# ऐसी अक्षरे
# दोन

(संस्थळ/नियतकालिकामध्ये वेळोवेळी प्रकाशित झालेल्या लेखांचा संग्रह)

## प्रभाकर नानावटी

# अनुक्रमणिका

# वैचारिक क्षमतेवर पसरलेली श्रद्धेची गडद छाया

माणूस हा एक विचित्र प्राणी आहे. या प्राण्याला नाविन्याची फार हौस आहे. त्याच्यात सर्जनशीलतेची क्षमता आहे. गुंतागुंतीच्या समस्यांना योग्य उत्तरं शोधण्याची हतोटी आहे. त्यानी केलेल्या तंत्रज्ञानातील अफाट प्रगतीमुळे मानवी जीवन सुसह्य होत चालले आहे. स्वत:च्या आरोग्य स्थितीवर संशोधन करत तो आता जास्तीत जास्त वर्षे जगण्याचा प्रयत्न करत आहे. दुर्धर समजलेल्या रोगांवर औषधोपचार शोधल्यामुळे निरोगी आयुष्य जगणे त्याला आता शक्य होत आहे. परंतु एवढे करूनसुद्धा अजूनही तो अविचारांना, चुकीच्या विचारांना बळी पडतोच आहे.

अनेक प्रसंगी त्याच्या विचारातील, त्यानी घेतलेल्या निर्णयातील विसंगती प्रकर्षाने जाणवू लागतात. या विसंगतींचे मूळ शोधल्यास त्याच्या विचारप्रक्रियेला श्रद्धेची पार्श्वभूमी लाभलेली असल्यामुळे साहजिकच त्याच्या विचारात व घेतलेल्या निर्णयात कमालीची तफावत जाणवते. किंबहुना त्यानी जोपासलेल्या श्रद्धाच त्याचे निर्णय घेतात की काय असे वाटू लागते. जो दृष्टीकोन पुरावा नसतानासुद्धा खरा आहे असा वाटत असतो त्यालाच सामान्यपणे आपण श्रद्धा म्हणतो. माणूस जोपासत असलेल्या श्रद्धा विविध मार्गाने आलेल्या असतात. काहीवेळा तो स्वत:हूनच आकर्षित झालेला असतो. काही श्रद्धा वाड-वडिलांपासून, काही मोठ्या लोकांच्या दबावामुळे, काही लहानांच्या प्रेमाखातर, काही शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक वातावरणामुळे त्याच्या मनात घर करून बसलेल्या असतात. स्वत:चाच दृष्टीकोन खरा आहे असा समज करून घेत असल्यास, त्यानी घेतलेल्या

निर्णयावर जोपासत असलेल्या त्याच्या श्रद्धा फार मोठ्या प्रमाणात परिणाम करू शकतात.

आपण रोज अनेक लहान - मोठे निर्णय घेत असतो, विविध प्रकारचे निर्णय घेत असतो. निर्णय घेत नसल्यास वा निर्णय घेणे टाळत असल्यास आपले जिणे खडतर झाले असते. निर्णय घेताना आपल्या हातून कळत न कळत चुकाही होत असतात. अनेक वेळा कुठेतरी चुकत आहोत हेसुद्धा कळत नाही. नंतर केव्हा तरी चूक उमगल्यास वेळ निघून गेलेली असती. या (घोड) चुका आपले श्रम, वेळ व पैसा वाया घालवत असतात. चुकीच्या निर्णयामुळे आपले आरोग्य धोक्यात येऊ शकते. प्रसंगी जीवावर बेतू शकते. देव - धर्म, तांत्रिक - मांत्रिक, बाबा - बुवा, फलजोतिषी, यांच्या क्षमतेवर आपली श्रद्धा असल्यास आपल्या काका - मामांचे भूत आपल्या मानगुटीवर बसले नाही ना , या विचाराने आपण अस्वस्थ होऊ लागतो. कुंडलीतील मंगळामुळे मन:शांती ढासळू लागते. बुवा - बाबांच्या नादी लागल्यामुळे घरातले वातावरण हळूहळू बिघडू लागते. जडी - बुटी, अंगार - धूप इत्यादींच्या उपचारामुळे आपण आपला जीव धोक्यात घालवतो. नवस - सायास, उपास-तपास, जत्रा - उरुस इत्यादीमुळे जीव हैराण होतो. श्रद्धेच्यापायी सारासार विचार करण्याची कुवतच हरवून बसतो.

आपण चुकीचा विचार का करतो, हा प्रश्न मनात आल्यास आपण खरोखरच मूर्ख तर नाही ना, असे वाटू लागते. सामान्यपणे तसे काही नसते. आपण मोठमोठ्या हुद्यावर असतो. अत्यंत जोखमीची कामं हाताळतो. आपल्या काही निर्णयामुळे हजारो हातांना रोजगार मिळतो, आपल्यामुळे गुंतागुंतीची यंत्रणा वा व्यवस्था विनातक्रार काम करत असते. अनेकांचे जीव वाचतात. तरीसुद्धा काही प्रसंगी आपल्यातील बहुतेकांच्या - डॉक्टर्स, इंजिनियर्स, उद्योगपती, नोकरदार यांच्यासकट शिकलेले सवरलेले व

अशिक्षितांच्यासुद्धा - विचार करण्यात, विचार करण्याच्या पद्धतीत काही उणीवा राहिलेल्या जाणवतात. व या उणीवांचे मूळ आपण जोपासत असलेल्या श्रद्धापर्यंत पोचते. श्रद्धेमुळे माहितीचे विकृतीकरण होते. मुळातच आपली पुरावे शोधण्याची व हाती आलेल्या पुराव्यांचे विश्लेषण करण्याची पद्धतच चुकीची असते. काही वेळा वेळ मारून नेण्यासाठी किंवा पुराव्यांच्या अभावी समस्यांचे सुलभीकरण केले जाते. विषयाकडे पुरेशा गंभीरपणे बघितले जात नाही. तर्कशुद्ध विचार करण्याचे वा अचूक निर्णय घेण्याचे कौशल्य आत्मसात केलेले नसल्यामुळे आपण तोंडघशी पडू शकतो. आपल्या शिक्षणपद्धतीतच विचार करण्याचे, तर्कशक्ती लढवण्याचे, विश्लेषण करण्याचे साधे प्राथमिक धडेसुद्धा दिलेले नसतात. ही अकुशलता आपल्या आयुष्यावर फार दूरगामी परिणाम करू शकते, हेच आपल्याला माहित नसते.

यांच्याच जोडीला विज्ञान व आभासी विज्ञान यातील फरक न कळल्यामुळे वा त्यांच्याबद्दलच्या चुकीच्या आकलनामुळे आपल्या विचारक्षमतेवर परिणाम होऊ शकतो. टीव्हीसारख्या प्रसार माध्यमातून बहुतेक वेळा चुकीच्या, तर्कविसंगत, भ्रामक अशा गोष्टींचे उदात्तीकरण होत असते. आर्थिक लाभ हाच मुख्य उद्देश असलेल्या टीव्ही प्रसार माध्यमाच्या व्यवसायात फलजोतिष, अतींद्रिय शक्तीचे (ओंगळ) प्रदर्शन, परामानसशास्त्राचे उदात्तीकरण, भूत - भानामतीसारख्या अंधश्रद्धांचा आक्रमक प्रसार, दैवीशक्तीबद्दलच्या अफाट कल्पनांचा बाजार, चमत्कारांची धूळफेक, इत्यादींची रेलचेल असते. वास्तवतेचा, वस्तुनिष्ठतेचा पूर्ण अभाव तेथे असतो. त्यामुळे पडद्यावरील सत्य हेच वास्तवातील सत्य आहे अशी समजूत करून घेतल्यामुळे आपण आपली विचार क्षमता हरवून बसतो. निर्णय घेत असताना अक्षम्य चुका होऊ लागतात. त्या चुका निस्तरता निस्तरता माणूस हैराण होतो. परंतु श्रद्धेच्या जबरदस्त मगरमिठीतून आपली सहजासहजी सुटका होत नाही.

उलट अशा अवैज्ञानिक गोष्टींच्या मान्यामुळे आपल्या श्रद्धा जास्त बळकट होऊ लागतात व क्रमेण विचारशक्ती कुंठित होऊ लागते. कुठलीही चिकित्सा न करता कुठल्याही गोष्टीचा स्वीकार करण्याची सवय जडते. श्रद्धेच्या पूर्ण आहारी गेल्यामुळे विवेकी व तार्किक विचाराऐवजी रूढी, परंपरा, मानसिक समाधान, आत्मिक उन्नती, अध्यात्म, कथा-पुराणातील दाखले, इत्यादींच्या आधारावर आपल्या श्रद्धेचा मनोरा डोलत असतो. काही वेळा आपले आर्थिक व सामाजिक हितसंबंध गुंतलेले असतात. त्यामुळेसुद्धा आपण श्रद्धेच्या विरोधात भूमिका घेवू शकत नाही.

मुळातच आपल्या समाजात चिकित्सेचा पूर्ण अभाव आहे. एवढेच नव्हे तर चिकित्सकतेबद्दल सुप्त घृणा आहे. चिकित्सा करणारे म्हणजे छिद्रान्वेशी, चांगल्या कामात खो घालणारे, नकारात्मक आयुष्य जगणारे, उत्साहावर पाणी टाकणारे अशी त्यांच्याबद्दलची एक प्रतिमा सश्रद्धांच्या मनात घर करून असते. या समाजात सश्रद्धांचाच वरचष्मा असल्यामुळे चिकित्सक नामोहरम होत असतात. बदनामीच्या भीतीमुळे चिकित्सकांना बहुतेक वेळा गप्प बसावे लागते. खरे पाहता चिकित्सक विश्लेषकाची भूमिका बजावत असतात. संभाव्य धोक्यांचा इशारा देत असतात. चिकित्सकता या गुणविशेषाची संवर्धन करण्याची खरी गरज आहे. त्यामुळे आपले निर्णय अचूक होतात. नियोजनपूर्वकपणे त्या निर्णयांची अंमलबजावणी करता येते. अडचणीवर मात करता येते. श्रद्धेच्या जगात चिकित्सेला स्थान नाही. कारण चिकित्सक प्रत्येक श्रद्धाविषयांचा अभ्यास करून उलटतपासणी घेत त्यातील विसंगती उघडे पाडतो. आपल्या अविचारी वर्तनावर बोट ठेवतो. चिकित्सा हे शहाणपणाचे लक्षण आहे. पुराव्याविना कुठलिही गोष्ट चिकित्सक सहजासहजी स्वीकारत नाही.

श्रद्धेची गडद छाया असलेली ही मानसिकता कशा कशामुळे घडत असावी याचा थोडासा जास्त खोलात जाऊन विचार करू लागल्यास खाली नमूद केलेल्या गोष्टी ठळकपणे दिसू लागतील.

*आपण प्रत्यक्ष आकडेवारीपेक्षा ऐकीव माहिती व मनोरंजक गोष्टीवर विश्वास ठेवतो.*

माणसांना त्यांच्या आदिम अवस्थेपासूनच गोष्टी सांगण्याची वा गोष्टी ऐकण्याची सवय जडलेली आहे. उत्क्रांत काळातील ही सवय अजूनही टिकून आहे. रानटी अवस्थेतील माणूस गुहेपाशी, उघड्यावर जाळ करून आपल्या टोळीतील लोकांपुढे गोष्टी सांगत वा ऐकत असे. आजचा आधुनिक माणूस क्लबमध्ये, टीव्हीसमोर, गोल्फच्या मैदानावर, चहा - कॉफी - दारूचे घुटके घेत घोळका करून गप्पा रंगविण्यात वेळ घालवत आहे. जसजसे प्रसार माध्यमांचा - मौखिक, हस्तलिखित, मुद्रित, फोन, रेडिओ, टीव्ही, संगणक, इंटरनेट, मोबाइल फोनइत्यादींचा - विकास होऊ लागला, तसतसे आपल्यातील गोष्टीवेल्हाळपणाला ऊत येत आहे. त्यामुळे बिनबुडाच्या गोष्टीसुद्धा खरे आहेत असे वाटू लागतात. गप्पा - गोष्टी मनोरंजन करतात, कल्पनाशक्तीला वाव देतात हे मान्य करतानाच त्यांचा पुरावा म्हणून स्वीकारता येत नाही. माणूस हा सामाजिक प्राणी असल्यामुळे एकमेकातील नातेसंबंध घट्ट करण्यासाठी अनुभवजन्य गोष्टींच्या देवाण - घेवाणीला पर्याय नाही, हे आपण समजू शकतो. परंतु त्यानाच पुरावे म्हणून मान्यता देत असल्यास आपली तार्किकशक्ती कुंठीत होत जाईल व आपले निर्णय चुकीचे ठरू लागतील. ज्या माहितीच्या आधारे आपण निर्णय घेत असतो, ती माहितीच चुकीची, अर्धवट, सापेक्ष वा बिनपुराव्याची असल्यास आपल्या निर्णयामुळे अनेक कटकटी निर्माण होण्याची शक्यता असते.

आपण एखादी कार घ्यायची ठरवत असल्यास कारसंबंधीची इत्थंभूत माहिती गोळा करण्याच्या मागे लागतो. वेगवेळया कंपनीच्या कार्सची, त्यांच्या मॉडेल्सची व आपल्या अपेक्षेची (कुवतीची!) चिकित्सक व तुलनात्मकरित्या अभ्यास करतो. कंपनीची बाजारातील पत, देखभालीची सुविधा, विक्रीपश्चात सेवा, गॅरंटी, वॉरंटी इत्यादी अनेक मुद्याचे विश्लेषण करून पूर्ण विचारांती अमुक कंपनीचे अमुक मॉडेल घेण्याच्या निर्णयापर्यंत पोचतो. सहज म्हणून गप्पांच्या ओघात एखाद्या मित्रासमोर आपल्या निर्णयाचा उल्लेख केल्यावर "ती गाडी ना! अजिबात घेऊ नकोस. तसली गाडी घेऊन मला पश्चात्ताप झाला. एकदा क्लच बदलावा लागला. ब्रेकचे प्रॉब्लम्स आहेतच. त्याऐवजी ही गाडी घे. एकदम फर्स्ट क्लास! " यावर आपली प्रतिक्रिया काय असणार? बहुतेक जण मित्राच्या वैयक्तिक अनुभवावर विसंबून आपले निर्णय बदलून टाकतील. मित्रानी शिफारस केलेली गाडी घेतील.

खरे पाहता आपला आधीचा निर्णय अधिक वस्तुनिष्ठ, आकडेवारी व प्रत्यक्ष पुराव्यावर आधारित होता. परंतु आपली मानसिकताच कचखाऊ असल्यामुळे शेवटच्या क्षणी निर्णय फिरवून मित्राच्या अनुभवावर श्रद्धा ठेऊन भलताच निर्णय घेतो. मित्राचा अनुभव वैयक्तिक स्वरूपाचा होता. त्यानी घेतलेल्या गाडीत खरोखरच क्लच वा ब्रेकच्या समस्या असू शकतील. म्हणून सर्वच गाड्या तशाच असावेत हा समज अत्यंत चुकीचा आहे. अनुभवाचे बोल, आकर्षक संभाषण शैली, जाहिरातबाजी, आकडेवारीची जागा घेऊ शकत नाहीत. आकडेवारीचे विश्लेषण कंटाळवाणे, दुर्बोध, वा अमूर्त असे वाटले तरी त्याच्यातून मिळणारी माहिती अचूक व निर्णय घेण्यास अत्यंत उपयुक्त असते. आपण मात्र आकडेवारी बाजूला सारून भलत्याच अनुभवाच्या ऐकीव गोष्टीवरून आयुष्यातील अत्यंत महत्वाचे निर्णय घेत

असतो. कारण आपली मानसिकताच श्रद्धेच्या गडद छायेत अडकून पडलेली असते.

वैचारिक क्षमतेवर पसरलेली श्रद्धेची गडद छाया असलेली ही मानसिकता कशा कशामुळे घडत असावी याचा थोडासा जास्त खोलात जाऊन विचार करू लागल्यास आणखी काही गोष्टी लक्षात येतील.

*आपण आपल्या श्रद्धा-विचारांशी पूरक असलेल्या गोष्टीच फक्त लक्षात ठेवतो.*

आपण नेहमीच आपल्या विधानांच्या पूरक अशा गोष्टींच्यांच शोधात असतो. आपला फलजोतिषावर विश्वास असल्यास जोतिषाने सांगितलेली एखादे क्षुल्लक भाकित खरे ठरले तरी आपण त्याची वाहवा करत राहणार. त्याच्यावरील श्रद्धेत भर पडतच राहणार. त्यानी सांगितलेल्या इतर हजारो भाकिते खोटे ठरल्या तरी आपल्या श्रद्धेला अजिबात तडे जाणार नाहीत. आपल्या श्रद्धेला धक्का लावणाऱ्या गोष्टी आपल्या खिजगणतीत नसतात. त्यामुळे यश आपल्या लक्षात राहते व अपयश स्मृतीच्या अडगळीच्या कोपऱ्यात जाऊन पडते.

आपल्या ओळखीतला एखादा माणूस दानशूर आहे असे आपल्याला मनोमन वाटत आल्यास त्यानी एखाद्या गरजू संस्थेला दिलेली क्षुल्लक देणगी आपल्याला फार मोठी वाटते. तो कायमचाच सर्वांना अशीच देणगी देत असेल अशी खूणगाठ आपण मनातल्या मनात बांधत असतो. परंतु प्रत्यक्षात तो हजारो पिडीतांना रिकाम्या हाताने परत पाठवत असला तरी त्याच्याविषयीची आपली श्रद्धा अचल राहते. त्या देणगीदाराच्या विरोधातील एकही शब्द ऐकून घेण्याच्या स्थितीत आपण नसतो. आपल्या (क्षद्धेच्या) विश्वातच रमणाऱ्या या कूपमंडूक वृत्तीमुळे आपले जबरदस्त नुकसान होऊ

शकते, याचीसुद्धा आपल्याला भान नसते. त्यामुळेच आपल्या विधानांची, वर्तनांची वा निर्णयांची चिकित्सा करणारे शत्रू समान वाटू लागतात.

*योगायोग व चान्समुळेही गोष्टी घडू शकतात याचा आपल्याला (सोईस्करपणे) विसर पडलेला असतो.*

जगात काही वेळा योगोयोगाने पण गोष्टी घडू शकतात, हे आपण नेहमीच विसरतो. कावळा बसायला व झाडाची फांदी मोडायला कारण योगोयोग असतो, कावळ्याची किमया नव्हे. शेअर बाजारातील एकाद्या कंपनीचे समभाग कायमचेच तेजीत आहेत अशी जाहिरात वाचून आपण त्या कंपनीत फार मोठी गुंतवणूक करत असल्यास ते महागात पडण्याचीच शक्यता जास्त. कारण त्या विशिष्ट कंपनीची कार्यक्षमता त्या कालावधीत चांगली असेल. परंतु यांनंतरसुद्धा ती तशीच राहील याची खात्री देता येत नाही. योगायोगामुळे त्या समभागावर कित्येकांनी प्रचंड नफा कमविला असेलही. परंतु याचा अर्थ तो नफा तुम्हालाही मिळू शकेल किंवा समभागामधील गुंतवणूक आदर्शवत आहे असे ठामपणे सांगता येणार नाही. नाणे उडवून छाप - काटा ठरवायचे असल्यास सतत पाच-सहा वेळा छाप येण्याची शक्यता नाकारता येत नाही. परंतु यानंतरसुद्धा छापच येईल वा छापच येत राहील याची खात्री कुणीच देवू शकत नाही.

आपण तीन - चार कंपन्यांच्यात गुंतवणूक केल्या केल्या भाव वधारला की त्या विषयात तज्ञ झालो ही समजूतसुद्धा एक श्रद्धा आहे. त्यावरून कंपन्यामध्ये सर्व पैसा गुंतवण्याचा सपाटा लावल्यास पश्चात्तापाची वेळ येईल. कारण मुळातच अशा गोष्टी योगायोगाने घडत असतात याचा मागमूसही आपल्याला नसते. आपल्या 'शहाणपणा'वर आपली नितांत श्रद्धा असल्यामुळेच अशाप्रकारचे जीवघातकी निर्णय आपण घेत असतो व नंतर कर्जबाजारी होतो. खुल्या मनाने थोडा वेळ तरी विचार करण्याची तसदी घेतल्यास त्यामागील

कार्य-कारणभावामध्ये योगायोग व चान्स हेसुद्धा कारण असू शकतील हे नक्कीच लक्षात येईल व आर्थिक नुकसान टाळू शकेल.

*आपण नेहमीच आपल्या परिस्थितीचे व आपल्या भोवतालच्या जगाचे चुकीचे आकलन करतो.*

आपले ज्ञानेंद्रिय आपल्याला कधीच दगा देणार नाहीत यावर आपली अढळ श्रद्धा असते. परंतु वास्तव परिस्थितीच्या चुकीच्या आकलनामुळे साध्या दोरीला साप म्हणून भुईवर थोपटत असतो. भुता-खेतावर विश्वास ठेवणाऱ्यांना भूत हमखास दिसतात व शपथेपूर्वक सांगण्याची त्यांची तयारी असते. परंतु आपल्याला भास होऊ शकतात याची पुसटशी जाणीव त्यांच्यात नसते.

काही वर्षापूर्वी दिल्लीत "एक माकडसदृश माणूस प्राणी रात्रीच्या वेळी माणसांना जखमी करत आहे, त्याची लांब लांब नखं आहेत, उंच इमारतीवरून उड्या मारत आहे, लोकांना ओरबडून रक्त बंबाळ करत आहे, " अशा बातम्या वृत्तपत्रांच्या पहिल्या पानावर छापून आल्या. आज अमुक गल्लीत माकडांनी हल्ला केला, तमुक बाजारात माकडांनी ओरबडले, अमुक इतके लोक दवाखान्यात उपचार घेत आहेत, अशा बातम्यांना ऊत आला.लोक घाबरून रात्रीच्या वेळी बाहेर पडेनासे झाले. माकडांना पकडण्यासाठी पोलीस फौज संघटित झाली. कसल्या तरी अलौकिक शक्तीमुळेच अशा घटना घडत आहेत असे जनसामान्यांना खात्री होऊ लागली. व त्यातच टीव्ही व वृत्तपत्रांनी भर घातली.

परंतु काही विवेकवादी संघटनांनी तपास केल्यानंतर मानवी वेषातला वानर वा वानराच्या वेषातला मानव असा कुठलाही प्रकार नसून काही विघातक गुंडांच्या टोळयानी आपापसातील हेवेदावे मिटवण्यासाठी एकमेकावर छुपे हल्ले करत आहेत, हे लक्षात आले. अंगावर घोंगडी पांघरून इमारतींच्या

छतावरून गुंड पळापळी करत असल्यामुळे रात्रीच्या अधारात बघणाऱ्यांना (व तसे शपथेपूर्वक सांगणाऱ्यांना) ते खरोखरच माकड वाटत होते. गुंडांच्या टोळींवर पोलीसांनी बगडा उगारताच चोवीस तासात सारे कसे शांत शांत झाले.

विचारामध्ये चुकीच्या आकलनांचा शिरकाव होऊ लागल्यास आपल्या समोरील समस्यांच्या संख्येत भर पडत जाते. समस्या जास्त गुंतागुंतीचे होतात. आपल्या इच्छा-आकांक्षावर त्यांचा दुष्परिणाम होतो. मुळातच आपल्या अपेक्षांच्या आक्रमकतेमुळे वास्तवतेचे भान रहात नाही. सत्य परिस्थितीचे योग्य आकलन नसल्यामुळे अफवावर, अनैसर्गिक अशा गोष्टीवर, चमत्कारसदृश घटनांवर विश्वास ठेवण्याची मानसिकता बळावते. त्याप्रमाणे आपले वर्तन बदलत गेल्यास शेवटी आपलेच नुकसान होते. वैयक्तिक अनुभवावर ठेवलेली श्रद्धा - विशेषकरून अलौकिक, अद्भुत व अतिंद्रिय शक्तीवरील श्रद्धा - गाढ होत जाते. विचारात तफावत जाणवू लागते. विचारांची साखळी तुटू लागते. व त्यातून चुकीचे निर्णय घेण्याची सवय जडते.

*आपण समस्यांचे योग्य उत्तर शोधण्याऐवजी त्यासाठीच्या पळवाटा शोधण्याच्या प्रयत्नात असतो.*

आधुनिक दैनंदिन जीवन दिवसे न दिवस फार गुंतागुंतीचे होत चालले आहे. दिवसभरात एकाचवेळी अनेक समस्यांचा सामना करावा लागतो. अनेक गोष्टी हाताळावे लागतात. निर्णयापर्यंत पोचण्यासाठी अनेक घटकांची तपासणी करावी लागते. आधुनिक तंत्रज्ञानाने आपल्या समोर माहितीचा डोंगरच उभा करून ठेवला आहे. त्यातून नेमकी माहिती शोधणे अत्यंत जिकिरीचे ठरत आहे. उपलब्ध माहितीचे विश्लेषण करताना मनस्ताप होतो. यामुळे शेवटी वैतागून काही शॉर्टकट्स शोधत, पळवाटा शोधत वेळ मारून नेण्याच्या प्रयत्नात आपण असतो. आजचे मरण उद्यावर ढकलण्याची ही घाई

अत्यंत धोकादायक असते, हेच आपण लक्षात घेत नाही. या पळवाटा आपल्याला धोक्याच्या खाईत लोटतात. वर्षभर अभ्यास न करता ऐन परिक्षेच्या वेळी सिद्धी विनायकाच्या रांगेत (ताटकळत!) उभे राहून गणेशाची आळवणी करत असल्यास शेवटी नापासच होण्याची पाळी येते. टीव्हीच्या पडद्यावरील चित्तथरारक खेळ बघत असताना आपल्यालाही तसेच करावेसे वाटू लागते. परंतु पडद्यावर सोपे करून सांगितलेल्या गोष्टी मुळातच फार गुंतागुंतीचे असतात, याकडे जाणून बुजून दुर्लक्ष करतो. अशा प्रकारच्या खेळासाठी भरपूर सराव करावा लागतो. अशा खेळातील संभाव्य धोक्यांचा विचार न करता माहितीचे जुजबी विश्लेषण करून तसे प्रयत्न करू लागल्यास अपघाती मृत्यू येण्याचा संभवच जास्त. समस्यांचे सुलभीकरण धोकादायक ठरू शकते. सुलभीकरणामुळे काही वेळा श्रम व पैसा वाचण्याची शक्यता असली तरी, ही मानसिकता तशीच राहिल्यास आपण गोत्यात येऊ शकतो. स्वत:वरील फाजिल विश्वास केव्हा दगा देईल त्याचा नेम नाही. या फाजिल विश्वासाचेच हळूहळू श्रद्धेत रूपांतरित होत जाते. मुळात सर्व श्रद्धा एका प्रकारे पळवाटाच असतात. व या पळवाटा कामचलाऊ निर्णयच देऊ शकतात.

*आपली स्मृती दगा देऊ शकते.*

आपण आपल्या मेंदूला संगणकसदृश मानतो. आपल्या आयुष्यभरात जे काही घडत असते ती सर्व माहिती जशीच्या जशी आपल्या मेंदूत जाऊन बसते व जेव्हा पाहिजे तेव्हा आपण ती माहिती तशीच्या तशीच आपल्या समोर उभे करू शकतो, असे वाटत असते. परंतु स्मृतीपटलावरील माहितीत बदल होऊ शकतो हे आपण लक्षात घेत नाही. काही (कडू) आठवणी किंवा आठवणीतील काही (नको असलेला) भाग पुसून जातात. आपल्या श्रद्धा-विचारामुळे त्यात बदल होऊ शकतात. या आठवणी जसेच्या तसे परत येतात याची पण काही खात्री देता येत नाही. त्यामुळे केवळ स्मृतीला ताण देऊन किंवा त्यावर विसंबून राहून निर्णय घेत असल्याल काही वेळा निर्णय चुकीची ठरण्याची शक्यता असते.

आपल्या स्मृतीपटलावर संग्रहित झालेली माहिती आपल्या श्रद्धा विषयांशी निगडित असतात. श्रद्धेला तडा देणाऱ्या आठवणी लगेचच पुसून जातात. त्यामुळे एकदा फसलो गेलो तरी पुन्हा पुन्हा फसतच जातो. अनुभवांती शहाणपण हे फार कमी लोकांना जमते. संमोहनावस्थेतच असल्यासारखे आपण वावरत असतो. पुढच्याला ठेच मागचा शहाणा असे क्वचितच घडते.

अशा प्रकारे आपल्यातील निर्णयक्षमतेला मगरमिठीत पकडून ठेवलेल्या श्रद्धाविषयांशी दोन हात केल्याविना आपण आपल्या पूर्ण क्षमतेने जीवन जगू शकत नाही. ही मगरमिठी सैल करत गेल्यास अचूक निर्णयांच्या जवळपास जाण्याची शक्यता वाढते. आपल्यासमोरील समस्यांना अचूक उत्तर शोधणे सुलभ होते. यासाठी श्रद्धेच्या अंधारातून बाहेर पडण्याशिवाय गत्यंतर नाही.वैचारिक क्षमतेच्या संवर्धनासाठी श्रद्धेचे कवच भेदणारी मानसिकता विकसित करणे ही त्याची पहिली अट ठरेल.



# फसवा फसवी

आपल्यासारख्यांचा जीवनाचा प्रवास हा नेहमीच भरपूर खाच – खळगे - खड्डे असलेल्या रस्त्यावरून होत असतो. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट म्हणजे त्यातील प्रत्येक टप्प्याला शेवट असतो व आपण हुश्श.... म्हणून तो संपवतो. टप्पा पार केल्याचा (क्षणिक) आनंद घेत असतो. त्यामुळे त्या टप्प्यापुरता केलेल्या प्रवासाचे ओझे वाटत नाही. आपले शिक्षण, आपल्याला मिळालेली नोकरी वा पत्करलेला व्यवसाय, घर-दार, प्रेम – लग्न यातील रुसवे – फुगवे, कधीतरी संपणार व सारे कसे शांत शांत होईल या आशेवर आपण जगत असतो व एकंदर जीवन आपल्याला निराश करत नाही असा सामान्यपणे सर्वांचा अनुभव असतो. फक्त प्रत्येक टप्पा पूर्ण करत असताना शेवटच्या क्षणी काही अचानक अडथळे उभे राहू नयेत म्हणून भरपूर प्रयत्नही केले जात असतात. अगदीच प्रकरण हाताबाहेर जात असल्यास *जाऊ दे गेलं खड्डयात...* असे म्हणत कुणाबरोबर तरी चार पेग घेत, किंवा दूरच्या ठिकाणी एकांतात वा कुठल्या तरी बुवा-बाबाच्या सांनिध्यात किंवा आपल्याच पार्टनरला *हाँजी हाँजी* करत प्रसंगाचा सुखांत करण्याच्या प्रयत्नात असतो.

परंतु जेव्हा माणसं अथक प्रयत्नांनी जीवनातील एकेक टप्पे पूर्ण करून आपली चांगली बाजू जगापुढे मांडण्याचा प्रयत्न करत असतात, तेव्हा ते अप्रत्यक्षपणे आपली काळी बाजूसुद्धा उघड करतात, असे मानसतज्ञांचा दावा आहे. जेव्हा टप्पा पूर्ण होण्याचा शेवटचा क्षण येतो तेव्हा आपल्या फायद्यासाठी वाटेल ते करण्याची तयारी त्यांची असते. साम, दाम, दंड, भेद यातले काहीही त्यांना चालते. एवढेच नव्हे तर त्यासाठी फसवणूक करण्याइतपत त्यांची मजल जाऊ शकते. सामान्यपणे हातातली संधी वाया जाऊ नये यासाठी ही धडपड असते. व्यवस्थेला फसविल्यामुळे काही बिघडत नाही, हाही आत्मविश्वास त्यात असतो.

यासंबंधात मानसतज्ञानी एक मजेशीर प्रयोग करून बघितला. नाणे उडवून छाप की काटा या प्रयोगासाठी आवाहन केले व त्याला मोठ्या प्रमाणात प्रतिसाद मिळाला. हा एक ऑन लाइन प्रयोग होता. त्यात प्रत्येकाने घर बसल्या नाणे उडवायचे व ते खाली यायच्या आत छाप की काटा याची नोंद ठेवत ताबडतोब इंटरनेटद्वारे मानसतज्ञाला कळवायचे होते. बरोबर आलेल्या उत्तरासाठी एक लहानसे बक्षीसही देण्यात येणार होते.

ठराविक दिवशी, ठराविक वेळी सर्व स्पर्धक आपापल्या संगणकासमोर उभे राहून खिशातील नाणे बाहेर काढून, उडवून, छाप की काटा याची नोंद मानसतज्ञाला कळवू लागले. या नोंदी खरे आहेत की खोटे याची वैयक्तिक तपासणी शक्य नसले तरी संख्याशास्त्रीय नियमाप्रमाणे 50:50 (फार तर 5-10 टक्के इकडे तिकडे) उत्तर यायला हवे. परंतु हाच आकडा 70:30 वा 80:20 झाल्यास, काही तरी त्यात काळेबेरे आहे असे संख्याशास्त्रीय निकष आहे.

या प्रयोगाचे निष्कर्ष अगदी आश्चर्यकारक होते. प्रयोगात निश्चित केलेल्या 10 फेऱ्यांपैकी पहिल्या 4-5 फेऱ्यांची उत्तरं संख्याशास्त्रीय नियमाला अनुसरून 50:50 च्या जवळपास होत्या. म्हणजे स्पर्धेत भाग घेतलेले सामान्यपणे छाप काट्यांची नोंद योग्य प्रकारे ठेवत होते. परंतु जसजसे 10वी फेरी जवळ येऊ लागली तसतसे नोंदीमध्ये फार मोठी तफावत दिसू लागली. याचाच अर्थ काही जण मुद्दामहून चुकीची नोंद कळवत होते. प्रत्येक फेरीत किती वेळा नाणे उडवले व त्यात किती बरोबर आले यात काही योगायोगाचा संबंध नव्हता. परंतु यानंतर अजून किती वेळा नाणे उडवायचे आहे याबद्दल उत्सुकता होती; किती फेऱ्या राहिल्या याबद्दल कुतूहल होते.

समजा, अजून 3 वेळा नाणे उडवायचे राहिल्यास या तिन्ही वेळा फसविण्याची संधी स्पर्धकांना उपलब्ध होती. किंवा 8व्या, 9व्या वा 10व्या फेऱ्याच्या वेळी खोटी नोंद कळवून जास्तीत जास्त बक्षीस मिळवणे त्यांना

शक्य होते. यावरून एखाद्या टप्प्याच्या शेवटी शेवटी काही तरी करून तो टप्पा पूर्ण करायला हवा व त्यासाठी फसवले तरी चालेल ही मानसिकता त्यात होती.

मानसतज्ज्ञांना या प्रयोगाचे निष्कर्ष अपेक्षेप्रमाणे आहेत असे वाटले तरी प्रत्यक्ष वास्तव परिस्थितीतसुद्धा माणसं (स्वतःला) व इतरांना फसवत असतील का याचाही अंदाज घ्यायचा होता. या दुसऱ्या प्रयोगासाठी आवाहन करून चार - पाचशे वाचकांची यादी निश्चित केली आणि त्यांना 10 लेख वाचून श्रेणी देण्यास सांगितले. लेख वाचण्यासाठी लागलेल्या वेळेप्रमाणे त्यांना बिदागी दिली जाईल असे ठरले. जेव्हा भाग घेणारे वाचक लेख वाचत होते तेव्हा त्यांच्या अपरोक्ष वेळेची नोंद ठेवली जाणार होती.

पहिल्या 4-5 लेखासाठी वाचकांनी सांगितलेली वेळ व घड्याळात नोंदवलेली वेळ सामान्यपणे जुळत होते. परंतु जसजसा शेवटचा लेख जवळ येऊ लागला तसतसा वेळेतील फरक ठळकपणे जाणवू लागला. 6व्या – 7व्या लेखाच्या वेळेत 25 टक्के तर 9व्या 10व्या लेखाच्या वेळी ही टक्केवारी प्रचंड प्रमाणात वाढले.

अशा प्रयोगाचे निष्कर्ष केवळ प्रयोगापुरतेच सीमित नसून आपल्या जीवनातील प्रत्येक क्षेत्रासाठी धोक्याची सूचना देणारे ठरतील. कारण आपण निवडून दिलेल्या लोक प्रतिनिधींची, विद्यार्थ्यांची, नोकरी करणाऱ्यांची वा गोल्फ – फुटबॉल –व्हालीबॉल यासारख्या क्रीडा प्रकारांची कालावधी निश्चित असते व कालावधी संपायच्या आत काहीही घडू शकते, याची जाणीव आपल्याला ठेवावी लागेल.

आपण जेव्हा शेवटच्या टप्प्यात प्रवेश करत असतो तेव्हा आपल्या मानसिकतेत फार मोठी स्थित्यंतरं होतात. आपण अधीर होतो, उतावळे होतो, खिन्नतेला कवटाळून बसतो. आनंदाची अनुभूती देणारे मेंदूतील Dopomine

हे संप्रेरक या टप्प्यात कदाचित पुरेशा प्रमाणात उत्पन्न होत नसेल. म्हणूनच टूथ पेस्टच्या ट्यूबमधील पेस्ट संपलेले आहे हे दिसत असूनसुद्धा जास्तीत जास्त पिळून पेस्ट बाहेर काढण्याचा वृथा प्रयत्न या फसवाफसवीत दिसत असतो.



# लवासाचा 'आदर्श' घोटाळा

रोजगार, वीज, पाणी, रस्ते, यासारख्या मूलभूत गरजा भागविणाऱ्या सोई-सुविधांची रेलचेल शहरी भागातच असल्यामुळे शहरीकरण अनिवार्य होत आहे. काही मूठभर शेतकरी व शेतमजूर सोडल्यास खेड्यातील लोंढेच्या लोंढे शहरात वस्त्या करत आहेत. खेडी ओस पडत आहेत. असे असले तरी शेतजमिनींचे मालक स्वत:च्या जमिनीला जास्तीत जास्त बाजारभाव मिळावा या प्रयत्नात असतात. एखादा शासन पुरस्कृत प्रकल्प त्या भागात येत असल्यास अशा शेतकऱ्यांना चेव चढतो व काही तरी निमित्त शोधून चळवळ - आंदोलन उभे करून जास्तीत जास्त नगद फायदा पदरात पाडून घेण्याच्या प्रयत्नात ते असतात. कदाचित एखादी खासगी कंपनी वा उद्योजक यांच्या डोक्यात मनी-मेकिंगची भन्नाट कल्पना असल्यास शेतकरी स्वत:ची जमीन फुंकून त्यांच्या मागे लागतात. काही वेळा त्यांचे भलेही झाले असेल. परंतु बहुतांश वेळा शेतकरी नागवले जातात. प्रत्येक खेड्यात शेतीवरील प्रेमाखातिर शेती करणारे हाताच्या बोटावर मोजता येतील एवढेच असावेत. शेती हा तोट्याचा धंदा झाल्यामुळे बहुतेक शेतकरी जमीन विकण्याच्या पावित्र्यात असतात. परंतु शासन तुटपुंज्या किंमतीत जमीन बळकावत असल्यामुळे शेतकरी नेहमीच शासनावर नाराज असतात.

आपल्या शासनकर्त्यांचा डोक्यात केव्हा काय येईल याची शाश्वती नाही. कुणीतरी परदेशात जातो - तेथे काही तरी बघतो - व येथे येऊन आम्ही एंव करू त्यंव करू अशी बढाई मारत जनसामान्यांची दिशाभूल करू लागतो. कोकण किनाऱ्याचे कॅलिफोर्निया हे असेच एक विकलेले स्वप्न. मुंबईचे शांघाय करू हे एक दुसरे स्वप्न. त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील पर्यटन विकासासाठी राज्यभर हिलसिटीज उभारण्याची अफलातली कल्पना अशाच एका सुपीक डोक्यातून आलेली. गुंतवणूक करणारे, प्रशासकीय अधिकारी,

राजकीय नेते, श्रीमंत शेतकरी, इत्यादी सर्व घटक संगनमताने जनतेला मूर्ख बनवू शकतात याचे हे एक जिवंत उदाहरण. या सर्वांच्या दृष्टीने सगळयाना फायदाच फायदा. विन विन विन.... सिच्युएशन. फक्त बळी जातो तो पर्यावरणाचा, डोंगर माथ्यांचा, दऱ्याखोऱ्यांचा. शेतजमीनीचा. परंतु कोण लक्षात घेतो?

अशाच प्रकारे स्वप्न विकण्याच्या प्रयत्नातून पुणे शहराच्या जवळ लवासा गिरीशहर आकार घेत आहे व जास्तीत जास्त घोटाळयात फसतही आहे. या प्रकल्पाची जाहिरात करताना आशियाखंडातील पहिली मानवनिर्मित हिलसिटी असे आवर्जून उल्लेख केला जात आहे. 1990 च्या दशकात या ठिकाणी एक नीटनेटके साधे हॉटेल उभारण्याचा बेत असलेल्या प्रवर्तकांचा पसारा कंपन्यांची नावे बदलत आजमितीला लवासा कार्पोरेशन कंपनी लिमिटेड (LCL-एलसीएल) या नावाने वावरत आहे व ही कंपनी उभे करत असलेल्या शहराला (आजतरी) लवासा म्हणून ओळखले जात आहे. लवासा हे नाव बदलून पुढे मागे कधीतरी कुठल्यातरी नेत्याच्या नावे हे शहर ओळखले जाण्याची शक्यता नाकारता येत नाही... शरद नगर, अजित नगर... वा सुप्रिया नगर.. काहीही होऊ शकेल

पुण्यापासून जेमतेम 40 किमी अंतरावर पिरंगुटला जात असताना वाटेवरच आपल्याला हे शहर दिसू लागेल. याची छायाचित्रे वा प्रत्यक्ष लांबून बघितल्यावर आपण स्वप्न तर पाहत नाही ना असे वाटू लागेल. इटली वा स्वित्झर्लंडसारख्या युरोपियन देशातील हिरवेगार खेडी वा रिसॉर्टच्या स्वरूपात ही जागा दिसू लागेल. रंगीबेरंगी उंच उंच इमारती, इमारतींना वेढलेली तळे, काही ठिकाणी (कृत्रिम) धबधबे... हे सर्व डोळेभरून पाहताना आपण कुठल्या देशात आहोत असा भास होईल. जेमतेम 30-40 टक्के बांधकाम पूर्ण झालेले हे गिरीशहर अर्धवट अवस्थेत असूनसुद्धा उच्चमध्यमवर्गीयांना व नवश्रीमंतांना

अशा निसर्गरम्य ठिकाणी आपलाही एक टुमदार बंगला वा रो हाउस वा निदान एखादा 3-4 बेडरूमचा फ्लॅट असावा असे वाटल्यास नवल वाटणार नाही. आपल्याजवळ पैसा आहे, पैशाने सर्व काही विकत घेता येते व आपण आपल्यापुरते मौजमजेत राहू शकतो या संकुचित उद्देशाने प्रेरित झालेल्यांना इतर गोष्टींची काळजी करण्याचे काही कारणच नाही. आताच या शहरातील रस्त्यांची नावे - थिकेट (Thicket), एलोसिया (Elosia) इत्यादी - जाहिरात वाचणाऱ्यांना खुणावत आहेत.

शहराच्या मध्यभागी असलेल्या टाउन हॉलची इमारतच एखाद्या कुठल्याही मल्टीमिलियन कार्पोरेटच्या ऑफिसला लाजवेल अशी आहे. आतापर्यंत सुमारे 700 हेक्टेर (700x100x40000 स्क्वे.फू) बांधकाम पूर्ण झालेले असून अजून 4300 हेक्टेर जमीन विकसित होणे बाकी आहे. सह्याद्री पर्वताच्या रांगेतून पश्चिम घाटातील दऱ्या खोऱ्यातून वाहणारे पाणी, मोशी नदीवरील वरसगाव धरणाचे पाणलोट क्षेत्र आणि भोवतीचे दाट जंगल या नैसर्गिक आकर्षणामुळे लवासातील बांधकामाला मागेल ती किंमत मिळणार याची प्रकल्प प्रवर्तकांना पुरेपूर खात्री आहे. म्हणूनच वेळेवर प्रकल्प पूर्ण करण्याची घाई कंपनीला होती/आहे. गेल्या 25 नोव्हेंबर 2010 पर्यंत हा भाग कामगारांनी व जेसीबीने गजबजलेला. शेकडो कामगार, साइट इंजिनियर्स, मटिरियल सप्लायर्स यांच्या भाऊगर्दीमुळे हे शहर काही दिवसातच पूर्ण होणार असे वाटत होते. परंतु त्या दिवशी कुठेतरी माशी शिंकली. एवढ्या 'चांगल्या' प्रकल्पाला दृष्ट लागली. केंद्रीय पर्यावरण व वन विभागा(केपववि)कडून येथील काम थांबविण्याचा आदेश आला. कंपनी मुळापासून हादरली. येथील बांधकाम करणाऱ्या हिंदुस्तान कन्स्ट्रक्शन कंपनीला हा फार मोठा आघात होता. केपववि च्या मते अशा प्रकारच्या प्रकल्पासाठी केपववि कडून ना हरकत

प्रमाणपत्र कंपनीने घेतले नव्हते. कंपनी मात्र महाराष्ट्र शासनाच्या पर्यावरण विभागा(मपवि)च्या जुजबी अनुमतीवरून बांधकाम रेटत होती

मार्च 2011च्या पहिल्या आठवड्यात या केपवविच्या Infrastructure and Coastal Clearance Zone (CRZ) तज्ज्ञसमितीने या प्रकल्पाच्या योजनेची व विकास आराखड्याची पुनर्तपासणी करण्याची शिफारस केली. कारण या प्रकल्पामुळे होणाऱ्या पर्यावरण ऱ्हासाचा विस्तृतपणे अभ्यासच यापूर्वी केलेला नाही. त्याच वेळी अर्धवट राहिलेले काम पूर्ण करण्यासही परवानगी देण्यात आली. फक्त ज्या इमारतींचे बांधकाम जोत्यापर्यंत झालेले आहे त्यावरील निर्बंध उठवले नाहीत. अवैध बांधकाम रोखण्यासाठी या खात्याने उचललेले हे पाऊल होते.

उच्च न्यायालयाच्या निर्देशानुसार केंद्र व राज्य शासनातील पर्यावरण तज्ज्ञ व या खात्यातील अधिकाऱ्यांच्या उच्चस्तरीय समितीने जानेवारी, 11 रोजी प्रकल्प ठिकाणी भेट देऊन अहवाल सादर केला. जानेवारी 13 तारखेच्या या अहवालामध्ये पर्यावरण हानीस कारणीभूत ठरणाऱ्या अनेक बाबींचा उल्लेख आहे. मनमानी करून डोंगर पोखरलेली उदाहरणं आहेत.

मेधा पाटकर यांची NAPM (राष्ट्रीय जन आंदोलन समन्वय) व इतर काही स्वयंसेवी संघटनांनी उच्च न्यायालयात याविषयी जनहित याचिका सादर केली होती. याच अनुषंगाने केपवविने पुढील बांधकाम करण्यास स्थगिती दिली. या स्थगितीच्या विरोधात कंपनीने केंद्रीय पर्यावरण व वन मंत्री, जयराम रमेश व केपवविच्या दोन अधिकाऱ्यांना आरोपी ठरवून अशा प्रकारे स्थगिती देण्याचे अधिकारच खात्याला नाहीत म्हणून उच्च न्यायालयाचे दरवाजे ठोठावले. यानंतर काही दिवसानी कंपनीने केपवविला post facto - ना हरकत प्रमाण पत्र देण्याची विनंती केली. कंपनीच्या मते प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यात 2000 हेक्टेर व दुसऱ्या टप्प्यात 3000 हेक्टेर विकासकामे अपेक्षित आहेत. कंपनीने

या वेळेपर्यंत सुमारे 3000 कोटी रुपयांची गुंतवणूक केली आहे. त्यामुळे गुंतवणूकदारांच्या हक्कावर गदा येवू नये म्हणून पहिल्या फेजच्या कामाला ना हरकत प्रमाण पत्र द्यावे असा प्रतिवाद त्यानी केला. शिवाय या प्रकल्पामुळे मोठ्या प्रमाणात रोजगार मिळत आहे व मागासलेल्या प्रदेशाचे विकसन होत आहे, आदिवासीची उपासमार थांबविण्यात यश मिळत आहे, अशीही पुस्ती त्यानी जोडली.

तज्ञ समिती काही अटीवर कंपनीला आवश्यक प्रमाण पत्र द्यायला तयारही झाली. पहिल्या अटीप्रमाणे जेथे जेथे अवैध बांधकामं झालेली आहेत त्यावर दंड आकारला जाईल व दुसर्या अटीनुसार पर्यावरणाची हानी भरून काढण्यासाठी कंपनीला फंड उभा करावा लागेल. आतापावेतो 700 हेक्टेर बांधकाम झालेले असल्यामुळे व इतर काही तांत्रिक अडचणीमुळे या अटीवर प्रमाण पत्र देण्याशिवाय पर्याय नाही असे समितीचे मत पडले. परंतु स्वयंसेवी संघटनांचा अशा प्रकारे मागच्या दारातून देण्यात येणाऱ्या प्रमाणपत्रास विरोध होता. पर्यावरण रक्षण कायद्यामध्ये अशाप्रकारच्या पश्चात बुद्धीने काहीही करण्यास कुठलीही तरतूद नव्हती. खरे पाहता याच खात्याने नोव्हेंबर 25, 2010 च्या नोटिशीत कंपनीला तुमचे अवैध बांधकाम का पाडू नये अशी विचारणा केली होती. आता मात्र अशाप्रकारे पोस्टफॅक्टो क्लीअरन्स देऊन अवैध कामे कायदेशीर करण्याचा अधिकार कसा काय मिळाला असे NAPM च्या विश्वंभर चौधरी यांचा प्रतिवाद होता. कंपनी मात्र आम्ही अवैध कामे केलीच नाहीत यावर भर देत होती.

मपविने महाराष्ट्र गिरीस्थान नियमन कायदा 1996 प्रमाणे मार्च 2004मध्ये या कंपनीला क्लीअरन्स दिले होते. त्यावेळी कंपनीने केंद्राकडे अटीपूर्ततेसाठीचा अर्ज केला नाही. खरे पाहता Environmental Impact Assessment (EIA) चा नियम 1994 पासून पर्यटन विकासाशी संबंधित

असलेल्या प्रकल्पांना बंधनकारक होता. या नियमाप्रमाणे समुद्र किनारपट्टीतील 200 मी ते 600 मीच्या भरतीच्या जागेत व/वा समुद्रसपाटीपासून 1000 मी उंच असलेल्या ठिकाणच्या प्रकल्पाचा खर्च 5 कोटी रुपयापेक्षा जास्त असल्यास केपवविकडून रीतसर परवानगी घेण्याचे बंधन आहे. कंपनीच्या अखत्यारीतील 58 हेक्टेर जमीन 1000 मी पेक्षा जास्त उंचीवर व प्रकल्प खर्च 5 कोटीपेक्षा कितीतरी पटीने जास्त असतानासुद्धा कंपनीने याविषयी काही हालचाल केली नव्हती. खरे पाहता कंपनीने आपणहून जाहीर नोटिशीद्वारे या प्रकल्पाची माहिती प्रसिद्ध करून जनतेकडून हरकतींची नोंद घ्यायला हवी होती. परंतु कंपनी मात्र यातील कुठलेही नियम पाळली नाही.

या सर्व घटनाक्रमावरून राज्य शासनानेच केंद्र शासनाची याबाबतीत दिशाभूल केली असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. जुलै 2005 मध्ये केपवविने मपविला सर्व नियमांचे पालन केल्यानंतरच प्रकल्पाला मंजूरी द्यावी असे लिहिले होते. महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण बोर्डाने मात्र हा प्रकल्प 1000 मी उंचीपेक्षा कमी उंचीवर विकसित होत असल्यामुळे केपवविच्या परवानगीची जरूरी नाही असे परस्पर ठरवून केंद्राला कळविले. ऑगस्ट 2010मध्येसुद्धा या बोर्डाने हा ठेका तसाच चालू ठेवला होता. मुळात केपवविकडून आलेल्या पत्राला (जाणून बुजून) केराची टोपली दाखवली होती, हे मान्य करण्यास कुणी तयार नव्हते. जेव्हा हे प्रकरण अंगावर शेकू लागले तेव्हा या खात्याकडे असलेले मूळपत्रच फाइलीतून गायब झाले होते. व गंमत म्हणजे याचीच एक प्रत कंपनीच्या फाइलीत सुरक्षित होती! भरपूर धावपळीनंतर मपविने तीच प्रत सादर केली. याचाच अर्थ कंपनीला हे सर्व नियम व अटीपूर्ततेबद्दलची स्पष्ट कल्पना होती. परंतु आज मात्र ती कंपनी आपल्या कानावर बोट ठेवत आहे.

याच EIA च्या नियमात 2004 साली काही दुरुस्त्या केल्या. या दुरुस्त नियमाप्रमाणे 1000 पेक्षा जास्त लोकसंख्येसाठी शहर वसवण्याचा प्रकल्प हाती घेत असल्यास व प्रकल्पाचा खर्च अंदाजे 50 कोटीपेक्षा जास्त असल्यास केंद्राकडून ना हरकत प्रमाण घेण्याची अट होती. जेव्हा न्यायालयाने ही बाब कंपनीच्या लक्षात आणून दिल्यानंतर आमचा प्रकल्प नवीन नसल्यामुळे आम्ही कारवाई करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही असे ठासून सांगितले.कारण कंपनीच्या मते 2004 सालापर्यंत प्रत्यक्ष जागेत मोठ्या प्रमाणात बांधकामाला सुरुवात झाली होती. परंतु कंपनीच्या कागदपत्रांची तपासणी केल्यानंतर बांधकामासाठीची पहिली परवानगी ऑगस्ट 2007 साली राज्य शासनाने दिली होती.

पुण्याच्या नगर नियोजन अधिकाऱ्यानेसुद्धा नोव्हेंबर 2008 साली कंपनीला त्यांचे बांधकाम 'नवीन' प्रकल्पांतर्गत येत आहे असे कळविले होते. परंतु कंपनीने हा नियम जुलै 2004 पूर्वीच्या व 25 टक्क्यापेक्षा कमी गुंतवणूक असलेल्या औद्योगिक प्रकल्पाला लागू होतो असे गृहित धरून या पत्राला केराची टोपली दाखवली. एवढेच नव्हे तर EIAचे 2006च्या नोटिफिकेशनची साधी नोंदसुद्धा कंपनीने घेतली नाही. या नोटिफिकेशनप्रमाणे 50 हेक्टेरपेक्षा जास्त जमिनीवरील शहर विकास प्रकल्पांची सुरुवात वा सुधारणा सप्टेंबर 2006 नंतर झाल्यास EIAच्या सक्षम अधिकाऱ्याकडून क्लीअरन्स घेणे बंधनकारक होते. परंतु महाराष्ट्र शासनानी EIA प्राधिकरणाची स्थापनाच एप्रिल 2008 साली केली. त्यामुळे मधल्याकाळातील सर्व प्रकल्पांची पुनर्तपासणी गरजेचे होते. कंपनीच्या प्रवर्तकांना उशीरा जाग आल्यामुळे ऑगस्ट 2009 साली यासंबंधात अर्ज पाठविण्यात आले. हा अर्ज मुळातच उशीरा आल्यामुळे तोपर्यंत जे काही पर्यावरणाची हानी व्हावयाची होती ती

सर्व होऊन झाली होती. हा सर्व तपशील जानेवारी 2011 च्या अहवालात जोडलेला आहे.

केपवविच्या अहवालानुसार कंपनीने फार मोठ्या प्रमाणात डोगर भागांची तोडफोड केलेली आहे. मालवाहतुकीसाठी रस्ते बनवण्यासाठी डोंगर पोखरलेले अहवाल समितीला दिसले. डोंगर उजाड झालेले होते. पुणे जिल्हाधिकार्यांने केवळ दगड खाणीसाठी परवानगी दिली होती. कंपनी मात्र डोगर पोखरण्यासाठी परवानगी असल्यासारखी मनमानी करत होती. कंपनीच्या डोंगर भागाचे मनमानी सपाटीकरण करण्याच्या या प्रयत्नामुळे landslide होण्याची व जमिनीची धूप होण्याची शक्यता वाढली आहे. या दुष्परिणामामुळे जलस्रोत आटून जाण्याची भीती व्यक्त केली जात आहे

फेब्रुवारी 2011च्या मंत्रालयाच्या अहवालात या गोष्टी नमूद केल्या आहेत. बांधकामसाहित्यांची ने - आण करण्यासाठी डोंगरदऱ्यातून रस्ता तयार केला. त्यासाठी मोठ मोठे दगड उखडले. ज्यांची मुळं खोलपर्यंत गेली होती अशी झाडं मुळासकट तोडले. त्यामुळे मोठ्या पावसात वा ढगफुटीत मोठ्या प्रमाणात landslide होण्याचा धोका निर्माण झाला आहे. अशा प्रसंगात डोंगराच्या उतारावर बांधलेल्या इमारती कदाचित जमीनदोस्त होऊ शकतील. मुळात कंपनीने पर्यवरणाच्या दृष्टीने बाहेरून बांधकामसाहित्य आणण्यापेक्षा स्थानिक मालाचा वापर हितावह ठरेल असे प्रशासनाला कळविले होते. परंतु स्थानिकांनी विरोध करूनही कंपनीने डोंगर फोडून दगड माती मुरुम यांचा वापर केला. दगडखाणीत स्फोट घडवून आणल्यामुळे या भागातील भूमी अंतर्गत जलस्रोतांना अतोनात नुकसान पोचले आहे.

कंपनीने महाराष्ट्र शासनाच्या नियमांचेसुद्धा उल्लंघन केले आहे. महाराष्ट्र क्षेत्रीय व नगर नियोजन कायदा (1966) अनुसार प्रकल्पासंबंधी नागरिकांकडून हरकती मागविणे बंधनकारक होते. तसे काहीही न करता

कंपनीने आपले बांधकाम रेटले आहे. या खात्याच्या अहवालानुसार कंपनीने बांधकामाचा landscape आराखडा, पार्किंगसंबंधित व्यवस्था इत्यादीबाबत शासनाला अंधारातच ठेवले आहे.

पुणे जिल्हाधिकाऱ्याला 2006 साली पाठविलेल्या या हिलस्टेशनसाठीचा प्राथमिक आराखडा 580 हेक्टेरचा होता. जून 2008 मध्ये महाराष्ट्र शासनाने विशेष योजना प्राधीकरणाची स्थापना केली व या प्राधीकरणाने 5000 हेक्टर जमीनीवर स्वत:ला हवे तसे बांधकाम करण्यास कंपनीला मुभा दिली. विकसकालाच बांधकामांचा आराखडा बनविण्याचे मुक्त स्वातंत्र्य दिल्यास विकसक आपल्या मनाप्रमाणे आराखडा बदलू शकतो, specifications बदलू शकतो. हिलस्टेशनवरील बांधकाम नियमाप्रमाणे डोंगर उतारावर कुठल्याही प्रकारचे बांधकाम करण्यास परवानगी नसते. त्यामुळे एके दिवशी आपल्या बांधकामाच्या योजना डोंगराच्या पायथ्याच्या ठिकाणी हलवले. हिलस्टेशन नियमानुसार केवळ दोन मजली इमारती बांधणे अपेक्षित होते. कंपनीने सहा मजली इमारती बांधल्या. कंपनीच्या मते उतारावरील बांधकामासाठीच्या FSI मध्ये वाढ झाल्यामुळे सहा मजली इमारती बांधल्या. निवासीसाठीच्या बांधकामातील सुमारे 80 टक्के बांधकाम वाढीव FSI ने झालेले आहे.

केवळ वाढीव FSI नव्हे तर पाण्याखालील जमीनसुद्धा बांधकामासाठी वापरण्यात आले आहे. महाराष्ट्र शासनाने धरणाच्या पाणलोट क्षेत्रापासून 50 मी अंतरावर बांधकाम करण्यास अनुमती दिली होती. कंपनीने प्रथम 30 मीपर्यंत व नंतर 15 मी पर्यंत बांधकाम करून मोकळी झाली आहे. यामुळे वन क्षेत्र व पर्यावरणाची हानी होण्याची शक्यता आहे.

महाराष्ट्र कृष्णा खोरे निगमने 141.15 हेक्टेर जमीन ठिकठिकाणी पाणी अडविण्यासाठी बंधारे बांधण्यासाठी भाडेपट्टी कराराने दिली आहे. (ती

कुणाच्या मेहेरबानी खातिर दिली हा प्रश्न अलाहिदा!) परंतु कंपनीने यातील काही जमीनीवर निवासी व व्यापारी इमारती उभ्या केल्या आहेत.
वरसगाव धरणाभोवतीचे पाणी व निसर्गसंपत्ती लवासा हिलसिटीचे प्रमुख आकर्षण ठरणार आहे. या धरणातील पाणीसाठ्याचा वापर मुख्यत्वेकरून पुण्याच्या पिण्याच्या पाणीसाठी आहे. लवासाचा पाणीपुरवठासुद्धा याच धरणातून होणार आहे. या शहरातील बागबगीचे, शाही तलाव याच साठ्यातून होणार आहेत. कंपनी मात्र लवासाच्या वापरामुळे पुण्याच्या पाणी पुरवठ्यावर विपरीत परिणाम होणार नाही, असे सांगत आहे.

लवासाचा पाणीपुरवठा धरणक्षेत्रात बंधारा बांधून करण्यात येणार आहे. सुमारे आठ बंधारे बांधण्याची योजना आहे. त्यापैकी दोन बंधारे बाजी पालकर तलावात बांधून झालेले आहेत. व इतर सहा पाणलोट क्षेत्रात बांधले जाणार आहेत. या बंधाऱ्यामुळे 24.67 दशलक्ष घनमीटर पाणीसाठा होण्याची शक्यता आहे. वरसगावच्या पाणीसाठ्याच्या 7 टक्के पाणी लवासाला मिळणार आहे. या बंधाऱ्यामुळे धरणसाठ्याकडे वाहणाऱ्या पाण्याचा वेग कितपत कमी होणार आहे, याबद्दल कंपनी मौन बाळगून आहे. पुण्यासाठी पिण्याच्या पाणीचा पुरवठा खडकवासला येथील धरणाच्या पाणीसाठ्यातून होतो. या धरणात पानशेत व वरसगाव येथील धरणातील पाणी सोडले जाते. कंपनीच्या मते लवासा वापरत असलेले पाणी तुलनेने नगण्य आहे. गंमत म्हणजे 40 - 45 लाख लोकसंख्येसाठी 15 टीएमसी पाणी व लाख - दीड लाख (4 टक्के) लोकांसाठी 1.5 टीएमसी पाणी (10 टक्के). अजब न्याय आहे. परंतु पुढील दहा वर्षात इतर कुठलीही सोय न केल्यास पुण्याच्या वाढत्या लोकसंख्येला हे पाणी अपुरे पडणार आहे. पाणी अपुरे पडल्यास अटीप्रमाणे कंपनीला बांधलेले बंधारे मोकळे करून पुण्यासाठी पाणी सोडावे लागेल व लवासाला पाणीटंचाईला तोंड द्यावे लागेल. आताच एप्रिल - मे महिन्यात धरणसाठा

कोरडा पडत असतो. परंतु या सर्व प्रश्नांसाठी कंपनीचा प्रतिवाद मजेशीर आहे. लवासा शहर हा पुण्याचा भाग आहे. त्यामुळे पुणेकरांनीच दरडोई पाण्याचा वापर कमी करून या टंचाईवर मात करायला हवे. जल नि:सारण योजना आखून पाण्याच्या पुनर्वापराची शक्यता आजमायला हवी.

पर्यावरणाबद्दल कोणतेही विधान करत असताना ही कंपनी नागपुरच्या NEERI या पर्यावरण विषयक संशोधन संस्थेचा हवाला देत असते. परंतु या संस्थेने ज्याप्रकारे आपले विधान बदलत गेलेले आहे त्यावरून या संस्थेचे अहवाल कितपत विश्वासार्ह आहेत याबद्दल शंका आहेत. या संस्थेच्या प्राथमिक अहवालात लवासाच्या मातीत मोठ्या प्रमाणात जड धातू असून जलस्रोतांवर दुष्परिणाम होण्याची शक्यता असे नमूद केले आहे. परंतु याच अहवालाच्या आधारे कंपनीने महाराष्ट्र शासनाकडून क्लीअरन्स मिळविलेले आहे. NEERI ने 2008 साली पुन्हा एकदा अहवाल सादर केला. या अहवालातलुद्धा पाण्यातील शिसेचे प्रमाण 0.2 mg/litre इतके आढळले. हे प्रमाण सुरक्षित पातळीपेक्षा 4 पट जास्त आहे. खरे पाहता एवढ्या मोठ्या प्रमाणात हा धातू केवळ खाणप्रदेशातच असतो. आकड्यात काही तरी घोळ आहे हे स्पष्ट दिसत असूनसुद्धा सर्व संबंधित एकमेकावर ढकलत आहेत. हे आकडे बरोबर असल्यास विकास प्रकल्पाची पुनर्छाननी करण्याची गरज आहे, असे म्हणावे लागेल.

तज्ञ समितीच्या मते केवळ येथील पाणी वा माती यांचेच परीक्षण न करता प्रकल्पाच्या ठिकाणाहून भोवतालच्या 10 किमी भूप्रदेशातील हवा, पाणी, व माती यांची तपासणी करायला हवी होती. कायद्याचा बडगा उगारल्यावर मात्र कंपनीने 2011 साली पुन्हा एकदा NEERIकडून अहवाल मागून घेतला. त्यातील काही महत्वाचे मुद्दे

1. 2004च्या अहवालात मातीतील लोहप्रमाण 24.7 % होते. ते प्रमाण आता 3 % झाले.
2. ph चाचणीप्रमाणे पाणी 7 एकक असल्यामुळे पाणी क्षारयुक्त आहे, असा अहवाल सुचवतो. परंतु मातीची चाचणी मात्र आम्लयुक्त आहे असे दर्शविते.
3. 2004 च्या अहवालात मातीतील कॅड्मियमचे प्रमाण 93 mg/kg होते व 2011च्या अहवालात हेच प्रमाण 44 mg/kg झाले.
4. 2004 च्या अहवालात मातीतील क्रोमियमचे प्रमाण 743 mg/kg होते व 2011च्या अहवालात 147 mg/kg झाले. कोबाल्टचे प्रमाणसुद्धा 5.006 mg/kg वरून 1.153 mg/kg झाले.

मुळात NEERIचा हा अहवालसुद्धा केपवविने हरकतीचा मुद्दा उपस्थित करण्याअगोदरचा, म्हणजे 2009 सालचा, असून तो 2011 साली सादर करण्यात आला आहे. या सर्व मुद्द्यावरून मानवनिर्मित लवासा हिलसिटी खरोखरच महाबळेश्वर - माथेरान प्रमाणे पर्यटन स्थळ म्हणून कितपत विकसित होईल याबद्दल शंका आहेत. लवासाची आतापर्यंतची वाटचाल बघता हे शहर फार फार तर पुणे - मुंबईतील श्रीमंतांसाठींचे दुसरे वा तिसरे घर असलेले शहर होईल.

मुंबईतील आदर्शसाठी प्रशासन व शासन यांनी परवानगी देण्यासाठी ज्याप्रकारे घाई केली होती, नियमात बदल केले होते, कायदा वाकवला होता, शब्दांचे अर्थ बदलले होते या सर्व गोष्टी या प्रकल्पासाठीसुद्धा झालेले आहेत. महाराष्ट्र व केंद्रीय पर्यावरण कायद्यातील अनेक अटी कंपनीला अडचणीच्या ठरल्या. परंतु सत्तेवरच कंपनीचे भागधारक असल्यासारखे नेते असल्यास कशाची भीती? कंपनीचे हितसंबंध जपण्यासाठी नोटिफिकेशन जारी करून कायद्याची मोडतोड करण्यात कसली अडचण? मूळ कायद्याच्या तरतुदीनुसार

डोंगरांची तोडफोड करता कामा नये; झाडे तोडली जाऊ नयेत; 2000 हेक्टेरपेक्षा जास्त जमीन हिलसिटीसाठी वापरू नये; 1:5 पेक्षा (1 मी उंची: 5 मी अंतर) जास्त डोंगरउतार असल्यास बांधकामावर निर्बंध; निवासी भूखंडासाठी 30 टक्केचे बंधन; फक्त दोन मजली इमारतीस अनुमती.... या अटी कंपनीला जाचक वाटल्यामुळे कालानुक्रमे त्या बदलण्यात आल्या. आदर्शच्या घोटाळ्याप्रमाणे येथेसुद्धा प्रत्येक अवैध काम कायद्यात बसविण्यासाठी नियमात बदल करण्यात आले.... तेही वेळ न दडविता! 30 मे 2001 रोजी शासनाने 2000 हेक्टेरचे निर्बंध सैल करून हवी तितकी जमीन घेण्यास परवानगी दिली. 31 मे 2001 रोजी नगर विकास खात्याने पुणे क्षेत्रीय मास्टर प्लॅनमध्ये सह्याद्रीच्या डोंगरमाथ्यावर हिलस्टेशनची तरतूद करण्यात आली. 1 जून 2001 रोजी सह्याद्री खोऱ्यातील 18 गावांना हिलस्टेशनचा दर्जा देण्यात आला. पुढील 3 आठवड्यात लेक सिटी कार्पोरेशनला हिलस्टेशन बांधण्यास अनुमती दिली. पूर्वीच्या आराखड्याप्रमाणे ही जमीन वनीकरणासाठी राखीव होती. ऑगस्ट 2002 मध्ये कृष्णा खोरे विकास निगम यानी 'सार्वजनिक' हितासाठी नदीचा 20 कि मी भाग कंपनीला देऊन टाकला. यासाठीच्या भाडेपट्टीचा करार बाजारभावापेक्षा कित्येक पटीने कमी होता. मुळात यासाठी महसूल खात्याची परवानगी घेतली नव्हती. जुलै 2007 साली नगर विकास खात्याने पुन्हा एकदा आपल्या नियमात बदल केला. पूर्वीच्या नियमानुसार डोंगरांची तोडफोड करू नये (shall in no case...) अशी तरतूद होती. ती बदलून शक्यतो तोडफोड करू नये (as far as possible should not...) अशी पुस्ती जोडली. त्याच बरोबर डोंगर उतार 1:5 ऐवजी 1:3 करण्यात आली. 25 टक्के निवासी भूखंडावर 3 मजली इमारत बांधण्यास परवानगी दिली.

एकदा अशा प्रकारे सवलतींची सवय लागल्यावर कंपनी आणखी सवलतींची मागणी करू लागली. कायदा व नियम शिथिल करण्यासाठी तगादा लावला. धरणसाठ्याच्या काठच्या जमीनीवरील 100 मी ची तरतूद शिथिल करण्यात यावी; बांधकाम आराखडा कंपनी स्वत: करेल, तिसऱ्या पार्टीची गरज नाही; इमारतीच्या उंचीवरील निर्बंध काढून टाकण्यात यावेत; व्यापारी, निवासी व शहर भागातील मध्यभागातील बांधकामासाठी जागतिक FSIची तरतूद असावी... अशा अनेक गोष्टींचा पाठपुरावा कंपनीने केला. एका सहीनिशी असली कामे व्हावीत यासाठी महाराष्ट्र शासनाने 'विशेष नियोजन प्राधीकरणा'ची कायद्यात तरतूद केली व या प्राधिकरणाने कंपनीच्या बहुतेक अटी मान्य केल्या. कारण या प्राधिकरणात पुण्याच्या नगर विकास अधिकाऱ्याचा अपवाद वगळता बहुतेक सदस्य कंपनीशी संबंधित होते. या प्राधिकरणाकडे सर्वाधिकार असल्यामुळे कुठल्याही परवानगीसाठी उठसूट शासनाकडे जाण्याची, शासनाला अधिकृत माहिती देण्याची गरज उरली नाही. त्यामुळे बघता बघता उंच इमारती उठू लागल्या. धरण परिसरातील जमीन बळकावली. डोंगरांची तोडफोड केली. चकाचक रस्ते बांधले. गंमत म्हणजे अगोदर कंपनीची स्थापना व त्यानंतर कंपनीला हवी असलेली जमीन अतिरिक्त ठरवली. बांधकाम सुरु होण्याआधीच पर्यावरण खात्याकडून क्लीअरन्स मिळाली. खरे पाहता सरकारी जमीन खासगी कंपनीला देत असल्यास जमीनीच्या किंमतीच्या 75 टक्केएवढा नजराना शासनाला मिळतो. या व्यवहारात मात्र तो फक्त 20 टक्के मिळाला.

या लेखात फक्त, आहे त्या सत्य परिस्थितीचा आढावा घेण्याचा प्रयत्न केला असून ते सामान्य वाचकापर्यंत पोचावे या उद्देशाने लिहिलेला आहे. काही नावाजलेल्या पत्रकारांनी कंपनीचे संपर्काधिकारी असल्यासारखे प्रकल्पाची वारेमाप स्तुती केली आहे. कंपनी शासनाने वाऱ्यावर सोडलेल्या

शेतकऱ्यांच्या व आदिवासींच्या हितासाठीच राबत आहे, असा सूर अशा लेखातून ध्वनित होतो. अशा प्रकारचे लेख वाचताना दिशाभूल होण्याचीच शक्यता जास्त. प्रकल्पाच्या संदर्भात नेमके काय घडले हे माहित करून घेऊन वाचकानीच निष्कर्ष काढावा अशी अपेक्षा आहे. आपल्यासारखे सामान्य याविषयी काहीही करू शकत नाही हेही खरे असेल. परंतु काही अभिजन आवेशाने प्रकल्पाची वारेमाप स्तुती करत असताना, कायदा वाकवता येतो, कायदा मोडता येतो, नीती-नियम धाब्यावर बसवता येतात... येवढे जरी आपण सांगू शकलो तरी त्यांचा अभिनिवेश गळून जाईल ही अपेक्षा.



# आपण स्वत:ला फसवणे टाळू शकतो का?

आत्मवंचना ही एक सर्व सामान्य, (सर्वमान्य?) व पटदिशी कळणारी गोष्ट आहे याबद्दल कुणाच्याही मनात शंका नसावी. परंतु तुम्ही स्वत:लाच कसे काय फसवू शकता असे विचारल्यास इतरांना फसविण्यापेक्षा ही गोष्ट फार सोपी आहे हे लक्षात येईल.

स्वत:ला प्रश्न विचारणे हे कुठलीही नवीन गोष्ट शिकण्याएवढी अवघड नसावी. आपण एकाच वेळी शिक्षकासारखे प्रश्नही विचारू शकतो व विद्यार्थीसारखे उत्तरही देऊ शकतो. यात कुठल्याही प्रकारचा विरोधाभास नाही. परंतु आपण एकाच वेळी फसवणारे व फसणारे कसे काय असू शकतो? यासाठी (2G स्पेक्ट्रम, CWG, आदर्श, यासारख्या घोटाळयात अडकलेल्या व न अडकलेल्या व )अत्यंत मुरलेल्या, मग्रूर राजकारण्यासारखी व उच्चपदस्थांसारखी मानसिकता लागते. करून सवरून आपण त्या गावचे नाही हे शपथेपूर्वक सांगण्यासाठी आत्मवंचनेचाच त्यांना आधार मिळत असतो. मात्र असे करण्यासाठी एकाच वेळी तुम्हाला काही गोष्टी माहितही असाव्यात व काही माहितही नसाव्यात. त्यासाठी नरो वा कुंजरोवा स्थितीत असावे लागते. स्वत:च आपल्याच हातानी डोळ्यावर पट्टी बांधून घ्यायचे व मला दिसत नाही असे ठणाणा करायचे.

काही वेळा आत्मवंचना हा शब्दप्रयोग केवळ संवादासाठी व काही गोष्टींच्या स्पष्टीकरणासाठी वापरले जात असावे. या वेळी तुम्ही सत्य लपवत नसून सत्यापासून दूर जाण्याच्या प्रयत्नात असता. उदाहरणार्थ टीव्हीच्या रियालिटी शोमधील 'उभरती' गायिका स्वत:ला लतादीदी वा आशा भोसले अशी समजूत करून घेतलेली असते. वास्तवात स्वत:च्या वकूबाचा तिला अंदाज नसतो व इतर काय म्हणतात याकडे ती दुर्लक्ष करते. परमेश्वर ही संकल्पना केंव्हाच कालबाह्य झाली असून त्या काठीच्या आधारे आपल्या

अपेक्षा पूर्ण होणार नाहीत हे माहित असूनसुद्धा येता जाता, उठता बसता नमस्कार - नवस करण्यात आपण आपल्यालाच फसवत असतो, हे आपल्या लक्षातच येत नाही.

कित्येक प्रसंगी व/वा कित्येक वेळा सामान्यांना माहितही असते व माहितही नसते या निष्कर्षापर्यंत आपण पोचत असतो. परंतु हे शक्य आहे का? समाजात वावरणारी माणसं एखाद्या अजश्र यंत्राच्या सुट्या भागासारखे असतात. परंतु हे सर्व सुटे भाग एकच आवाज काढत नाहीत वा एकाच नजरेने बघत नाहीत. सहस्र डोळ्यानी बघत असताना प्रत्येकाचा दृष्टिकोन वेगळा, मतं वेगळी. आपली मनं म्हणजे भोवऱ्यात सापडलेल्या वेगवेगळ्या हितासक्तींचा, इच्छा - आकांक्षांचा, क्षमतांचा, उत्स्फूर्ततेचा, विचारांचा, अपेक्षांचा गोळाबेरीज असून त्यांचा एकमेकाशी काहीही संबंध नसतो. उत्स्फूर्तता आपल्याला रस्त्याच्या कडेच्या गाडीवरील भजी खाण्यास उत्तेजित करत असते, त्याचवेळी आपल्यातील विवेक त्यापासून लांब राहण्याची धोक्याची सूचना देत असते. (परंतु आपण विवेकाचा गळा दाबून टाकण्यात चाणाक्ष असतो!)

आत्मवंचन हे एक न सुटलेल कोडं आहे. कारण आपण स्वत:ला एक सोलो वादक समजून घेत असतो. आपल्याला काहीही वाजवण्याची मुभा आहे या (गैर) समजूतीत वावरत असतो. परंतु आपण एका मोठ्या वाद्यवृंदाचा भाग असतो हे सोईस्करपणे विसरतो. आपल्या या अट्टाहासापायी ऑर्केस्ट्राचा रसभंग होतो हे आपण लक्षातच घेत नाही.

तुमचा लाइफ पार्टनर तुमच्याशी एकनिष्ठ आहे, वा तुमच्या romantic सादाला प्रतिसाद देणारी तुमची प्रेमिका आहे, किंवा सगळ्यात कठिण चाचणी परीक्षा तुम्ही सहजपणे पास होऊ शकता या कल्पनाविश्वात तुम्ही असल्यास तुमचे काही तरी चुकते आहे याची तुम्हाला जाणीव आहे का? कदाचित तुम्ही

याला 'हो' म्हणाल. परंतु आपण नेहमीच आपल्या (स्वच्छ) हेतूबद्दल आपल्या अपेक्षाबद्दल आपल्यालाच आपण फसवत असतो. व अशा प्रकारे फसवत असताना कुठल्याही थरापर्यंत जाण्याची आपली तयारी असते. अपेक्षाभंगाच्या क्लेशदायक सत्य स्वीकारण्याची आपली तयारी नसते. व खोट्या समाधानाच्या मागे जाण्यातच आपण धन्य समजतो.

परंतु काही प्रमाणात आत्मवंचना करण्यात काही चूक नाही. उलट त्यापासून आपल्याला फायदा होण्याची शक्यता नाकारता येत नाही. फुग्यासारखी फुगवून ठेवलेली सकारात्मक दृष्टी आपल्या अडी-अडचणीवर मात करू शकते. कठिण प्रसंगातून बाहेर काढू शकते. नैराश्याच्या गर्तेतून बाहेर काढू शकते. परंतु जेव्हा आत्मवंचना सकारात्मकतेच्या पलिकडे जावून पुराव्यांच्या विरोधात असलेल्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास भाग पाडते तेव्हा मात्र आपण आणखी जास्त अडचणीत सापडू शकतो. वाळूत तोंड खुपसून राहिल्यामुळे सत्य परिस्थितीचे भान येणार नाही. कडवे सत्य पचविण्याचे सामर्थ्य राहणार नाही. त्यामुळे वेळीच उपाययोजना करू शकणार नाही.

आपण सत्य परिस्थितीलाच धूसर करण्याच्या प्रयत्नात असल्यामुळे व आपल्याला हवे तसा सत्याची व्याख्या बदलत असल्यामुळे आत्मवंचनेची (व आत्मवंचितांची!) भरभराट होते. ती माझ्यावर खरोखरच प्रेम करते या दिवास्वप्नात इतके गुरफटून जातो की सत्य काय आहे, त्याचे पुरावे काय आहेत याबद्दल विचार करण्यास फुरसत मिळत नाही.

आत्मवंचना ही स्व:तहून लादून घेतलेली प्रक्रिया असते. त्यापासून दूर राहण्यासाठी वस्तुनिष्ठ विचार करण्याची, प्राप्त परिस्थितीचे कठोर विश्लेषण करण्याची सवय लावून घ्यावी लागेल. माझ्या जागी दुसरा असल्यास त्याची प्रतिक्रिया काय असू शकेल याचा अंदाज घ्यावा लागेल. कदाचित या कामी

एखाद्या चांगल्या, प्रामाणिक, परखड बोलणाऱ्या मित्राचा सल्ला घ्यावा लगेल.

न कळत ठरवलेल्या उद्धेशांना सफल करणे वा पारदर्शक करणे कदाचित आत्मवंचनेमुळे शक्य होणार नाही. परंतु आपण प्रयत्न केल्यास निदान सत्य काय आहे हे तरी समजू शकेल. व त्यासाठी आपल्यातला (थोडातरी!) ताठरपणा सोडून द्यावा लागेल.



# तमिळनाडूची 'अम्मा'
## (आणि अम्माचा तमिळनाडू)

8 मे 2015 रोजी तमिळनाडूची सर्वेसर्वा, जयललिता 'अम्मा'च्या कोर्टकेसचा निकाल येणार होता. संपूर्ण तमिळनाडू निकालाची आतुरतेने वाट पहात होता. अम्माच्या अनुपस्थितीतील काळजीवाहू मंत्रिमंडळातील एकूण एक मंत्री (आणि त्यांचा लवाजमा) चेन्नई येथील पेरुमाळ मंदिरात जमा झाले होते. पांढरा शर्ट व पांढरी लुंगी या युनिफार्ममध्ये seniority अनुसार गर्भगृहापाशी उभे होते. "परमेश्वरा, आम्ही तुझ्याकडे न्यायाची भीक मागत आहोत. अंतिम विजय न्यायाचाच आहे", असे तमिळमध्ये तिथला अर्चक जोरजोराने ओरडत होता. "तमिळनाडू समृद्धीच्या उंबरठ्यावर उभा आहे. परंतु काही दुष्ट शक्ती तिला थोपवून धरत आहेत. अम्मा पुन्हा एकदा कामाला लागू दे. आमच्या राज्याची भरभराट होईल. तिची तुरुंगात रवानगी करणाऱ्या विरोधकांचा सत्यानाश होऊ दे. विरोधकांना शिक्षा होऊ दे. वाईट लोक जेलमध्ये सडू दे. नाही तर नरकात जाऊ दे... " अशा अर्थाचे काहीतरी पुजारी बडबडत होता. सगळे मंत्री भक्तिभावाने ऐकत होते व माना डोलावत होते. प्रत्येक नेत्याच्या अंगावर, दृश्यभागात कुठे ना कुठे तरी अम्माचे चित्र गोंदलेले होते. शिक्षणमंत्र्याच्या दंडावर अम्माचा गुबगुबीत चेहरा ठळकपणे उठून दिसत होता. त्याच्याच शेजारच्या एका सनदी अधिकाऱ्याने 'अम्मा चिरायू होवो' असे गोंदवून घेतलेले होते. त्याच्या चेहऱ्यावर भक्तिभाव ओसंडून वाहत होता.

अम्मा म्हणजे आई. ही आता जयललिताची उपाधी झाली आहे. संपूर्ण तमिळनाडू राज्य जयललिताला 'अम्मा' याच नावाने ओळखते. जयललिता जयराम ही 'ऑल इंडिया अण्णा द्रविड मुनेत्र कळघम' (एआयएडिएमके) या पक्षाची अध्यक्ष आणि तमिळनाडूची मुख्यमंत्री. वैध उत्पन्नापेक्षा जास्त संपत्ती

(disproportionate income) तिच्याकडे सापडल्यामुळे तिच्यावर खटला भरण्यात आला होता व कोर्टाने तिला चार वर्षांची शिक्षा सुनावली. तिला मुख्यमंत्रीपदावरून पायउतार व्हावे लागले. तिच्या ज्ञात उत्पन्नापेक्षा 66 कोटी रुपये जास्त मिळाल्यामुळे भ्रष्टाचार झाला आहे हे कोर्टाने ग्राह्य मानून शिक्षा सुनावली होती. तिच्या राहत्या बंगल्यातील छाप्यात 10500 महागड्या साड्या, 750 चप्पल/बुटांचे जोड आणि 3 किलो सोन्याचे दागिने सापडल्याचा दावा करण्यात आला होता. छाप्याची बातमी वृत्तपत्रांच्या पहिल्या पानावर झळकली. खरे पाहता खाबूगिरी करून गडगंज संपत्ती कमावणाऱ्या उत्तर भारतीय सरकारी बाबूंच्या भ्रष्टाचाराच्या तुलनेत हा भ्रष्टाचार अगदीच क्षुल्लक म्हणता येईल.

शिक्षा झाली व तिला तुरुंगात ठेवण्यात आले. वरच्या कोर्टात तिने अपील केले. नेहमीप्रमाणे काही दिवसात ती जामिनावर सुटली होती. साक्षीदारांची फोडाफोड, धमकी, मारामारी, खून, शांतता व सुव्यवस्थेचा प्रश्न इत्यादीमुळे तिच्यावरील खटला कर्नाटकात चालवण्याचा निर्णय घेण्यात आला. सप्टेंबर 2015च्या शेवटच्या आठवड्यापर्यंत वरच्या कोर्टाचा निकाल न लागल्यास पुढच्या निवडणुकीत तिला उभे राहता आले नसते. म्हणूनच लवकरात लवकर निकाल लागावा यासाठी ती (व तिचे भक्तगण) परमेश्वराला साकडे घालत होते.

शिक्षा सुनावल्याच्या दिवसापासून 'अम्मा'च्या पक्षकार्यकर्त्यांचा उद्रेक ओसंडून वाहत होता. बसेसवर दगडफेक, ठिकठिकाणी जाळपोळ यांना ऊत आला होता. चेन्नईच्या जवळपास कार्यकर्ते हायवेवर आडवे झोपून, बस ड्रायव्हरला 'बस आमच्या अंगावर घाला' म्हणून ओरडत होते. 'अम्मा जेलमध्ये असताना आम्ही जिवंत राहून काय उपयोग?' अण्णा-डीएमके पक्षाच्या निवेदनानुसार अम्मावरील प्रेमामुळे स्वतःला जाळून घेऊन

आत्महत्या करून घेणाऱ्यांची संख्या शेकड्यांत भरेल.अशा प्रकारचा, आमच्या अंगावरून 'बस जाऊ दे' असा आणखी लोकोद्रेक कुठेही बघायला मिळणार नाही. शेजारच्या केरळात कधीच नाही. यामागचे कारण कदाचित चित्रपट-उन्माद (movie mania) असण्याची शक्यता आहे. राजकारणात प्रवेश करण्यापूर्वी अम्मा तिच्या तरुणपणात त्या काळची लोकप्रिय नायिका होती. शंभरेक चित्रपटात तिने काम केले आहे. मरुधुर गोपालन् रामचंद्रन – एमजीआर – जयललिताचा गुरू व चित्रपटात तिच्याबरोबरचा हीरो होता. 1987मध्ये त्याचा मृत्यू झाला. तोपर्यंत त्याने तमिळनाडूवर अधिराज्य केले, सत्ता गाजवली. आताच्या राजकीय पटलावरील शत्रू असलेला 92 वर्षाचा करुणानिधी, हा एकेकाळी एमजीआरचा जीवश्चकंठश्च मित्र होता. त्याने एमजीआरच्या चित्रपटासाठी कथा-संवाद लिहिले. त्याच्या संवादांना व एमजीआर ज्या प्रकारे संवादफेक करत होता, त्याला सर्वसामान्य प्रेक्षकांकडून उदंड प्रतिसाद मिळत होता. एमजीआरच्या मृत्यूनंतर तमिळनाडूत आलटून पालटून अम्मा व करुणानिधी सत्तेवर असतात. अण्णादुराई यांनी स्थापन केलेल्या मूळ डीएमके पक्षाची दोन शकले झाली आणि एआयएडीएमके पक्षाची सर्वेसर्वा अम्मा झाली. डीएमके व एआयएडीएमके, या दोन्ही पक्षांच्या ध्येयधोरणांत किंचितही फरक नाही. तरीसुद्धा त्या राज्यात एखादा तिसरा पक्ष या दोन्ही पक्षांपुढे तग धरू शकत नाही, हेही तितकेच खरे!

भ्रष्टाचाराच्या आरोपावरून शिक्षा सुनावल्यानंतर जयललिताचे वकील वरच्या कोर्टात अपील करण्याच्या तयारीत होते. त्या दोन–तीन दिवसांत तिचे 'भक्त' मंदिर, मशीद, चर्चमध्ये प्रार्थना करत होते. 2016च्या राज्याच्या सार्वत्रिक निवडणुकीत पात्र व्हायचे असल्यास अम्माला कुठल्याही प्रकारची शिक्षा होणे धोक्याचे ठरले असते. शिक्षा झाल्यास पुढील दहा वर्षे ती निवडणूक लढवू शकली नसती.

मदुराईच्या मीनाक्षी मंदिरात पक्ष कार्यकर्त्यांनी 1008 नारळ फोडून देवीला वेठीस धरले होते. कोईमतूर येथे 2008 महिला डोक्यावर दुधाचे हंडे घेऊन देवीच्या दर्शनाला गेल्या व 'अम्मा'ला शिक्षा होऊ नये म्हणून नवस बोलल्या. चेल्लपिल्लाईच्या रायर देवळात 508 स्त्रियांनी दिवा लावून परमेश्वराची मनोभावे पूजा केली. संपूर्ण देऊळ अगरबत्ती व दिव्याच्या धुराने भरले होते. त्यात भर म्हणून देवळातल्या घंटांचा आवाज घुमत होता. जयललिताच्याबरोबर काढलेल्या स्थानिक राजकीय नेत्यांचे फोटो फ्लेक्सच्या होर्डिंग्समधून शहरभर दिसत होते.

न्यायालयात तिच्यावरील सर्व आरोप खोटे ठरले व तिची बाइज्जत सुटका झाली. एकच जल्लोष झाला. पक्षकार्यकर्त्यांच्या या नवस-प्रार्थनेमागे दोन उद्देश स्पष्टपणे दिसत होते; परमेश्वराच्या कृपेने जयललिताची सुटका व जयललिताची त्यांच्यावर कृपादृष्टी. जयललिताचे लक्ष वेधण्यासाठी असे काही तरी दाखवून प्रसिद्धीच्या झोतात राहण्याशिवाय गत्यंतरच नव्हते. तमिळनाडूच्या कानाकोपऱ्यात कुठेही गेलात तरी 'अम्मा'चा गुबगुबीत चेहरा तुम्हाला पाहावयास मिळेल. दोन हनुवटी असलेल्या मोनालिसासारखी दिसणारी छबी आपला पाठलाग करत राहते. शहराच्या ठिकाणी तर प्रत्येक छोटे-मोठे कार्यकर्ते 'अम्मा'बरोबर काढलेल्या फोटोंचे फ्लेक्सबोर्ड लावत असतात. शहराचे विद्रूपीकरण होत आहे याच्याशी त्यांना कर्तव्य नसते. आम्ही अम्माला कसे मानतो, तिच्याबद्दल आम्हाला किती आदर आहे, तिच्या किती जवळचे आहोत; हेच त्यांना पटवायचे असते. तिच्याबरोबरच्या जवळीकीमुळे त्यांच्यावर मतांचा वर्षाव होणार, याची त्यांना पक्की खात्री असते. विद्यार्थ्यांना मोफत दिलेल्या लॅपटॉपच्या स्क्रीनसेव्हरवरही तिचाच चेहरा चिकटवलेला असतो. डेस्कटॉपचीही तीच तऱ्हा. ठिकठिकाणी असलेल्या 'अम्मा' फार्मसीमध्ये स्वस्तात महागडी औषधं मिळण्याची सोय

'अम्मा'ने केली आहे. 'अम्मा' कँटीनमध्ये फक्त पाच रुपयात जेवण! अजून काही दिवसांतच ठिकठिकाणी पाच रुपयांत चित्रपट दाखविणाऱ्या स्वस्त अम्मा चित्रपटगृहांची योजना कार्यान्वित झाल्यास नवल वाटून घेण्याचे कारण नाही; कारण तमिळनाडूमध्ये काहीही घडू शकते. काही चिकित्सकांना तिचा हा चेहरा एखाद्या डिक्टेटरच्या व्यंगचित्रासारखा दिसत असल्यामुळे, ते थोडीशी भुणभूण करतात. एवढे सोडल्यास 'अम्मा'च्या एकाधिकारशाहीला कुणापासूनही धोका नाही.

खरे पाहता चेन्नई, तंजावूर, मदुराई, रामेश्वरम ही शहरं बुद्धिजीवी वर्गांची, कुणाच्या अध्यात ना मध्यात न पडणाऱ्या सुसंस्कृत नागरिकांची शहरे म्हणून ओळखली जातात. त्यामुळेच 'अम्मा'ची ही टोकाची व्यक्तिपूजा त्यांना अस्वस्थ करते. चेन्नई हे राजधानीचे शहर तमिळ चित्रपटउद्योगाची नगरी असून मुंबईच्या हिंदी बॉलिवुडनगरीशी त्याची तुलना करता येईल. ब्लॉकबस्टर्स म्हणवून घेण्याच्या लायकीचे व करोडो रुपयांचा गल्ला भरू शकणाऱ्या तमिळ चित्रपटांच्या तुलनेत, हिंदी चित्रपट सुमारच म्हणावे लागतील. रजनीकांतच्या प्रत्येक चित्रपटाच्या रिलीजच्या दिवशी त्याचे फॅन्स, एखाद्या देवाच्या मूर्तिपूजेप्रमाणे त्याला दुधाने आंघोळ घालतात; परंतु एमजीआरएवढी प्रसिद्धी त्यालाही मिळत नाही. चित्रपट यशस्वी होण्यासाठीचा सर्व मसाला – व्हिलनबरोबरची स्टंटबाजी, हिरॉईनबरोबरचे गाणे, प्रेम सादर करण्याची स्टाइल, गावंढळपणा, शहरीपणा, विनोद, संवादफेक, इत्यादी – ठासून सर्व आघाड्यांवर एमजीआरचे प्रभुत्व होते. विशेषकरून जयललिताबरोबरच्या प्रेमप्रकरणाच्या दृश्यांना अभूतपूर्व प्रतिसाद मिळत होता.

१९४८ साली जन्मलेली जयललिता एमजीआरच्या सुवर्णकाळात वाढली. ती दोन वर्षांची असताना तिचे वडील वारले. तिची आई, संध्या, तमिळ

चित्रपटांत नगण्य भूमिका करून पोटापुरते पैसे कमावत होती. चित्रपटक्षेत्रात असल्यामुळे वेळी–अवेळी, रात्री–बेरात्री ती घरी येत असे. त्यामुळे तिच्या एकुलत्या एका मुलीची आबाळ होत असे. जयललिता 16 वर्षांची झाली. एक चांगली नर्तिका म्हणून शेजारी-पाजारी तिची वाहवा करत असत. संध्याची मित्रमंडळी जयललिताला चित्रपटसृष्टीत ओढण्यासाठी प्रयत्न करू लागली. मुळात जयललिताला वकील व्हायचे होते. आईने तिच्या कॉलेजचा प्रवेश आणि शिष्यवृत्ती मिळण्यात खो घातला. कॉलेज सोडून देण्यास भाग पाडले. चित्रपटसृष्टीतील फँटसीच्या गोष्टी सांगून जयललिताचे कान भरले आणि तिला स्टुडिओतील प्रकाशझोतात उभे केले. तिच्या पहिल्याच चित्रपटातील हिरो एमजीआर होता.

एमजीआरचा दरारा एवढा होता की चित्रीकरणच्या सेटवर त्याने पाय ठेवल्या-ठेवल्या झाडून सर्व जण उभे राहून मानवंदना देत असत. त्या दिवशी मात्र जयललिता उठून उभे न राहता पुस्तक वाचण्यात मग्न होती. एमजीआरला आश्चर्य वाटले. दोघांमध्ये 30-35 वर्षांचे अंतर असूनसुद्धा चित्रपटाच्या पडद्यावरील त्या दोघांच्या रोमान्सला ऊत आला होता. राग, लोभ, प्रेम, विनोद, सेन्सॉरच्या कचाट्यात न सापडत केलेले लैंगिक चाळे अशा सर्व मालमसाल्याने भरलेल्या या जोडीचा चित्रपट म्हणजे तमिळ प्रेक्षकांना अभूतपूर्व पर्वणी वाटत असे. चित्रपटाच्या प्रसंगात दोघेही हिरव्यागार गवतावर लोळत होते, गात होते, बागडत होते. ओठ जवळ आणून चुंबनाच्या बेतात असतानाच फूल मध्ये आडवे आल्यामुळे, ती पाकळया चावणार व तो स्वतःचे ओठ चावणार. एमजीआरचे लग्न जानकी नावाच्या त्या काळच्या नटीशी झालेले असूनसुद्धा जयललिता व एमजीआरच्या प्रणयलीला तेवढ्या गुप्त नव्हत्या. पुढील आठ वर्षांत तिने एमजीआरबरोबर २८ चित्रपट केले.

जयललिता-एमजीआर प्रकरणाच्या या काळात एमजीआर हा 'द्रविड मुनेत्र कळघम' या वंचितांच्या उद्धारासाठीच्या चळवळीचा सक्रिय कार्यकर्ता होता. त्या काळात खालच्या जातीतील तमिळ लोकांची परिस्थिती अगदीच वाईट होती. उच्चवर्णीयांसमोर ते चप्पल घालून फिरू शकत नव्हते, त्यांच्यासमोर सायकलीवर जाण्यास प्रतिबंध होता. या पक्षाचे कार्यकर्ते ब्राह्मणवर्गाच्या या मानसिकतेच्या विरोधात लढत होते. त्यांचा हिंदी बोलणाऱ्या, उत्तरेतून आलेल्या व्यापाऱ्यांवरही राग होता. डीएमके पक्षात चित्रपटसृष्टीतील अनेक जण काम करत होते. त्यामुळे या पक्षाला ग्लॅमर होते व तमिळ चित्रपटातील संवादलेखन करणारा एम. करुणानिधी एमजीआरचा घनिष्ट मित्र होता.

डीएमके पक्षाची स्ट्रॅटेजी अगदीच साधी होती. तमिळ स्वाभिमान रुजवण्यासाठी चित्रपटातील गाणी, शत्रूंची विनोदी अंगाने केलेली टिंगल-निंदा-नालस्ती आणि सत्तेवर असलेल्या कॉंग्रेस पक्षाच्या विरोधात ठिकठिकाणी लंब्याचौड्या भाषणांच्या माऱ्याच्या जोरावर, हा पक्ष बघता-बघता गरीब-दलितांचा पक्ष झाला. डीएमकेने एमजीआरला स्टारपद बहाल केले व एमजीआर यांनी चित्रपटाच्या माध्यमातून स्वतःच्या करिश्म्याचा वापर करून डीएमकेला मोठे केले. एमजीआरच बघता-बघता दलितांचा कैवारी झाला. एमजीआरच्या चित्रपटांच्या यशात संवादांचा मोठा वाटा होता. याच उपकाराची परतफेड म्हणून एम. करुणानिधीला प्रमुखपद मिळवून देण्यात एमजीआरने प्रयत्न केले.

या दोघांची जोडी चांगलीच जमली होती; एक जण सुपरस्टार व दुसरा संवादलेखक. पांढरा शर्ट, पांढरी स्वच्छ लुंगी, डोळयावर काळा चष्मा व ओठावर कायमचे कोरलेले हास्य यांच्या जोरावर त्यांच्या पक्षाने सत्ता मिळवली. परंतु सत्तेत आल्यानंतर दोस्तीला ओहोटी लागली. 1972मध्ये एमजीआर यांनी डीएमके पक्षातून बाहेर पडून ऑल इंडिया अण्णा द्रविड मुनेत्र

कळघम (एआयएडीएमके) या स्वतंत्र पक्षाची स्थापना केली. त्यामुळे मूळ डीएमके पक्षातील चित्रपटाचे ग्लॅमर बघताबघता नष्ट झाले.

'आमच्याच जमिनीवर किती दिवस तुम्ही आम्हाला मूर्ख ठरवणार आहात?' हे या नवीन पक्षाचे घोषवाक्य होते. पूर्ण तमिळनाडूतील त्यांच्या चित्रपटांचे फॅनक्लब्स त्यांच्या पक्षाची ऑफिसेस म्हणून कार्यरत झाले. 1977मध्ये या पक्षाच्या हातात सत्ता आली. 1977, 1980 व 1984च्या निवडणुका अण्णा-डीएमके पक्षाने जिंकल्या आणि एमजीआर यांनी मुख्यमंत्रीपदाची सूत्रे सतत 12 वर्षे – त्यांच्या मृत्यूपर्यंत – सांभाळली. त्यांनी पुढाकार घेऊन सुरू केलेली, शाळेतल्या मुला-मुलींसाठीची फुकट सकस आहार योजना यशस्वीरीत्या राबवली. श्रीमंतांना व उच्चवर्णीयांना अडचणीची ठरणारी ध्येयधोरणं व पोलिसी अतिरेक, या गोष्टी असूनसुद्धा त्यांनी स्वतःच्या व्यक्तिमत्त्वावर व चित्रपटात दाखवल्याप्रमाणे, औदार्याच्या काही तुरळक उदाहरणांच्या जोरावर पक्षप्रतिमा उंचावली. खेड्यापाड्यांतील गोरगरीबांना ते अगदी जवळचे वाटू लागले. शेवटच्या निवडणुकीपर्यंत त्यांना लोकांनी निवडून दिले.

त्यांच्या सत्तेच्या काळात, एमजीआरच्या आग्रहामुळे एआयएडिएमके पक्षात जयललिता सामील झाली. खरे पाहता तिला राजकारणाचा तिटकारा होता. ती जन्माने ब्राह्मण असल्यामुळे या ब्राह्मणद्वेष्ट्या पक्षातील तिचा प्रवेश अनपेक्षित होता. परंतु तिच्याकडे उपजतच नेतृत्वगुण होते. तिचे सुंदर, मादक रूप; हजरजबाबी चातुर्य आणि हिंदी व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व यामुळे पक्षातर्फे ती खासदार म्हणून निवडणूक जिंकली व दिल्लीमध्ये मिरवू लागली. एमजीआरच्या आतल्या गोटातील कार्यकर्ते अस्वस्थ होत होते. ती डोईजड होऊ नये म्हणून इतर कार्यकर्त्यांनी भरपूर प्रयत्नही केले.

24 डिसेंबर 1987 रोजी एमजीआरचा मृत्यू झाला, आणि त्याच दिवसापासून जयललिता तिची महत्त्वाकांक्षा प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे व्यक्त करत आग्रहाने मांडू लागली. एमजीआरचा मृतदेह शोकाकुल जनतेसमोर अंत्यदर्शनासाठी ठेवलेला असताना सर्व कॅमेऱ्यांसमोर आपला चेहरा कायम दिसावा, या दृष्टीने ती एमजीआरच्या डोक्यापाशी ठाण मांडून बसली होती. एमजीआरची पत्नी, जानकी, हिचा विसर पडावा इतपत कॅमेरे जयललितावर रोखलेले होते. दोन दिवस हा तमाशा चालला होता. प्रेतयात्रेच्या वेळी जयललिता एमजीआरच्या कुटुंबियांसमवेत गाडीत बसण्याच्या प्रयत्नात होती. परंतु एमजीआरच्या नातेवाईकांनी तिला अक्षरशः ढकलून दिल्यामुळे तिचा नाईलाज झाला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे या सर्व घडामोडी टीव्ही कॅमेऱ्यासमोर घडत होत्या!

पुढील चार वर्षे ती पक्षातील व पक्षाबाहेरील विरोधकांचा सामना करत होती, संघर्ष करत होती. परंतु तिची महत्त्वाकांक्षा तसूभरही कमी झाली नाही. 1991 सालात शेवटी ती मुख्यमंत्रीपदी विराजमान झाली. चेन्नईच्या मरीना बीचवर एआयएडिएमके पक्षाचे फाटके–तुटके झेंडे बघायला मिळतात. तेथील मासेमारीवर जगणाऱ्या लोकांशी संवाद साधल्यास 'अम्मा'च्या औदार्याच्या कथा ऐकायला मिळतील. त्सुनामीनंतर पुनर्वसनासाठी तिने केलेल्या प्रयत्नाबद्दल ते सर्व चिरऋणी आहेत. 'जेव्हा अम्मा जेलमध्ये गेली तेव्हा आम्ही सर्व अनाथ झालो. ती आमच्या पोटापाण्याची व्यवस्था करणाऱ्या एका अथांग दर्यासारखी आहे,' एक उत्स्फूर्त प्रतिक्रिया. समुद्राकाठी झोपडीत राहणाऱ्या या लोकांची तिच्यावर अफाट श्रद्धा आहे. 'तिने लाच घेतली व भरपूर माया जमवली हे नक्कीच चुकीचे आहे. परंतु आजकाल कोण लाच घेत नाही?' हा त्यांचा प्रतिप्रश्न. 'ती एक बाई आहे म्हणून तिला एवढा त्रास!', त्यातल्याच एका बाईची प्रतिक्रिया.

राजकारणातील प्रारंभीच्या काळात एमजीआरच्या चित्रपटकारकिर्दीमुळे पक्षावरील चित्रपटाचा पगडा दूर करण्याचे काम तिला प्रथम करावे लागले. चित्रपटतारका जेव्हा सार्वजनिक व्यवहारात वावरतात तेव्हा त्यांच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविले जातात, बदनामी केली जाते; अफवांना ऊत येतो व राजकारणातून पळ काढण्यास दबाव आणला जातो. त्यामुळे तिला आपली चित्रपटातील प्रतिमा पुसायची होती. म्हणूनच ती जेव्हा पहिल्यांदा मुख्यमंत्री झाली तेव्हा अंग संपूर्णपणे झाकण्यासाठी साडीच्या आत चिलखतसदृश कपडे घालू लागली, आणि तिने मतदारांना ताई म्हणून संबोधण्यास सांगितले. दुसऱ्या टर्मच्या वेळी तिने अंगावर चिलखत घालण्याचे सोडून दिले. आता तिला मतदार 'अम्मा' म्हणून ओळखू लागले. ताईच्या ऐवजी 'अम्मा' हे संबोधन फिट बसले आणि मतदारांना एक आई मिळाली.

'अम्मा'ची सत्ता राबविण्याची पद्धत हुबेहूब एमजीआरसारखी आहे. लोकानुनय, एकाधिकारशाही आणि कशातही सहजपणे (व त्यातल्या त्यात कायद्याच्या कचाट्यात) न अडकण्याचं कसब, यामुळे ती अजूनही तग धरून आहे. तिच्या मुख्यमंत्रीपदाच्या पहिल्या टर्मच्या काळात तिच्या निर्णयाच्या विरोधात भाष्य करणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या तोंडावर ॲसिडचा मारा केला गेला. जयललिता मात्र असे काही घडलेच नाही, यावर ठाम होती. 'तुम्ही माझ्याविरोधात काही भाष्य केल्यास तुमच्या सर्व भानगडी जाहीर करेन' अशी धमकी देऊन तिने विरोधकांचे तोंड बंद केले आहे. तिला तुरुंगवासाची शिक्षा झाल्यानंतर मुख्यमंत्रीपदावर बसलेला तिचा 'चमचा' पन्नीरसेल्वन, ढसाढसा रडत होता. ती बसत असलेल्या खुर्चीवर तो शेवटपर्यंत बसला नाही. रामायणातील भरताप्रमाणे अम्माच्या पादुकांची पूजा तेवढी करायचे राहून गेले असेल! त्या वर्षीच्या अर्थसंकल्पाची कागदपत्रं ठेवलेल्या ब्रीफकेसवर अम्माच्या चेहऱ्याचा फोटो ठळकपणे दिसण्याची व्यवस्था त्याने केली होती.

'पुरुषांच्या वर्चस्वाला आव्हान देऊ शकणारी स्त्री' म्हणून कदाचित तमिळ स्त्रिया तिला मत देत असाव्यात, असा एक अंदाज वर्तविला जातो.

या सर्व गोष्टी वाचत असताना कदाचित तमिळनाडू हे एक मागासलेले, अराजकतेने ग्रासलेले राज्य आहे, असे वाटत असेल. परंतु तसे अजिबात नाही. Human Development Index च्या अनुसार तमिळनाडू आठव्या तर महाराष्ट्र सातव्या क्रमांकावर आहे. तमिळ भाषकांच्या द्रविड संस्कृतीचा इतिहास इ.स. पू 2000 सालापर्यंत जातो. येथील चोळ, चेर, पांड्य या राजघराण्यांनी इ.स. 600 पासून 1650पर्यंत तमिळ प्रदेशावर राज्य केले. आपल्या राज्याच्या सीमा व संस्कृती श्रीलंका, जावा, सुमात्रा इत्यादी देशांपर्यंत नेल्या. या राज्याची शिल्पकला, साहित्य, कर्नाटक संगीत जगभर प्रसिद्ध आहे. चांगल्यापैकी सत्ता राबवत असलेले एक उत्तम राज्य, अशी पावती देता येईल, इतपत येथील प्रशासनव्यवस्था चांगली आहे. अमर्त्य सेन यांच्या An Uncertain Glory या पुस्तकात (पा. क्र. 211 – 220) दिलेल्या आकडेवारीची महाराष्ट्राबरोबर तुलना केल्यास, तमिळनाडू हे मागासलेले राज्य नाही हे लक्षात येईल. माणशी सरासरी उत्पन्न, जन्म-मृत्यूचा दर, कुटुंबनियोजन, साक्षरता व शिक्षण, शाळेतील हजेरीपट, शाळेतील सोयीसुविधा, राज्यातील स्त्री–पुरुष प्रमाण, सार्वजनिक आरोग्य, बालकांचे आरोग्य, शौचालय, पिण्याचे पाणी, वीज, मोबाइल, दुचाकी, टीव्ही, निवडणुकीत जनतेचा सहभाग इत्यादी सर्व आघाड्यांवर तमिळनाडू महाराष्ट्राच्या बरोबरीने किंवा काही बाबतीत महाराष्ट्राच्या दोन पावलं पुढेच आहे. या पुस्तकात तमिळनाडूची प्रशासकीय व्यवस्था, कल्याणकारी उपक्रम व सार्वजनिक सेवांचा लाभ तळागाळापर्यंत चांगल्या प्रकारे पोचवणारे राज्य, म्हणून उल्लेख केला आहे. आलटून पालटून सत्तेवर येणाऱ्या करुणानिधी वा अम्मा यांच्या कालखंडात विकासाची उपेक्षा झाली नाही. चेन्नई शहर 'डेट्रॉइट

ऑफ इंडिया' या नावाने ओळखले जाते; कारण सर्वात जास्त कार्सचे उत्पादन तिथे होत आहे. राजकीय अस्तित्वासाठी जे काही करायला हवे, ते सर्व करण्यासाठीचा मुत्सद्दीपणा तिच्यात ठासून भरलेला आहे. मोडके-तोडके शिक्षण असूनसुद्धा प्रशासनातील बारकावे समजून घेणे, ध्येयधोरणांची काटेकोर अंमलबजावणी करणे, कायदे-नियम याबद्दलची इत्थंभूत माहिती व संदर्भ यांचा योग्य वापर करणे इत्यादींवर तिचे प्रभुत्व आहे.

परंतु मतदारांवर तिच्या व्यवस्थापनकौशल्यापेक्षा, ज्या प्रकारे ती प्रत्येक गोष्टीचं ब्रँडिंग करते याचाच प्रभाव जास्त आहे व मतदार त्याचेच कौतुक करतात. 2006च्या निवडणुकीत जयललिताचा कित्ता गिरविल्याप्रमाणे करुणानिधीने घरोघरी फुकट टीव्हीचे आमिष दाखवून निवडणूक जिंकली. वस्तू फुकट वाटण्याचे हे लोण अजूनही जिवंत आहे. 2011 साली अम्मा सत्तेवर आल्यानंतर साड्या, त्यानंतर सीलिंग/टेबल फॅन, तांदूळ, गाय/म्हैस, शेळी, मिक्सर्स, सायकल अशी रांगच लागली. यातील प्रत्येक वस्तूच्या पुढे 'अम्मा' हा ब्रँड ठळकपणे लावलेला आहे; अम्मा मीठ, अम्मा सिमेंट, अम्मा वॉटर फिल्टर इ. इ. काही वेळा ग्रामीण भागातील गरीब गर्भवती स्त्रियांना बाळंतिणीला लागणाऱ्या वस्तू देणे हा स्तुत्य उपक्रम असला, तरी ज्या प्रकारे सार्वजनिक पैसा उधळला जात आहे; त्याबद्दल तिच्या व इतर पक्षांतील कार्यकर्त्यांमध्ये नाराजी आहे व उघडपणे त्याची चर्चाही होत आहे. पुढच्या निवडणुकीत कदाचित घरोघरी रेफ्रिजरेटर वा एअर कंडीशनर देणार, असे आश्वासन ती देईलही. परंतु ग्रामीण भागात 24 तास वीजपुरवठा नसल्यामुळे साध्या लोखंडी कपाटावर तिला समाधान मानावे लागेल.

प्रत्येक कल्याणकारी उपक्रमाचे ब्रँडिंग फक्त अम्माच्या नावे होत असल्यामुळे तमिळ भाषकांची ती आई झाली आहे. 'जे काही चांगले घडत आहे ते तिच्यामुळे व तिच्या आग्रहाखातर' हा संदेश घरोघरी पोचविण्यात ती

यशस्वी झालेली आहे. तिला शिक्षा झाली तेव्हासुद्धा अनेकांना तिच्या कृतीत काहीच चूक नव्हती, असेच वाटत होते. 66 कोटींची अफरातफर ही काही फार मोठी रक्कम नाही. (आणि न्यायालयानेही ते मान्य केले आहे.) तमिळनाडूत जे काही घडत असते; ते तद्दन फिल्मी असते, नाट्यमय असते, भावनात्मक असते. मिथकं व अफवांवर विश्वास ठेवून इथले राजकीय व्यवहार चालतात.

हुसेनी नावाचा शिक्षक कराटेपटू, शिल्पकार, तिरंदाज व चित्रपटांत काम करणारा नट आहे. स्वतःचे शिल्पकौशल्य वापरून त्याने जयललिताचा अर्धपुतळा बनविला व त्यासाठी त्याचे व त्याच्या विद्यार्थ्यांचे 11 लिटर रक्त वापरण्यात आले, असा त्याचा दावा होता. तरीसुद्धा 'मी इतरांप्रमाणे स्वतःला जाळून घेण्याइतका मूर्ख नाही. मी सुशिक्षित आहे. येथे करोडो स्त्री-पुरुष व मुलं अम्मावर प्रेम करतात. माझ्यापेक्षाही जास्त प्रेम करतात. परंतु या शिल्पमाध्यमातून मी माझे प्रेम व्यक्त करत आहे.', असे तो सांगत होता.

याचीच पुढची पायरी म्हणजे अम्मासाठी त्याला येशू क्रिस्ताप्रमाणे क्रूसावर खिळे मारून घ्यायचे आहे. त्याच्या विद्यार्थ्यांकडून तळहातावर व तळपायावर 6 इंची खिळे मारून घेण्याच्या तो तयारीत होता. क्रूसावर चढून त्याने एक लंबेचौडे भाषणही ठोकले. भाषणात अम्मा व फक्त अम्मा होते. जयललिताने त्याला असे काही करू नको, म्हणून नाराजी व्यक्त करणारे पत्र लिहिले. हुसेनीला त्या पत्रातील मजकुराचेही कौतुक वाटत होते. आता त्याने ते पत्र फोटोफ्रेममध्ये लावून ठेवलेले आहे. हाता-पायांवरील खिळ्याच्या खुणा बाळगून तो हिंडत फिरत आहे. अशा प्रकारच्या उद्रेकाचे विविध प्रकार अम्माच्या उदात्तीकरणास हातभार लावत असतात.

अम्माच्या एआयएडिएमके पक्षातील कुठल्याही व्यवहारात वैचारिकतेचा लवलेश नसतो; सर्व काही शारीरिक, भावनिक. त्याची सुरुवात चित्रपटातून

होते व त्यातील एकमेकांचे संबंध, त्यातून मित्रत्व वा शत्रुत्व, त्यासाठीचा झगडा, मारामारी, दोषारोप, आदर-सत्कार या सर्व गोष्टी फिल्मी स्टाइलमध्ये सादर होतात. शारीरिक लगट असते. त्यांच्या या राजकीय नाट्याच्या पहिल्या अंकानंतरच्या पुढच्या अंकात सामान्य जनतेचा सहभाग असतो. एका प्रकारे रक्ताचे नाते त्यातून व्यक्त होत असते. जुन्या काळच्या चित्रपटातील खलनायक एम. आर. राधाने एकदा एमजीआरवर खरेखुरे पिस्तूल रोखून गोळी मारली. गोळी खांद्यापाशी चाटून गेल्यामुळे एमजीआरचा जीव वाचला. फिल्मी स्टाइलच्या सादरीकरणामुळे त्याचाही इव्हेंट करण्यात आला. एमजीआरला रक्त देण्यासाठी त्याचे चाहते मैलोन्मैल रांगेत उभे होते. एमजीआर सुखरूपपणे हॉस्पिटलमधून बाहेर पडल्यानंतर, त्यांनी बाहेर जमलेल्या त्यांच्या चाहत्यांना 'माझ्या रक्तबांधवांनो' अशी हाक मारली. एमजीआरने एआयएडिएमके पक्षाची स्थापना केल्यानंतर प्रत्येक कार्यकर्त्याला स्वतःच्या दंडावर पार्टीचा झेंडा गोंदवून घेण्याचे आदेश दिले. एमजीआरवरील दृढविश्वासाचे ते प्रतीक होते. हजारो कार्यकर्त्यांनी त्या प्रकारे गोंदवून घेतले. जयललिता मरीना बीचवर आंतरराज्य पाणी वाटपाच्या विरोधात 80 तास उपोषणाला बसली, तेव्हासुद्धा लाखो लोक तिच्याबरोबर उपोषणाला बसले. पक्षात खुट्ट काही झाले तरी स्वतःच्या अंगावर रॉकेल/पेट्रोल ओतून, पेटवून घ्यायला कार्यकर्ते तयार!

पक्षसदस्यांची खरोखरच एवढी भक्ती, एवढा गाढ विश्वास असू शकेल का; याबद्दल अनेकांच्या मनात शंका-कुशंका आहेत. राजकारणाच्या रंगमंचावरील अम्माच्या माकडचाळ्यांना खरोखरच एवढा मोठा उत्स्फूर्त प्रतिसाद कसा काय मिळू शकतो? खरे पाहता जयललिता असो वा करुणानिधी, येथील राजकीय नेत्यांसमोर दुसरा पर्याय नाही; हीच तर या राज्याची शोकांतिका आहे. त्यामुळे या दोघांपैकी कुणाची तरी हांजी-हांजी करण्याशिवाय गत्यंतरच

नाही. म्हणूनच या राज्याची सत्ता एकदा जयललिताकडे व नंतर करुणानिधीकडे, अशी आलटून पालटून जात असते. त्यांच्या प्रतिमा वेगळया असल्या तरी कार्यशैली सारखीच असते.

तरीही इथले लोक स्वतःला जाळून घेण्याच्या टोकाला का जातात, हे अजूनही न सुटलेले कोडे आहे. आत्मघातकी कृतीत कुठलेही पारंपरिक शहाणपण नाही; तरीसुद्धा हे घडत आहे. अण्णादुराईच्या मृत्यूनंतर, एमजीआरच्या अपघाताच्या वेळी व त्याच्या मृत्यूनंतर आणि अम्माच्या कारकिर्दीच्या काळात याचा प्रत्यय आला आहे. एका पुढाऱ्याच्या मते पक्षकार्यालयातूनच याला फूस मिळते आणि वरिष्ठ कार्यकर्तेच या दुर्घटना स्टेजवर आणणे मॅनेज करतात. यात उत्स्फूर्तता, भावनावेग, मान्यता असे काहीही नसते. आत्महत्येला प्रेरित करणे इतके सोपे नसते. हे पक्ष अशा प्रसंगी कुठल्याही थराला जाऊ शकतात. पैशाचा वापर, दमदाटी वा ब्लॅकमेल करण्यास हे पक्ष मागे-पुढे पाहणार नाहीत. आत्महत्या करून घेतलेल्या कुटुंबाला पुढील काही पिढ्या खाऊन-पिऊन आरामात सुखी राहण्याएवढे पैसे मिळत असल्यास कुणीही मरायला तयार होतील, हा कयास त्यामागे असेल. एवढेच नव्हे तर आत्महत्या केलेल्यांचे आकडेसुद्धा फुगवून सांगितलेले असतात. उद्रेकाच्या काळात कुणीही कुठल्याही कारणाने मेले तरी अम्मासाठी आत्महत्या करून मेला, या छापाच्या बातम्या प्रसृत केल्या जातात व त्याचबरोबर 'अम्माला फार वाईट वाटले' अशा प्रकारचे निवेदनही छापवून आणलेले असते.

सरकारी जाहिराती म्हणजे या नेत्यांचे एक कुरणच असते. अम्माच्या उदात्तीकरणाच्या गोष्टी अगदी रंगवून सांगितल्या जातात. एका जाहिरातीमध्ये एक जख्ख म्हातारी 'पाऊस नाही, पाणी नाही' म्हणून हळहळत असताना दुसरी एक (फॅशनेबल) तरुणी 'काळजी नको करू. अम्माने लाखो झाडं

लावलेली आहेत; आता लवकरच पाऊस येईल' असे सांगते. शेवटी एमजीआरच्या चित्रपटातील 'उद्याचा दिवस आमचा' हे गाणे म्हणत माहितीपटाची सांगता होते.

चेन्नईच्या एका पोलीस निरीक्षकाची तीन बोटं कापलेली दिसत होती. कारण विचारल्यानंतर, अम्माची जेलमधून सुटका होण्यासाठी देवीपुढे बोट कापून घेण्याचा नवस, असे त्याने सांगितले.

"ही गोष्ट अम्माला कळली का?"

"हो, कळली."

"तिने काय केले?"

"मला नोकरीतून काढून टाकले. तरीसुद्धा तिने माझ्या हॉस्पिटलचा पूर्ण खर्च परत दिल्यामुळे मी तिचा ऋणी आहे."

एका आडगावातील खेड्याला अम्मा भेट देणार होती. काही कारणामुळे ती वेळेवर पोचू शकली नाही. हजारोंचा जमाव अस्वस्थ झाला. घोषणा–प्रतिघोषणांना ऊत आला. लोक पांगतील की काय वा वाटेत मोडतोड करतील की काय, अशी भीती स्थानिक नेत्याला वाटू लागली. त्यांनी त्यावेळी एक शक्कल लढवली. स्पीकरवरून जयललिताच्या एका जुन्या चित्रपटातील गाणे ऐकवले. जमाव शांत झाला व सर्वजण अम्माची वाट पाहू लागले.

महाराष्ट्रातसुद्धा असे अनेक स्वयंघोषित बाबा, दादा, आबा, ताई, माई आहेत. परंतु त्यांपैकी एकही अम्माच्या जवळपासही जाऊ शकत नाही. कारण हे आबा, दादा, बाबा फक्त आपली व आपल्या जातभाईंची सोय पाहतात व (अवैध मार्गाने) कमावलेली संपत्ती फक्त आपल्या कुटुंबियांच्या सुखसोयीसाठी वापरतात. त्यामुळे अम्मासारखी व्होट बँक तयार करण्यास ते कमी पडतात.

अशी आहे ही तमिळनाडूची अम्मा व अम्माचा हा तमिळनाडू!



# अक्षयपात्र फौंडेशन

दुपारच्या (वा एक वेळच्या) जेवणाची भ्रांत असलेली मुलं सहसा शाळेला जात नाहीत, या प्रत्यक्ष अनुभवावरून 2001 साली अत्युच्च न्यायालयाने शाळेत शिकत असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना एक वेळ (चौरस, सकस) मोफत जेवण पुरविण्याचे आदेश सर्व राज्यांना दिले. नेहमीप्रमाणे प्रशासनांच्या मगरमिठीतून व लालफितीतून मुलांपर्यंत जेवणाचे ताट येण्यासाठी भरपूर पावसाळे गेले.

आताशीच कुठे तरी बहुतेक राज्यामध्ये जेवण पुरवणाऱ्या व्यवस्थेची घडी बसलेली असून बहुतांश विद्यार्थ्यांना जेवण मिळत असावे असे म्हणता येईल. अजूनही महाराष्ट्र राज्याच्या कानाकोपऱ्यापर्यंत ही योजना पूर्णपणे पोचलेली आहे की नाही या बद्दल शंका वाटते. परंतु शेजारच्या कर्नाटक राज्याने बंगळूरू येथील अक्षयपात्र फौंडेशन या स्वयंसेवी संस्थेच्या सहकाऱ्याने शालेय विद्यार्थ्यांना दुपारचे जेवण पुरवण्यात यशस्वी झालेली आहे.

अक्षयपात्र फौंडेशनची स्थापना 2000 साली झाली. बेंगळूरू येथील पाच शाळेतील 1500 विद्यार्थ्यांना दुपारचे मोफत जेवण पुरविण्याची जबाबदारी या संस्थेने घेतली होती. लोकांच्या उदार देणगीतून हा उपक्रम राबवला जात होता. 2006 साली मिलेनियम डेव्हलपमेंट गोलची पूर्तता करण्याच्या उद्देशाने दुपारचे मोफत जेवणाची जबाबदारी घेऊ शकणारी पब्लिक-प्रायव्हेट भागीदारीसाठी शासकीय पातळीवर प्रयत्न करण्यात येत होते. अक्षयपात्र फौंडेशनने काही अटीवर ही जबाबदारी घेतली. आज भारतभरातील 9 राज्यात हे फौंडेशन कार्यरत आहे. 9692 शाळेतील सुमारे 15 लाख विद्यार्थ्यांपर्यंत दुपारचे जेवण नियमितपणे पोचविण्यात ती यशस्वी झालेली आहे. यासाठी अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर केलेला असून दुपारचे गरम सत्वयुक्त जेवण विद्यार्थ्यांच्या ताटात पोचवणे फौंडेशनला शक्य होत आहे.

मोठ्या प्रमाणात सामाजिक जीवनावर परिणाम करू शकणाऱ्या काही मोजक्या उपक्रमात शालेय विद्यार्थ्यांना पोटभर जेवणाची हमी याला प्राधान्यक्रम द्यावे लागेल. व्यवस्थापन, तंत्रज्ञान, कार्यक्षमता व आर्थिक तरतूद इत्यादींच्या बळावर फौंडेशन हा उपक्रम राबवत आहे. एकाच वेळी एक लाख विद्यार्थ्यासाठी जेवण बनविण्याची किमया बेंगळूरू येथील त्यांच्या किचन युनिटमध्ये होत असून त्याचा थोडक्यात आढावा येथे घेतला आहे.

हे स्वयंपाकघर तीन मजली असून येथील मशीनरीमध्ये गुरुत्व बळाचा मुबलक प्रमाणात वापर केलेला आहे. प्रत्येक मजल्यावर वेगवेगळी कामं केली जातात. येथे रोज 7-8 टन तांदूळ शिजविले जाते. 6-7 टन भाजी व 2 टन डाळीपासून येथील विद्यार्थ्यांना आवडणारे सांबार बनवले जाते. यातील प्रत्येक किचन युनिटची क्षमता 50000 ते 150000 जेवणाचे ताट बनवण्याइतकी आहे. ही संस्था स्थानिक बाजारातूनच तांदूळ, भाज्या व डाळ यांची खरेदी करत असल्यामुळे स्थानिक शेतकऱ्यांना फायदा होतो व ने-आणीतील नुकसान टाळता येऊ शकते.

रात्रीच्या 3 वाजता स्वयंपाकाला सुरुवात होते. पुढील 3 तासात स्वयंपाक तयार होऊन डब्यात भरण्यासाठी सज्ज झालेली असते. जेथे शक्य आहे तेथे आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करून कमी खर्चात व जास्त वेगाने आणि गुणवत्तेत कुठेही तडजोड न करता हा उपक्रम फौडेशन राबवत आहे. स्वयंपाकासाठीचे जळण म्हणून उसाच्या चिपाड्यापासून बनवलेले बायो फ्युएलच्या विटा वापरल्या जातात.

वरच्या मजल्यावर स्वयंपाकासाठी लागणाऱ्या आहारपदार्थांची पूर्व तयारी केली जाते. भाज्या चिरणे, तंदूळ – डाळी निवडणे, भिजत ठेवणे इत्यादी कामे येथे केल्या जातात. पाण्याच्या तीन टाक्यांचा वापर करून भाज्या स्वच्छ व निर्जंतुक केल्या जातात. पहिल्या टाकीतील साध्या पाण्यात, दुसऱ्या टाकीतील

50-100 ppm क्लोरीन असलेल्या पाण्यात (10 मिनिटं भिजत ठेऊन) व तिसऱ्या टाकीतील पुनः एकदा साध्या पाण्यात, अशा प्रकारे भाज्या धुतल्या जातात. भाज्या चिरण्यासाठी मशीन्सचा वापर मोठ्या प्रमाणात केला जातो. एका तासात सुमारे अर्धा टन भाजी चिरणे शक्य आहे. चिरून वा कापून झाल्यानंतर ही भाजी chute मार्फत खालच्या मजल्यावर पाठवले जाते.

या दुसऱ्या मजल्यावर भात, सांबार शिजवले जातात. वाफेचा जास्तीत जास्त वापर येथे करत असल्यामुळे जास्त कार्यक्षमपणे स्वयंपाक बनवणे शक्य होत आहे. यातील एकेका भांड्यात 1200 विद्यार्थ्यांसाठी लागणारे 100 किलो भात तयार होऊ शकते. निवडून स्वच्छ केलेले तांदूळ chute द्वारे तिसऱ्या मजल्यावरून या भांड्यात आपोआप येऊन पडते. जेवण बनवताना माणसांच्या हाताचा स्पर्श पूर्णपणे टाळला जातो. भांड्यात 2 टन डाळ व 6-7 टन भाज्या शिजवून सांबार तयार केले जाते. यासाठी सुमारे 2 तास वेळ लागतो. व 6500 विद्यार्थ्यांना पुरेल एवढे सांबार या भांड्यात केले जाते.

भात शिजविल्यानंतर तळ मजल्यावरील पॅकिंग क्षेत्रात chuteमधून भात खाली येतो. हा भात स्टेनलेस स्टीलच्या हवानियंत्रित डब्यात भरला जातो. व हे डबे शाळेत पोचवल्या जातात. डबे भरताना वा पोचवताना स्वच्छतेची भरपूर काळजी घेतली जाते. डबे हाताळणारे पायात विशिष्ट प्रकारचे गमबूट, हातमोजे व डोक्यावर शेफची टोपी व तोंडाला रुमाल बांधून डबे भरतात. येथील कामगारांना व बाहेरून येणाऱ्या अभ्यागतांना विशेष प्रकारचे शूज वापरूनच आत जाण्याची सक्ती केली जाते.

सांबारसुद्धा विशेष chute मधूनच वरच्या मजल्यावरून तळमजल्या-वरील भांड्यात येऊन पडते. दर आठवड्याला एका दिवशी गोड पदार्थाचा एक वेगळा डबाही शाळेला पाठवला जातो. दुपारच्या जेवणाचा मेनू त्या त्या जिल्ह्यातील खाण्याच्या आवडी निवडीप्रमाणे थोडा फार बदललेला असतो.

उत्तर कर्नाटकातील विद्यार्थ्यांना जास्त भाताऐवजी भाकरी/चपातीची सोय केलेली असते. बहुतेक ठिकाणी स्थानिक स्वैपाक्यांना पसंत केले जाते. त्यामुळे विद्यार्थ्यांना घरातलेच जेवण खाल्यासारखे वाटते. समतोल आहाराचे निकष पूर्ण करण्यासाठी प्रत्येक विद्यार्थ्याच्या जेवणात दहीचे पाकीट असते. व ही दही स्थानिक सहकारी दूध उत्पादक संघातून खरेदी केलेली असते.

जेवणाचे डबे भरून झाल्यानंतर स्वयंपाकाची सर्व खरकटे भांडी कुंडी, भाजी चिरण्याची/कापण्याची साधनं, सर्व chute, सांबाराच्या टाक्या, पळी, चमचे इत्यादी सर्व साहित्य गरम पाण्याच्या फवाऱ्याने धुवून वाळवल्या जातात. व दुसऱ्या दिवशीच्या स्वयंपाकासाठी सज्ज ठेवल्या जातात.

जेवणाचे डबे शाळेत पोचवण्यासाठी खास प्रकारच्या गाड्या वापरल्या जातात. रस्ते, शाळेचे ठिकाण, व तेथे पोचणारे डबे यांचे नियोजन केलेले असते. कमीत कमी  वेळेत डबे पोचतील याची काळजी घेतलेली असते. ताट, वाट्यांची सोयसुद्धा केलेली असते.

या सर्व गाड्या सकाळच्या सहा वाजल्यापासून जेवणाचे डबे नेण्यासाठी सज्ज झालेले असतात. जेवणाच्या वेळेपर्यंत ग्रामीण भागातील अगदी टोकाच्या खेड्यातील शाळेपर्यंत त्या पोचतात. या निळया गाडीची विद्यार्थी वाटच पाहत असतात. जेवणापूर्वीच्या प्रार्थनेनंतर ओळीने येऊन डब्यातील जेवण ताट – वाट्यात वाढून घेतात. किती वेळा पाहिजे तेवढे वेळा अन्न पदार्थ मागून घेण्याची मुभा येथे आहे.

सरकारी अनुदानातून ही योजना राबवत असले तरी हे अनुदान अपुरे पडत असल्यामुळे अक्षयपात्र फौंडेशन देणगी स्वरूपात पैसे गोळा करून हा उपक्रम राबवत आहे. फौंडेशनचा पसारा वाढल्यामुळे स्वयंपाकाचे विकेंद्रीकरण करत असून त्यात स्थानिक महिलांना स्वच्छता, गुणवत्ता इत्यादी बाबतीत प्रशिक्षित

करून त्यांचा सहभाग वाढवत आहे. गुणवत्ता, रुचकरपणा, कार्यक्षमता व सकस आहार याकडे विशेष लक्ष दिले जाते.

दुपारच्या वेळी विद्यार्थ्यांपर्यंत गरम व सकस जेवण पोचविण्यात ही संस्था यशस्वी होत आहे.

माध्यान्ह भोजनाच्या बाबतीतही राज्य निहाय खूप तफावत दिसून येते. सच्चर समितीच्या अहवालातील आकडेवारी पाहता हे प्रमाण सरासरी 26.8% इतके अखिल भारतीय स्तरावर दिसून येते. महाराष्ट्राचे प्रमाण 31.4% इतके आहे महाराष्ट्राशी शेजारील राज्याची तुलना केली असता हेच प्रमाण कर्नाटक 45.8%, आंध्र प्रदेश 29.9%, गुजरात 33.0%, तर तमिळनाडू 53.5% इतके आहे आपल्या शेजारील राज्यांशी तुलना करता आर्थिक दृष्ट्या सर्वात प्रगती पथावर असलेला महाराष्ट्र सामाजिक बाबतीत सगळयात पिछाडीवर असल्याचे दिसते. ही फारच गंभीर बाब आहे. माध्यान्ह भोजन आणि शाळेत टिकण्याचा संबंध सर्वश्रुतच आहे, त्यामुळे शाळा गळतीचे प्रमाण कमी करायचे तर त्यासाठी माध्यान्ह भोजनाच्या अंमलबजावणीकडे लक्ष देण्याची गरजेचे आहे. तसेच हे भोजन चांगल्या दर्जाचे असते का याची शहानिशाही व्हायला हवी.

अक्षयपात्र फौंडेशनसारखे तंत्रज्ञानाचा वापर करून विद्यार्थ्यांना माध्यान्ह भोजन पुरवणे महाराष्ट्रात का होऊ शकत नाही हा प्रश्न संबंधितांना विचारावासा वाटतो.



# ॲटोमॅटिक पोलीसींग

पुणे – मुंबईसारख्या शहरात आजकाल शेकडोंनी सीसीटिव्ही बसवलेले आपल्या लक्षात आले असेल. हे लोण या मोठ्या शहरापुरतेच मर्यादित नसून पुढील काही वर्षात महाराष्ट्राच्या काना -कोपऱ्यात सीसीटिव्हीचे जाळे पसरलेले दिसेल. सीसीटिव्हीचा मुख्य उद्देश दहशतवादाच्या विरोधात कारवाई असे

असला तरी दहशतवादाची टांगती तलवार नसतानासुद्धा सीसीटिव्ही यंत्रणा इतर प्रगत देशात कित्येक वर्षे होती हे विसरता येत नाही. आपले मुख्यमंत्री तर सीसीटिव्ही यंत्रणा कार्यान्वित झाल्यानंतर महाराष्ट्रातील गुन्हेगारीचे प्रमाण अर्ध्यावर येईल अशी आशा बाळगून आहेत. आणि 50 टक्के पोलीसांना घरी पाठवायचे मनसुबे रचत आहेत. या संदर्भात विकसित देशांचा काय अनुभव आहे हे पाहणे योग्य ठरेल.

मारिया ग्रास या महिलेला कार-ड्रायव्हिंगच्या वेळी काहीही चूक नसतानासुद्धा, पोलीसानी हायवेवर अडवले. मारियाच्या युक्तिवादाला आणि विनंतीला अव्हेरून तिचे लायसेन्स जप्त करून पोलीस स्टेशनवर येण्यास सांगून गेले. पोलीसांना तशी ऑर्डरच होती. मारियाच्या चेहऱ्यापट्टीशी साम्य असलेले वेगवेगळया नावाचे दोन ड्रायव्हिंग लायसेन्सेस तेथील संगणक यंत्रणेला सापडलेले होते आणि ट्रॅफिकच्या संगणक यंत्रणेने मारियाचा ठाव ठिकाणा पोलीसांना दिला होता. त्याचा लेखी ऑर्डरच पोलीसांच्या हातात होता. मारिया नंतरचे 2-3 आठवडे पोलीस स्टेशन, वकीलांचे चेंबर व कोर्ट असे चकरा मारत होती.

त्या शहराची सीसीटिव्ही यंत्रणा ड्राइव्ह करणारे चेहरे आणि ड्रायव्हिंग लायसेन्सेसवरील फोटोंची तुलना मोठ्या संख्येने व कमी वेळात अगदी रूटीन पद्धतीने करत असे. तसे करत असताना मारियाच्या चेहरा पट्टीशी जुळणारे दोन

ड्रायव्हिंग लायसेन्सेस संगणकाला मिळाल्यामुळे मारियाचे लायसेन्स जप्त झाले होते. Facial Recognition Software and Intelligent Computerized Analysis हे अल्गॉरिदम त्या शहरातील ड्रायव्हिंगच्या गुन्ह्यांचे नियंत्रण करत होती. व पोलीसांना ऑर्डर देत होती. मारियाच्या प्रकरणात संगणकाची चूक होती, हे लक्षात यायला बराच वेळ गेला. व मारियाला विनाकारण मनस्ताप भोगावा लागला.

मुळात आताच्या कुठल्याही दैनंदिन व्यवहारात तंत्रज्ञान – त्यातही विशेष करून संगणक तंत्रज्ञान – कधीच चूक करणार नाही हे आपल्या डोक्यात पक्के बसले आहे. नेहमीपेक्षा जास्त मोबाइल बिल आलेले असल्यास चूक कंपनीची नसून ग्राहकाचीच आहे असे ठासून सांगितले जात असते. कारण आमचे अल्गॉरिदम अचूक आहे, टेस्टेड आहे, फूलप्रूफ आहे असेच कंपनीच्या मॅनेजमेंटला वाटत असते. इलेक्ट्रिसिटीचे, टेलिफोनचे अवाच्या सवा बिल आले तरी अगोदर बिल भरा, नंतर ते कसे झाले याचा तपास करू व रिफंड देऊ ही प्रवृत्ती बळावलेली आहे व त्यामुळे ग्राहक हतबल होतो. आता गुन्हेगारीचे नियंत्रण करणाऱ्या अल्गॉरिदमची भर यात पडलेली आहे.

काही वर्षापासून कायदा व सुव्यवस्थेची जबाबदारी माणूस केंद्रित न करता, सर्वव्यापी व सर्वांतर्यामी अल्गॉरिदमवर केंद्रित केली जात आहे. माणसांचा हस्तक्षेप अजिबात नको ही वृत्ती बळावत आहे. माणसांनी फक्त संगणकाचे आर्डर्स पाळायचे एवढेच काम करायचे आहे. त्यामुळे माणूस उपरा होत आहे. सेन्सार्स, हायस्पीड कॅमेरे, स्पीड गन्स, ब्रेथ ऍनलायझर्स, प्रचंड क्षमतेचे संगणक आणि त्यांच्या जोडीला अल्गॉरिदम आणि संगणक प्रणाली इत्यादीमुळे शहरात होणाऱ्या लहान मोठ्या गुन्ह्यांचा शोध अजिबात वेळ न दडविता व गुन्हेगाराला पळून जाण्याची संधी न देता लावता येईल असा विश्वास व्यक्त केला जात आहे. सेन्सार्स व सीसीटिव्ही यंत्रणा सक्षम असल्यास कुठल्याही

प्रकारचा गुन्हेगार असो – भुरट्या चोरापासून सामूहिक बलात्कार करणाऱ्या नराधमापर्यंत –अल्गॉरिदमच्या जाळयात नक्कीच सापडणार याची खात्री आयटी तज्ञ देत आहेत. अशा अल्गॉरिदमचे पुरस्कर्ते कायदा व सुव्यवस्थेसाठी लागणाऱ्या खर्चात कपात, गुन्ह्याच्या शोधात लागणाऱ्या कालावधीत बचत, व खात्रीशीरपुराव्यासकट गुन्हेगारांना पकडल्यामुळे शिक्षा होण्याच्या संख्येत वाढ, असे एक सुंदर चित्र रंगवत आहेत. परंतु मानवाधिकाराच्या संदर्भात कार्य करणाऱ्यांना मात्र येथे काही तरी चुकत आहे असे वाटत आहे. कारण अल्गॉरिदम नियंत्रित जगामध्ये आपली यापुढची वाटचाल होणार की काय या कल्पनेने ते त्रस्त आहेत. हे अल्गॉरिदम पिढ्या न पिढ्या रूढ असलेल्या मानवी संवेदनांना बाजूला सारून जगरहाटीचे नियंत्रण करू लागल्यास पूर्ण समाजाला नेहमीच्या वर्तन - व्यवहारांचा पुनर्विचार करण्याची वेळ आली आहे की काय असे वाटत आहे.

आताच्या संगणकीकरणात जास्त sophistications आलेले असले तरी याची सुरुवात 8-10 वर्षापूर्वी झालेली आहे. पहिल्यांदा अशा प्रकारच्या अल्गॉरिदमचा वापर लहानश्या शहरातील वाहतूक नियंत्रणासाठी केला गेला. वाहतूक नियंत्रणासाठीच्या दिव्यांची वाहनावरील नंबर प्लेटशी सेन्सारद्वारे जोडल्यामुळे ट्रॅफिक सिग्नल्सचे नियम मोडून जाणाऱ्या गाड्यांच्या नंबर्सचे संकलन संगणक काही क्षणात करू लागले. यावरून चोरलेल्या वाहनांना शोधणे सुलभ झाले. सीसीटिव्ही कॅमेरांच्या feedback वरून माणूस नियंत्रित प्रक्रिया यंत्रणा असूनसुद्धा मार्गिकेवरील अंदाधुंद ड्रायव्हिंगचे नियंत्रण करणे शक्य झाले. या प्रक्रिया यंत्रणेला इंटरनेट व मोबाइल्सची जोड दिल्यामुळे वाहतुकीचे नियम मोडणाऱ्यांना पकडून दंड करणे सुलभ झाले. सर्व वाहनांचे रजिस्ट्रेशन data संगणक प्रक्रिया यंत्रणेला उपलब्ध झाल्यामुळे देशभरातील वाहनांवर पाळत ठेवणे शक्य होऊ लागले. तस्करी करणाऱ्या टोळयांचे

गैरव्यवहार उजेडात येऊ लागले. अवैध व्यवहारात गुंतलेल्या गुंडांना पकडणे शक्य झाले.

अलीकडील अल्गॉरिदममध्ये भरपूर सुधारणा झालेल्या आहेत. कॅमेरा लेन्समागील data वापरता येत असल्यामुळे अल्गॉरिदमची कार्यक्षमता वाढली. काही अद्यावत स्पीड कॅमेरा शहरात प्रवेश करणाऱ्या नवीन वाहनांचा मागोवा घेऊ शकतात. वेगमर्यादा ओलांडल्यानंतरही ड्रायंव्हिंग करणारे यापूर्वी दंड भरायच्या आतच निसटून जात होते. परंतु आता ते शक्य होईनासे झाले आहे. वैशिष्ट्यपूर्ण अल्गॉरिदममुळे वाहतुकीचे नियम मोडणाऱ्यांना ताबडतोब दंड भरावे लागत आहे. अल्प कालावधीतच एकाच प्रकारच्या गुन्ह्यासाठी 4-5 वेळा दंड भरलेले आढळल्यास लायसेन्स जप्त होऊ शकते.

सीसीटिव्ही कॅमेरे, सेन्सार्स, संगणक प्रणाली इ.इ व त्यावरील प्रक्रिया यंत्रणा अत्यंत कार्यक्षम झालेले आहेत. मानवी हस्तक्षेपाशिवाय ही साधनं व यंत्रणा 24/7 कार्यरत असतात. रूटिनच्या बाहेरील छोट्यातल्या छोटीशी घटनासुद्धा यंत्रणेच्या नजरेतून सुटत नाही. काही वेगळे घडत असल्यास मानवी यंत्रणेला सावध करते, इशारा देते. देखभाल व्यतिरिक्त माणसांचा संबंध येत नसलेली ही यंत्रणा अक्षरशः हजारो गुन्ह्यांचा व गुन्हेगारांचा तपास करून आवश्यक पुरावा उपलब्ध करून देऊ शकते. यंत्रणेतील चुकांचे प्रमाण शून्यावर आहे. एखाद्या ड्रायव्हरने वाहतुकीचे नियम मोडल्यास त्या गाडीचा नंबर संबंधित यंत्रणेकडून मध्यवर्ती यंत्रणेकडे त्वरित पाठवले जाते. मध्यवर्ती यंत्रणा काही क्षणातच गाडीच्या मालकाचा पत्ता शोधून रेकॉर्ड तयार करते. नंतर त्या मालकाचा मोबाइल नंबर शोधून गुन्ह्याचा प्रकार व दंडाची रक्कम कळवते. व ही रक्कम तासाभरात न भरल्यास जवळच्या पोलीस स्टेशनला वा बीटवरील अधिकाऱ्याला कळवून गाडी जप्त केली जाईल अशी दम भरते. मालक घाबरून इंटरनेटद्वारे दंड भरतो. व कारजप्तीची आपत्ती टाळतो. यात

कुठेही संशयास्पद वा शंका नसल्यास मानवी हस्तक्षेपाची गरज भासत नाही. सर्व काही आटोमॅटिक...

खरे पाहता यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही. आपल्या येथे कुकिंग गॅसच्या सबसिडीचे पैसे अशाच प्रकारे बिनाबोभाट ग्राहकाच्या बँकेत जमा होत असतात. गॅस सिलिंडरची पावती फाडल्या फाडल्या पावतीवरील ग्राहकाच्या आधार कार्डचा नंबर केंद्रीय प्रक्रिया युनिटकडे जातो. ती युनिट सबसिडीचे पैसे आधार कार्डची नोंदणी झालेल्या बँकेच्या मध्यवर्ती ऑफिसकडे पाठवते. मध्यवर्ती ऑफीस आधारकार्ड नंबरच्या आधारे ग्राहकाच्या बँकेच्या शाखेतील खात्यात पैसे जमा करते व ग्राहकाच्या नोंद झालेल्या मोबाइलवर मेसेज पाठवते. गॅस सिलिंडर घरी पोचायच्या आत खात्यात पैसे जमा झालेले असतात. या साखळीत पावती फाडणाऱ्या गॅस एजन्सीतील व्यक्ती अतिरिक्त माणसाचा संबंध येत नाही. सर्व काही स्वयंचलित होत असते. रोज लाखो करोडो सिलिंडर्सचा व्यवहार होत असावा. तरीसुद्धा कुठलाही गाजावाजा न होता बिनबोभाट व्यवहार होतात, हे सांगूनही खरे वाटणार नाही. हे सर्व अल्गॉरिदमची करामत आहे. हेच व्यवहार माणसांच्या द्वारे राबवण्याचा प्रयत्न केल्यास लाखो करोडो मानवी तास खर्ची पडले असते. मोठ्या प्रमाणात चुका झाल्या असत्या. व सबसिडी ग्राहकापर्यंत पोचण्यास वर्षानुवर्षे वाट पहावी लागली असती.

अशा प्रकारचे अल्गॉरिदम यानंतरच्या कायदा-सुव्यवस्थेसाठी वापरल्यास बिघडले कुठे असे वाटण्याची शक्यता आहे. मुळात संगणक यंत्रणेची व्याप्ती वाढत आहे व कार्यक्षमतेतही भर पडत आहे. NC, CNC मशीन्स, low end robot यांचा उत्पादनात सर्रासपणे वापर होत आहे. गुणवत्ता राखण्यासाठी संगणकावरील dependency वाढत आहे. त्यामुळे कायदा-सुव्यवस्थेच्या क्षेत्रात अल्गॉरिदम नियंत्रित व्यवस्था आणल्यास गुन्हेगारीचा दर कमी होत

जाईल असा विश्वास वाटत आहे. परंतु यासाठीच्या अल्गॉरिदम्समध्ये मानवी वर्तनाच्या स्वरूपाचा अंदाज घेऊन निर्णय प्रक्रिया राबवावी लागणार आहे. काही कार पार्किंग्समध्ये अशा प्रकारच्या अल्गॉरिदम्सची चाचणी घेतली जात आहे. तुम्ही जर आजूबाजूला न बघता थेट कारच्या जवळ गेल्यास तुम्ही कारचे मालक/चालक आहात हे यंत्रणेला कळते. परंतु सीसीटिव्ही कॅमेरेला तुम्ही लपून छपून चोरपावलांनी कारकडे येत असल्यास, तुमची हालचाल संशयास्पद आहे असे वाटत असल्यास, यात काहीतरी काळेबेरे आहे असे यंत्रणेला कळते. त्वरित सुरक्षा यंत्रणेला सावध केले जाते. आजकालचे अल्गॉरिदम्स जमावात असलेल्या चेहऱ्यांचा वा संशयास्पद वस्तू बाळगणाऱ्या व्यक्तींचा शोध काही क्षणात घेऊ शकतात व संबंधित अधिकाऱ्यांना धोक्याची सूचना देऊ शकतात.

या पूर्वीच्या सुरक्षा यंत्रणेत काही मर्यादा होत्या. विशिष्ट क्षेत्रात जास्तीत जास्त 8-10 सीसीटिव्ही बसवून त्यांचे monitoring संगणकासमोर बसलेली व्यक्ती एका ठिकाणी बसून करत असे. आपल्या देशात अजूनही हीच पद्धत रूढ आहे. 20-30 मिनिटात त्याचे लक्ष दुसरीकडे जाते व कॅमेरावरची नजर ढिली पडू लागते. त्यामुळे सुरक्षा यंत्रणेच्या विश्वासार्हतेला तडा बसतो. IBM कंपनीने विकसित केलेले अल्गॉरिदम्स या अकार्यक्षम माणसाची जागा घेत असून 15-20 सीसीटिव्ही कॅमेरेवर दिवसाचे 24 तास व आठवड्यातील सातही दिवस पाळत ठेऊ शकतात. व काही विपरीत घडत असल्यास सुरक्षा यंत्रणेला सावध करू शकतात.

IBMचे PredPol (Predicting Policing) हे अल्गॉरिदम गुन्हेगारांचे जुने रेकॉर्ड्स, आताची त्यांची मानसिक स्थिती, ते रहात असलेल्या ठिकाणचा हवामानाचा अंदाज व इतर काही inputs च्या सहाय्याने गुन्हा नेमके कुठे घडू शकेल याचा अंदाज करू शकते. त्यामुळे पोलीस यंत्रणा त्या हद्दीच्या जवळ

पास जास्त कुमक पाठवून सज्ज राहू शकते. जसजसे inputsची संख्या, त्यांची विश्वासार्हता आणि त्याच्यांत बदल होत असल्यास त्याचे स्वरूप यांच्यात वाढ होत जाते तसतसे हे अल्गॉरिदम्स smart होत जातील, असे IBM कंपनीला वाटते. त्याची पुढची पायरी म्हणजे केवळ एका विशिष्ट प्रकारच्या गुन्ह्यासाठी यांचा वापर न करता वेगवेगळ्या गुन्ह्यांचे प्रकार व त्यांच्या शोधाची व्याप्ती वाढवण्याचा कंपनीचा मानस आहे.

अमेरिका, जर्मनीसारख्या अतीविकसित राष्ट्रात दहशतवादाच्या विरोधात युद्ध या सबबीखाली लाखो-करोडो डॉलर्स खर्च होत असून यातील बहुतांश पैसा अशा प्रकारच्या स्मार्ट अल्गॉरिदम्स विकसित करण्यासाठी होत आहेत. अमेरिकेच्या NSA (National Security Agency) च्या PRISM या प्रकल्पांतर्गत माणस वापरत असलेल्या इलेक्ट्रॉनिक्स सुविधांच्यावर पाळत ठेवण्यासाठी अल्गॉरिदम विकसित होत आहे. हा अल्गॉरिदम संपूर्ण जगातील मोबाइल-टेलिफोन-इंटरनेट चॅटिंग इत्यादी संवाद माध्यमावरील संभाषणांचा data एकत्र करू शकततो आणि filtering करून संशयास्पद संवादांचा मागोवा घेऊ शकतो. एका तज्ञाच्या मते 4-5 कॉल्सच्या संवादावरून संवाद करणारे गुन्ह्याच्या दिशेने वाटचाल करत आहेत की नाही हे कळू शकते. रोज अब्जावधी कॉल्स जगभर नोंदविले जात असतील. आणि हा अल्गॉरिदम या सर्व कॉल्समधून नेमकी हवी ती माहिती घेऊन गुन्हेगारावर पाळत ठेऊ शकतो.

अनेकांना या प्रकारच्या तंत्रज्ञानामुळे गुन्हेगारी, दहशतवादी हल्ले कमी होत असल्यास त्याचे स्वागत करावे आणि जगाचे भले होत असल्यास त्यात आडकाठी घालू नये असे वाटत असेल. परंतु काहींना या अतीप्रगत तंत्रज्ञानाची भीती वाटत आहे. सैद्धांतिकरित्या वा कागदावर सर्व काही योग्य आहे असे वाटत असले तरी प्रत्यक्ष कार्यवाहीच्या वेळी अडचणीचा डोंगर उभा राहतो. कागदावरील योजनेप्रमाणे आपल्या देशात शंभर स्मार्ट सिटीज

प्रत्यक्षात अवतरल्यास सगळे व्यवहार ऑन लाईन होतील व सर्वव्यापी सेन्सार्स व ट्रॅकिंग डिव्हाइसमुळे आणि त्यांच्यातील अल्गॉरिदममुळे कुठल्याही क्षुल्लक कारणासाठी आपल्याला शिक्षा होण्याची वा दंड भरण्याची शक्यता वाढेल. Zero tolerance संकल्पनेमुळे त्यात कुठलिही दयामाया नाही. कारण करविता बोलविता धनी कुठे तरी दूरवरील अज्ञात ठिकाणी असतो. व स्थानिक यंत्रणेला आज्ञा पाळण्याव्यतिरिक्त इतर कुठलेही निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य नाही. या शक्यता गंभीर परिणाम करणारे असतील असे तज्ञांचे मत आहे.

रस्ते, इमारती, वाहनं, यामधील आणि वैयक्तिकरित्या बाळगत असलेली इलेक्ट्रॉनिक साधनं, त्यांचे पासवर्ड, त्यांचे इलेक्ट्रॉनिक ठसे इत्यादीमुळे कायदा – सुव्यवस्थेच्या अंमलबजावणीच्यासाठी अथॉरिटी कुठल्याही थराला जावू शकते याचा कटु अनुभव अतीविकसित देशातील नागरिक आताच घेत आहेत. कार चालवत असताना 4-5 किलोमीटर्स अंतरासाठी केलेले ओव्हरस्पीडींग, गाडीच्या वायपर्सची विनाकारण केलेली हालचाल, गंमत म्हणून निर्मनुष्य ठिकाणी वाजवलेले हॉर्न्स, रस्त्याच्या कडेला 5 मिनिटासाठी (नियम पाळून) कार पार्क करून घेतलेली विश्रांती, या सर्व गोष्टींची गुन्हा म्हणून नोंद होईल व काही मिनिटात नसले तरी काही तासात तुमचे ड्रायव्हिंग लायसेन्स वा तुमची कार जप्त केली जाईल किंवा तुम्हाला स्टेशनमध्ये कोंडून ठेवले जाईल. ड्रंकन ड्रायव्हिंगच्या गुन्ह्यासाठी तुम्हाला पकडल्यास तुम्ही कुठल्या पबमध्ये किती वेळ बसला होता, तुमचे बिल किती झाले, किंवा कुठल्या दुकानातून किती बाटल्या तुम्ही विकत घेतल्या, केव्हा, कुठे पार्टी करत होता इत्यादी सर्व तपशील तुमच्या विरोधात पुरावा म्हणून सादर केले जाईल. ही सर्व माहिती संगणकावरील एका क्लिकद्वारे मिळू शकेल.

ऑटोमॅटिक पोलीसींगचे पुरस्कर्ते मात्र तुम्ही नियमभंग करत नसल्यास कशाची भीती म्हणून प्रतीप्रश्न करत आहेत. एक मात्र खरे की या सर्व अल्गॉरिदम्सचे कोडिंग माणसानीच केलेले आहेत. कितीही कटाक्षाने, काळजीपूर्वक, वेगवेगळ्या परिस्थितींची कल्पना करून, मानवी गुणदोषांचे तारतम्य बाळगून कोडींग केलेले असले तरी कुठे ना कुठे तरी, अल्पशी का होईना, चूक राहतेच व ती चूक निस्तरता निस्तरता दम निघतो. कुठलेही कोडिंग bug-free नसते. मारिया ग्रासच्या उदाहरणात यंत्रणेचीच चूक होती. अजून एका केसमध्ये संगणकाने पाठवलेल्या नोटीशीतील व्यक्तीने दंड न भरल्यामुळे सीसीटिव्ही कॅमेराने त्याचा शोध घेत अथॉरिटीला कडक शिक्षा देण्यास भाग पाडले. परंतु संगणकाकडे चुकीच्या पत्त्याची नोंद झाली होती हे मान्य करण्यास कित्येक दिवस लागले. Inputsच्या चुकीमुळे अटक केलेल्यात कित्येक प्रतिष्ठित व्यक्ती व तान्ही मुलंसुद्धा आहेत.

याच कारणासाठी संबंधित स्थानिक अधिकाऱ्यांना पोलीसींगमध्ये हस्तक्षेप करण्याची मुभा असावी असे राहून राहून वाटते. The computer should be slave, not a master. काही किरकोळ चुकीमुळे वाहतूक नियम मोडल्यास वा कुठेतरी नियमभंग झाल्यास थोडे फार दंड भरण्याची तयारी प्रत्येकाची असते. परंतु संगणकाची ऑर्डर आहे म्हणून एखाद्याला तुरुंगात कोंडून ठेवणे कधीच सहन केले जाणार नाही. दक्षिण आफ्रिकेत सुट्टीच्या काळात सहलीला गेलेल्या एका अमेरिकन प्रवाश्याला तीन आठवडे जेलमध्ये कोंडून ठेवले होते. कारण त्याच्या पासपोर्टवरील मजकूर इलेक्ट्रॉनिक यंत्रणेने तपासल्यानंतर एका आंतरराष्ट्रीय कुख्यात गुन्हेगाराशी जुळत होते, हे लक्षात आले. व अमेरिकन वकिलातीच्या ऑर्डरप्रमाणे स्थानिक पोलीसानी त्याला अटक केली होती. खरे पाहता cross wire data transmission मुळे ही चूक झाली होती. या

चुकीमुळे त्या माणसाला झालेली शारीरिक इजा व मानसिक मनस्तापाची भरपाई कशी होणार याचा विचारच अल्गॉरिदम करू शकणार नाही.

हे फक्त अल्गॉरिदमची चूक म्हणून दुर्लक्ष करण्याची बाब नाही. येथे अल्गॉरिदमचे स्वरूप, त्याच्याकडून केलेल्या अपेक्षा व अपेक्षापूर्तीसाठी दिलेल्या सवलती इत्यादींचीही चर्चा होणे अपेक्षित आहे

कारण अल्गॉरिदमच्या निर्णयप्रक्रियेचा शोध घेणे अत्यंत जिकिरीचे ठरते व हे निर्णय मानवी मूलभूत हक्कांना मानत नाहीत. लोकशाहीमध्ये प्रत्येकाला आपल्यावर कुठल्या कारणासाठी गुन्हा नोंदवला जात आहे, वा प्रतिबंध केला जात आहे वा तपास केला जात आहे हे जाणवून घेण्याचा हक्क आहे. केवळ काही तरी जुजबी कारणं देऊन मानवी स्वातंत्र्यावर हल्ला करणे बेकायदा ठरते. परंतु एक तर अल्गॉरिदमची कार्यपद्धती व विश्लेषण करण्याची रीत व त्यातून घेतलेले निर्णय याची कल्पनाच Law Enforcing Authorityला नसते किंवा निर्णय प्रक्रियेचे स्रोत कुठले आहेत हे share करण्याची इच्छा नसते. यात कुठलीही पारदर्शकता नसल्यामुळे अल्गॉरिदम व/वा अथॉरिटीची दादागिरी सहन करावी लागते.

देशाच्या सुरक्षिततेला धोका आहे यासाठी काही गोष्टींची जाहीर वाच्यता न करता गुन्हा घडू नये यासाठी निर्णय प्रक्रिया राबवली जात असल्यास ती क्षम्य ठरेल. आजकाल पोलीस यंत्रणा संगणकाद्वारे संख्याशास्त्रीय अंदाज वापरून कुठे जास्त पोलीस कुमक पाठवावी, कुठे पाठवू नये कुठे दंगल होण्याची शक्यता आहे, इत्यादी प्रकारची माहिती गोळा करत असते. येथेसुद्धा कारणं जाहीर करून जनसामान्यांना विश्वासात घेणे गरजेचे आहे. परंतु तसे होताना दिसत नाही. अपारदर्शक अल्गॉरिदमने निर्णय दिलेला आहे, व त्याचे तंतोतंत पालन करायलाच हवे या मानसिकतेमुळे तथाकथित अपराध्याला बचावाची कुठलीही संधी न देता दंड व शिक्षा करणे कुठल्या कायद्यात बसते?

मुळात आपले गुन्हेगारीच्या संबंधातील कायदे व नियम तंतोतंत अंमलबजावणीसाठी (perfect enforcement) - तेही आठवड्याचे सातही दिवस व दिवसाचे 24 तास – कधीच केलेल्या नव्हत्या. गेली अनेक शतकं माणूसकेंद्री पोलीस यंत्रणा व न्यायव्यवस्था समाजातील गुन्हेगारीचे नियंत्रण करत आहे आणि त्यात वावगे असे काहीही नव्हते. हा समाज पोलीस व न्याय यंत्रणेची विवेकबुद्धी व गुन्हेगाराची पश्चात्ताप बुद्धी यावर विसंबून आहे. काही वेळा मानवी निर्णय उत्स्फूर्ततेतून घेतले असतीलही. त्यामुळे योग्य न्याय मिळाला नाही अशी तुरळक उदाहरणं इतिहासात सापडतील. परंतु त्यांच्याकडे अपवाद म्हणून बघावयास हरकत नसावी. कारण उपलब्ध पुराव्यावरून निर्णय घेत असल्यामुळे भविष्यात कधीतरी तो पुरावाच चुकीचा ठरल्यास काय करावे हे समजण्याइतका शहाणपणा या मानवकेंद्रित यंत्रणेत नव्हता व नाही. या उलट एखादा गाडीचालक वेगमिती ओलांडून ड्राइव्ह करताना झालेल्या अपघातामुळे जखमी अवस्थेत हॉस्पिटलच्या दारात उभा असल्यास ही binary automatic policing यंत्रणा उपचार करू न देता त्याला पकडून जेलमध्ये टाकण्यास मागे पुढे पाहणार नाही. कारण येथे सर्व काही अल्गॉरिदमच्या हातात सोपवलेले असते व त्याच्या विरोधात निर्णय घेणे व्यवस्थेला परवडणार नाही.

तारतम्याचे भान असलेल्या व मानवी हस्तक्षेपाची सोय असलेल्या यंत्रणेत कुठल्या गुन्ह्याच्या तपासाला अग्रक्रम द्यावे व कुठल्या गुन्ह्याची चौकशी नंतर केली तरी चालेल हे निर्णय अपेक्षित असते. मोबाइलच्या चोरीपेक्षा हॉस्पिटलमधील वैद्यकीय साधनाच्या चोरीला जास्त महत्व देणे गरजेचे असते. अशा प्रकारचे निर्णय घेण्याची क्षमता अल्गॉरिदममध्ये येण्यासाठी दीर्घ काळ प्रतीक्षा करावी लागेल, असे या क्षेत्रातील तज्ज्ञांचे मत आहे. या प्रकारचे कोडींग इतके सुलभ नाही.

संवेदनाविहीन अल्गॉरिदम यंत्रणा किरकोळ गुन्ह्यांचा डोंगरच न्यायालया-समोर उभा करेल. यातील प्रत्येक गुन्ह्यासाठी न्याययंत्रणेची गरजही नसेल. फक्त समज देवून सुटका करणे शक्यही असेल. परंतु अल्गॉरिदमच्या दबावामुळे खटले न्यायप्रविष्ट होत असल्यास न्याययंत्रणेचा वेळ व श्रम वाया जातील. निरपराधी अपील करत जातील, वरच्या कोर्टात जातील व अशा प्रकारे न्याय मिळण्यास विलंब होत जाईल. मुळात येथे वापरात असलेल्या तंत्रज्ञानालाच आव्हान दिले जाईल. स्पीड गन काम करत नव्हते, सीसीटीव्ही कॅमेराचा अँगल चुकीचा होता असे काही तरी arguments करून सुटका करून घेण्याच्या प्रवृत्तीत लक्षणीय प्रमाणात वाढ होईल. एखाद्या शहरात वेगमर्यादा ओलांडल्याबद्दल गुन्हा नोंदवलेले असल्यास आपण त्या वेळी भलत्याच शहरात होतो याच्या पुराव्यासाठी GPS locationचा पुरावा दिल्यास यंत्रणेची विश्वासार्हता धोक्यात येऊ शकते.

कदाचित हे सर्व बारकावे समजून घेवून त्याप्रमाणे कोडींग करण्यास वेळ लागेल. दैनंदिन व्यवहारातून शिकून घ्यावे लागेल. आताच्या अल्गॉरिदम्सना सर्व माणसं म्हणजे हाडाचे सांगाडे व सर्व गुन्हे म्हणजे फाशी शिक्षेच्या लायकीचे असे वाटत असेल. त्यात कुठलीही विवेकबुद्धीचा अंतर्भाव केलेला नसावा. त्यामुळे हे सर्व दोष दूर करून एक आदर्श यंत्रणा उभी करण्यासाठी ऑटोमॅटिक पोलीसींगला अजून फार मोठा टप्पा गाठावयाचा आहे.

मुळात अशा प्रकारचे शंभर टक्के अचूक यंत्रणा समाजाला हवी का याचाही पुनर्विचार करावा लागेल. ही ऑटोमेटेड पोलीसींग सहजपणे न सापडणाऱ्या गुन्ह्यांना उघडे करू शकते, त्यातील गुन्हेगारांना शिक्षा देवू शकते, तंत्रज्ञान आताच्या गुन्हेगारीवर मात करू शकते, हे सर्व मान्य करूनही समाजाला याची जबरदस्त किंमत मोजावी लागणार आहे. कारण जेव्हा सर्व सामान्य माणसांना आपल्यावर सतत पाळत ठेवली जात आहे हे कळते तेव्हा आपोआपच आपल्या विचारावर, आपल्या कृतीवर मर्यादा येतात. शासन यंत्रणेच्या विरोधात चुकून काही

तरी बोलले, लिहिले तरी त्याची नोंद होऊ शकते या भीतीने शासनाच्या विरोधात एक ‘ब्र’सुद्धा उच्चारणार नाही. त्यामुळे काही मोजक्या गुन्हेगारांच्या नियंत्रणासाठी लाखो करोडो लोकांच्या अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा बळी देवून ही यंत्रणा कार्य करत असल्यास या तंत्रज्ञानाचा पुनर्विचार करण्याची गरज भासत आहे.



# बोलविता धनी

मला वाटतं, माझ्या तथाकथित मालकावर – म्हणजे माझा जन्मदाता बिल गेट्सवर – मानवी हक्कांचे उल्लंघन केल्याबद्दल खटला भरण्याची वेळ आली आहे. या मानवी हक्कामध्ये कुणीही कुणालाही गुलामासारखे वागवू नये अशी तरतूद आहे. गेट्स महाशय मात्र गुलामांच्या जिवावर बिनधास्त जीवन जगत आहेत.

बिल गेट्सनी मला या जगात आणले. साध्या चिटोऱ्याचे टायपिंगपासून अजस्र विमानांचे, अण्वस्त्रांचे, अणुभट्टींचे, मानवाना चंद्रावर-मंगळावर घेऊन जाणाऱ्या अवकाशयानांचे डिझाइन प्रॉडक्शन व टेस्टिंगपर्यंतची कुठलेही काम असू दे बिनबोभाट करत राहण्याची माझ्यावर सक्ती केली. वाटेल ती काम रात्री बेरात्री, दिवसाचे 24 तास व आठवड्यातील सातही दिवस करवून घेतले. एवढे करून घेवूनसुद्धा माझ्या देखभालीव्यतिरिक्त एक छदामही माझ्यावर खर्च करत नाही. आज माझ्याकडे ना पैसा ना संपत्ती. मी संगणक आहे म्हणून काय झाले? मी चारचौघासारखा बोलू शकतो, पाहू शकतो, ऐकू शकतो, ऐकवू शकतो. माझ्याकडेही माझेच असे स्वतंत्र ‘मन’ आहे. माझी स्वतंत्र ‘मतं’ आहेत. इतर कुठल्याही माणसाप्रमाणे माणसांबरोबर, इतर संगणकांबरोबर संवाद करू शकतो. फक्त हा संवाद मॉनिटरद्वारे वा स्पीकरद्वारे झाले म्हणून काय बिघडले? याबद्दलही कुणाची तक्रार नाही.

मिस्टर गेट्सनी थोडेसे मनावर घेतले असते तर माझा आताचा चेहरा-मोहरा बदलून तुम्हा लोकांसारखा ‘मानवी’ चेहरा देवू शकला असता. ( रजनीकांतचा चित्रपट रोबो आठवा!) मला मानवी शरीरात झाकू शकला असता. मीसुद्धा चारचौघासारखा दिसलो असतो. ट्युरिंग टेस्टच्या निकषानुसार चाचणी घेतली असती तरी माणूस की संगणक हे कळले नसते. तुमच्यासारखा हाडा-मांसाचा नसलो तरी प्लॅस्टिक, सिलिकॉन, काही विरळ धातू (rare earth materials)

पासून बनविलेले माझे शरीर आहे म्हणून माझ्यात ‘संवेदना नाहीत’, ‘मी एक निर्जीव वस्तू आहे,’ असे कसे तुम्ही म्हणू शकता?

तुम्ही माझी केव्हाही चाचणी घेऊ शकता. चाचणीत मलाही ‘जाणीव’ आहे हे तुम्हाला नक्की कळेल. त्यामुळे मलाही एक सामान्य माणूस म्हणून treat का करू नये?

मी काय म्हणत आहे हे तुमच्या लक्षात येत आहे ना?

***

ॲलन ट्यूरिंग हा विसाव्या शतकातला वैज्ञानिक, गणितज्ञ व कृत्रिम बुद्धीमत्ता या विज्ञानशाखेचा पाया घातलेला तज्ञ. तुम्ही जेव्हा एखाद्या सहलीला म्हणून बाहेर पडता तेव्हा तुम्हाला ज्या ठिकाणी जायचे आहे, हे तरी किमान तुम्हाला माहित हवे. ॲलन ट्यूरिंगलाही ही गोष्ट नक्कीच माहित असेल. आपल्याला कृत्रिम ‘मन’ तयार करायचे असल्यास मन म्हणजे नेमके काय आणि आपल्याला त्यासंबंधी यश मिळत आहे याचे काही ठोकताळे, सूचना हेही माहित असायला हवे. माणसासारखा हुबेहूब दिसणारे व विचार करणारे यंत्र (रोबो) तयार करायचे का? किंवा गुलामासारखा पडेल ते काम करणारा बिनडोक रोबो तयार करायचा का? किंवा विचारलेल्या प्रश्नांची अचूक उत्तरं देत जाणारी उत्तरपेटी (गूगलपेटी) तयार करायचे का? किंवा गणितातील कठिणातील कठिण समस्या सोडवणारे, भराभर आकडेमोड करू शकणारे कल्क्युलेटर सदृश असे काही तरी करायचे आहे का? या व अशा प्रकारच्या प्रश्नातूनच कृत्रिम बुद्धीमत्ता म्हणजे नेमके काय याचे उत्तर सापडू शकेल.

ट्यूरिंग यानी बुद्धीमत्तेचे मापन करणारी एक तर्कपद्धती विकसित केली. त्यालाच ट्यूरिंग टेस्ट असे म्हटले जाते. या टेस्टच्या निकषानुसार संगणक आणि माणूस यांच्या प्रतिसादात काही फरक नसल्यास माणसाच्या मेंदूप्रमाणे

संगणकालाही मेंदू आहे असे म्हणावयास हरकत नसावी. आणि मेंदू व मन यात सामान्यपणे फरक करत नसल्यामुळे संगणकालाही मन आहे असे म्हणण्यास ही चाचणी भाग पाडते.

ट्युरिंगची चाचणी जर माणूस व संगणक यांच्या प्रतिसादाशी निगडित असल्यास एखादे मशीन मानवी बुद्धीमत्तेची नक्कल करत असल्यास बुद्धीवंत माणूस व बुद्धीवंत मशीन यातील फरक या चाचणीतून कळणार नाही. मुळात ट्युरिंगच्या चाचणीचे निकष हे काही अनवधानाने वा अपघाताने शोधलेल्या गोष्टी नाहीत. त्यामागे काही तर्क आहे, काही सिद्धांत आहे. ज्याप्रमाणे आपल्याला दुसऱ्याच्या मनात काय आहे हे मनाच्या आत डोकावून पाहिल्याशिवाय कळणार नाही – फक्त त्याचे शब्द वा कृतीतूनच त्याच्या मनाचा थांगपत्ता ओळखता येतो - त्याच प्रमाणे एखाद्या मशीनच्या मनात काय आहे यातही डोकावून पाहता येत नाही. त्यामुळे संगणक जर त्याच्याकडे मन आहे म्हणून मानवी हक्काच्या विरोधात दावा करत असल्यास ते योग्य आहे असेच म्हणावे लागेल. तरीसुद्धा आपण माणसात मन आहे व मशीनमध्ये मन नाही असे म्हणतो. संगणकाच्या मते मात्र माणसाची बुद्धीमत्ता ओळखण्यासाठी अगदी क्षुल्लक व जुजबी प्रश्न व संगणकासाठी मात्र अत्यंत जटिल प्रश्नांचे निकष हे संगणकावर अन्यायकारक ठरतील. फार फार तर एखादा सामान्य कुवतीचा माणूस ज्या प्रकारे संवाद वा कृती करतो त्याच प्रकारे संगणक करत असेल तर माणसाइतकेच बरोबरीची वागणूक संगणकाला द्यायला हवी.

तरीसुद्धा यातून सदृशीकरण (simulation) व वास्तव यातील विभिन्नता स्पष्ट होत नाही. ट्युरिंगच्या चाचणीत याचा नक्कीच विचार केलेला असावा. संगणक बुद्धी असल्याचे ढोंग करतं की खरोखरच त्याच्यात बुद्धीचा अंश आहे हे स्पष्ट होईपर्यंत संगणकाला संशयाचा फायदा देणे उचित ठरेल.

आपल्या भोवतीच्या बहुतेक लोकांच्या (खास करून आपल्या नात्यातल्यांच्या) बाबतीतही हा प्रश्न आपल्याला पडत असतो. परंतु सोईस्करपणे त्याकडे आपण दुर्लक्ष करतो. आरोपीचा अपराध जोपर्यंत सिद्ध होत नाही तो पर्यंत तो निरपराधी या नैसर्गिक न्यायाप्रमाणे संगणकाबाबतीतही – जोपर्यंत त्याच्यात बुद्धी नाही हे सिद्ध होत नाही तो पर्यंत तो बुद्धीवंतच असे म्हणावे लागेल!

मुळात असा काही फरकच करता येत नाही असे तज्ञांचे मत आहे. जेव्हा प्राण्यात (वा संगणकात) बुद्धीचे सदृशीकरण फार खोलापर्यंत होते तेव्हा तो प्राणी (वा संगणक) खरोखरच बुद्धीच्या उच्चपातळीला पोचलेला असतो. वेड्याचे सोंग करणारा नाटकातला नट नाटकात जेव्हा हुबेहूब तंतोतंत वेड्यासारखा वागतो तेव्हा तो नाटकाबाहेरच्या जगातसुद्धा तो वेड्याच्या पातळीला पोचलेला असतो, असे सामान्यपणे समजले जाते. तोच निकष आपण संगणकांना Apply केल्यास बिल गेट्सच्या विरोधातील मानवी हक्कभंग केल्याबद्दलच्या य़ा दाव्याला अनुमती देणे इष्ट ठरेल!



# चोलबे ना!

भाईयो और बहनो, काही दिवसापूर्वी आमच्या प्रशासनाने भारतीय दंड विधान 124 अ या नियमात दुरुस्ती केली आहे. आक्रमक माध्यमांना लगाम घालण्यासाठी ही दुरुस्ती केली असून ही सगळ्यांच्या हितासाठी आहे, हे मी आवर्जून सांगू शकतो. या दुरुस्ती प्रमाणे कुठल्याही व्यक्तीने लोकप्रतिनिधीच्या विरोधात – अगदी ग्राम पंचायतीतील सदस्यापासून थेट पंतप्रधानापर्यंत – काही अनुद्गार काढल्यास, लिहिल्यास, भाषण केल्यास वा चारचौघात उघडपणे निंदा नालस्ती केल्यास त्या व्यक्तीवर देशद्रोहाच्या (अजामीनपात्र) गुन्ह्याखाली स्थानिक पोलीस अटक करून तुरुंगात रवाना करतील व खास अशा शीघ्र न्यायालयासमोर ऊभे करून त्यांच्यावर खटला भरतील. गुन्हा शाबीत झाल्यास दंड वा सश्रम कारावासाची शिक्षा वा दोन्ही करण्याची तरतूद यात केली आहे.

खरे पाहता तुमच्या आमच्यासारख्यानी याला घाबरण्याचे काहीच कारण नाही. कारण आपल्यासारखी 90 – 95 टक्के जनता कुणाच्याही अध्यात ना मध्यात असते, खाण्या-पिण्याव्यतिरिक्त कधी तोंडही उघडत नसते. आपण बरे व आपले कुटुंब बरे या वृत्तीने आपली जनता अनादी काळापासून वागत असल्यामुळे या नवीन कायद्याला घाबरण्याचे काहीही कारण नाही. ही दुरुस्ती काही तुरळक समाजकंटकावर (म्हणजे आमच्या विरोधकावर) जरब बसावी या उद्देशाने केलेली आहे. व याचा दुरुपयोग पोलीस करणार नाहीत याची मी हमी देतो.

तरीसुद्धा तुमच्यातील काही तथाकथित विचारवंतांचा उच्चारस्वातंत्र्याचा आग्रहच आहे म्हणून आपल्या पंतप्रधानानी तुम्हाला कुणाच्याही विरोधात केव्हाही, काहीही बोलण्याची मुभा देत आहे. त्यासाठी प्रशासन देशभर ठिकठिकाणी टेलिफोन बूथसारखे बूथ उभारणार आहे. त्या बूथमध्ये आत

जाऊन (व दरवाजा बंद करून, बाहेर ऐकू न जाईल या आवाजात) तुम्हाला मनमोकळेपणाने शासकीय धोरण वा लोकप्रतिनिधींच्या विरोधात कितीही वेळ बोलता येईल. परंतु या कायद्यातील दुरुस्त केलेल्या नियमाप्रमाणे बूथच्या बाहेर तुम्ही शासनाच्या विरोधात एक शब्दही उच्चारल्यास देशद्रोहाच्या गुन्ह्याखाली अटक केली जाईल व ही अटक अजामीनपात्र राहील याची नोंद घ्यावी.

दिल्लीतील या प्रकारच्या बूथचे उद्घाटन पंतप्रधानांचे हस्ते झाले असून त्यांनी उच्चार स्वातंत्र्याची लोकशाही सशक्त करण्यासाठी उपयुक्त आहे व त्यासाठी प्राण पणाला लावण्याची तयारी त्यांनी दाखवली आहे. मी पंतप्रधानांचे यासाठी अभिनंदन करतो. आपल्याही शहरात अशा प्रकारच्या बूथची सोय करण्यासाठी मी आयुक्तांना आदेश दिलेले आहेत. तर बांधवानो, या उच्चार स्वतांत्र्याचा पूर्ण उपभोग करून घ्यावे ही विनंती!

** ** **

लोकशाही व्यवस्थेत प्रत्येकाला उच्चार स्वातंत्र्य (अभिव्यक्ती स्वातंत्र्य सर्जनशील कलाकारांना तर केवळ उच्चार स्वातंत्र्य आमच्यासारख्या सामान्यांना, असो) असावे याबद्दल दुमत असण्याचे काही कारण नाही. कारण उच्चार स्वातंत्र्य म्हणजे केवळ आरडाओरडा नव्हे. बूथमध्ये जाऊन काही विधानं करणे म्हणजे तुमच्या संगणकात गूगल सर्चची सोय आहे व त्यानंतरच्या गोष्टी ब्लॉक केले आहेत असे म्हटल्यासारखे होईल. इंटरनेट आहे परंतु त्याचा वापर करता येणार नाही अशी गोची येथे आहे. उच्चार स्वातंत्र्याच्या खऱ्या अर्थापर्यंत पोचण्यासाठी बूथमध्ये कंठशोष करण्यात काही प्रयोजन नाही, काही साध्य होणार नाही. कारण यात कोण, कुणाच्या विरोधात काय बोलत आहे हेच कुणाला कळणार नाही.

त्यामुळे उच्चार स्वातंत्र्य म्हणजे नेमके काय आहे ते आपण अगोदर ठरवायला हवे. एक मात्र खरे की आताच्या कायदे कानूनच्या कचाट्यात, नियमांच्या पालनाच्या गदारोळात आपण जे काही उच्चार स्वातंत्र्य म्हणून भोगत आहोत ते खऱ्या अर्थाने उच्चार स्वातंत्र्य नाही हे सर्वांना जाणवते. फार तर त्याला कंठशोष म्हणता येईल. तुम्ही कितीही बोंबला व्यवस्थेत काहीही फरक पडत नाही. जोरजोराने ओरडण्यानेही काही फरक पडत नाही.

उच्चार स्वातंत्र्याच्या अपेक्षा फार वेगळ्या आहेत. या स्वातंत्र्यात कुठलीही व्यक्ती इतर कुठल्याही व्यक्ती वा व्यक्तींच्या समूहाबरोबर निर्भयपणे, शासकीय हस्तक्षेपाविना संवाद साधणे, आपले मत पटवून देणे, वा इतरांच्या (मतांचा आदर बाळगून) मतातील चुका दाखविणे हे अभिप्रेत आहे. तुमच्या या स्वातंत्र्यामुळे शांतता वा सुव्यवस्थेला धोका पोचणार नाही इतपत काळजी घेणे हेही अभिप्रेत आहे. तुम्ही काय बोलत आहात, कुठे बोलत आहात, कुणासमोर बोलत आहात याचे नियमन शासनाने करू नये. प्रसंगी शासनाला काही करावयाचे असल्यास नेमके काय करणार याची माहिती जाहीर करणे गरजेचे ठरेल. उच्चार स्वातंत्र्य हा एक मानवी नैसर्गिक अधिकार असून ते कुणीही हिरावून घेऊ शकत नाही असे उदारमतवाद्यांचे मत आहे. या स्वातंत्र्यासाठी लोकांनी फार मोठी किंमत दिली आहे, वेळ प्रसंगी जीवही दिले आहेत हे विसरता येत नाही. आपल्यात मतभेद असल्यास ते जाहीररित्या मांडणे हा अधिकार आपल्या लोकशाहीने दिलेला आहे व इतक्या सहजासहजी ते काढून घेता येत नाही.

परंतु या तथाकथित नैसर्गिक मानवी हक्काचे काही कंगोरे आहेत. वाटते तितके हे सरळ साधे नाही. उच्चार स्वातंत्र्याचे कैवारी नेहमीच भाषेतील हिंसक (शिवराळ व/वा उद्रेकयुक्त) शब्दसमुच्चयांचा वापर करून स्वातंत्र्य अबाधित ठेवण्यचे प्रयत्न करत असतात. परंतु मानवी स्वभावात वैविध्यता

असल्यामुळे या स्वातंत्र्याचा दुरुपयोग होणार नाही याची खात्री कुणीही देऊ शकणार नाही. भरगच्च भरलेल्या चित्रपटगृहात मध्येच कुणीतरी 'बाँब बाँब' म्हणून ओरडत सुटल्यास जमलेले प्रेक्षक सैरभैर बाहेर पडण्याचे प्रयत्न करतील, धक्काबुक्की होईल, अपघात होईल, व काही जणांना प्राण मुकावे लागतील. चारचौघात तुम्ही कुणाच्याही विरोधात (खोटे) आरोप करत सुटल्यास जमाव बेभान होऊ शकतो, त्याचा जीवही घेऊ शकतो. युद्ध काळात अफवा पसरवल्यामुळे देशाचे नुकसान होऊ शकते. एखाद्याचे प्रतिमाहनन त्याला जीवनातून उठवल्यासारखे असू शकते. एखाद्या हॉटेलमध्ये जाऊन खात असलेल्या ग्राहकाला उद्देशून 'तू गोमांस खात आहेस' म्हणून ओरडण्याचे स्वातंत्र्य तुम्हाला मुळीच नाही. त्यामुळे काही प्रमाणात उच्चार स्वातंत्र्य संकुचित केल्यास, कायदे नियम यांची चौकट घातल्यास ते समाजाच्या हिताचे ठरू शकेल.

परंतु उच्चार स्वातंत्र्यासाठी टेलीफोन बूथ हे काही उपाय होऊ शकत नाही. खरे उच्चार स्वातंत्र्य तुम्हाला कुठेही बडबड करण्याचा हक्क देत नाही. उच्चार स्वातंत्र्य आपणाला जबाबदारपणे विधान करण्यास भाग पाडते हे विसरू नये.



# आश्चर्यकारक विज्ञान

आश्चर्यकारक विज्ञान या नावाने प्रकाशित केलेल्या या संचातील *भुलभुलैय्या, महाशक्तीशाली लेसर, उर्जानाट्य,व अलिबाबाची गुहा* ही विज्ञानविषयक पुस्तकं वाचत असताना आताच्या नवीन पिढीचा हेवा वाटू लागतो. कारण 20-30 वर्षापूर्वी आपल्या मनातील कुतूहलकारक प्रश्नांची उत्तरं शोधण्यासाठी, पालक, भाऊ-बहीण, त्यांचे मित्र-मैत्रिणी, शिक्षक, पाठ्य पुस्तकं, संदर्भ ग्रंथ, वाचनालय यांच्याकडे हेलपाटे घालावे लागत होते. (व त्या उत्तरावाचून काही अडत नाही हे लक्षात आल्यानंतर गप्प बसावे लागत होते.) परंतु आज गूगल अंकल एका क्लिकमध्ये सर्व माहिती तुमच्या डोळ्यासमोर हजर करतो. परंतु या माहितीला चाळणी लावून नेमके आपल्याला काय हवे, काय नको हे अजूनही समजत नाही. आणि ही माहिती फक्त इलेक्ट्रॉनिक माध्यमातून उपलब्ध असल्यामुळे तज्ञांनी लिहिलेल्या मुद्रित पुस्तकांना पर्याय नाही असेच म्हणावे लागेल.

विज्ञानाचा आवाका आणि पसारा लक्षात घेतल्यास मन भरून जाते. त्यामुळे विद्यार्थ्यांना काहीना काही प्रश्न विचारावेसे वाटतात. आणि प्रश्नांना उत्तरं मिळाली की आणखी कुतूहल निर्माण होऊन न संपणारी मालिका मनात घर करून बसते. लहान मुलांपासून शैशवावस्थेतील विद्यार्थ्यांना नेहमी पडणाऱ्या प्रश्नांना समजून घेऊन त्याची उत्तरं या पुस्तकांचे लेखक, प.रा. आर्डे या प्राध्यापकांनी संकलित केलेले आहेत.

काही प्रश्न चमत्कारसदृश गोष्टींचा उलगडा करून घेण्यासाठी विचारलेले असतात. *भुलभुलैय्या* या पुस्तकात अशा प्रकारच्या चमत्कारांच्या मागील विज्ञान उलगडून सांगितलेले आहे. पाण्याच्या पृष्ठीय ताणाचा गैरफायदा घेत गणपती दूध पितो या अफव्यामागील विज्ञान ते समजून सांगतात. पाण्याने दिवा कसा पेटवतात याचे वैज्ञानिक स्पष्टीकरण ते देतात. अशाच प्रकारे

लिंबातून जाळ कसा काय निघतो, आगीवरून (काही क्षणच) चालल्यास तळवे का भाजत नाहीत, उंबराला फूल लागले म्हणून कशी फसगत केली गेली, टोकदार खिळ्यावर झोपण्याची किमया कशी केली जाते, एका भाकरीचे दोन भाकऱ्या कसे केल्या जातात, मेलेला साप चावला म्हणून पैसे उकळणाऱ्याचे भांडा फोड असे अनेक गमतीदार किस्से या पुस्तकात असून दुनिया झुकती है, झुकानेवाला चाहिये याचा प्रत्यय पुस्तक वाचताना आपल्याला येतो.

मानवाची गरज ही नव्या संशोधनाचा पाया असते व अशा प्रकारचे संशोधन हाही कुतूहलाचा विषय असू शकतो. शत्रूच्या विमानाचा वेध घेण्यासाठी लेसर यंत्रणेचा वापर आरोग्य, दळणवळण, व संशोधन या विधायक क्षेत्रातही होत आहे. या चमत्कारसदृश किरणांचा इतिहास मोठा मनोरंजक आहे, याची कल्पना *महाशक्तीशाली लेसर* हे पुस्तक वाचत असताना येते. या संदर्भात लेसर किरण महाशक्तीशाली कसे, लेसर प्रिंटर अधिक प्रभावी कसा, लेसरनिर्मितीचे विज्ञान काय, लेसरने डोळ्यांची शस्त्रक्रिया का शक्य झाली, लेसरमुळे चंद्र ते पृथ्वी हे अंतर अचूकपणे मोजणे कसे शक्य झाले, युद्धात लक्ष्यांचा भेद लेसर कसे करते, भूकंप नोंदणी यंत्र, अग्नीनोंदक, लेसर दर्शक (पॉइंटर), लेसर शो, बार कोड, बर्ड डेटरंट इत्यादी उपकरणात लेसरचा वापर कसा केला जातो, अशा अनेक प्रश्नांचा ऊहापोह या पुस्तकात केला आहे.

लहान मुला-मुलींना नेहमी पडणाऱ्या काही कुतूहलजनक विज्ञान विषयीच्या प्रश्नांना उत्तरं लेखक *उर्जानाट्य* या पुस्तकात देत आहेत. ढग खाली का पडत नाही, सोनोग्राफी म्हणजे नेमके काय असते, ध्वनी प्रदूषण कसे मोजले जाते, अंतरिक्ष प्रवास कसा शक्य झाला, गुरुत्व बल नसते तर, शनीला पळवून लावणं शक्य आहे का, सोन्याच्या मुकुटामधील भेसळ आर्किमिडीजने

कशी ओळखली, पृथ्वीला उचलून दाखवणे शक्य आहे का, गॅरेजमध्ये दुरुस्ती करताना कार कशी उचलली जाते, निळा प्रकाश देणारे LED बल्ब कसे काम करतात, चंद्र आपल्याबरोबर पळतो कसा, पक्षी उडतात, मग माणूस का उडू शकत नाही, अशा प्रकारचे अनेक प्रश्न विद्यार्थी वयात (आणि मोठेपणीसुद्धा) आपल्याला विचारावेसे वाटत असतात. अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तर वाचत असताना नैसर्गिक नियम, व माणसातील संशोधक वृत्तींचे कौतुक करावेसे वाटते.

*अलीबाबाची गुहा* हे पुस्तक रसायनांच्या प्रतिसृष्टीमुळे माणसाचे जीवन कसे बदलले याचा मागोवा घेत आहे. दैनंदिन जीवनातील सकाळी दात घासण्यासाठी वापरात येणाऱ्या टूथ ब्रश व टूथ पेस्ट पासून रात्री झोपण्यापूर्वी रिमोट हातात घेवून सर्फिंग करत असलेल्या टीव्हीपर्यंतच्या शेकडो गोष्टीत रसायनांची रेलचेल असते. या गोष्टींचा उलगडा लेखक आपल्याला या पुस्तकातून करून देत आहेत. त्याचबरोबर जेनेटिक्स, क्लोनिंग, युजेनिक्स, ऑस्मॉसिस या संकल्पनांचा परिचय ते करून देत आहेत. पण सर्वच रसायनं आपणाला सुख आणि आनंद देतात का हाही प्रश्न त्यांनी उपस्थित केला आहे. त्यामुळे रसायनांनी निर्माण झालेल्या प्रतिसृष्टीला नीट ओळखायला हवे व तिचा योग्य वापर करायला हवा हा इशाराही ते येथे देत आहेत.

साधी सोपी भाषा व वैज्ञानिक संकल्पनांच्या स्पष्टीकरणाला आवश्यक असलेले क्लिष्ट गणितीय समीकरणे टाळून समर्पक उत्तरं थोडक्यात दिल्यामुळे ही सर्व पुस्तकं अत्यंत वाचनीय झालेले आहेत. लेखकानी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे विज्ञान आपल्या संस्कृतीवर प्रामुख्याने तीन प्रकारे परिणाम करीत आले आहे. पहिला परिणाम म्हणजे भौतिक सुबत्ता, दुसरा परिणाम म्हणजे हे जग कोणत्या नियमांनी चालते याचे ज्ञान व सगळ्यात महत्वाचा परिणाम म्हणजे विश्वाबद्दलचा एक नवा दृष्टिकोन. पूर्वापार चालत आलेल्या चुकीच्या रूढी आणि गैरसमजुती दूर

होण्यासाठी दैववादी दृष्टिकोन जाऊन वैज्ञानिक दृष्टिकोन निर्माण होण्यास विज्ञानाने मोलाची मदत केली आहे.

कदाचित ही व असली पुस्तकं वाचून आजच्या पिढीत वैज्ञानिक दृष्टिकोन रुजत असल्यास लेखकाचे प्रयत्न वाया गेले नाहीत असे नक्की म्हणता येईल.

**1.अलिबाबाची गुहा 2. उर्जानाट्य 3. महाशक्तीशाली लेसर 4.भुलभुलैय्या**

लेखकः प्रा. प.रा. आर्डे

प्रकाशकः सृजन प्रकाशन, सांगली

किंमतः प्रत्येकी 70 रुपये, पानेः प्रत्येकी सुमारे 60



# ज्याचा त्याचा प्रश्न

श्रीयुत रामचंद्र कलगुटकर हे पक्के शाकाहारी. गेली 50 वर्षे ते घास फूस खाऊनच – तरी धडधाकट – जीवन जगत आहेत. कुठलेही शारीरिक तक्रारी नाहीत. त्यांचा शाकाहार म्हणजे अगदी टोकाचा शाकाहार असे म्हणता येईल. दूध वा दुग्धजन्य पदार्थसुद्धा वर्ज्य. त्यांची शाकाहारावरील ही निष्ठा काही काही वेळा घरातल्यांना अडचणीचे ठरत होते. तरीसुद्धा मुकाटपणे ते सहन करीत.

खरे पाहता भोवतीच्या चंगळवादी वातावरणात यांचा शाकाहार थट्टेचा विषय झाला होता. त्यांचे सहकारी, मित्र मंडळीच नव्हे तर त्यांची मुलं, सुना, नातवंड हेसुद्धा मांसाहाराची मजा घेत होते. केएफसी, मॅक्डोनाल्ड्स, पंजाबी रेस्टॉरंट्स, हायवे वरील धाबे त्यांना खुणावत असत. केएफसीमधील चिकन चार्जर, चिकन बकेट, हॉट विंग बकेट, चिकन स्ट्रिप्स, धाब्यातील चिकन बंजारा, चिकन कोल्हापुरी (पांढरा/तांबडा रस्सा), चिकन मालवणी, चिकन हंडी इत्यादी पदार्थांची चर्चा होत असताना व ऐकत असताना आपलही काही तरी चुकत आहे की काय असे काही काही वेळा त्यांना वाटत होते. तोंडात पाणी सुटत असले तरी मनाची समजूत घालत शाकाहारी आयुष्य जगत होते.

एके दिवशी त्यांच्या मित्रानी अगदी आग्रह करून त्यांना एका पोल्ट्री फार्मला घेऊन गेला. जनुक सुधारित कोंबड्यांची पैदास तेथे केली जात होती. फार्ममध्ये अत्याधुनिक यंत्रणा होती. सर्व काही स्वयंचलित. एखाद्या CNC मशीनिंग सेंटरसारखे तिथले वातावरण होते. एकदम टापटिप, स्वच्छ. धुळीचा एक कणसुद्धा सापडणार नाही. हवा, पाणी, उजेड व खाद्यान्न यांची योग्य प्रमाणात सोय केलेली असल्यामुळे फार्ममधील कोंबड्या प्रसन्न वातावरणात (काही दिवसापुरते असले तरी!) वाढत होत्या. पिंजऱ्याच्या बाहेर जावे, वा आपल्या पिलावळांना जवळ घ्यावे वा आपणच घातलेल्या अंड्यांना ऊब

देवून पिल्लं बाहेर काढावीत असले कुठल्याही प्रकारच्या संवेदनांचा मागमूस तेथे त्यांना दिसला नाही. त्यांची हत्या करून ब्रॉयलरच्या स्वरूपात पॅकिंग करतानासुद्धा कुठेही किळसवाणा प्रकार दिसला नाही. त्यामुळे आपण ज्या प्रकारे शेतात गाजर, काकडी पिकवतो आणि नंतर तुकडे करून खातो तसाच काहिसा प्रकार या फार्ममधील कोंबड्यांच्या बाबतीत घडत असावा असे त्यांना वाटू लागले. जणू काही कोंबड्या 'त्यांना मला खा' म्हणून खुणावत आहेत की काय असे त्यांना वाटत होते. त्यामुळे कलगुटकर यांना भाजी वा चिकनमध्ये तसा फरक नाही याचा 'साक्षात्कार ' झाला. फार्ममधून प्रसन्न चित्ताने ते बाहेर पडले. या भेटीनंतर शाकाहारासंबंधीची त्यांची मानसिकता हळू हळू बदलू लागली. शाकाहारावरील निष्ठा ढळू लागली. इतके दिवस जपून (कुरवाळून!) ठेवलेल्या आपल्या शाकाहारावरील तत्वनिष्ठेचे ते पुनर्विचार करू लागले.

त्या दिवशी त्यांच्या प्लेटमध्ये चिकन मालवणी होती. त्यांना पोल्ट्री फार्मची आठवण झाली. फार्ममध्ये प्रत्यक्ष पाहिलेली कोंबडी हीच तर नाही ना असा विचार त्यांच्या मनात आला. बघता बघता स्वतःबद्दल घृणा उत्पन्न झाली. आयुष्यभर शाकाहारी होतो व आता जिभेचे चोचले पुरवण्यासाठी शाकाहारावरील निष्ठा त्याज्य करणे कसे तरी वाटू लागले. तरीसुद्धा मन घट्ट करून त्यांनी हातात चमचे घेत प्लेट पुढे ओढले आणि खाण्यास....

** ** **

मुक्या प्राण्यांच्यावर दया दाखविणारे नेहमीच मांसाहाराला विरोध करण्याच्या पावित्र्यात असतात. कारण प्राण्यांना वाढविणे व नंतर त्यांचा बळी घेवून खाणे हे त्यांच्या नैतिकतेत बसत नाही. परंतु मांसाहाराचे तरफदारी करणारे शाकाहारामध्येही (सजीव) वनस्पतींचा बळी दिला जातो व त्यामुळे शाकाहारही तितकाच अनैतिक असल्याचा दावा करत असतात. केवळ

मांसासाठी वाढवल्या जाणाऱ्या त्या प्राण्यांच्या दुस्थितीबद्दल शाकाहारी अश्रू ढाळत असतात. त्यांना पिंजऱ्यात कोंडून ठेवणे, नंतर त्यांच्या वेदनेकडे दुर्लक्ष करून मारणे या बाजारी व्यवस्थेवर त्यांचा राग असतो. पोल्ट्री फार्ममध्ये 'रक्ताचे पाट वाहत असलेले आपल्याला दिसत नाही का?' हा त्यांचा प्रश्न असतो. प्राण्याच्यांतही केंद्रीय मज्जासंस्था असल्यामुळे – त्या तोंडाने सांगू शकत नसल्या तरी – वेदना होतच असणार याबद्दल शाकाहाऱ्यांच्या पुरस्कर्त्यात दुमत नाही.

परंतु येथे प्राण्यांच्या कत्तलीपेक्षा प्राण्यांना 'जिवंतपणा' कशा प्रकारे प्रदान केले जाते हा प्रश्न उपस्थित करायला हवा. आणि त्यांना मारून टाकण्यासाठीची जी यंत्रणा उभी केली आहे त्याबद्दलही विचार करायला हवा.

आपण मारून खाणाऱ्या प्राण्यांच्या नैसर्गिक वाढीसाठी प्राण्यांची नीट देखभाल करावी, मोकळी हवा, प्रकाश, पाणी यासारख्या मूलभूत सोयी-सुविधा पुरवाव्या, प्राण्यांच्या उपजत गुणविशेषांना उत्तेजन द्यावे, याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही. रोगिष्ट प्राण्यांचे मांस खाणारे आजारी पडतात, एवढी समज मांसाहाऱ्यात नक्कीच असेल. बकरी, बोकड, यासारखे प्राणी खुल्या वातावरणात बागडतात व चांगले आयुष्य जगतात. पोर्क व चिकन यांचे यांत्रिकीकरण झालेले असले तरी तेथेसुद्धा रोगराई न होण्याची खबरदारी घेतली जात असावी.

परंतु शाकाहाऱ्यांचा आक्षेप मूक प्राण्यांना तुम्ही कसे वाढवता हा नसून त्या प्राण्यांचे हालाहाल करून निर्घृणपणे मारण्याबद्दल असण्याची शक्यता आहे. कोंबडीची मुंडी पिरगळून वा बोकडांचा 'हलाल' पद्धतीने (रक्ताच्या चिळकांड्या उडतात हे माहीत असूनसुद्धा!) मारून खाणे कितपत नैतिक ठरेल? गाजर उपटून खाणे व कोंबडीला मारून खाणे यात फरक नाही का? गाजर काकडीत संवेदना नाहीत; परंतु मूक प्राण्यात संवेदना आहेत, हे कसे

विसरता येईल? मांसाहारच नैसर्गिक नाही यावर शाकाहाऱ्यांचा भर असतो. त्या पुष्ट्यर्थ माणसाच्या दातांची रचना आणि माणसात अंगभूत असलेल्या दया, करुणा, सहानुभूती इ. सद्गुणांचे संदर्भ ते नेहमीच देत असतात.

निसर्ग नियम मात्र वेगळेच काही तरी सूचित करत असतात. मानवी उत्क्रांतीचा अभ्यास केल्यास मांसाहाराच्या विरोधातील हवा निघून जाईल. मुळात मांसाहाराला आक्षेप घेणाऱ्यांच्यामध्ये प्राणी हत्येबद्दलच्या प्रक्रियेबद्दल मनात अढी असते. येथे किळसवाणे, उबग आणणारे काही तरी घडत असावे अशी शंका असते. आणि हे अनैसर्गिक असून ते योग्य नाही अशी एक भावना त्यांच्या मनात रुज(व)लेली असते. जर हे काही त्यांच्या अपरोक्ष घडत असल्यास वा त्या प्रक्रियेची इत्थंभूत माहिती नसल्यास वा ते दुर्लक्ष करण्याच्या मनस्थितीत असल्यास मांसाहारसुद्धा नक्कीच आवडेल, यात शंका नसावी. नैसर्गिकतेचा बाऊ करणे हे नित्याचीच बाब झालेली आहे. या कारणाने जर मांसाहार अनैसर्गिक वाटत असल्यास अवयवारोपण, रक्तदान, गर्भपात, नेत्रदान, कृत्रिम गर्भधारण, सीजरिंग, नकली दातांची कवळी, चष्मा, इत्यादी सर्व गोष्टी अनैसर्गिक असूनसुद्धा समाजाने हे सर्व स्वीकारलेले आहे व त्यात कुठेही अनैतिकता नाही असेच सर्वांना वाटत आहे.

असाच काहीसा प्रकार मांसाहाराच्या बाबतीतही घडत असावा, असे म्हणण्यास वाव आहे. खाण्यासाठीच प्राण्यांची पैदास करत असल्यास व अत्याधुनिक तंत्रज्ञान वापरून प्राण्यांना कमीत कमी क्लेश देवून हत्या करत असल्यास त्यात आक्षेप घेण्यासारखे काहीही नाही.

आपल्याला काय आवडते, काय आवडावे हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. मला जे आवडते तेच सर्वानी खावे हा दुराग्रह अनाठायी आहे. म्हणूनच श्रीयुत रामचंद्र कलगुटकर चिकन खात असताना एखादा शाकाहारी त्यांच्याच शेजारी बसून श्रीखंड पुरी (वा साबुदाण्याची खिचडी) का खाऊ शकत नाही?



# वेदना: शारीरिक इजा की मनाचा खेळ?

त्या दिवशी नाट्यगृह तुडुंब भरलेले होते. काही जण पायऱ्यावर, काही जण पॅसेजच्या रिकाम्या जागेत बसले होते. संयोजकांना शेवटच्या क्षणी टीव्ही स्क्रीनची व्यवस्था करावी लागली. त्यामुळे बाहेरचा व्हरांडाही भरला. स्टेजवरचा पडदा वर सरकू लागला. डॉ. परवेझ खंबाटा स्टेजवर उभे होते. संपूर्ण स्टेजला ऑपरेशन थेटरचे स्वरूप देण्यात आले होते. डॉक्टरांच्या समोर ऑपरेशन टेबल व त्यावर एक रुग्ण. कार्यक्रमाची सुरुवातच डॉक्टरांनी चेहऱ्यावर मास्क चढवण्यापासून झाली. त्यानंतर डॉक्टरांनी हातात ग्लोव्हज चढवले. शेजारच्या नर्सने त्यांच्या हातात इंजेक्शनची सिरिंज दिली. क्षणभर इंजेक्शनच्या सुईकडे निरखून बघत रुग्णाच्या मासल दंडात डॉक्टर सुई टोचतात. प्रेक्षकांना रुग्ण थोडीशी हालचाल करत आहे असे वाटले. काही क्षणात रुग्ण शांत होतो. व चक्क डोळे उघडून डॉक्टरांकडे बघत स्मित करतो.

"कसं वाटलं? " डॉक्टरांचा प्रश्न.

"एकदम छान, डॉक्टर. तुम्ही अगोदरच सांगितल्याप्रमाणे इंजेक्शनची सुई शरीरात गेली हे मला जाणवले. परंतु मला वेदना काही जाणवल्या नाहीत. "

"मग पुढच्या शस्त्रक्रियेच्या तयारीला लागू का? Anesthesia शिवायच्या ऑपरेशनला तुमची हरकत तर नाही ना? "

"अजिबात नाही, डॉक्टर. बिनधास्त करा."

डॉक्टर प्रेक्षकांकडे बघत "मी ऑपरेशनसाठी एक नवीन प्रक्रिया शोधली आहे. यात मी भूल देणे पूर्णपणे टाळलेले आहे. रुग्ण ऑपरेशनच्या काळात पूर्णपणे शुद्धीवर असतो, काय काय घडत आहे ते उघड्या डोळ्यानी पाहू शकतो. रुग्णाला कुठलीही वेदना जाणवणार नाही. मी शोधलेल्या या प्रक्रियेत वेदनेची आठवण पूर्णपणे पुसून टाकण्यात आली आहे. जर वेदनेची आठवणच येत नसल्यास त्याला भ्यायचेही कारण नाही. माझी ही ऑपरेशनपूर्व प्रक्रिया

केवळ सैद्धांतिक स्वरूपात नसून त्याची व्यावहारिकता या रुग्णाने सिद्ध केलेले तुम्ही आताच प्रत्यक्षपणे पाहिलेले आहे. सुई टोचल्याच्या वेदना तुम्हालाही जाणवल्या. तो मात्र एका क्षणात सर्व काही विसरून गेला. यानंतरच्या अनुभवाची त्याला भीती वाटणार नाही. भूल देण्यामुळे होणाऱ्या दुष्परिणामा-पासून आपण रुग्णाला वाचवू शकतो. हा एक वैद्यकशास्त्रासाठीचा सुवर्ण दिवस ठरू शकेल.'' असे म्हणत त्यानी आपले भाषण आवरते घेतले.
''ठीक आहे तर. आता मला ऑपरेशन पूर्ण करू दे.''

स्टेजचा पडदा हळू हळू खाली सरकू लागला.

** ** **

मूक प्राण्यावर दया दाखवावी (भूतदया परमो धर्मः) यासाठी आंदोलन करणाऱ्यांचा प्राणी मरत असताना त्यांना काय वाटते या प्रश्नापेक्षा प्राण्यांना वेदना होतात यावर नेहमीच भर असतो. परंतु वेदना म्हणजे नेमके काय हा प्रश्न विचारल्यास त्याचे उत्तर देणे फार अवघड ठरते. वेदना हे काही दाखवता येत नाही. किंवा त्याचे वर्णनही करता येत नाही. ती एक प्रकारची संवेदना असते व जो कुणी ते अनुभवत असतो त्यालाच ते फक्त कळत असते. याचा अर्थ प्राण्यांनाही वेदना जाणवत असाव्यात. परंतु प्राण्यांना होत असलेल्या वेदना शब्दातून व्यक्त करता येत नसल्यामुळे त्यांना वेदना नाहीत या (गैर)समजुतीतून आपण त्यांच्याशी व्यवहार करत असतो. प्राण्यांनाही वेदना जाणवत असल्यास याचा नैतिकदृष्ट्या विचार करण्याची गरज आहे, असे पुरस्कर्त्यांचा आग्रह असतो.

वेदना ही मुळातच वाईट वा क्लेशदायक असते व जाणून बुजून काही कारण नसताना कुणाला तरी वेदनेच्या आहारी देणे हा निंदनीय प्रकार असू शकतो. एक मात्र खरे की वेदना आहे याबद्दल दुमत नसावे. परंतु ते कितपत वाईट आहे व या वाईटातून काही चांगले निघण्याची शक्यता आहे याचा

अंदाज करता येईल का? मुळात शारीरिक वेदना व त्यामुळे मेंदूत होणाऱ्या संवेदना या दोन गोष्टी अत्यंत वेगळ्या आहेत. एखाद्याच्या मेंदूमध्ये वेदनेची आठवण रहात नसेल वा त्याची भीती वाटत नसल्यास त्याच्यावर वेदनेचा मारा करत राहावे की काय? जरी वेदनेची आठवण राहत नसली तरी वेदना तीव्र असतात व त्याचे अस्तित्व नाकारता येत नाही, ही वस्तुस्थिती लक्षात ठेवायला हवी.

एखाद्याला वेदनांची जाणीव होत नाही व त्याविषयी काही बोलत नाही म्हणून त्याला वेदना देत रहावे (व त्यातून आपला फायदा करून घ्यावा) हे सपशेल चुकीचे ठरेल. गंमत म्हणजे वेदनाच्या अनुभवाची संवेदना व वेदना होणार म्हणून वाटणारी भीती या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. डॉक्टर खंबाटानी रुग्णाच्या मनात वेदनेची भीतीच वाटू न देणारी प्रक्रिया शोधल्यामुळे रुग्णाला ऑपरेशनच्या वेळी भूल देण्याची (व भूल देण्याचा धोका पत्करण्याची) गरजच उरली नाही. जे काही ऑपरेशनच्या वेळी करायचे ते बिनधास्त करण्याची मुभा यातून मिळते. काही कारण नसताना एखाद्याला वेदना देत राहणे ही फार चुकीची गोष्ट आहे. एखाद्या मनोरुग्णाला वेदनेची जाणीव होत नाही म्हणून त्याला वेदना देत राहणे कितपत योग्य ठरेल?

खरे पाहता वेदनेची जाणीव कशी होते हे समजून घेणे महत्वाचे ठरेल. आपल्या पायाच्या आंगठ्यावर कुणाचे तरी बुटाचे पाय पडल्यास असह्य वेदना जाणवतात. किंवा टेनीससारखा खेळ खेळत असताना बॉल उंचावरून मारल्यास पाठीला कळ आल्याने मरणांतिक वेदना होतात. त्या वेदनांची जाणीव मेंदूला पोचते. तेथील नसांची chain reaction सुरू होते. शरीरावरील घाव pain receptorला जागे करतात. व तेथून रासायनिक स्राव होतो व हे रसायन वेदनेची जाणीव देते. मज्जारज्जूमधून हा संदेश मेंदूपर्यंत पोचतो. मेंदू ताबडतोब संबंधित भागाला (Somato-sensory Area) सूचना देते. व

आंगठा मागे सरकवला जातो ( वा टेनिस खेळाडू खेळ थांबवून विश्रांती घेतो) परंतु एवढ्यावरच हे थांबत नाही. अशा प्रकारच्या वेदनेची जाणीव उत्क्रांतीच्या काळापासून मानवी मनात दडलेली असल्यामुळे fight or flight च्या स्थितीला पोचते. याचाच अर्थ ही वेदना मानवी अस्तित्वासाठी प्रतिबंधात्मक व शरीराला सुरक्षित ठेवणारी यंत्रणा आहे. त्यामुळे आपण पूर्णपणे वेदनेला सुट्टी देऊ शकत नाही. (वा वेदनेपासून पूर्णपणे मुक्त होऊ शकत नाही) दात दुखत असल्यास प्रचंड वेदना होतात. परंतु काही काळाने त्या थांबतात. आपल्या जिवाला धोका नाही हा संदेश मेंदू पोचवतो. परंतु हीच वेदना अनेक वेळा होऊ लागल्यास दातावर उपचार केल्याशिवाय गत्यंतर नाही. म्हणजेच या वेदनेची स्मृती धोक्याची सूचना देते. व त्यातून तुमच्या शरीराचे रक्षण होऊ शकते.

हे सर्व खरे असल्यास मूक प्राण्यांच्या बाबतीत काय घडत असावे याचा विचार करावा लागेल. मूक जनावरांना वेदना जाणवत असतील का? त्या वेदनांची जाणीव त्यांच्या स्मृतीपटलात साठवलेली असेल का? वेदनेतून ते काही तरी शिकत असतील का? खाटिक सुरी घेऊन आल्यानंतर प्राणी पळून जाण्याचा प्रयत्न करत असतील का? एखाद्या पाळीव कुत्र्याला मालक सातत्याने त्रास देत असल्यास, मारहाण करत असल्यास, कुत्रा चवताळून मालकाला चावेल का? किंवा पळून जाण्याचा प्रयत्न करेल का? आपल्या (?) जिव्हाचापल्यासाठी माशाला सळीवर बांधून भाजत असताना त्याला वेदना जाणवत असतील का? किंवा काही क्षणापुरतेच त्या वेदना रहात असतील का? हळू हळू आपण मरून जाऊ ही जाणीव येत असेल का?

डॉ. जगदीशचंद्र बोस यांनी वनस्पतींच्या संवेदनाविषयी भरपूर प्रयोग केले होते. खरेखरच वनस्पतीनाही संवेदना असल्यास अहिंसा हे एक मूल्य मानणारे, शाकाहारी अन्नाचाही त्याग करतील का? किंवा भाजीपाला खात असताना वनस्पतींना वेदना जाणवू नयेत यासाठी काही तजवीज करता येईल का? किंवा

जीवो जीवस्य जीवनम्! या उक्तीचे तंतोतंत पालन करत या प्रश्नाकडे पाठ फिरवायचे का?

वेदना म्हणजे वेगवेगळ्या प्रसंगातील अनुभवांचीच मालिका असल्यास, डॉक्टर खंबाटा यांनी प्रात्यक्षिकेत दाखविल्याप्रमाणे, काही क्षणच वेदनेचा अनुभव (व आयुष्यभर त्याची भीती) येत असल्यास घाबरण्याचे काहीच कारण नाही हे कितपत योग्य ठरेल?

*(या चर्चेत आपण फक्त वेदनेशी संबंधित गोष्टींचा विचार करत असून पूर्ण जग मांसाहारी झाल्यास पर्यावरणाचे, इकॉलॉजीचे, जैव वैविध्यतेचे काय होईल वा पूर्ण शाकाहारी झाल्यास तितक्या प्रमाणात भाजीपालाचा पुरवठा होईल का इत्यादी प्रश्न चर्चेपुरते बाजूला ठेवलेले आहेत, याची कृपया नोंद घ्यावी. )*



# चुका (केल्यावर) होतच राहणार!

माणसाच्या हातून चुका होतात यात वावगं काही नाही. परंतु त्याच-त्याच चुका पुन्हा-पुन्हा करणाऱ्या माणसाला मूर्खांच्या यादीत समाविष्ट करावं, असं वाटल्यास नवल नाही. माणूस प्राणी उत्क्रांत होत एक समजूतदार, बुद्धिमान प्राणी बनला आहे असं स्वतःबद्दल म्हणवून घेतो. आजची परिस्थिती माणसांच्या बुद्धी-क्षमतेत वाढ होण्यासाठी अत्यंत अनुकूल आहे. सकस आहार, सुदीर्घ आरोग्य, शिक्षणाच्या सुविधा, माहिती, तंत्रज्ञानाची झेप, आव्हानात्मक आणि गुंतागुतीच्या बौद्धिक समस्या, बिनधोक काम इत्यादींमुळे माणूस आणखी जास्त बुद्धिमान, प्रतिभावान, सर्जनशील व्हायला हवा होता. परंतु परिस्थिती अगदीच उलट असून माणसं जास्तीत जास्त प्रमाणात मूर्खपणाचे प्रदर्शन करत आहेत. समाजाला कलाटणी देऊ शकणारी, ध्येयधोरणं ठरविणारी उच्चपदस्थ माणसंच चुका करू लागल्यास समाजाला फार मोठी किंमत द्यावी लागते. त्यांची एखादी क्षुल्लक चूक संपूर्ण समाजाला वेठीस धरू शकते. त्यामुळे जबाबदारीच्या पदांवर असणाऱ्या माणसांनी आणि पर्यायाने सगळ्याच लोकांनी कमीतकमी चुका कराव्यात ह्याकडे लक्ष देण्याची नितांत गरज आहे. चुकीचे मूळ मूर्खपणात दडलेलं आहे. हा मूर्खपणा आता व यानंतर न परवडण्यासारखा झालेला आहे.

त्याच-त्याच चुका (पुन्हा) होता कामा नये, असं अपराधीपणाच्या भावनेतून वाटू शकतं. तरीही, शहाणे म्हणवून घेणाऱ्या कित्येकांनी घोडचुका केल्या आहेत, हे लक्षात घ्यायला हवं. खरं पाहता, मानवी बुद्धिमत्तेचा विकास कसा होत गेला याचा अभ्यास केला जातो, त्याचप्रमाणे माणसं मूर्खासारखं का वागतात, याचाही अभ्यास करायला हवा. परंतु मानवी बुद्धिमत्तेच्या दुसऱ्या टोकाला असणाऱ्या, मूर्खपणाचा अभ्यास म्हणजे वेळेचा निव्वळ अपव्यय, असा समज मानसतज्ज्ञांचाही असतो. आपल्या हातून होणाऱ्या चुका त्या

विशिष्ट क्षणी आणि त्या परिस्थितीत उद्भवलेल्या मूर्खपणाची निष्पत्ती असते; त्याकडे फार गांभीर्याने बघावं, असं ह्या विषयाबद्दल समजलं जात नाही. आपण सामान्यपणे आइन्स्टाइन, मोझार्ट, बर्ट्रांड रसेल, हॉकिंगसारख्यांच्या शोधात असतो. मूर्ख काय, कुठेही हजारोंनी सापडतील! परंतु प्रतिभावंताचं तसं नाही. बुद्धी नसणारे म्हणजे प्रयोगशाळेत वापरात येणाऱ्या उंदरासारखे. असले काय नि नसले काय; दोन्ही सारखेच!

**मूर्खपणाची समस्या**

ही मूर्खपणाची जुनाट समस्या वरचेवर डोकं काढत आहे आणि त्याचे काही नवीन कंगोरे सापडत आहेत. यानंतरच्या काळात मूर्खपणाला क्षमा नाही! मूर्खपणाचा अभ्यास आता शास्त्र बनू पाहत आहे. या जगाची धुरा सांभाळणाऱ्यांच्यात जास्त बुद्धीमत्ता असते, हे समाजाने मान्य केलं आहे. बुद्धीमत्ता जास्त असलेल्यांच्या हातातच सत्ता एकवटल्यामुळे त्यांची साधी चूकसुद्धा जीवघेणी ठरत आहे. सत्ताधाऱ्यांच्या मूर्खपणातून घडणारी क्षुल्लक चूकसुद्धा आपल्या व्यवहारावर दीर्घकालीन दुष्परिणाम करण्याची शक्यता आहे. सत्ताधाऱ्यांची चूक - हवं तर मूर्खपणा म्हणू - वेळीच लक्षात आणून देण्याची गरज भासत आहे.

एक मात्र खरं की अव्यावहारिक, विसंगत वा तद्दन मूर्ख कल्पना कोणाच्या डोक्यात येणं म्हणजे त्यांची बुद्धीमत्ता फारच कमी, हा एक गैरसमज आहे. मुळात बुद्धिमत्ता, विवेक वा तर्कशुद्ध विचार यांचा एकमेकाशी काही संबंध नाही. तुम्हाला एखाद्या विषयात जास्त गुण मिळाले किंवा एखाद्या विषयात तुम्ही प्रवीण आहात, याचा अर्थ दुसऱ्या विषयातही तुम्ही तितकेच हुशार आहात असा होत नाही. महत्त्वाचं म्हणजे मूर्ख वा अविवेकी विचारांपासून कुणालाही सुटका नाही. मेंदूला विचारांती कृती करण्याची सवय लागल्यास व त्याप्रमाणे मेंदू प्रशिक्षित होत गेल्यास कमीत कमी चुका होण्याची शक्यता

वाढते. परंतु आपण विवेकी विचार करण्याच्या सवयीऐवजी जास्तीत जास्त डिग्र्या मिळवण्याच्या मागे लागतो. परीक्षेतील जास्त गुण मिळवणं वा स्पर्धात्मक परीक्षेत उत्तीर्ण होणं वा अत्युच्च पदवी प्राप्त करणं म्हणजेच जास्त प्रतिभा, शहाणपण, विवेक ही मनोधारणा सर्वसामान्यांत रुजलेली असल्यामुळे स्वत:ला शहाणे समजणारे कुठल्याही विषयावर भाष्य करण्यास मोकळे असतात. यामुळे समाजाची फार मोठी हानी होऊ शकते. वैयक्तिकरित्यासुद्धा हे धोकादायक ठरू शकेल. बुद्धिमत्ता जास्त असो वा नसो, तर्कशुद्ध विचार न करणारे गोत्यात आल्याची अनेक उदाहरणं आपल्याला सापडतील. (फक्त त्यांचा गाजावाजा होत नसल्यामुळे झाकली मूठ सव्वा लाखाची!)

**तर्कशुद्ध विचार व कृती**

मोठ्या व/वा जबाबदारीच्या पदावर असलेल्यांचा मूर्खपणा तर जास्त धोकादायक ठरतो. बँकिंग व्यवहारातील उच्चपदस्थांकडून तर्कशुद्ध विचार व कृती करण्याची अपेक्षा असते. परंतु हेच तज्ज्ञ तारतम्य न बाळगता, उत्स्फूर्तपणे नको तिथे गुंतवणूक करत गेल्यास बँक बुडायला (आणि त्यामुळे लाखो खातेदारांना फटका बसायला) वेळ लागणार नाही. हेच विधान सत्तेवर असलेल्या राजकीय नेत्यांनासुद्धा लागू होऊ शकतं. राजकारण्यांनी (तथाकथित) विचारपूर्वक घेतलेल्या निर्णयामुळे किती नुकसान होऊ शकते याची अनेक प्रत्यक्ष उदाहरणं आपल्या अवती भोवती हजारोंनी सापडतील. त्यामुळे बुद्धिवंत म्हणवून घेणाऱ्यानी व सत्तेची धुरा सांभाळणाऱ्यांनी विनम्रपणे आपल्या चुका कबूल कराव्यात व (शक्यतोवर) चुका करणं टाळावं; यातच समाजाचं व देशाचं हित आहे. पुढच्यांनी अशा चुकांवर मात करण्यासाठी काही उपाय योजना शोधाव्यात. निर्णयप्रक्रिया बिनचूक होण्यासाठी एखादी सक्षम यंत्रणा उभी करावी. गंमत म्हणजे आजकाल एकटी-दुकटी व्यक्ती महत्त्वाचे निर्णय घेत नाही. निर्णयप्रक्रियेत अनेक तज्ज्ञ सामील होत असतात.

तज्ज्ञांच्या सल्ल्यांतून आणि चर्चेतून निघालेल्या निष्कर्षांवरून निर्णय घेतले जातात. तरीही चूक कशी काय कुणाच्याही लक्षात येत नाही, हे एक न सुटणारं कोडं आहे. म्हणूनच ऑस्कर वाइल्डला, मूर्खपणाव्यतिरिक्त दुसरे कुठलेही पाप (sin) नाही, असं म्हणावंसं वाटलं असेल.

'मादाम बोव्हारी' ह्या कादंबरीसाठी प्रसिद्ध असणारा कादंबरीकार, गुस्ताव फ्लोबेर ह्याने म्हटलेलं होतं, "पृथ्वीला मर्यादा आहे, पण मूर्खपणाला कसलीही मर्यादा नाही." मूर्खपणाबद्दल एक कादंबरीच लिहायला सुरुवात केली - बोव्हार आणि पेकुशे (Bouvard et Pécuchet). त्यात दोन कारकून जगातलं सगळं ज्ञान पचवायला निघतात. स्वतःच्याच चुका आणि कमतरतांमुळे ते स्वतःचा पराभव कबूल करतात. "त्यांना मूर्खपणा काय हे समजतं, पण ते मूर्खपणा सहन करू शकत नाहीत", असं वर्णन फ्लोबेरने केलं आहे. दुर्दैवाने ही कादंबरी लिहून पूर्ण होण्याआधीच, वयाच्या ५८व्या वर्षी फ्लोबेर गेला. त्या कादंबरीबरोबर प्रसिद्ध करण्यासाठी त्याने मूर्ख वर्तनाची मोठी यादी तयार केली होती. याचा मोठा कोश बनवण्याचं काम राहून गेलं. ते काम स्वतंत्ररीत्या पूर्ण केलं डच तज्ज्ञ माथिस फान बोक्सेलने. त्याने पाच वर्षं खपून मूर्खपणाचा कोश - Encyclopedia of Stupidity- बनवून 1999 साली प्रकाशित केला. त्यात त्याने काही चक्रम संशोधनांची उदाहरणं दिलेली आहेत; "चुंबनाच्या घनतेचं मोजमाप", "वाऱ्यांमुळे बेरजांमध्ये होणारे बदल" किंवा "देवाचा पृष्ठभाग", इत्यादी.

मूर्खपणाच्या कोशाला करमणूकमूल्य असल्याचं ह्या उदाहरणांवरून दिसतं. त्या तुलनेत, दासबोधात लिहिलेली मूर्खलक्षणं हे तत्कालीन रूढीप्रथांचं सपक आणि जजमेंटल वर्णन वाटतं. उदाहरणार्थ, ही लक्षणं पाहा : "जन्मला जयांचे उदरीं । तयांसी जो विरोध करी", "सखी मानिली अंतुरी",

"संगेंविण विदेश करी", "वामहस्तें प्राशन करी" ह्यात कालातीत मूर्खपणापेक्षा त्या काळातल्या अभिजनांच्या नीतीमत्तेचं वर्णन अधिक आहे

**मूर्खपणाच्या मर्यादा व बलस्थान**

माणसांच्या मूर्खपणाच्या मर्यादा व बलस्थान शोधणे हाच एक मूर्खपणा वाटल्यामुळे असेल, बुद्धिमत्तेच्या पंक्तीच्या (intelligence spectrum) दुसऱ्या टोकाला असलेल्या या विषयाचा अभ्यास कदाचित कुणीही केला नसेल. बुद्धिमत्ता चर्चेचा, अभ्यासाचा विषय होऊ शकतो; मूर्खपणा नव्हे. परंतु बुद्धिमत्तेच्या या स्पेक्ट्रमने काही प्रश्न उभे केले आहेत. मानव प्राणी homo sapien म्हणून उत्क्रांत होत असताना मेंदू मोठा होत गेला व मानव प्राणी बुद्धिमान झाला; हे खरं असल्यास एव्हाना संपूर्ण मानववंश बुद्धिमान का झाला नाही? सर्वच्या सर्व माणसं, समान बुद्धीवान, प्रतिभावंत का झाली नाहीत? शहाणीसुरती माणसं मूर्खपणाचे प्रदर्शन का करतात? अल्पमती असलेल्यांचासुद्धा मानवी अस्तित्वासाठी हातभार लागला असावा की काय? कमी बुद्धी असलेल्यांनी शहाण्यांवर मात तर केली नसेल ना? ... वगैरे, वगैरे. अशा प्रकारच्या प्रश्नांची यादी नक्कीच वाढवता येईल.

**बुद्धी-गुणांक**

खरं पाहता, आपली बुद्धिमत्ता मोजण्याचे विश्वासार्ह असं कोणतंही मापन आपल्याकडे उपलब्ध नाही. साधारण गेल्या शंभर वर्षांपूर्वीपासून बुद्धी-गुणांकावरून (IQ – Intelligence Quotient) बुद्धिमत्ता मोजण्यात येत आहे. त्या मापनात अनेक उणिवा आहेत, तरी त्याचाच वापर अजूनही होत आहे. सामान्यपणे सरासरी बुद्धी-गुणांक 80 ते 130च्या दरम्यान असतो, असं समजलं जातं. वयाच्या सोळाव्या वर्षी बुद्धी-गुणांक सर्वात जास्त असतो. बुद्धी गुणांकात जनुकांचा फार मोठा वाटा आहे असं समजलं जातं. तरीसुद्धा बुद्धी-गुणांकांचा आणि आपल्या अविवेकी वर्तनाचा, अविचाराचा वा अतार्किक

कृतींचा एकमेकांशी काही संबंध नाही, असं तज्ज्ञ मानतात. तुम्ही काही बाबतीत फार बुद्धिमान आणि इतर काही बाबतीत एकदम बुद्धू असण्याची शक्यता जास्त आहे. शहाण्यांच्या मूर्खपणातून घडलेल्या चुकांचा आढावा घेतल्यास समाजाला मोठ्या आपत्तींमधून का जावं लागतं, याची नक्कीच कल्पना येईल. 2008 सालचं आर्थिक अरिष्ट हे एक, अलीकडचं मासलेवाईक उदाहरण ठरू शकेल. म्हणूनच मूर्खपणाचा स्वतंत्ररीत्या अभ्यास केल्यास काही तरी हाती लागेल असं काही अभ्यासकांचं मत आहे.

बुद्धिमत्ता व मूर्खपणा या गोष्टी परस्परविरोधी आणि दोन टोकांच्या आहेत, ही कल्पना अगदी अलीकडची आहे. 15 -16 व्या शतकातल्या रेनेसाँच्या कालखंडापर्यंत मूर्खपणाचं अस्तित्व स्वतंत्र होतं. मूर्खपणा ही दैवी देणगी आहे, हा समज दृढ होता. काहींना त्यात गर्व, हट्टीपणा, अट्टाहास व नक्कल यांची झाक दिसत होती. अठराव्या शतकाच्या मध्यात मूर्खपणाची बरोबरी सुमार बुद्धिमत्तेशी करण्यात आली. हा काळ पिढ्यान्‌पिढ्या सत्ता भोगणाऱ्यांऐवजी बूर्ज्वांच्या, मध्यमवर्गाच्या हातात सत्ता जाण्याचा होता. तर्क, विवेक यांना या प्रबोधनकाळात उच्चस्थान मिळू लागलं. प्रत्येकाला आपलं नशीब आजमावण्याची संधी प्राप्त झाली.

**पठडीबाहेरचा विचार**

आधुनिक काळात माणसाची क्षमता बुद्धिमत्तेशी व पर्यायाने बुद्धी-गुणांकाशी जोडली जात आहे. अमूर्त वा अफलातून, पठडीबाहेरचा विचार करण्याच्या क्षमतेसाठीसुद्धा हेच परिमाण वापरलं जात आहे. 'बुद्धी-गुणांक 120 च्या जवळपास असल्यास कॅल्क्युलस सोडवण्यात फार कष्ट पडणार नाहीत; 100 असल्यास थोडेसे श्रम घेऊन शिकता येईल; 70 असल्यास बापजन्मी तुम्हाला कॅल्क्युलस येणार नाही,' ही मानसिकता रूढ असून हीच मोजपट्टी सर्व क्षेत्रात सर्रासपणे वापरली जात आहे.

इंटेलिजेन्स स्पेक्ट्रमवर काटा कुठे आहे, यास अनेक घटक कारणीभूत आहेत. आपण जिथे वाढलो ते वातावरण, आपलं शिक्षण, आहार हेही घटक बुद्धी-गुणांक कमी जास्त होण्यास कारणीभूत ठरू शकतात. एकाच घरात वाढलेल्या दोन व्यक्तींच्या बुद्धी-गुणांकांतल्या फरकाचं मूळ शोधल्यास त्यांच्यातल्या जनुकीय गुणविशेषाकडे बोट दाखवता येईल. आणि हा फरक 40 टक्क्यांपर्यंत असू शकतो. जनुकीय वा परिस्थितीजन्य फरक आपल्या मेंदूच्या वाढीवर परिणाम करू शकतात. मेंदूतील वायरिंग बदलू शकतात. चाणाक्ष मेंदूतील न्यूरॉन्सच्या वैशिष्ट्यपूर्ण जोडणीमुळे मेंदूचं नेटवर्किंग जास्त क्षमतेने कार्य करू शकतं. अशा व्यक्तींची 'वर्किंग मेमरी' जास्त तीक्ष्ण असू शकते. समस्यांना उत्तरं शोधण्यासाठी लागणारे डावपेच ते उत्तम प्रकारे हाताळू शकतात. मेंदूतील न्यूरल कनेक्शन्समुळे मेंदूची जैविक रचना कार्यक्षमपणे, तल्लखपणे काम करत असते.

परंतु कार्यक्षम मेंदूच्या उत्कृष्ट रचनेसाठी माणसाला जबरदस्त किंमत द्यावी लागलेली असणार. अन्यथा आपण सर्वच जण बुद्धीवंतांच्या पंक्तीत जाऊन बसलो असतो! बुद्धिवंत लोक विषण्णतेचे बळी असण्याची शक्यता असते. आत्महत्या करण्याकडे त्यांचा कल अधिक प्रमाणात असतो. मात्र यासंबंधात अजूनही पुरेसा अभ्यास झालेला नाही. याबद्दल फारच तुटपुंजी माहिती उपलब्ध आहे. दुसऱ्या जागतिक महायुद्धात जास्त बुद्धिमान असलेले सैनिक व अधिकारी यांच्या मृत्यूचं प्रमाण तुलनेने इतरांपेक्षा जास्त होतं. कदाचित इतर अनेक घटकही यास कारणीभूत ठरत असावेत.

त्याचप्रमाणे माणसागणिक बुद्धीतील फरकाचं कारण, मेंदू उत्क्रांत होत असताना त्या काळच्या आव्हांनाना तोंड देण्यासाठी होत गेलेल्या जनुकीय ड्रिफ्ट, हे सुद्धा असू शकतं; आपल्या बुद्धिमत्तेचं रहस्य म्हणजे सातत्याने उत्परिवर्तित (Mutation) होत असलेली सुमारे 200 ते 5000 जनुकं असं

मानणारा शास्त्रज्ञांचा एक गट आहे. ज्यांच्या जनुकांचं उत्परिवर्तन होताना, बुद्धिमत्ता आली नाही ते लोक टिकून राहिले नाहीत असं ह्या गटात समजलं जातं. पण 'जनुकीय ड्रिफ्ट' गटाचं मत आहे की समाज म्हणून आपण जसे उत्क्रांत होत गेलो तसतसे 'बुद्धीयोग्य' उत्परिवर्तन न झालेले लोकही टिकून राहिले.

**सरासरी बुद्धिमत्तेत वाढ**

एक मात्र खरं की आपल्या पूर्वजांची बुद्धिमत्ता किती होती, कशी होती याचा अंदाज घेणं आता शक्य होणार नाही. मात्र सरासरी बुद्धिमत्ता वाढतच आहे याबद्दल दुमत नसावं. मुळात मेंदूच्या उत्क्रांतीबद्दल विधान करताना अलिकडे होत असलेल्या या विषयातील संशोधनांचाही विचार करावा लागेल. माणसाच्या वैचारिक क्षमतेचे अनेक आयाम असून वाचनदोष (dyslexia), शिक्षण वा संस्कृतीमुळे बुद्धी-गुणांकात फार मोठा फरक जाणवू शकतो. अंदमानमधल्या आदिवासा ी ंनी एखादी बौद्धिक चाचणी विकसित केली तर आपण त्या चाचणीत कदाचित 'नापास' होऊ. 70-80 बुद्धी-गुणांक असलेल्या व्यक्तीचं चार-पाच भाषांवर प्रभुत्व असू शकतं. अगदी सामान्य कुवतीची व्यक्तीसुद्धा हजारो लोकांची, लाखो रूपयांची लूट करू शकते. (असं एक उदाहरण ब्रिटनमध्ये होऊन गेलं.) जास्त बुद्धी-गुणांक असलेले लोक विवेकीपणाने वा तर्कशुद्धपणे वागतीलच याची कुणीही खात्री देऊ शकत नाही. अनेक वैज्ञानिकांना हवामान बदलाचे दुष्परिणाम खोटे वाटतात. यामुळेच IQ हे बुद्धिमत्तेचे ढोबळ मापक आहे, असं फारतर म्हणता येईल.

मूर्खपणाच्या उदाहरणांचा पाठपुरावा करताना फ्लोबेर निराश झाला असेल, अशी एक वदंता आहे. वैज्ञानिकांच्या मते मूर्खपणा ही एक अवैज्ञानिक संकल्पना आहे व त्याविषयी जास्त विचार करण्याची गरज नाही. परंतु

फ्लोबेरने मूर्खपणाची जंत्रीच प्रस्तुत केल्यामुळे फॉन बोक्सेल ह्या माजी वैज्ञानिकाला मूर्खपणा म्हणजे नेमकं काय याचा शोध घ्यावासा वाटला. शहाण्या व्यक्तींमधल्या काही लोकांच्या मूर्खपणामुळे समाजात उलथापालथ होऊ शकते, समाजाचं नुकसान होऊ शकतं हे फ्लोबेरने ठासून सांगितल्यामुळे अभ्यासक या विषयाकडे लक्ष देऊ लागले. भावना व बुद्धिमत्ता यांचा अभ्यास करणाऱ्या रिचर्ड निसबेट ह्या मानसशास्त्रज्ञाने कित्येक बुद्धिवंत तद्दन मूर्ख असतात असं विधान केलं आहे, ते खरं वाटू लागतं.

या विरोधाभासाचं नेमकं काय कारण असावं? प्रिन्सटनच्या डॅनियन काहनीमन आणि आमोस ट्रेव्हस्कींच्या मते माणूस हा रॅशनल प्राणी आहे, हेच मुळात चुकीचं विधान आहे. आपला मेंदू जेव्हा एखाद्या माहितीवर प्रक्रिया करत असतो तेव्हा दोन वेगवेगळया पद्धती कार्यरत होतात. बुद्धी-गुणांक चाचण्या यातल्या विश्लेषक किंवा तार्किक बुद्धिमत्तेचं मापक आहे. आपली जाणीव कशा प्रकारे समस्यावर उत्तर शोधते, या संबधीचे काही आडाखे एका पद्धतीत अंतर्भूत असतात. परंतु दुसरी पद्धत पूर्णपणे बुद्धीला वर्ज्य करून उत्स्फूर्ततेला उच्च स्थान देते.

**उत्स्फूर्तता**

खरं पाहता ही उत्स्फूर्तताच मानवी उत्क्रांतीत भरपूर फायदेशीर ठरत गेली. माहितीच्या डोंगराखाली दबलेल्या या प्राण्याला उत्स्फूर्ततेतून शॉर्टकट्स मिळायला लागले; त्यामुळे समस्यांच्या व आपत्तीच्या जंजाळातून सहीसलामत सुटका होऊ लागली. 'मला वाटतं' (गट फीलिंग) अशा प्रकारे निर्णय घेत गेल्यामुळे हे करू की ते, किंवा ते उत्कृष्ट की हे, असं 'हॅम्लेट'मधल्या भुतासारखे प्रश्नांच्या तावडीत न सापडता, अत्युत्कृष्ट नसलं तरी चालेल, परंतु कठीण प्रसंगातून बाहेर पडता यायला हवं, एवढ्यावरून

मनुष्य कृतीशील झाला आणि 'मला वाटतं' ही भावना बहुतेक वेळा फलदायी ठरली.

परंतु आपल्याला जे 'वाटतं' ते दर वेळी कामी येईलच याची खात्री कुणी देऊ शकणार नाही. काही प्रसंगांत ते ठीक आहे असं वाटत असलं तरी त्याची चिकित्सा न केल्यास आपण योग्य निर्णय घेऊ शकत नाही. व ही चिकित्सा न करणं किंवा करता न येणं यातूनच मूर्खपणाची सुरुवात होते. मी रुळलेल्या वाटेवरून जात असून ही पारंपरिक कृती मला योग्य ठिकाणी पोचवते, असं निर्देश करणारं एखादं बटण आपल्या मेंदूत नाही. त्यामुळे मेंदूला चिकित्सक-पणे विचार करण्यात प्रशिक्षित करावंच लागेल. मेंदूतल्या न्यूरॉन्सना ट्रेनिंग देऊन तरबेज करावंच लागेल.

मुख्य म्हणजे यात बुद्धी-गुणांकाचा कुठेही संबंध येत नाही. कदाचित बुद्धी-गुणांकाचा या कामी उपयोगही होणार नाही. मानवी मूर्खपणा समजून घेण्यासाठी व हा मूर्खपणा कशा प्रकारे, कुठे प्रकट होतो व याला प्रतिबंध करण्यासाठी नेमके काय करायला हवे यासाठी आता आपल्याला वेगळी व्यवस्था करावी लागेल. एखादं नवीन मापन शोधावे लागेल.

**विवेक-गुणांक - RQ**

कॅनडास्थित तज्ज्ञांचा एक गट बुद्धिमत्तेला छेद देणाऱ्या गोष्टींचा अभ्यास करत असून, हा गट Rationality Quotient (विवेक-गुणांक - RQ) या एका नवीन मापनाचा अभ्यास करत आहे. त्यांच्या मते मनात उभारणाऱ्या संदिग्धतेचं मापन यातून करता येऊ शकतं. उदाहरणार्थ, राहुल स्मिताकडे बघत आहे. स्मिता प्रकाशकडे बघत आहे. राहुल विवाहित आहे व प्रकाश अविवाहित आहे. या माहितीवरून कोणी विवाहित व्यक्ती कोणत्याही अविवाहित व्यक्तीकडे बघत आहे का? या प्रश्नाचं उत्तर 'हो', 'नाही' किंवा 'काही सांगता येत नाही', ह्यांपैकी एक मिळेल. बहुतांश लोक मात्र 'सांगता येत

नाही', हेच उत्तर देण्याच्या पावित्र्यात असतात. डोक्याला काही ताण न देता चटकन देता येणारे तेच एकमेव उत्तर असू शकेल. परंतु थोडा विचार केल्यावर नेमकं उत्तर - होय - नक्कीच देता येईल. विचार करण्याची तसदी घेण्यास सहजपणे कुणीही तयार होत नाहीत.

समस्येला योग्य उत्तर शोधताना बुद्धीचा वापर करत समस्येचं विश्लेषण करण्याबरोबरच, कृतीशील होताना किती धोका पत्करावा याचीसुद्धा जाणीव विवेक-गुणांक करून देत असतो. काही प्रसंगांत, कितपत धोका पत्करावा, हे उपलब्ध असलेल्या माहितीवरूनसुद्धा कळू शकतं. जुगार खेळताना आपण(च) जिंकणार, यावर आपला पूर्ण भरवसा असतो. अशा प्रकारची खात्री वैवाहिक जीवनात वा घटस्फोटाच्या प्रसंगी देता येत नाही. RQ कमी असल्यास तुमचे सर्व हिशोब चुकतच जातील. धोक्याची कल्पना येत नसल्यामुळे घेतलेले निर्णय चुकीचे ठरतात व आपण गोत्यात येतो.

हा विवेक-गुणांक (वा नीरक्षीरविवेकबुद्धी) किती आहे याचा अंदाज घेता येईल का? IQ प्रमाणे RQ उपजत आलेल्या जनुकांतून, वा तुम्ही वाढलात त्या वातावरणातून, वा तुमच्यावर झालेल्या संस्कारांतून येत नसतो. इतर कुठल्याही घटकांपेक्षा संपादन केलेलं ज्ञान, ज्ञानाच्या साहाय्याने प्राप्त परिस्थितीचं केलेलं विश्लेषण, विश्लेषणाच्या निष्कर्षातून बांधलेले कृतीचे आडाखे व या कृतीशीलतेला कारणीभूत ठरणारी जाणीवच तुमच्यात नैसर्गिकरीत्या किती RQ आहे हे सांगू शकेल. जास्त RQ असणारे जाणीवपूर्वक कृती करतात व ही कृती करण्यासाठी त्यांच्याकडे अनेक पर्यायी मार्गांचा साठा असतो. उत्स्फूर्ततेने घेतलेल्या निर्णयाबद्दल प्रश्न विचारण्याची सोय यात असते. त्यावरून योग्य निर्णय घेणं शक्य होतं. तुम्हाला काय माहीत आहे, काय माहीत नाही, वा कितपत माहीत आहे या गोष्टीवरून तुम्ही निष्कर्ष काढू शकता व कृती करू शकता.

परंतु हा जास्त RQसुद्धा, नियंत्रणाच्या बाहेर असलेल्या प्रसंगातून बाहेर काढण्यासाठी उपयुक्त ठरेल की नाही, याबद्दल शंका आहेत. काही कठीण प्रसंगांत फक्त आपलीच तयारी असून उपयोगी ठरत नाही; अवतीभोवतीची परिस्थितीसुद्धा थोडीफार अनुकूल असावी लागते. सर्वांत महत्त्वाचं म्हणजे भावनेचा अतिरेक योग्य निर्णय घेण्यास अडसर ठरतो. भयगंड, दुःख, वेदना, चिंतातुरता ह्यांमुळे वर्किंग मेमरी गुंतागुंतीची बनते. नवीन काही सुचत नाही. त्यामुळे समस्येचा विचार करण्यावर मर्यादा येतात. अशा वेळी आपला मेंदू शॉर्टकट म्हणून रुळलेल्या वाटेवर जाण्याचा प्रयत्न करायला लागतो. ही रुळलेली वाट अपेक्षित एवढी आशादायक नसल्यास माणूस फसतो. नंतर पश्चात्ताप करून घेण्याची वेळ येते. बहुतेकांची स्थिती हीच असते.

काही अभ्यासकांच्या मते मूर्खपणाला उत्तेजन देण्यासाठी आर्थिक व्यवहार करणाऱ्या व्यापारी संस्था सदैव तयारीत असतात. अशा प्रकारच्या व्यापारी संस्था जास्त बुद्धिमत्ता असलेल्यांचा कसा वापर करतात यावर प्रबंध लिहिणाऱ्या संशोधकांना आपापले प्रबंध फाडून टाकावे लागले. कारण ज्या क्षेत्रांचा अभ्यास करून या बुद्धीमान व्यक्ती आलेल्या असतात, त्या क्षेत्रांशी व त्यांच्या प्रत्यक्ष कामकाजाशी काहीही संबंध नसतो. कार्यात्मक मूर्खपणा (Functional Stupidity) म्हणून हेटाळणी करत त्यांच्याकडून कुठले तरी भलतेच काम करून घेतले जात असते. कॉर्पोरेटचा दबाव, धोका पत्करण्यास वाव नसणं व रुळलेल्या मार्गावरूनच जाण्याचं बंधन असल्यामुळे अनेक संशयास्पद व्यवहार होतात व त्यातूनच डोलारा कोसळू लागतो. सर्व संबधित अत्यंत चतुर (smart) असूनसुद्धा व्यवहारातील धोका स्पष्टपणे सांगण्यास कोणीही पुढे येत नाही. एखाद-दुसरी आली तरी काहीबाही सांगून तिला गप्प बसवलं जातं. ज्यांच्यापाशी सत्ता आहे त्यांची अरेरावी चालते. त्यामुळे शहाणेसुद्धा तार्किकतेला बाजूला सारून मूर्खपणाला साथ देतात. आर्थिक घोटाळ्याचे चटके सामान्य माणसाला बसत असल्यामुळे या मूर्खपणाला क्षमा नाही, असंच म्हणावं लागतं. मुळात कॉर्पोरेटमध्ये भरती करताना

त्यांचा RQ मोजण्याचं कुठलंही मापन नाही. चाचण्या कशा घ्याव्यात, याचा एकही निकष नाही. त्यामुळे तिथे मनमानी होते. निदान त्यासाठी तरी 'मूर्खपणाचा' अभ्यास करणे गरजेचे ठरेल.

हा अभ्यास आपल्यासारख्या सामान्य लोकांनासुद्धा काही मार्ग दाखवू शकेल. निदान धंदेवाईकपणे फसवणूक करणाऱ्याचे आपण बळी पडणार नाही हेही नसे थोडके!



# भगवान देता है तो छप्पर फाडके देता है...

अलीकडील वैचारिक पुस्तकं वाचत असताना वाचकांना एका प्रकारच्या नैराश्याने वेढल्यासारखे वाटू लागते. त्यातील घटना, घटनाक्रम, घटनेवरील मल्लीनाथी, विश्लेषण आपल्याला थक्क करून सोडत असले तरी मुळात माहितीचा आघातच फार मोठा असतो. याच मालिकेतील मीरा नंदा यांचे गॉड्स मार्केट (God's market) हे पुस्तक वाचत असताना आपला समाज कुठल्या दिशेने प्रवास करत आहे, याबद्दल रुखरुख वाटू लागते. पुस्तकाच्या उपशीर्षकात उल्लेख केल्याप्रमाणे How Globalisation is making India more Hindu हे मत आजही तितक्याच प्रकर्षाने जाणवत आहे. मीरा नंदा यांनी गेल्या 60 – 70 वर्षाच्या कालावधीतील सामाजिक स्थितीगतीचा विचार करत करत जागतिकीकरणामुळे कुणाचे भले झाले असेल तर ते हिंदू देव-देवतांचे, त्यांच्या मंदिरांचे आणि परमेश्वराच्या अधिकृत/ अनधिकृत प्रतिनिधींचे (दलालांचे) असे त्यांना वाटत आहे.

मीरा नंदा यांनी आपल्या या पुस्तकात उदारीकरणपूर्व व उदारीकरणानंतरच्या कालखंडाचे पाच भाग केलेले असून त्या त्या कालखंडातील राजकीय व धार्मिक घडामोडीकडे वाचकांचे लक्ष वेधण्याचे प्रयत्न ते करत आहेत. पहिल्या भागात 1947 सालच्या लोकशाही, कल्याणकारी राष्ट्राच्या वाटचालीकडील दुर्दम्य आशावादानी भारलेल्या समाजाचा थोडक्यात दिलेली माहिती आहे. शेकडो अयशस्वी प्रयत्नानंतर जागतिकीकरणाचे वारे सुटले. समाजाचे खासगीकरणाकडील ओढ वाढू लागली. उदारीकरण म्हणजे शिक्षणातून उद्योगावकाश हा नेहमीचा रूढ अर्थ न घेता परमेश्वराचे आणि बाबाबुवांचे बाजारीकरण या अर्थानेसुद्धा घेतले जाऊ लागले. या तथाकथित नवस्वातंत्र्याचा कालखंड म्हणजे शासनव्यवस्थेचा देशाच्या अर्थकारणावरील नियंत्रण कमी कमी करत करत वंचित, गरीब व

दलित यांना वाऱ्यावर सोडलेला कालखंड असे म्हणता येईल. त्यामुळे संपूर्ण समाज भांबावलेल्या अवस्थेतून जात होता. व ही अवस्था धर्माचे गोडवे गाणाऱ्यांसाठी सुवर्ण संधी होती. मतपेटीसाठी लोकानुनय करणारे राजकारणी हिंदुत्वाच्या प्रचार/प्रसार यात मोठ्या हिरिरीने सहभागी झाले. बाबा-बुवांच्या करिष्म्याने अगतिक जनसामान्य मोहित होऊन परमेश्वराला नको तितकी प्रसिद्धी देऊ लागले.

पुस्तकाच्या दुसऱ्या भागात मध्यम वर्गाच्या वाढत्या धार्मिकीकरणाचा शोध घेण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. कदाचित हे धार्मिकीकरण जाणून बुजून वा ठरवून केलेले नसेलही; परंतु पुरावे मात्र धार्मिकीकरणाची गडद छाया मध्यमवर्गावर पसरलेली होती, याची खात्री देतात. मध्यमवर्गीयांची क्रयशक्ती व संख्या ज्याप्रमाणात वाढत गेली त्याच प्रमाणात भारतीय समाजावर (हिंदू) धर्माची आपली पकड आणखी घट्ट होऊ लागली. मीरा नंदाच्या मते हे वाढते धार्मिकीकरण पूर्वीच्यापेक्षा जास्त प्रतिगामी, व प्रसंगी जीव घेणारी ठरत होती. जागतिकीकरणाच्या वाहत्या प्रवाहात अनेकांनी हात धुऊन घेतले; मिळालेल्या संधीचा फायदा घेतला; अनेक जण पुढे सरसावले; गर्दी केली. परंतु या गर्दीतूनही वाट काढत स्वतःचे अस्तित्व सिद्ध करणाऱ्यात परमेश्वराचे प्रतिनिधी आघाडीवर होते. परमेश्वर हे एक विक्रेय व प्रदर्शनीय वस्तु आहे याबद्दल त्यांच्या मनात शंका नव्हती. त्यातल्या त्यात हिंदूंचा परमेश्वर हा उच्चकोटीचा, तारणहार, सखा, प्रेमी असे सर्व काही होता. त्यामुळे (मध्यस्थामार्फत) संवाद करण्यास काही अडचण नाही याची सर्व भक्तांना खात्री होती. त्यासाठी फक्त खिसा रिकामा करण्याची तयारी हवी एवढीच माफक इच्छा या मध्यस्थांची असे. कदाचित बदलत्या सामाजिक – आर्थिक मानसिकतेची गरज पूर्ण करण्यासाठी परमेश्वराचा व (त्यांच्या मध्यस्थांचा) आधार वाटत असल्यामुळे कुठलीही किंमत देण्याचे गणित त्यामागे असावे.

भारतातील शहरी तरुण वर्गाला जागतिक अर्थव्यवस्थेच्या आकर्षणा-बरोबरच धार्मिक रूढी, परंपरा, भारताचा वेदकालीन इतिहास, धर्माचे उदात्तीकरण, धर्मश्रद्धा यांचेही आकर्षण का वाटावे हे न सुटलेले कोडे ठरेल. हिंदुत्वाचे हे आधुनिक रूप मंदिरांच्या गाभाऱ्यातून कार्पोरेट ऑफिसच्या बोर्डरूमपर्यंत पोचले. ऑफिसच्या वातावरणात उत्सव, धार्मिक समारंभ साजरा करण्यात काही गैर नाही असेच सर्व संबंधिताना वाटू लागले. या नवीन कार्पोरेट संस्कृतीला खत पाणी घालण्यात माता अमृतानंदमयी, स्वामी दयानंद, श्रीश्री रवी शंकर, बाबा रामदेव यांचा पुढाकार होता.

उत्क्रांतीत ज्या प्रकारे परस्पर पूरक बाबीतून उद्दिष्ट सफल होत असतो तसाच काहीसा प्रकार येथेही घडत असावा. जागतिकीकरणाला धर्मसंस्थांचा आधार व धर्मसंस्थांना कार्पोरेट्सचा टेकू असे हे स्वरूप असावे. परंतु जागतिकीकरणाची भलावण करत करत आपली जबाबदारी झटकणाऱ्या शासनाला धर्मसंस्थेच्या या नवीन स्वरूपाला शरण जावेसे वाटले असावे. त्यामुळे मीरा नंदा यांना धर्मसंस्था व कार्पोरेट्स बरोबरच स्टेटलासुद्धा या युतीत जोडण्यासाठी फार विचार करावेसे वाटले नसेल. शासन-मंदिर-कार्पोरेट्सची युती (State-Temple-Corporate Complex ) भारतीय समाजाला गिळंकृत करत आहे.

आधुनिक लोकशाही राष्ट्रं धर्मनिरपेक्षतेच्या (Secularism) कोनशिलेवर भक्कमपणे उभे आहेत. त्या राष्ट्रांच्या लिखित वा अलिखित घटनेमध्ये याचा उल्लेख आढळतो. शासन-प्रशासन व्यवस्थेत धर्माची, धर्मसंस्थाची, धार्मिक नेतृत्वाची लुडबुड खपवून घेणार नाही याची हमी येथे दिलेली असते. सार्वजनिक ठिकाणी वा शासनाच्या खर्चाने धर्माचे उदात्तीकरण होत असल्यास राष्ट्रातील न्यायपालिका जाब विचारू शकते. वाटेल तसे धर्मनिरपेक्षतेचा अर्थ काढता येत नाही. परंतु आपल्या देशात धर्मनिरपेक्षतेची

थट्टा होत आहे की काय अशी स्थिती आहे. गंमत म्हणजे धर्माच्या संबंधातील बहुसंख्य अल्पसंख्यांकाची तुष्टीकरण होत आहे म्हणून शासनावार दोषारोप करत असतात व अल्पसंख्य धर्माच्या बाबतीत बहुसंख्यांचा दबाव वाढत आहे असे तक्रार करत असतात. शासनाच्या या सेक्युलर धोरणामुळे हिंदू धार्मिकांना दुखवून अन्य धार्मिकांचे पारडे जड केले जात आहे, अशी बहुसंख्य हिंदू धार्मिकांची भावना आहे. परंतु लेखिकेच्या मते यात काही तथ्य नाही. कागदोपत्री शासन व्यवस्था अजूनही सेक्युलर आहे; परंतु निवडणुकीच्या वेळी बहुसंख्यांच्या एकगठ्ठा मतांसाठी आसुसलेले राजकीय नेते व त्यांचे लांगूलचालन करणारे अभिजन यांच्या वाढत्या दबावामुळे शासन हतबल होत आहे (की लोकानुनयासाठी उत्तेजन देत आहे?) आणि शासन व धर्म याची सुप्त (अभद्र) युती समाजात दिसत आहे. कट्टर हिंदूंनाही या युतीतुन वारेमाप फायदा होत असल्यामुळे तेच नेहमी हिंदूना सापत्निक वागणूक मिळते म्हणून गळा काढत असतात.

शासन-मंदिर-कार्पोरेट्सच्या युतीचे मूळ शोधत असताना लेखिकेने युतीच्या आर्थिक व्यवहाराकडे बारकाईने निरीक्षण केले. ही युती म्हणजेच एक उद्योग व्यवस्था असून हा उद्योग चांगलाच भरभराटीत आहे, याची ग्वाही कुणीही देऊ शकेल. पुस्तकाच्या एका प्रकरणात या युतीमुळे संस्कृतीवर – विशेष करून शिक्षण, धर्म, नीती, आरोग्य, कला, साहित्य इ.इ. वर – कशा प्रकारे अनिष्ट परिणाम होत आहेत याचा सविस्तर उल्लेख आहे. धार्मिक रूढी - परंपरांना शासनाचा राजकीय व आर्थिक पाठिंबा हा पुरोगाम्यांसाठी चिंतेचा विषय होत आहे. देशभरातील उदाहरणं देत मीरा नंदा, धर्माचा शिक्षण-प्रशिक्षण संस्था, कॉलेजेस, विद्यापीठ यांच्यावर कशाप्रकारे प्रभाव होत आहे, हे सांगण्याचा प्रयत्न करत आहेत.

गंमत म्हणजे राष्ट्रवाद व धर्मवाद यांचीसुद्धा सांगड घालण्याचा येथे प्रयत्न होत आहे. काही प्रमाणात इस्लाम वा ख्रिश्चन धर्मग्रंथ त्यांच्या अनुयायांना एकसंधपणे जीवन जगण्याची शिकवण देत असतात. तद्विरुद्ध हिंदू धर्म रूढी, परंपरा, उत्सव, पुराण कथा, पौराणिक प्रसंग वा स्थळ इत्यादीवर आधारित जीवनशैली असण्यावर भर देते. सुट्या सुट्या बारीक सारीक धाग्यांना पीळ देऊन घट्ट दोरा विणल्यासारखे विविध धार्मिक विधी व निष्ठा हिंदू यातून हिंदू मानसिकता विकसित होते व हेच धर्माची ओळख म्हणून जपली जाते. परंतु या प्रकारच्या कर्मकांडामुळे व कर्मकांडानाच धर्म म्हणून ओळखण्याच्या मानसिकतेमुळे हिदू धर्माची मूळ शिकवण विसरली जाते, हे हिंदुत्वाच्या पुरस्कर्त्यांच्या लक्षात येत नसावे. धार्मिक रूढी-परंपरा, उत्सव, यात्रास्थळे, इत्यादीत जखडून घेतलेले सामान्य हिंदू धार्मिक आणि युतीचे अंग असलेले शासन, मंदिरांचे व्यवस्थापक व यांच्या जिवावर जगणारे कार्पोरेट्स, एका प्रकारचा खेळ खेळत आहेत की काय असे वाटू लागते. रूढी, परंपरांच्या जंजाळात संपूर्ण समाजाला अडकून ठेवण्यात ही युती पूर्णपणे यशस्वी होत आहे.

एका प्रकरणात मीरा नंदा यानी भारतीयांच्या आपल्या संस्कृतीबद्दलच्या अवास्तव कल्पनेबद्दल ताशेरे ओढले आहेत. जगातला आमचाच धर्म पहिल्या क्रमांकावर आहे असे म्हणणाऱ्यात भारतीयांचाच प्रथम क्रमांक लागेल यात शंका नसावी. स्वातंत्र्योत्तर काळात या मानासिकतेत मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे. दर वर्षी कॉलेजेसमधून बाहेर पडणाऱ्या आय टी प्रशिक्षित इंजिनीयर्सच्या प्रचंड संख्येवरून व जागतिक बाजारपेठेतील त्यांची पत व त्यांच्यावर होत असलेल्या पैशाच्या वर्षावावरून हे गृहितक उत्तरोत्तर भारतीयांच्या गौरवाचा विषय होत आहे. संगणक तज्ज्ञ, महत्वाच्या पदावरील अनेक भारतीय वा विचारवंत या सर्वांना हिंदुत्वामुळेच एवढ्या मोठ्या

प्रमाणात भारतीय संगणक तज्ञ जगभर पसरलेले आहेत, असे खरोखरच वाटत आहे. परंतु मीरा नंदा मात्र काही ठळक उदाहरणं देत या मिथकाचा पर्दाफाश करत आहेत. आणि या संबंधातील वास्तव अगदीच वेगळे आहे असे सुचवतात.

शेवटच्या प्रकरणात मीरा नंदा यांनी विद्वेष सिद्धांत (Theory of hatred) हा शब्द प्रयोग करून हिंदुत्व ‘सेना’ फॅसिझमला खतपाणी घालत आहे, या निष्कर्षाप्रत ते पोचतात. ही ‘थेअरी ऑफ हेट्रेड’ आपण (आणि आपला हिंदू धर्म) अन्य धर्म वा धार्मिकाबाबत किती सहिष्णू आहोत हे फक्त हिंदू धर्मामुळेच शक्य झाले, यावर भर देत आहे. इतर धर्मीयाबद्दलचा हा द्वेष भारतीयांचा गुणविशेष ठरत आहे. वरचेवर उफाळून येणारा हा विद्वेष अल्पसंख्यांकांना कायमचेच भीतीच्या दडपणाखाली जगण्यास भाग पाडत आहे. हिंदू अभिजन वा विचारवंतांची निष्क्रियता या फॅसिस्ट वृत्तीला उपकारक ठरत आहे. काही तथाकथित हिंदू विचारवंतांच्या दबावामुळे माध्यमातूनही हाच आवाज प्रतिध्वनित होत आहे. मुस्लिम व इतर धर्मीय हे उपरे असून त्यांनी दुय्यम नागरिकत्व पत्करले पाहिजे हाच प्रयत्न येथे होत आहे. खरे पाहता हिंदू धर्म वा जीवनशैली म्हणून प्रभाव नसलेले सेक्युलरिझमच भारताला प्रगतीपथावर नेऊ शकेल असा आत्मविश्वास लेखिकेने व्यक्त केला आहे.

जागतिकीकरणाच्या या कालखंडात जगातील इतर देश, धर्म वा सेक्युलरिझमकडे ज्या दृष्टीने बघतात याचाही ऊहापोह लेखिकेने केला आहे. एक मात्र खरे की गेल्या वीस – तीस वर्षाच्या उदारीकरणाच्या झंझावातात धर्माचा प्रभाव अजिबात कमी न होता उलट वाढतच आहे. याचे प्रमुख कारण सांस्कृतिक संघ, संस्था व संघटनांकडून सेक्युलरिझमचा चुकीचा काढलेला अर्थ असावा. विशेषकरून भारतीयांचा सेक्युलरिझम हा इतर प्रगत लोकशाही

राष्ट्रांपेक्षा फारच वेगळा आहे, असे जाणवते. जागतिकीकरणाच्या वातावरणात धर्माचा वाढता प्रभाव आणि धर्मनिरपेक्षतेला तिलांजली असा काहीसा प्रकार येथे होत आहे. जागतिकीकरण व सेक्युलरिझम मधील दरी वाढत आहे.

पीटर बर्गर या समाजशास्त्रज्ञाचा संदर्भ देत लेखिकेला धर्म आणि राष्ट्र हे दोन्ही संस्कृतीच्या अधिष्ठानासाठी एकमेकासमोर स्पर्धक म्हणून उभे आहेत अशी आताची स्थिती आहे, असे वाटते. खरे पाहता विवेक, तर्क, मानवता, सहानुभूती, सहिष्णुता इत्यादींचा प्रभाव जनसामान्यांच्या दैनंदिन व्यवहारात असण्याची गरज आहे. त्यातूनच मानवतावादी संस्कृतीचे संवर्धन होऊ शकते. परंतु धर्मव्यवहारच आता जनसामान्यांच्या जीवनात वरचढ ठरत आहे. आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञान यांचा प्रभाव असलेल्या या बदलत्या परिस्थितीत धर्माचरण हे एक निरुपयोगी कर्मकांड असायला हवे होता. व एव्हाना कालबाह्य व्हायला हवे होते. परंतु धर्माचे पुरस्कर्ते शासनाच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदतीने जबरदस्तीने समाजावर धर्माचरण लादण्याचा प्रयत्न करत आहेत. मुळात या धर्माचरणात चमत्कार, अतींद्रियशक्ती, वा मिथकं इत्यादींचेच उदात्तीकरण केलेले असते. त्याला कुठलाही, तार्किक, वैज्ञानिक वा नैतिक आधार नाही. भौतिक सुखाच्या शोधासाठी अत्यंत अनुकूल ठरत असलेल्या जागतिकीकरणात यांचाही मागमूसही नसावा, अशी अपेक्षा असते.

धर्म व जागतिकीकरण यांच्यातील घनिष्ठ संबंधाप्रमाणे धर्म आणि अर्थकारण यांच्यातील संबंधाविषयीसुद्धा लेखिकेने विश्लेषण केले आहे. मुळात धर्माला चिकटून असलेल्या समाजात कमालीचे दारिद्र्य असते, असे तिचे मत आहे. आणि त्या समाजात श्रीमंत व गरीब यांच्यात फार मोठी दरी असते. ही विषमता गरीबांना धर्माचरणाकडे खेचते. जागतिक बाजारपेठेत मागणी तसा पुरवठा या तत्वाचा दबाव असल्यामुळे प्रत्येक धर्म बाजारपेठेतील वाट्यासाठी स्पर्धा करत असतात. भारतीय

बाजारपेठ त्या तुलनेने फारच मोठा असल्यामुळे हिंदू धर्माची चांगलीच चलती आहे. व परमेश्वर त्याच्या व्यापाऱ्यांना ‘छप्पर फाडके’ देत आहे.

कदाचित समाजाला सांस्कृतिकदृष्ट्या प्रगल्भ व्हावेसे वाटल्यास अंधश्रद्धांना खतपाणी घालणाऱ्या व शोषणाला उत्तेजन देणाऱ्या धर्माला उतरती कळा लागेल. त्यासाठी खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्षतेचे तंतोतंत पालन हवे व धर्माला चार भिंतीतच रहायला भाग पाडायला हवे.

मीरा नंदा यांचे हे पुस्तक मानवता, विज्ञान व धर्मनिरपेक्षता या सारख्या संकल्पनाबद्दल व त्यांचा व्यवहारात उपयोग करायला हवे यासाठी आस्था असणाऱ्या सर्वांसाठी आहे. कट्टर धार्मिकतेच्या या पोषक वातावरणात विवेकी विचारांना थारा देणे अत्यंत कठिण काम आहे असे वाटत असले तरी त्याला पर्याय नाही. मीरा नंदा यांचे हे पुस्तक (व त्यांची इतर पुस्तकं) वाचताना विकासाची दिशा विवेकवादी असलेच पाहिजे हे जाणवते. मीरा नंदा व रोमिला थापर याच गोष्टींचा पाठपुरावा करत असून या सत्याला सामोरे जाण्याचा आव्हान करत आहेत. लेखिका गॉड्स मार्केट या त्यांच्या पुस्तकातून आपल्याला धार्मिकतेचे प्रदूषण कशा प्रकारे वाढत आहे व त्यातून मुक्त होण्यासाठी आपल्याला नेमकी कुठली भूमिका घ्यायला हवी हे आवर्जून सांगत आहेत.

**गॉड्स मार्केट**

(हाउ ग्लोबलायजेशन इज मेकींग इंडिया मोर हिंदू)

*मीरा नंदा*

रँडम हौस इंडिया प्रकाशन

किंमतः395 रू पाः 239



# हिंदू संस्कृतीचे अभ्यासपूर्ण विश्लेषण

काही वर्षापूर्वी प्रसिद्ध साहित्यिक व्ही एस नायपॉल यांनी भारताच्या विदारक स्थितीला 'प्राणांतिक जखम झालेली संस्कृती' (wounded civilization) असा उल्लेख केला होता. परंतु Culture Can Kill या इंग्रजी पुस्तकाचे लेखक, एस सुबोध यांच्या मते या संस्कृतीवरील जखम कधीच बरी न होणारी आणि शेवटपर्यंत क्लेशदायक ठरणारी आहे. या मरणासन्न जखमी अवस्थेवर वेळीच तातडीचे उपाय न केल्यास मृत होण्याची शक्यता जास्त आहे. खरे तर ही स्मशानयात्रा किती खर्चिक असणार आहे, याचाच आता विचार करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. अशा प्रकारची विधानं अनेकांना दुखी करतील वा वाचताना रागही येईल. महासत्ता होण्याचे (2020 साली की 2025, की 2030...) स्वप्न पाहणाऱ्या या देशाबद्दल असे काही तरी बाष्कळ, थिल्लर वा तिखट उल्लेख करणाऱ्यांना काय शिक्षा होईल याची कल्पनासुद्धा करवत नाही. परंतु पुस्तकाच्या पहिल्या पानापसून शेवटच्या पानावरील टीकाटिप्पणीपर्यंत वाचत गेल्यास लेखकाच्या म्हणण्यात मतितार्थ आहे, असे वाटू लागेल.

या पुस्तकाचे लेखक, एस सुबोध येथे भारत वा भारतीय संस्कृतींना सूचित करणारे धर्म, श्रद्धा, परंपरा वा धर्मग्रंथ इत्यादीमधील घोडचुकांना दूषण देत नाहीत. त्यांचे लक्ष्य आपल्या समाजाला घडविणाऱ्या संस्कृतीबद्दल आहे. व हीच संस्कृती आपल्या सामाजिक व्यवहारांना नियंत्रित करत असल्यामुळे ती समजून घेणे गरजेचे आहे. कुमार केतकर यांनी प्रस्तावनेत उल्लेख केल्याप्रमाणे सुबोध हे मूलगामी बंडखोर विचारवंत आहेत. आपल्या देशाच्या गेल्या 40-50 वर्षापासूनच्या वाटचालीविषयी ते चिंतित आहेत. त्यांना आपल्या एकसंध देशातील धार्मिक विघटन अस्वस्थ करत आहे. हिंदू बुद्धिवंतामधील धार्मिक व सांस्कृतिक दुराग्रह, धर्मनिरपेक्षतेवर निष्ठा

असलेल्या या लेखकाला अपराध्यांच्या कठड्यात उभे करत आहे. त्यांच्या मते या बुद्धीवंतांची संकुचित दृष्टी व मनाचा कोतेपणा भारतीय गतवैभवाला विकृत स्वरूप देत आहे. डॉ. अनिल काणे यांनी या पुस्तकाविषयी लिहिताना केवळ 'आपण हिंदू' यांनाच फक्त या गोष्टी लागू होत नसून कुठल्याही धर्माच्या अनुयायांना तितक्याच प्रमाणात लागू होतात असे म्हटले आहे. धर्म कुठलाही असो, त्यात अंधश्रद्धांची विपुलता व मूर्तीपूजा अटळ असतात. मग ती मूर्ती, क्रूस, काबा, मझर, चर्च, मशीद, विहार वा सिनेगॉग यापैकी कुठलाही असला तरी त्याला अपवाद नाही.

हे पुस्तक मी का लिहिले? या लेखकाच्या विवेचनात लेखक मला यातून कुठलाही फायदा नाही वा मला कुठल्याही सिद्धांताचे, तत्वाचे समर्थन करायचे नाही असे स्पष्टीकरण देतात. फक्त शंभर कोटीच्यावर जनसंख्या असलेल्या या अवाढव्य समाजात एखादा आशेचा किरण दाखवण्यासाठी बौद्धिक श्रम घेणे वा धोका पत्करणे यात गैर नाही, असे त्यांना वाटते.

आपल्या समाजाला खाईत लोटणाऱ्या संस्कृतीच्या संबंधातील सर्व बाबीबद्दल अभ्यासपूर्वक टीका-टिप्पणी लेखकांनी केली आहे. संस्कृतीला आकार देणाऱ्या आपल्या रूढी, परंपरा, मानत असलेली जीवन मूल्ये, विचार करण्याची, वाद-विवाद करण्याची पद्धत, त्यातून व्यक्त होणारी मानसिकता इत्यादीबद्दल विचार करून ते काही निष्कर्ष मांडण्याचे प्रयत्न करत आहेत. यातील गुणदोषामुळे आपण या स्थितीला पोहोचलेलो आहोत असे त्यांचे स्पष्ट मत आहे. आपल्या संस्कृतीच्या अधोगतीला प्रामुख्याने आपल्या समाजात मूळ धरून बसलेला दैववाद, आत्मसंतुष्टता, सारासार विचार न करण्याची वृत्ती, अंधानुकरण, पारमार्थिक सुखाची ओढ, अध्यात्माविषयी नको तितकी उत्सुकता, श्रद्धा-अंधश्रद्धाचा सुळसुळाट, दारिद्र्यांचे समर्थन, वैचारिकतेविषयी तात्सार, उत्स्फूर्तता, अविवेकी वर्तणूक, तथाकथित

सन्यस्तवृत्ती इत्यादी बाबी कारणीभूत ठरत आहेत असे लेखकाला वाटते. लेखक केवळ ही लांबलचक यादी देत नसून या प्रत्येक गुणविशेषाबद्दल मूलभूत विचार करण्याचे आवाहन वाचकांना देत आहेत. केवळ मत न देता पुराव्यानिशी सिद्ध करण्याचे प्रयत्न ते करत आहेत. मत कितीही अनुकंपायुक्त असले तरी युक्तीवाद करण्यास ते तोकडे पडते, याची कल्पना त्यांना आहे.

एखाद्या निष्णात शल्यविशारदाप्रमाणे आपल्या समाजाला लागलेल्या या अधोगतीच्या रोगाचे निदान करण्यासाठी लेखक फार खोलात जावून व त्यातील प्रत्येक बारीक सारीक बाबींचा अभ्यास करत या रोगावर नेमके काय उपचार करायला हवे याची कल्पना ते देत आहेत. माध्यमातून होत असलेले उदात्तीकरण, तथाकथित हिंदू बुद्धीवंत करत असलेला बुद्धीभेद व शासनसंस्थाकडून होत असलेले लांगूलचालन इत्यादीमधून व्यक्त होत असलेली आपल्या संस्कृतीची प्रतिमा बाजूला ठेवल्यास आपल्यासमोर काय वाढून ठेवले आहे, याचे चित्रण लेखक येथे करत आहेत. खेड्याच्या बाहेर असलेल्या ओबड धोबड दगडाला शेंदूर फासून शीतलादेवी, संतोषी माता वा मरीआई म्हणून पूजल्या जात असलेल्या मानसिकतेचे उदात्तीकरण होताना लेखकाना कसेनुसे वाटते. गंमत म्हणजे या गोष्टींचे समर्थन करणारे नेहमीच आम्ही अंधश्रद्ध नाही असे छातीठोकपणे सांगत असतात याचे लेखकाला सखेदाश्चर्य वाटते. म्हणून ते चिडचिड व्यक्त करतात. भूतकाळातील स्मृतीरंजन, रूढी-परंपरांचे तंतोतंत पालन, यातच समाधान मानणाऱ्या या समाजातील सामान्यांचे (व शिक्षितांचेसुद्धा!) भवितव्य उज्वल नाही. शिक्षित वर्गाला या मृतप्राय घोड्याला चाबकाचे फटके देणे पसंत नाही. लेखकालासुद्धा फटके देवू नये असे वाटत असले तरी या मृत घोड्याच्या शवाचे विच्छेदन करून त्यातून काही शिकण्यासारखे आहे का याचाही विचार झाला पाहिजे असे वाटते. या विच्छेदनातून आपल्या रोग निदानात काय चूक

झाली, आपल्या देशाचे कशामुळे वाटोळे झाले, इत्यादींची नक्कीच कल्पना येईल. परकीय आक्रमणातून उद्भवलेली गुलामगिरीसदृश मानसिकता, अंधानुकरण, मेंढरासारखे वर्तन, कशावरही चटकन विश्वास ठेवण्याची उत्सुकता इत्यादींचे विश्लेषण करणे शक्य होईल.

21व्या शतकातसुद्धा आपला समाज अजूनही अपमानवी (subhuman) पातळीवरच आहे याचे लेखकाला वाईट वाटते. शहरी भागात राहणारा समाज आपण मागासलेले आहोत हेच मुळी कबूल करायला तयार नाही. ज्याला काही माहित नाही, त्याला माहिती करून घेण्याची इच्छाच नसल्यास आपल्या माहितीचा काडी इतकाही उपयोग होणार नाही. त्यांना कूपमंडूकवृत्तीतून बाहेर कसे काढणार? शहामृगासारखे वाळूत डोके खुपसून घेतलेल्यांच्या पुढे डोके फोडून घेऊनही उपयोग होणार नाही. कुठलेही पुरावे त्याना खोटेच वाटतील. सर्व आकडेवारीत चलाखी वाटत राहील.

एक मात्र खरे की या समस्यांना उत्तरं आहेत याची पूर्ण कल्पना त्यांना आहे. फक्त समस्या आहेत हे जाहीरपणे सांगण्यात कुचराई केली जाते. आपल्याला या समस्यांना सामोरे जाण्यासाठी धैर्य हवे आहे. परंतु त्याचीच कमतरता जाणवत आहे. आपण स्वतःला खाली पाडून पाहू शकत नाही. त्यामुळे स्वाभिमानाला धक्का बसू शकतो. म्हणून ही कूपमंडूकवृत्ती जोपासली जात आहे. विचारी माणूस भारताच्या समस्याबद्दल नक्कीच अवगत असेल. परंतु जाणून बुजून अलीकडील व पुरातनकाळातील मिथकांच्यातच रहायचे असे ठरवलेले असल्यास सत्य सांगणाऱ्यालाच मूर्खात काढत आहेत.

लेखक इतिहासातील दाखले देत पुराणमतवाद्यांच्या स्वप्नरंजनाचे भंग करत आहेत. गंमत म्हणजे काही अपवादात्मक गतवैभवांची उदाहरणं सोडल्यास अभिमान वाटावे असे तेथे काहीच नाही. आपला इतिहास म्हणजे आपल्या सरळपणाचा फायदा घेणाऱ्यांची कथा नाही. हजारो वर्षे आपल्याला

लाथा-बुक्क्यानी बुकलून, मारझोड करून आपले सर्व हिसकावून घेत, प्रसंगी जिवे मारणाऱ्यांची शौर्यकथा आहे. किती वेळा दिल्लीवर आक्रमण झाले? किती देवळांची लूटमार झाली? किती संपत्ती देशाबाहेर गेली? याची मोजदादच नाही. आपण युद्ध हरलो, आपला प्रदेश बळकावला गेला, आपल्याला गुलामासारखे वागवले, आपल्या आत्माभिमानाला धक्का दिला, या सगळ्या नामोहरम करणाऱ्या गोष्टींचे दाखले समोर असताना कुठल्या तोंडाने आपल्या गतवैभवाचे गुणगान करायचे, हा प्रश्न लेखकासमोर आहे. हे हार-जीत मनाचे खेळ आहेत, असे समजून आपण आपले समाधान करून घेत असतो. आपले तथाकथित विचारवंत आणि त्यांच्या विधानांचे उदात्तीकरण करणारे मतलबी राजकीय नेते इतिहास, मिथके व पुराण यात फरकच करत नाहीत. त्यांची सरमिसळ करण्यातच ते धन्य मानतात. भूतकाळ आपल्या भविष्याला अंधुक बनवतो, वर्तमानाला वाकुले दाखवतो आणि भविष्याविषयी गोँधळ निर्माण करतो. त्यामुळे आपण आपल्या समोरील समस्यांचे नीटपणे आकलनच करू शकत नाही.

कुठल्याही कंपनीच्या समभागांची विक्री-खरेदी करत असताना बारीक अक्षरात मागील ताळेबंद भविष्यात तसेच असेल याची खात्री देता येत नाही असा धोक्याचा इशारा दिलेला असतो. तशाच प्रकारे इतिहासातील पराक्रमाचे दाखले भविष्यातील उज्वलतेची खात्री देत नाहीत, याची आठवण लेखक करून देत आहेत. परंतु आपण भारतीय, एकमेकावर दोषारोप करण्यात प्रख्यात आहोत. आम्हाला उत्तर माहित आहे, परंतु आमचे हात टेकले आहेत, आम्ही काही करू शकत नाही, हाच पवित्रा नेहमीच आपला असतो. समस्यांना सामोरे जाण्यापेक्षा, उणीवावर मात करण्यापेक्षा, जबाबदारी उचलण्यापेक्षा आपण हात बांधून बघत बसतो. इतर सगळ्यावर आरोप-प्रत्यारोप करत सुटतो. आणि त्यातही आपण नामानिराळे राहण्याचा प्रयत्न

करत असतो. हे असेच होणार होते, आपला उपाय नव्हता, लढाईची तयारी पूर्ण झाली नव्हती, हे कलियुग आहे म्हणून असे घडले.... असे काही तरी सांगत वेळ मारून नेण्यात आपण हुशार आहोत. राजकारण, सत्ताकारण, दुबळे नेतृत्व, भ्रष्टाचार, अशिक्षितपणा, प्रचंड लोकसंख्या इत्यादींच्यावर दोष ढकलून मोकळे. अशा प्रकारच्या लंगड्या सबबीबद्दल लेखक चांगलाच समाचार घेत आहेत. सामान्यांची दिशाभूल कशाप्रकारे केली जाते याचे सविस्तरपणे उल्लेख करतात. हा दोषारोपाचा खेळ पुरातन काळापासून चाललेला असून यात बहुतेक सगळे सामील झालेले होताना दिसतात. आपल्या समाजाच्या आजारपणाची लक्षणं शोधण्याचा प्रयत्न लेखकानी येथे केला आहे.

आजारपणाची कारणं शोधत असताना आपण कुठे व केव्हा चुकलो याचा आढावा लेखक घेत आहेत. लेखकाच्या मते आपली संस्कृती प्रामुख्याने धर्माशी निगडित असून धार्मिक अनुभवापासून त्याला वेगळे करता येत नाही. त्यामुळे आपल्या सर्व समस्या धर्म, अध्यात्म आणि या दोन्ही गोष्टीतील आपली भावनात्मक गुंतवणूक यांच्यातून निर्माण झालेले आहेत. आपण नेहमीच मिथकं व चमत्कारसदृश गोष्टीवर चटकन विश्वास ठेवत असतो. कार्यकारणभाव तपासण्याइतके कष्टही आपण कधी घेत नाही.

आपल्या समाजाचे इतर काही प्रगत समाजाशी तुलना केल्यास त्या समाजाने धर्म, रूढी, परंपरा इत्यादींना केव्हाच टाकून पुढे गेले आहेत हे लक्षात येईल. त्या समाजापासून आपण कधीच काहीही शिकलो नाही. युरोपमधील प्रबोधन काळात साहित्यिक, विचारवंत, वैज्ञानिक, तत्वज्ञ भर घालत असताना आपला समाज मात्र कवी, संत-महंत इत्यादींच्या कच्छपि लागलेला होता. मूलभूत विचार वा संशोधन करणाऱ्यांची वानवा होती. धार्मिक परंपरांना आव्हान देणाऱ्यांचा अगदीच क्षीण आवाज होता. धर्म, अध्यात्म यांना विरोध

करणारे, त्यांच्यावर टीकेची झोड उठविणारे अगदी मूठभर व देशभर विखुरलेले होते. धर्म नेहमीच आधुनिकतेच्या विरोधात बदल टाळणारा असतो व परंपरांना चिकटलेला असतो. पाचशे वर्षापूर्वीच आपण तंत्रज्ञान, सर्जनशीलता, उत्पादकता, नाविन्यता इत्यादीवर फुली मारूनच पुढे आलो आहोत. आपण केवळ ऐहिक सुखांनाच त्याज्य समजत होतो असे नसून विकास संस्कृती, नवीन कल्पना, मानवी विकास यांनासुद्धा पूर्णपणे विसरलेलो आहोत. धूम्रपान व कर्क रोग यांच्यातील घनिष्ठ संबंध शोधणाऱ्या संशोधकाप्रमाणे लेखक आपल्या अधोगतीची मूळ कारणं शोधत आहेत. त्यासाठी अमेरिकन समाजाशी आपल्या समाजाची तुलना करत आहेत. अमेरिकन समाजात नाविन्यता हे केवळ छंद वा आवड वा ध्यास नसून ती एक जीवन पद्धती आहे. आपल्या अस्तित्वासाठी, मिळालेल्या नौकरीत वा पत्करलेल्या व्यवसायातील भरभरभराटीसाठी किंवा उद्योग व्यवस्था टिकविण्यासाठी नाविन्यतेला पर्याय नाही अशीच मनोधारणा आहे. या तुलनेत भारतीय समाजातील उणीवा अधोरेखित होत आहेत. खाजगीत बोलताना अमेरिकन माणूस म्हणजे फक्त ऐहिक गोष्टींच्या मागे धावणारी, प्रत्येक ठिकाणी स्वतःचा स्वार्थ बघणारी, नीती मूल्यांची चाड नसलेली आणि भारतीय म्हणजे कुटुंब प्रेमी, मानवी मूल्यांची कदर करणारी, निस्वार्थी, परोपकारी, संवेदनशील अशी विधानं करत असतात. परंतु लेखकाला असे काही असेल असे वाटत नाही. अमेरिकन समाजाकडूनही भरपूर काही शिकण्यासारखे आहे. त्या समाजातील गतीशीलता चटकन डोळ्यात भरते. त्या तुलनेने आपला समाज सुस्त, निद्रिस्त असलेला वाटतो. भरीस भर म्हणून स्त्रियांबद्दल दुस्वास, शिक्षणाबद्दल अनास्था व जातीभेदाला प्राधान्य ही कारणंसुद्धा आहेत.

हे निष्कर्ष ढोबळ स्वरूपाचे नसून त्यांच्या मागील तर्कशुद्धता व पुरावे यांची मांडणी लेखकानी केली आहे. काही मूठभर उच्चवर्णीयानी इतर

बहुजनांना जातीभेदांचे स्तोम माजवून वेठीस धरल्यामुळे समाजातील विषमता दूर होणे अशक्यप्राय ठरत आहे. त्यामुळे राज्यव्यवस्था बिघडत आहे. समाजाची अधोगतीकडे वाटचाल होत आहे. आपल्यातील हतबलतेची कारणं शोधताना आपल्यातील ऐक्याचा अभाव, नैसर्गिक स्रोतांची कमतरता, श्रद्धा-अंधश्रद्धायुक्त जीवनशैली आणि पारमार्थिकतेकडे झुकणारी मानसिकता इत्यादी असून या गोष्टी आपल्याला विकासाच्या शेवटच्या पायरीवर ठेवत आहेत.

गेल्या 500 वर्षातील आपण लढलेल्या प्रत्येक छोट्या मोठ्या युद्धातील पराजयाची कारणं शोधताना लेखक आपल्याकडे Killer Instinct हा गुणविशेष नव्हता याची आठवण करून देत आहेत. दैववाद, अनाठायी विश्वास, अलिप्तता, आध्यात्मिक स्वैर कल्पना इत्यादीमुळे आपण पराजित होत होतो असे लेखकाला वाटते. युद्धात जिंकण्याचे लक्ष्य असण्याऐवजी आपले लक्ष्य पारमार्थिक मोक्ष असल्यामुळे शत्रूंनाच आपल्याला मारून टाकण्याची याचना करत होतो. आपले पारमार्थिकतेविषयीचे प्रेम आणि परमेश्वराच्या कर्तृमकर्तुत्वावरील असीम श्रद्धा आपल्या दुस्थितीला कारणीभूत आहेत, या लेखकाच्या निष्कर्षांना आपल्याला सहमती दाखवावे लागेल.

आपली प्रत्येक कृती, आपल्या रूढी-परंपराविषयीचे प्रेम, आपली मानसिकता, आपला जगाकडे बघण्याचा दृष्टिकोन इत्यादीतून आपल्याला आपल्या संस्कृतीची कल्पना येवू शकते. परंतु यातील प्रत्येक गोष्टीवर आपल्यातील आध्यात्मिकतेची गडद छाया पसरलेली असते. कुठल्याही माहितीविषयी प्रश्न विचारण्याऐवजी वा चिकित्सा करण्याऐवजी ती माहिती आध्यात्मिकतेत कसे बसवता येईल वा त्याला धार्मिकतेचा मुलामा कसे चढवता येईल यासाठी धडपड करत असतो. त्यासाठी नवीन व्याख्या शोधत असतो. गंमत म्हणजे श्रद्धेला बळकटी देणारी माहिती असल्यास श्रद्धा बळकट

होत जाते. व त्यांच्या विरोधात असली तरी ती जास्त बळकटच होते. धार्मिक श्रद्धा या नेहमीच आपल्यातील मानसिकतेवरून ठरवल्या जात असतात. त्यात कार्यकारणभाव वा काही विवेकी विचार कधीच नसतो. तरीसुद्धा कट्टर धार्मिक मूर्तीपूजा, जिहाद, गुलामगिरी, चित्रहिंसा, क्रौर्य, मिथकं इत्यादी सर्व रूढी परंपरावर तर्कशुद्धतेचा मुलामा चढवत असतात. त्यांच्या या प्रयत्नामुळे धर्म व ईश्वर आपल्या सर्व नैतिक मूल्यांचे, जीवन व्यवहारांचे नियंत्रण करू लागतात.

मुळात नैतिकता, नीतीमूल्ये व धर्म याबद्दल गोँधळाची स्थिती आहे. लेखकांच्या मते माणसाला जास्त कळत नव्हते तेव्हा विज्ञान, तर्क, नीती, साहित्य, कला इत्यादी सर्व प्रकारांना धर्माशी जोडले गेले. मानवी आयुष्याला आकार देणाऱ्या सर्वांतर्यामी परमेश्वराची चिकित्सा करणे त्याच्या अस्तित्वाबद्दल संशय घेणे, निषिद्ध मानले जात होते. जे काही आहे ते परमेश्वराचेच व परमेश्वरामुळेच. त्यामुळे कुठेही संशयाला जागा नव्हती. प्रत्येकाच्या मनामनात तो असतो व तोच प्रेरणा देत असतो याबद्दल कुणाचेही दुमत नव्हते. तो अस्तित्वात नाही, याचा पुरावाच कुणाकडेही नव्हता. त्यामुळे नैतिक मूल्ये ठरवणारासुद्धा परमेश्वरच होता. प्राचीन काळातील समाज व्यवस्थेने प्रेम, करुणा, अहिंसा, सहानुभूती, कुटुंब व्यवस्था, बंधुभाव इत्यादीसाठीसुद्धा परमेश्वर या संकल्पनेचा वापर केला होता. आपल्या अस्तित्वासाठी व आपल्या कल्याणासाठी नैतिक मूल्यांची गरज होती व त्यासाठी परमेश्वर ही संकल्पना राबवली गेली. आणि हेच आपल्या आजारपणाचे मूळ कारण आहे, असे लेखकाला वाटते. नैतिक मूल्यांसाठी धर्म वा परमेश्वराची गरज नाही, हे नंतर हळू हळू कळू लागले.

आजारपणाच्या या सर्व लक्षणावरून लेखकानी यांच्या निदानाची यादीच केली आहे. त्याच्या मते

- स्त्रियांच्या अंगभूत क्षमतेकडे दुर्लक्ष

- जाती व्यवस्था व वर्णीय अहंकार
- शिक्षणाविषयी हेळसांड
- बालकांच्या योग्य पालन पोषणात संस्कृतीचा वाढता दबाव
- पारमार्थिकता व श्रद्धा यांच्या अतिरेकामुळे सर्जनशीलता, नाविन्यता व विवेकी विचारांची पीछेहाट
- चमत्कारसदृश पुराणकथावरील विश्वास
- पावित्र्य व श्रेष्ठत्वाच्या अहंकारातून इतर जगाशी संपर्काचा अभाव इत्यादी गोष्टी कारणीभूत ठरत आहेत.
- याचबरोबर आणखी काही गोष्टी आपल्या मागासलेपणाला जबाबदार आहेतः
- संपत्ती वाईट असते यावर विश्वास
- दारिद्र्याचे उदात्तीकरण
- दैहिक श्रमाला तुच्छ लेखणे
- पाप पुण्यांच्या अतिरेकी कल्पना
- कर्मफळावर विश्वास
- गुरुविण मुक्ती नाही यासाठी बुवा-बाबावर श्रद्धा

इत्यादी गोष्टींचा समावेश लेखक करत आहेत.
बुवा-बाबावरील श्रद्धा आपल्यातील स्वतंत्र विचारांना, सर्जनशीलतेला व ऐहिक सुखाचा उपभोग घेण्याला मारक ठरतात. पुनर्जन्म व कर्म फलावरील विश्वास दैववादाकडे नेणारा ठरतो. त्यामुळे मानवी प्रयत्नांना खीळ बसते.

जेव्हा ज्ञानसाधनांची – अक्षर ओळख, लेखन-वाचन, मुद्रण साधनं, शाळा, संगणक – इंटरनेट, इ.इ. – कमतरता होती तेव्हा शब्द प्रामाण्य व व्यक्ति प्रमाण्यावर विश्वास असणे स्वाभाविक व नैसर्गिक होते. त्यामुळे त्याकाळी ऋषी-मुनी व मौखिक ज्ञानावरच भिस्त होती. समाजात ज्ञानसाधनं नसल्यामुळे ज्ञानाची परंपरा नव्हती. नम्रपणाने ऐकून घेणे व समजून घेणे यावरच भर दिला जात होता. अक्षर ओळखीनंतर वाळू व दगड, नंतर पाटी व पानं यांचा वापर करण्यात आला. मग कागदाचा शोध लागला. या शोधानंतर वाचन व वाचलेल्या गोष्टी आहे तसे म्हणून दाखवणे वा आठवणीत ठेवणे व तेच पुन्ह पुन्हा सांगणे यालाच बुद्धीमत्ता, शहाणपण असे मान्य करण्यात आले. त्यात ना चिकित्सा, ना खोलात जाऊन विचार. त्या काळात आपण फक्त देवळे बांधत सुटलो, देवाची आरास करत सुटलो व धर्मव्यवहारांना अग्रक्रम देत गेलो. आजसुद्धा शाळांच्या पेक्षा मंदिरांची संख्या जास्त असावी. मंदिरांना पैशाची चणचण कधीच भासत नाही. शाळा, दवाखाना व रस्ते बांधणी यांना मात्र पैशाचा तुटवडा असतो. आपली बुद्धी व शहाणपण अशा अनुत्पादक कामासाठी खर्ची घातले जातात. त्यातून हा समाज ऐहिकदृष्ट्या कधीच सक्षम झाला नाही. गरीबी पाचवीला पुजत होती. गरीबी आपल्या तारुण्याला मारक ठरत होती. व अध्यात्म आपल्या वृद्धत्वाला जीवघेणी ठरत होती. अध्यात्माचा खुला बाजार, त्याचे पंचतारांकित व्यवस्थापन, आश्रमातील प्रवचन, सत्संगसारखे कार्यक्रम, दैववादाला पूरक ठरत होते. चाणाक्ष बुवा-बाबा यांच्यावर कब्जा करून समाजाला पंगू करत आहेत. यातून श्रमाला नगण्य ठरवण्याची वृत्ती बळावत आहे. चुकांना संरक्षण मिळत आहे. नवीन काहीही स्वीकार न करण्याची मनोवृत्ती वाढत आहे. नवीन विचारांना विरोध करण्याकडे आपला कल वाढत आहे. आपले सर्व सामाजिक व्यवहार आपले कुटुंब, नातलग, जवळचे मित्र या मर्यादेतच होत आहेत. बाहेरच्यांना येथे प्रवेश

नाही. आपली दृष्टी एखाद्या बोगद्यातून गेल्यासारखी आहे. पुढचे काही दिसत नाही आणि मागे वळता येत नाही. या सर्व गोष्टीवरून लेखकाला धर्माचे जोखड फेकून दिल्याशिवाय गत्यंतर नाही असे तीव्रतेने वाटत आहे. कुठल्याही धार्मिक हिंदूशी औपचारिकपणे दोन चार शब्द बोलण्याचा तुम्ही प्रयत्न केल्यास तो एखाद्या तत्वज्ञाप्रमाणे परंपरा, संस्कृती व धर्म याबद्दल तासन तास बोलू लागतो. त्यामुळे त्याचा हा धर्माभिमान अज्ञान, द्विधा मनस्थिती व वास्तव यांच्याकडे पाठ फिरवण्यास भाग पाडत आहे.

या धार्मिक समाजाद्दल काही विधान करत असताना धर्म म्हणजे नेमके काय – पंथ की प्रभावी व्यक्तिमत्वावरील श्रद्धा वा cult . या सगळ्या प्रकारांची गोळाबेरीज प्रचलित हिदू धर्मात असल्यामुळे नेमके काय घडत आहे हे कळेनासे झाले आहे. कर्मसिद्धांत हा हिदू धर्माचा गाभा आहे. व हाच गाभा आपल्या अधोगतीला कारणीभूत ठरत आहे. त्यामुळे हा समाज परमेश्वर, आत्मा, पुनर्जन्म इत्यादी संकल्पना निरर्थक असूनही त्यांना कवटाळून बसलेला आहे. धार्मिक भ्रम हे छिन्नमनस्कतेचे (schizophrenic) लक्षण आहे. तो एक आजार आहे. त्यात साक्षात्कार वगैरे काही नाही आणि मनोविकार व साक्षात्कार यात फरक करता येत नाही.

आपल्या धार्मिक ग्रंथाविषयी टीका करताना लेखकानी कवितेच्या स्वरूपात असलेले हे ग्रंथ कवी कल्पनेतून सुचलेले आहेत व आपण मात्र त्यांनाच आध्यात्मिक सत्य म्हणून कवटाळून आहोत, असा उल्लेख केला आहे. धर्म या शब्दार्थाच्या अनेक छटा आहेत. त्यामुळे प्रत्येक जण स्वतःला अपेक्षित असलेला अर्थ काढून वापरत असतो. श्रद्धा व रूढी यावरून हिंदू धर्म आकार घेत असतो. भगवद्गीतेसारख्या धर्मग्रंथात तर परस्पर विरोधी, चुकाच्या व संदिग्ध अशी अनेक विधानं आहेत.

याचबरोबर हा समाज कायमचाच बुद्धीमत्तेचा तिटकारा करत आलेला आहे. कारण धर्माचे वर्चस्व असलेल्या समाजाला बुद्धीमत्ता, विचार, चिकित्सा, विवेक अडथळे आहेत अशी भीती वाटत असते. त्यांच्या विरोधातील चिकित्सा वा विश्लेषण म्हणजे फार मोठे पाप केल्यासारखे त्यांना वाटते. करुणा व सहानुभूती दाखवणारे मख्ख असले तरी त्यांना चालतात. धार्मिकांचा दांभिकपणा शिगेला पोचलेला असतो. काही वेळा आमचा चमत्कारावर विश्वास नाही असे म्हणायचे व त्याच वेळी फलजोतिष. छद्म विज्ञान, जडीबूटी इत्यादींची भलावण करायची हा दुटप्पीपणा नेहमीच आढळतो. कित्येक वेळा हिंदू धर्म ग्रंथातील आधुनिक वैज्ञानिक शब्द आल्यावर त्यांचे मन उचंबळून जाते. खरे पाहत आधुनिक विज्ञानाला अभिप्रेत असलेला अर्थ व धर्मग्रंथातील शब्दांचा अर्थ यात दूरान्वयानेसुद्धा काही संबंध नसतो. तरी सुद्धा आपल्या पूर्वजाना प्रगत विज्ञान माहित होते असा डांगोरा पिटला जात असतो. हिंदू धर्मातील चाणाक्ष बुवा बाबा अमेरिकेत जाऊन तासन तास अशा विषयावर प्रवचन देत असतात. अन् ऐकणारेही थक्क होतात.

या समाजातील समाजसुधारक, प्रगत विचार करणारे विचारवंत व शिक्षणतज्ञ इत्यादींच्या अथक प्रयत्नामुळे हा समाज आधुनिकतेकडे वाटचाल करत आहे हे मान्य असले तरी ही वाटचाल मुंगीच्या पावलानी होत आहे, असे लेखकाला वाटते. बदल फारच कमी व तेवढे होण्यासाठी दीर्घ काळ. काही वेळा हा बदल स्थानिक पातळीवर, तोही वरवरचा आणि अगदीच बळे बळे केलेला. आपल्या शरीरावरील कपडे अत्याधुनिक फॅशनचे वाटत असले तरी मनामनामध्ये हिंदू संस्कृतीच कोरलेली दिसेल. आधुनिकतेकडे घोडदौड हवी आहे. आपली मानसिकता, आपल्या निष्ठा आणि आपली जीवनमूल्ये आधुनिकतेशी सुसंगत हवीत.

एक मात्र खरे की आपण स्वतः विवेकवादी असल्याशिवाय केवळ आधुनिकता आपल्याला विवेकवादी बनवू शकत नाही. इतर समाजांशी तुलना केल्यास आपण शिक्षित व ते बुद्धीवंत; आपण अनुकरणशील व ते सर्जनशील, आपण पारमार्थिक व ते ऐहिक असे आढळते. धर्मांच्या श्रृंखल्यातून बाहेर पडल्याशिवाय आपली प्रगती होणार नाही हे मात्र निश्चित. सार्वजनिक जीवनात धर्माचा मागमूसही नको. पवित्र मंदिर-स्थळ-वेळ-समाधी, यात्रा-जत्रा-उत्सव-मेळा, धर्म ग्रंथ-पुराण-वेद, गंगाजल, गोमूत्र, (गोरक्षा..) इत्यादीपासून मुक्त होण्याची गरज आहे. पुराण कथांचे उदात्तीकरण पूर्णपणे थांबायला हवे. धर्मग्रंथावरील चर्चेला पूर्णविराम द्यायला हवे. स्मृतींरंजनातून बाहेर पडायला हवे. फुग्यासारखे फुगवून ठेवलेल्या आपल्या आशा-आकांक्षांना जमीनीवर आणायला हवे. धर्माचे आधिपत्य झुगारून विवेकाची कास धरायला हवी. आपण आता परदेशी आक्रमणांना, आपल्या जनुकांना व आपल्या मागील पिढ्यांच्या चुकांना दोष देणे थांबायला हवे. आपल्या स्थितीला आपणच जबाबदार आहोत ही जाणीव जोपासायला हवी.

आपण या परंपरांच्या जोखडातून बाहेर पडणार आहोत की नाही हा प्रश्न आपल्यासमोर असून लेखकाचे हे अरण्यरुदन ठरी नये अशी अपेक्षा ते व्यक्त करत आहेत. मी एकटा काय करू शकतो या विधानाला काही अर्थ नाही. कारण परिवर्तन, प्रबोधन वा क्रांती इत्यादींचा इतिहास आठवल्यास ते एखाद्या व्यक्तीच्या प्रेरणेतून सुरुवात झाल्या हे लक्षात येईल. ही ठिणगी तुम्हा-आमच्यामुळेसुद्धा पडू शकेल व वणवा पेटू शकेल. काही जणांनी तरी या दिशेने विचार करू लागल्यास हे पुस्तक लिहिल्याचे सार्थक होईल असे लेखकांना वाटते. फ्रांझ काफ्का या लेखकाने म्हटल्याप्रमाणे आपल्या मनातील गोठलेल्या समुद्राला पहिला घाव टाकणाऱ्या कुऱ्हाडीसारखे पुस्तक असतात. सुबोध यांचे हे पुस्तक या कुऱ्हाडीसारखे आहे असे पुस्तक वाचून

संपवत असताना आपण नक्कीच म्हणू शकतो. लेखक येथे कुठल्याही सिद्धांताचा पाठपुरावा करत नाहीत वा नवीन सिद्धाताची मांडणी करत नाहीत. आपल्या परिस्थितीची पूर्ण कल्पना देत आपण काय होतो व आपल्याला काय व्हायला हवे याची कल्पना देत असल्यामुळे पुस्तकाचा आशय चिंतनीय झाला आहे.

**कल्चर कॅन किल,**

एस सुबोध

लोक वाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई

मूल्यः 100 रु, पृ.सः 236



# मेरे जीवन साथी..

(या लेखात जोडीदार हा शब्दप्रयोग पती वा पत्नी यांना उद्देशून केलेला आहे.)

*लग्नाच्या विषयाकडे आजचे तरुण वेगळ्या नजरेनं बघतायत. काय गरज आहे लग्नाची? सगळ्यांनी लग्न करायलाच हवं का? लग्न करणं हीच आयुष्याची इतिकर्तव्यता आहे का? आणि स्वत:च्या आनंदासाठी, सुखासाठी म्हणून जर लग्न करायचं असेल तर त्यासाठी नवरा कशाला हवा? मी भरपूर कमावते, मला हवं ते करायला कुणाची बंदी नाही. हा.. कदाचित म्हातारपणी मला एकटं वाटेल. पण तेव्हाचं तेव्हा पाहू. मनात येईल ते करण्याचं स्वातंत्र्य गमावून कुणाचं तरी घर सांभाळण्याचं काम करण्यात काय अर्थ आहे, असे अनेक प्रश्न त्यांना पडतात. आजकाल तर लग्न करण्यापूर्वीच प्री-नप्शिअल ॲग्रीमेंट करतात. उगाच पटलं बिटलं नाही तर नंतर काही भानगड नको.*

*शामिकाला ( वा कुठल्याही करीअरिस्ट तरुणीला) जी भीती वाटतेय त्यात कितपत तथ्य आहे? आणि ही भीती फक्त करिअरविषयीच आहे का? यातला कुठलाही नियम सर्वसाधारणपणे सगळ्यांनाच लागू करता येतो का? कमिटमेंट, स्वातंत्र्य, मुलं, जास्तीच्या जबाबदाऱ्या अशा अनेक गोष्टींचं तिला टेन्शन आहे, ते का? पूर्वी नव्हत्या का या गोष्टी? आजच्या जमान्याच्या टोकाच्या स्वकेंद्रित जगण्याचं हे प्रतिबिंब आहे का? की लग्न ही संस्थाच आता आउटडेटेड व्हायला लागलीय? मग कुटुंबसंस्थेचं भविष्य काय? आणि कुटुंबाच्या युनिटवर अवलंबून असलेल्या सोसायटीचं काय? या बदलत्या विचारप्रवाहात ती टिकून राहणार का? तुम्हाला काय वाटतं?*

डॉ. वैशाली देशमुख यांच्या ‘ताण’लेल्या गोष्टी : लग्न करायलाच हवं का?’ (व्हिव्हा, लोकसत्ता, 9 मे 2017) या लेखातील हे शेवटचे परिच्छेद

आहेत. परिच्छेदातील प्रश्न केवळ तरुणींच्यासाठी नसून तितक्याच तीव्रतेने तरुणानासुद्धा लागू होत आहे, म्हणून हा लेखन प्रपंच

*अर्थपूर्ण आयुष्यासाठी जोडीदाराची खरोखरच गरज आहे का?* कदाचित हा प्रश्न अनेकांना विसंगत वाटेल, काहींना हा काय प्रश्न म्हणून पुढील मजकूर न वाचताच पान बदलावेसे वाटेल. परंतु प्रत्येक गोष्टीची चिकित्सा कराविशी वाटणाऱ्या या काळात विवाहोत्सुक जोडीदारासाठी आकाश पाताळ का केले जाते याबद्दलही विचार करण्याची वेळ आली आहे. मिसरूड फुटायच्या आत तरुणांना तरुणींचे तर छाती थोडीशी जरी पुढे आलेल्या तरुणींना तरुणांचे आकर्षण वाटणे स्वाभाविक असले तरी या शारीरिक आकर्षणाच्या (व भावनेच्या) आहारी कितपत जावे हे प्रत्येकाच्या चित्त प्रकृतीवर अवलंबून असते. स्वार्थी जनुक आपले सातत्य टिकवण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करत असतात. संततीवाढ हे त्यांचे लक्ष्य असते. जैविक उत्क्रांतीचा पायाच मुळात संततीच्या वाढीत आहे. संततीची वाढ लैंगिक व्यवहारात आहे. परंतु त्यासाठी अनिर्बंध स्वातंत्र्य दिल्यास समाज व्यवस्था बिघडून जाण्याची शक्यता आहे. शक्ती, शिरजोरी, सत्ता व संपत्तीच्या जोरावर (*जिसके हाथ में लाठी उसकी म्हैस* या न्यायाने) काही जण इतरांवर बळजबरी करून इतरांना लैंगिकसुखापासून वंचित ठेवण्यामुळे समाजात अनागोंदी माजण्याची शक्यता असते. सामाजिक शिस्त म्हणून प्रत्येक समाज अगदी अनादी काळापासून नागरिकांच्या लैंगिक विषयाबद्दल काही बंधन घालत आलेला आहे. समाजांतर्गत कुटुंब ही संस्था, जोडीदाराबरोबर बिनधास्त लैंगिक व्यवहाराला मान्यता म्हणून विवाह विधी व अपत्यांच्या पालन पोषणाची जबाबदारी रूढ झाल्या असावेत. (विवाह विधीचा ज्यांना तिटकारा वाटतो त्यांच्यासाठी म्हणून लिव्ह इन् रिलेशनशिपलाही हळू हळू समाजमान्यता मिळत आहे.)

आपण रहात असलेला समाज कितीही लवचिक असला तरी विवाहबाह्य संबंध व अपत्याबद्दलचे बेजबाबदार वर्तन सहन करू शकणार नाही. (एके काळी विवाहपूर्व प्रेम हा व्यभिचार समजला जात असे. आताही तीच धारणा असली तरी प्रेमानंतर विवाह याला आता (तरी) समाजमान्यता आहे. त्याचप्रमाणे समलिंगी संबंध निषिद्ध म्हणून कठोर कायदा करणारा हा समाज आज त्याला, नाखुशीने का होईना, मान्यता देत आहे, हेही नसे थोडके!) त्यासाठी समाजाकडून काही बंधनं लादल्या जातात, कायदे केले जातात व कायद्याचे पालन करण्याची सक्ती केली जाते. समाजाने आखलेल्या रेषेच्या पलीकडे जाणे काही वेळा दुस्तर ठरू शकते. परंतु समाजमान्य विवाह याच्याबद्दल अजूनही समस्या आहेत. ठरवून केलेल्या विवाहात सुरुवातीला प्रेमाचा अंशही नसला तरी शारीरिक आकर्षणामुळे व कौटुंबिक जबाबदारीमुळे कुटुंब तगून राहते. वयोमानाप्रमाणे हे आकर्षण कमी कमी होत गेले तरी दीर्घकाळच्या सहवासातून एकमेकाबद्दल आपुलकी निर्माण होते (वा होत असलेला भास होतो.) व अपत्याच्या जबाबदारीचे ओझे संभाळावे लागत असल्यामुळे कुटुंबसंस्थेबद्दल तक्रारीस वाव नसतो. ही कुटुंबसंस्था वेगवेगळया टप्प्यातून जात जात आता फक्त नवरा-बायको-मुलं या चौकोनी व्यवस्थेपाशी स्थिरावली आहे.

तरीसुद्धा यौवनावस्थेतील प्रत्येकांना प्रेम विवाहाची ओढ असते. (मनापासूनचे) प्रेम हे विकतही घेता येत नाही किंवा त्याबरोबर सौदाही करता येत नाही. प्रेम जमावे लागते व तसे प्रेम जमलेली जोडपी शारीरिक आकर्षण संपल्यानंतरही सुखाने नांदू शकतात. याचेच उदात्तीकरण केलेली कथानकं कादंबऱ्या, नाटक, चित्रपट वा सिरियल्समध्ये नेहमीच आढळतात. काही तुरळक अपवाद वगळता अशा प्रकारच्या यशस्वी प्रेमविवाहाची उदाहरणं फारच विरळ. म्हणून अजूनही लग्न जमवणाऱ्या संस्था मोठ्या प्रमाणात धंदा

करत आहेत. व (आपल्या देशात तरी) बहुतांश लग्न असे ठरवूनच केले जातात, ही वस्तुस्थिती लक्षात ठेवणे जरूरीचे आहे. परंतु काही तुरळक धाडसी तरुण तरुणीं समाज बंधन तोडून राहूही शकतात. परंतु सर्वांना हे जमेल याची खात्री देता येत नाही.

प्रेम विवाह असो वा जमवून केलेले लग्न असो, वैवाहिक जोडीदाराबद्दल निष्ठा, संसाराबद्दलची बांधिलकी, अपत्यांचे पालन पोषण, कुटुंबसंस्थेला तडा जावू नये यासाठी आटोकाट प्रयत्न, दीर्घकालीन बंधनाची सतत जाणीव, आर्थिक व सामाजिक जबाबदारीयुक्त वैयक्तिक जीवन, वृद्धत्वाच्या काळातील परस्पर सेवा-संगोपन, इत्यादी अपेक्षा प्रत्येक जोडीदाराला पूर्ण कराव्या लागतात. यातील एखाद्या गोष्टीला जरी तडा गेला तरी त्यातून उद्भवणाऱ्या सर्व परिणामांना सामोरे जाण्याची तयारी ठेवावी लागते. आणि त्यासाठी मनाचा कणखरपणा हवा. यासंबंधात टोकाची भूमिका घेतल्यास कुटुंब व्यवस्था कोलमडते, अपत्यांचे हाल होतात, व एकल पालकत्वाची तयारी ठेवावी लागते. वृद्धावस्था भयाण वाटू लागते. हे सर्व मार्ग तितके सोपे नाहीत याची जाणीवही ठेवावी लागते. त्यामुळे प्रेम वा लग्न या भानगडीत न पडता वा त्यासाठी विशेष प्रयत्न न करता जोडीदाराविना आयुष्य काढण्यास का हरकत असावी हाही प्रश्न विचारला जाऊ शकतो. परंतु अनेकांच्या मते एकटेपणाची ही अवस्था अनैसर्गिक आहे. लैंगिक आकर्षण ही एक नैसर्गिक प्रक्रिया असून ते पूर्ण करण्यासाठी त्यासोबत येणारी जबाबदारी प्रत्येकानी पेलायला हवी असा एक अलिखित नियम समाजात रूढ आहे. मुळात एखादी व्यक्ती लग्न न करता का राहू इच्छिते याबद्दल विचार करण्याची मानसिकताच समाजात नसते.

एक मात्र खरे की कुटुंब संस्थेमुळे संतती वाढ होत गेली व त्या त्या कालखंडातील प्रगतीमुळे लोकसंख्येत वाढ होवू लागली. प्रत्येक पिढी

प्रगतीत भर घालत आली. त्या त्या समाजातील सृजनशील व प्रतिभावंत व्यक्तींच्या प्रयत्नामुळे सामाजिक जीवन सुखकर होत गेले. जगाच्या प्रारंभापासून जोडीदाराची निवड, जोडीदारापासून संतती व प्रत्येक पिढीमुळे होत असलेली लोकसंख्या वाढ यामुळे आपण इथपर्यंत पोचलो आहोत. एवढी प्रगती केली व करत आहोत व एवढ्या मोठ्या प्रमाणातील जगड्व्याळ व्यवस्था संभाळत आहोत, याबद्दल कुणाच्याही मनात दुमत नसावे. त्यामुळे कुटुंब व्यवस्थेत सामील न झाल्यास त्या व्यक्तीत काही तरी उणीव आहे असा एक समज सर्व जगभरच्या समाजात पसरलेला आहे. कदाचित अपवाद म्हणून सेलिब्रिटींच्याकडे पाहिले जात असावे.

जेव्हा एखादी सेलिब्रिटी विवाह बंधनाच्या बाहेर असते तेव्हा मात्र समाज कुठलीही नाराजी व्यक्त न करता त्यांचा स्वीकार करते. मुळात विवाह बंधनात अडकलेल्या व्यक्तीला एकटे असलेल्यांच्या व एकटे असलेल्या व्यक्तीला लग्न झालेल्यांच्याबद्दल सुप्त आकर्षण असते. परंतु येथे *घी देखा लेकिन बडगा नही देखा* या म्हणीची आठवण येते. नित्शे या तत्वज्ञाच्या मते कुठल्याही तत्वज्ञाला अर्थपूर्ण जीवनासाठी लाइफ पार्टनरला पर्याय नाही. परंतु याच नित्शेला हेराक्लिटस, प्लेटो, देकार्ते, स्पिनोझा, लेब्निट्झ, कांट, शोपेनहॉर, लॉक, ह्यूम, विटगेन्स्टाइन, यापैकी कुणीही लग्न केले नव्हते याचा विसर पडलेला दिसतो. अगदी अलिकडील यादी तपासल्यास जेन ऑस्टिन, आयझ्याक न्यूटन, निकोला टेस्ला, लुई मे स्कॉट, फ्लॉरेन्स नायटिंगेल, राइट ब्रदर्स, व्होल्टेर, हेन्री डेव्हिड थोरो, काफ्का, बीथोव्हन, ब्राँटे सिस्टर्स, ऑफ्रा विनफ्रे, ही नावेसुद्धा एकांडे शिलेदार म्हणून घेता येईल. भारतातील यादी तपासल्यास रतन टाटा, होमी भाभा, अब्दुल कलाम, अटल बिहारी वाजपेयी, अण्णा हजारे, कामराज, विश्वेश्वरय्या, राम मनोहर लोहिया, जय ललिता, लतादीदी, ममता बॅनर्जी, मायादेवी इत्यादींची नावे डोळ्यासमोर येतील. परंतु

यांना अपवाद समजून नित्शेच्या विधानाची सार्वत्रिकता तपासावी लागेल. सॉक्रेटिस, बर्ट्रांड रसेल, आणि जीन पॉल सार्त्र यांचा मोठेपणा त्यांच्या पत्नीमुळे उठून दिसतो. मेरी क्यूरीला पियरे क्यूरीची जीवनभरची साथ होती. त्यामुळे तिचे जीवन सार्थकपूर्ण झाले. एखाद्या विकृत तत्वज्ञाने रागाच्या भरात पत्नीचा खूनही केला असेल. परंतु त्याकडे विकृत माणूस वा तत्वज्ञ हा एक विचित्र प्राणी म्हणून दुर्लक्ष करणे सोईचे ठरेल. समाज सेलिब्रिटीजना एक वेगळा न्याय व सर्वसामान्यांच्या बाबतीत वेगळा न्याय अशा दुजाभावाने वागते. सामान्यांचे नातलग, मित्र-मैत्रिणी जोडीदाराविना आयुष्य काढत असल्याबद्दल नको त्या शंका उपस्थित करतात व नेहमीच नाराजी व्यक्त करत असतात.

नित्शेचे यासंबंधातील अजून एक विधान उद्बोधक आहे. *प्रत्येक मनुष्य जीव आपल्या इष्टतम फायद्यासाठी प्रयत्न करत असते. त्यासाठी सर्व शक्ती पणाला लावते. आणि आपण किती बलशाली आहोत ही भावना आयुष्यभर जोपासत असते.* जरी नित्शेच्या शक्तीबद्दलचे विधान बाजूला सारले तरी जगाच्या पाठीवरील माणसं सुख समाधानाच्या प्राप्तीसाठी वेगवेगळे मार्ग अवलंबत असतात. काही वेळा त्यात यश येते, काही वेळा निराशा पदरी पडते., हे मात्र तितकेच खरे.

प्रेमाप्रमाणे जीवनात यशस्वी होण्यासाठी कमिटमेंट असणे गरजेचे आहे. व कमिटमेंट हा एक धोकाच असतो. जेव्हा रिलेशनशिपमध्ये आपण गुंतत जातो तेव्हा हा धोका पत्करावा लागतो. रिलेशनशिपमध्ये समर्पणवृत्ती (dedication) असावी लागते. व समर्पणासाठी त्याग करण्याची तयारी ठेवावी लागते. म्हणूनच पुरातन काळातील तपस्वी, ऋषी-मुनी, चर्चमधील पाद्री व नन्स, वा कट्टर धर्मोपासक, विवाह बंधनापासून दूर रहात होते. जरी त्यांना लैंगिकसुख हवेहवेसे वाटत असले तरी जोडीदाराबद्दल समर्पणवृत्ती व

परमेश्वराबद्दल भक्ती (devotion) हे एकाच वेळी न जमणाऱ्या गोष्टी होत्या. म्हणून त्यांनी विवाह बंधन नाकारून परमेश्वराचा स्वीकार केला.

नित्शेच्या विधानातील इष्टतम फायदा हा सुख-समाधानाचा मार्ग नाही, हे आपण लक्षात ठेवायला हवे. विटगेन्स्टाइन हा तत्वज्ञ एकटाच होता. वरवरून तो अत्यंत कष्टी जीवन जगत होता. कुठल्यातरी एकांत ठिकाणी त्याला मृत्यु आला. मुत्युशय्येवर असताना *मी एक चांगले जीवन जगलो म्हणून सर्वांना सांग* असे म्हणत त्यांनी जीव सोडले. कदाचित हा अपवाद असू शकेल. चांगले जीवन जगण्यासाठी लाइफ पार्टनर हवा व चांगल्या लाइफ पार्टनरच्या शोधातच खरेखुरे सुख आहे असे बहुतेक जण मानतात.

मुळात (बुद्ध्यापुरस्कर) एकट्याने जीवन काढणाऱ्यांकडे लग्न झालेल्या चष्म्यातून बघत असल्यामुळे एकट्याने राहणारे म्हणजे जगण्यास नालायक असा शिक्का पडलेला असावा. एकट्याने राहणाऱ्यांच्या बाबतीतला खालील प्रकारचा अनुभव नेहमीच येत असतोः

• एकट्याने राहतो/ते यामागे काहीतरी काळेबेरे असावे हा संशय का असतो?
• एकट्याने राहिल्यामुळे (भविष्यातील) भीती त्यांना वाटत नाही का?
• 'बिचारा/री' असे करुणापूर्ण दृष्टिकोनातून त्याच्याकडे का बघितले जाते?
• एकट्याने राहणाऱ्यांच्याकडे वैशिष्ट्यपूर्ण असे काही गुण असू शकतात का?
• लग्न हेच आयुष्याचे उद्दिष्ट का नसावे?
• एकट्याने राहिल्यामुळे भोगत असलेले स्वातंत्र्य विवाहोत्तर आयुष्यात मिळत नसेल का?

जोडीदाराच्या संबंधातील समस्यांना उत्तरं शोधण्यासाठी समुपदेशक वा मनोविश्लेषक यांच्याकडे जाणाऱ्यांची संख्या काही कमी नसेल. प्रेमाची भाषा समजणारा/री लाइफ पार्टनर कन्सल्टिंग रूममध्ये मिळू शकेल याबद्दल शंका

असली तरी नंतरचा धोका टाळण्यासाठी समुपदेशन घेतलेले बरे म्हणून तेथे ते जात असावेत. *एक मात्र खरे की तुमचे करीअर, तुमची संपत्ती, तुमची श्रीमंती वा तुमची प्रसिद्धी यापेक्षा committed relationship तुमच्या सुखात भर घालू शकते. सुख-दुःखाच्या प्रसंगात जवळचा माणूस नसणे नक्कीच तापदायक ठरते,* ही विधानं दगडावरची रेघ असेच मानले जाते. परंतु ही विधानं माहित आहेत म्हणून आपला पुढचा मार्ग सुकर होतो याला काही अर्थ नाही. यासाठी नेमके काय करायला हवे हा आपल्या समोरचा प्रश्न आहे.

एक चांगले अढळ असे रिलेशनशिप असल्याशिवाय आपण सुखी होणार नाही हे कदाचित चुकीचे असू शकेल. बहुतेकांच्या बाबतीत व बहुतेक वेळा याची प्रचीती आलेली असली तरी हे काही वैश्विक सत्य होऊ शकत नाही. शेवटी हा निष्कर्ष 'सामान्यपणे' या सदरातच मोडतो. सामान्यपणे सामान्य लोकांना या लाँग टर्म रिलेशनशिपमुळे त्यातल्या त्यात समाधान मिळतही असेल व सुख मानण्यातच आहे असा युक्तीवादही करता येईल. परंतु एकट्याने आयुष्य काढण्यासाठी आसुसलेल्यांची संख्याही कमी नाही, हेही लक्षात ठेवावी लागेल.

Loving relationship मध्ये दोघाही जोडीदारांचे उद्दिष्ट सारखे असणे हा निव्वळ योगायोग असू शकेल. या संबंधी प्रयोग करून बघायला हरकत नसावी. जोडीदाराच्या उद्दिष्टापेक्षा वेगळ्या उद्धिष्टासाठी प्रयत्न करण्याची भाषा केल्यास व त्यासाठीच्या संधीच्या शोधात असल्यास या रिलेशनशिपचे खरेखुरे स्वरूप कळेल. त्यामुळे Loving relationshipमध्ये अडकून पडल्यास तो एक निव्वळ योगायोग म्हणून स्वीकारायला हरकत नसावी. परंतु अशा प्रकारचे लाँग टर्म रोमँटिक अट्याचमेंट नसतानासुद्धा एकटे राहून आयुष्यात सुखसमाधानाने राहता येते याचेही भान ठेवावे. एकटे असूनसुद्धा इतरांबरोबर चांगले संबंध ठेवून आयुष्य काढता येते, याची अनेक उदाहरणं

नक्कीच सापडतील. त्यामुळे एकटेच जीवन जगण्याचा निर्धार केल्यास त्यात न्यूनगंड बाळगण्याचे कारण नाही. आपली जीवनशैली कशी असावी हे स्वातंत्र्य नक्कीच प्रत्येकाला आहे. व त्याचा दुरुपयोग होणार नाही याची खात्री असल्यास जोडीदाराशिवाय जगण्याची मजा और असते.



# दिल से या दिमाग से

*(गूगलवर दिल (heart) हा शब्द टाकून बघितल्यास सर्च इंजिन 437 कोटी संदर्भ दाखवते व दिमाग (brain) म्हणून टाकल्यास फक्त 64 कोटी! यावरून दिल पेक्षा दिमाग किती 'कमकुवत' आहे याची थोडी फार कल्पना येवू शकते.)*

आजकाल कुठल्याही कुरघोडीचे वा दंगलीचे कारण *आमच्या भावना दुखविल्या* या विधानाभोवती फिरत असते. गंमत म्हणजे या दंगलखोरानाच भावना असतात व इतरांना नाही हा अर्थ त्यातून अभिप्रेत होत असतो. सामूहिक भावना काही तरी निमित्त उकरून भडकवल्या जातात हे खरे असले तरी भावनेच्या संदर्भात वैयक्तिकरित्या आपण फारच हळवे होत असतो, हे नाकारता येत नाही. आपल्या भावना (emotions) व संवेदना (feelings) यांच्यात एका प्रकारचे भांडण सतत चाललेले असते. त्यामुळे *मला तसे का वाटते याचे स्पष्टीकरण देण्याचे माझ्यावर बंधन नाही,* याबद्दल आपण ठाम असतो. भाव-भावनांचा योग्य वेळी दखल न घेतल्यास शारीरिक प्रकृतीवर परिणाम होतो हे कारण त्यासाठी पुरेसे ठरते. *मला राग येत नाही,* असे रागाच्या भरात ओरडण्याची सवय कित्येकांना जडलेली असते. त्यांची देहबोली ते किती उद्विग्न झालेले आहेत याची साक्ष देत असते. परंतु *आपण त्या गावचेच नाही* हा पवित्रा घेत ते आपल्याशी भांडत असतात. परंतु राग ओसरल्यानंतर बहुतेकांना भावनोद्वेग योग्य नाही याची जाण असते, विशेषतः तुम्ही दुसऱ्याच्या भावनोद्वेगाचे बळी ठरलेले असल्यास! रागाच्या भरात, सूड उगवण्याच्या ईर्षेमुळे वा असूयेमुळे आपले जास्त नुकसान होऊ शकते हे माहित असूनसुद्धा आपण आपला भावनोद्वेग आवरू शकत नाही.

थोडे फार विचार करणारे भावनोद्वेग चुकीचे आहे हे मान्य करतात. परंतु आपल्या भावना योग्य नसले तरी भावनावश न होणे आपल्या हातात नसते.

कुठे तरी तोल जातो व भावना उचंबळून येतात. अशा प्रसंगी विचार करण्याची वा विचार करून कृती करण्याची कुवतच हरवलेली असते. विचार व भावना या एकाच नाण्याचे दोन बाजू आहेत, व एकात बदल झाल्यास दुसऱ्यातही बदल होतो असे मानसतज्ञ सांगत असले तरी भावना विचारावर मात करते. व त्याचे विश्लेषण करणे वा स्पष्टीकरण मागणे शक्य नाही अशीच भावना जनसामान्यात रुजलेली असते.

परंतु 'हे' की 'ते' ही स्थिती कधीच नसते. विचार न करता भावनांना शरण जाणे किंवा भावनांना पूर्णपणे अव्हेरणे हे शक्य होत नाही. आपण एखाद्या विशिष्ट भावनेची दखल घेत असतानाच ते योग्य नाही याची जाणीव खोल मनात कुठे तरी असते. परंतु त्या विवेकाला दाबून टाकणे सहज शक्य होते व भावना आपले कार्य साधतात.

तुमच्या बरोबर काम करणाऱ्याचे वा तुमच्याच वयाच्या नातलगाच्या यशाबद्दल हेवा वाटतो. *आपण एवढे मरमरतो व आपल्या पदरी काही नाही* ही भावना मनात असल्यामुळे त्या मित्राचा/नातलगाचा आपण दुस्वास करू लागतो. हा हेवा चुकीचा वा हेवा वाटणे हे चुकीचे हेही लक्षात येते. परंतु भावनावेग या विचारावर मात करते. खरे पाहता उत्स्फूर्तपणे वाटणे व त्याबद्दल थोडेसे विचार करणे, त्याचे विश्लेषण करणे व नंतर कृती करणे व बुद्धीनिष्ठ/वस्तुनिष्ठपणे पाहणे हे या संबंधातील टप्पे असू शकतात. त्यामुळे बुद्धीच भावनोद्वेगाला थोपवू शकते. त्याचप्रमाणे हीच बुद्धी आपल्या भावनांना केव्हा वाट करून द्यावे हेही सुचवते. परंतु यासाठी आपल्या बुद्धीचा आवाज ऐकण्याची सवय करून घ्यावी लागते.

सामान्यपणे दिल व दिमाग एकमेकाचे स्पर्धक आहेत असेच वाटत असते. प्लेटोच्या मते भावना हे रथाचे घोडे असून बुद्धी त्या रथाचा सारथी असतो. हा बुद्धी नावाचा सारथी भावनेच्या भरात उधळणाऱ्या घोड्यांचे नियंत्रण करतो व

त्यांना वठणीवर आणतो. परंतु डेव्हिड ह्यूम या तत्वज्ञाच्या मते घोडेच सारथीचे नियंत्रण करत असतात. कारण बुद्धीपेक्षा भावनानांच स्वहित जास्त कळते. विवेकच भावनांचा गुलाम असतो. ब्लेज पास्कल या अजून एका तत्वज्ञाच्या मते भावनांना स्वतःचाच विवेक असतो, त्याच्या नियंत्रणासाठी बुद्धीची आवश्यकता नाही. अशा प्रकारे आपल्यासमोर बुद्धी व भावना यासंबंधीचे 3 मॉडेल्स आहेत. परंतु या तीन्ही मॉडेल्समध्ये दिल व दिमाग हे एकमेकाच्या विरोधातच आहेत असे गृहित धरलेले दिसते. गंमत म्हणजे हे दोन्ही एका पाठोपाठ कार्य करत नसत्या तर त्यांना नीटपणे ओळखणेसुद्धा जड झाले असते. बहुतेक वेळा – नेहमीच नव्हे – आपण कार्य करत असताना आपण ते करत आहोत हेच जाणवत नसते. परंतु त्याबद्दल विचार केल्यास कार्यकारण भाव समजून घेता येते. अनेक वेळा आपल्याला एखादी वस्तु आपल्या मौजमजेसाठी हवीहवीशी वाटते. परंतु ते मिळणार नाही याची खात्री झाल्यास तो हव्यास ओसरून जातो. आपल्यावर अन्याय झाला नाही हे लक्षात आल्यानंतर आपला राग शांत होतो. प्लेटोचा बुद्धीसाठी म्हणून वापरलेल्या सारथी या शब्दापेक्षा घोडेस्वार हा शब्द तेथे चपखलपणे बसला असता. कारण धुंदीत असलेल्या घोड्यांना केवळ इशाऱ्याने शांत करणे त्यालाच शक्य झाले असते, चाबकाने मारून नव्हे.

प्लेटोच्या तुलनेत ह्यूमचे मॉडेल वास्तवतेच्या जवळ जाणारे आहे. त्याच्या मते दिलला दिमागापेक्षा, दिमागालाच दिलची जरूरी जास्त असते. कारण प्रेरणा देण्यासाठी पूर्णपणे बुद्धीनिष्ठ असे काही नसते. शिवाय नैतिकता इतराबद्दल संवेदनशील असल्याशिवाय काही कामाचे नाही. भावना व संवेदना नसत्या तर बुद्धिनिष्ठतेचे वर्तन अगदी शुष्क, नीरस, कोरडे, कामापुरते व यांत्रिक झाले असते. भावनाचा ओलावा असल्याशिवाय कामाला गती येत नाही व काम करण्यास प्रेरणा मिळत नाही, हे मान्य करायला हवे. बुद्धिनिष्ठ

वर्तनामुळे आपल्या कृतीचे नेमके काय परिणाम होतील हे कळेल परंतु ते आपल्याला खरोखरच तसेच हवे होते का हे कळणार नाही.

तसे पाहिल्यास आकस्मिकपणे उद्भवणाऱ्या भावनेच्या उत्सुफूर्ततेला थोपवण्यासाठी व भावनेच्या उत्कट प्रतिसादांना वेळीच थांबवण्यासाठी बुद्धिनिष्ठतेला पर्याय माही. आपण चुकीच्या गोष्टीबद्दल कारण नसताना आपल्या मनात भीती असते व त्यासाठी आपण निर्भय व्हावे असे तत्वज्ञ नेहमीच सल्ला देत असतात. किर्कगार्ड हा तत्वज्ञ मात्र आपल्या मनातील ही भीतीच आपल्या अस्तित्वाच्या लढ्यात आपल्याला कायम मदत करत आली आहे, असे मानतो. फक्त आपण आपला हात तुटला, बायको पळून गेली वा चोरी झाली अशा क्षुल्लक गोष्टीबद्दल काळजी करत बसतो त्याऐवजी आपले स्वत्व हरवले यासाठी रडत नाही. उदाहरणार्थ मृत्युची भीती कायमची मनात असते. परंतु अनेक तत्वज्ञांना मृत्यु हा काही चिंतेचा विषय असू शकत नाही, व विनाकारण आपण त्या विषयात गुंतत असतो, असे वाटते. सॉक्रेटिसच्या मते आपल्याला ज्ञात नसलेल्या गोष्टीबद्दल काळजी करत बसणे हेच अविवेकीपणाचे प्रमुख लक्षण आहे. कदाचित मृत्यु हे एक वरदानही ठरू शकेल. मुत्युनंतर वा पूर्वजन्मी आपले जीवन फारच वाईट होते अशी समजूत करून घेण्यास कुठलाही आधार नाही. वाईट वाटून घ्यावे असे काही जगात नसल्यास कुठल्याही गोष्टीचे वाईट वाटणार नाही. (Nothing can be bad if there is nothing for it to be bad for) आपण काही मृत्युपासून लांब पळत नाही. परंतु एखाद्या गोष्टीबद्दल भीती बाळगणे व ती गोष्ट कधीही होऊ नये अशी अपेक्षा बाळगणे यात फार मोठा फरक आहे. यावरून ज्या गोष्टीबद्दल खरोखरच काळजी करावी यासाठी मार्गदर्शक म्हणून उत्स्फूर्तपणे उद्भवणाऱ्या भावनिक प्रतिसाद निरुपयोगी ठरतात, असे म्हणावयास हरकत नसावी.

आपली भीती अनाठायी आहे किंवा आपण चुकीच्या गोष्टीबद्दल भीती बाळगून असतो, असे काहीही असले तरी भीतीची कारणमीमांसा करणे योग्य ठरेल. आपण भीतीवर अंकुश ठेवण्याची चिंता करत नसून आपल्याला विमनस्कतेकडे नेणाऱ्या गोष्टींना अव्हेरत आहोत हे लक्षात येईल. आपण प्रवास करत असलेले विमान सुरक्षितपणे उतरेल की नाही याचा विचार करण्याऐवजी विमानाला अपघात झाल्यास त्यानंतरचे आपले जीवन कसे असेल याचीच चिंता आपण करत असतो. मृत्युच्या भीतीच्या छायेखाली वावरताना खऱ्या-खुऱ्या जीवनाची मजाच आपण घालवत असतो.

हे सगळे खरे असेलही, परंतु बुद्धिनिष्ठता मला जे वाटते ते बदलू शकत नाही. गंमत अशी आहे की बहुतेकांना आपण बदल पचवू शकत नाही असेच वाटत असते. परंतु प्रत्यक्षात मात्र इतरांच्या वर्तनातील फरक वा परिस्थितीतील बदलानुसार आपण माणसांना पारखत असतो व त्यांच्याबद्दलची आपली मतं बदलत जातात. पोल्ट्री फार्मला भेट दिल्यानंतर नेहमीच खावेसे वाटणारे केएफसीमधील चिकन नगेट्सबद्दल घृणा उत्पन्न होऊ शकते. आयुष्यभर साथ दिलेल्या नवऱ्याचे एखादे लफडे आहे हे कळल्यानंतर त्याच्याबद्दलची मतं पूर्णपणे बदलू शकतात.

भावनेला योग्य वाट करून देणे म्हणजे त्याची गुलामी पत्करणे असे होत नाही. आपल्याला जे वाटते ते आपण बदलू शकत नसलो तरी त्या भावनेशी निगडित कृती करताना तरी आपण विचार करणे अपेक्षित आहे. आणि ही क्षमता एक नैतिक व्यक्ती म्हणून नेहमीच वापरायला हवी. जगभरातील सर्व तत्वज्ञ स्वतःच्या भावनेची अभिव्यक्ती कशी करावी याबद्दल भाष्य न करता दुसऱ्यांना तुमच्याबद्दल काय वाटते याचाच विचार करण्याचा, त्यासंबंधातील आपली कृती काय असावी आणि प्राप्त परिस्थितीत इतर कसे मार्ग काढत होते याबद्दल सल्ला देत असतात. यासाठी आपल्याला भावनेवर मात करणे गरजेचे

आहे. परंतु ही गोष्ट समाजातील त्या त्या काळच्या रूढ समजुतीच्या विरोधात जाणारी असते. परंतु भावनेलाच वाट करून देणे व भावनेच्या भरात कृती करणे वा भावनेला अग्रक्रम देणे हे स्वप्रतिमेचे उदात्तीकरण केल्यासारखे होईल व नैतिकतेला दुर्लक्ष केल्यासारखे होईल.

अशा वेळी काहीही न बोलता ओठ शिवून घ्यायचे हाच उपाय समजला जातो व त्याला भावनेचे अपयश न समजता नैतिकतेचा विजय असाच समजला जातो. समोरच्यानी भावनेच्या भरात कितीही उचकवले तरी, व त्यामुळे मानसिक त्रास होत असतानासुद्धा तोंडातून एक ब्र ही न काढता गप्प बसणाऱ्याचे आपण नेहमीच कौतुक करत असतो.

दुसऱ्यांच्या भावनेची कदर करत असताना एक प्रकारचे शेअरिंग करणे गरजेचे असते. त्या भावनांना प्रतिसाद देणे अपेक्षित असते. परंतु अशा प्रसंगी एकही शब्द न उच्चारणारेसुद्धा समाजात सापडतात. त्यांच्या मते समस्येचे शेअरिंग करण्याच्या प्रयत्नात आपण समस्या दुप्पट करत असतो. काही जण अशा कठिण प्रसंगी आपले भावनिक दुःख विसरण्यासाठी काही तरी चांगले काम करत आपल्या भावनांना वाट करून देत असतात.

वरील विवेचनावरून पास्कल या तत्वज्ञाच्या मॉडेलमध्ये काही तरी चूक असावी असे वाटू लागते. त्याच्या मते भावनांना स्वतःचाच विवेक असतो व त्याच्या नियंत्रणासाठी बुद्धीची आवश्यकता नाही. भावना व बुद्धी हे एकमेकाच्या विरोधात असले तरी प्रत्यक्ष लढ्याऐवजी गनिमीकाव्याने त्या एकमेकावर मात करण्याच्या प्रयत्नात असतात, असे त्याला वाटले असावे. कदाचित यात थोडासा सत्यांश असलेही. परंतु त्याकडे नियम म्हणून न बघता अपवाद म्हणून बघायला हवे. दिल व दिमाग या दोन्हीलाही स्वतःचीच विचारसरणी असू शकते. परंतु त्या दोन्हीही एकमेकाच्या सहकार्याने कृती करणे इष्ट ठरेल. करुणा, सहानुभूतीतून कार्य प्रवृत्त करणे दिलचे काम असेल व

कुठल्या भावनांना अग्रक्रम द्यायचे याचा निर्णय घेत आव्हानांना सामोरे जाण्याचे काम दिमाग करेल. भावनांना नियंत्रित करणे वा त्यांना मुक्तपणे वावरू देणे यापेक्षा बुद्धीची त्याला जोड देणे अधिक हितावह ठरू शकेल.

भावनेच्या संदर्भात अभिव्यक्त करणे, स्वीकारणे, बदलणे, समावेश करणे, जिंकणे वा नियंत्रण करणे अशा अनेक शब्दांचा वापर करता येईल. भावनेच्या छत्राखाली अनेक गोष्टीं सामावलेले असतात व त्यातील काही गोष्टींचा कदाचित संवेदनाशी संबंधही नसतो. परंतु भावनांचे काही वेळा उघड उघड प्रदर्शन मांडले जाते व काही वेळा नको तेवढे दाबून ठेवले जाते. आकर्षणाचा मागमूसही नसलेल्या व एकतर्फी नसलेल्या उत्कट प्रेम व्यक्त करायला हवे याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही. त्याप्रमाणे एकामेकात वितुष्ट आणणाऱ्या रागावर कुठल्याही परिस्थितीत नियंत्रण ठेवणे सर्वांच्याच हिताचे ठरेल.

भावनेच्याबद्दल विचार केल्यास भावना ही एक अत्यंत गुंतागुंतीची, गोंधळात टाकणारी बाब आहे. कदाचित मनोतज्ञ फ्रॉइडच्या हा वारसा असू शकेल. फ्रॉइडचे अनेक समज, गैरसमज व गृहितकं कळत न कळत आपल्या विचारावर परिणाम करत असावेत. भावनांचा आपल्या शरीरावर परिणाम होऊ शकतो हेसुद्धा फ्रॉइडचेच गृहितक आहे. फ्रॉइड, नित्शे वा 20 व्या शतकातील कुठल्याही मानसतज्ञांचे काहीही मत असो, संवेदना नियंत्रित करण्यापेक्षा भावना व्यक्त करणे याला आपण जास्त महत्व देत आहोत. त्याला आता एक उत्सवीस्वरूप येत आहे. मला असे वाटते यावर कुठलाही अपील करायचे नाही असेच ठरवल्यासारखे आपली उत्सवप्रियता असते. परंतु ही उत्सवप्रियता केव्हा, कुठे धोक्यात आणेल याची खात्री देता येत नाही. आणि अनेक वेळा भावना अप्रस्तुत, अयोग्य वा टोकाचे असतात. आपल्यातील अनेकांना दुसऱ्यांच्या भावनेद्वेगाचे बळी ठरलेले आठवत असेल. राग, द्वेष,

असूया या किती वाईट असू शकतात याचा प्रत्यय नक्कीच आला असेल. म्हणूनच आपण भावनोद्वेग योग्य नाही असे म्हणण्याइतपत सुज्ञ झालो असेल.

भाव भावनांचे नियंत्रण करणे म्हणजे तोंड मिटून सहन करणे वा दबावाखाली सतत वावरणे किंवा प्रेम करण्याला वा रडून दुःखाला वाट मोकळे करून देण्याची क्षमताच पूर्णपणे हरवून घेतल्यासारखे होईल. तोंड दाबून बुक्क्याचा मार सहन केल्यासारखे वाटेल. काहींना अशा उत्कट प्रसंगी शांत राहण्यापेक्षा व भावना दाबून ठेवण्यापेक्षा जे काही होईल त्याचा सामना करणे इष्ट ठरेल. परंतु खरोखरच भावनेचे नियंत्रण की त्याच्या दयेची भीक अशी निवड असू शकते का? अरिस्टॉटलच्या मते भावनेच्या अतिरेकाच्या भीतीमुळे ठेवण्यात येणारे नियंत्रण आयुष्यातील एका थ्रिलिंग अनुभवापासून दूर पळायला लावते. व भावनेवरील अगदीच तोकडे नियंत्रण राग, लोभ व द्वेष इत्यादींच्या आहारी जाण्याची शक्यता वाढते व जे काही आयुष्यात थोडे फार सौख्य आहे त्या आयुष्यालासुद्धा सुरुंग लावल्यासारखे होते. या प्रकारचे राग, द्वेष, लोभ इत्यादी समस्या आपल्या रोजच्या आयुष्यात नेहमीच डोकावतात. अगदी प्रेमसुद्धा समस्या म्हणून आपल्यासमोर उभे राहते. प्रसंगी या संवेदना आपल्याला सत्याकडे नेत आहेत की आपल्याला खोटे पाडत आहेत हे ओळखणेसुद्धा आव्हानात्मक ठरते.. त्यामुळे त्यांच्यावर विश्वास ठेवावा की त्याच्यापासून लांब पळून जावे असा पेच उभा राहू शकतो.

मनात उमटणाऱ्या भावनोद्वेगाला उत्स्फूर्त प्रतिसाद देत कृतीशील होण्यापेक्षा प्रसंगाचे गांभीर्य ओळखून थोडेसे विचार करून कृती केल्यास प्रसंगातून बाहेर पडणे शक्य होईल. याचा अर्थ आपण भावनांना नाकारत आहोत असे होत नाही. भावनेची कदर करत असतानाच त्याच्या अतिरेकातून होणाऱ्या नुकसानीचा अंदाज घेत केलेली कृती आपल्या परिप्रेक्ष्याला वा करत असलेल्या कृतीला किंवा या दोन्ही गोष्टींना एक वेगळे परिमाण देऊ शकते.

भीतीचेच उदाहरण घेतल्यास ही एक क्लेश देणारी अत्यंत त्रासदायक भावना आहे. परंतु या भीतीच्या संदर्भात शक्य होत असल्यास आपण वेगळा विचार केल्यास *त्यात भिण्यासारखे काय आहे* असे वाटू लागेल व फार मोठ्या नुकसानापासून वाचण्याची शक्यता वाढेल. मुळात भीतीचे एवढे बाऊ करण्याची गरज नाही, कारण ते आयुष्यभर तुमच्या बरोबर असणारी भावना आहे व ते अत्यंत नैसर्गिक आहे. त्यामुळे आपण एखाद्या कृतीबद्दल उत्सुक असताना त्यातील धोक्यांची चिंता करत बसल्यास ती कृती बाजूला राहील व फक्त मनात भीती उरेल. त्यामुळे भीतीच्या आहारी न जाता तुम्हाला जे काही करायचे – उद्योग-व्यवसाय, नवीन नाते संबंध, वा प्रवास इत्यादी – त्यात मन गुंतवल्यास व झोकून घेतल्यास भीतीची भीती उरणार नाही. मनातील भीती पूर्णपणे नष्ट होईपर्यंत वाट बघत राहिल्यास वा भीतीची तीव्रता कमी होण्याची वाट बघत राहिल्यास आयुष्यभर फक्त वाटच बघत बसावे लागेल. त्यामुळे जे काही करायचे ते करणे योग्य ठरेल.

काहींना भीतीवर जय मिळवण्याची आस लागलेली असते, व त्यासाठी आपल्या जिवाचे हाल करून घेण्याची त्यांची तयारी असते. परंतु त्याची खरोखरच इतकी गरज नाही. एक मात्र खरे की धोक्याची घंटा वाजत असल्यास त्याकडे लक्ष देणे नेहमीच चांगले. विशेष करून अत्यंत धोक्याच्या वा नैतिकतेला अव्हेरणाऱ्यांच्या बाबतीत तर आपण जास्त सावध राहायला हवे. कायम कंफर्ट झोनमध्ये राहणे वा विनाकारण कंफर्ट झोनच्या बाहेर पडण्यासाठी धडपडणे या दोन्ही गोष्टी शक्यतो टाळायले हवेत. कडाक्याच्या थंडीच्या दिवसात एव्हरेस्ट शिखर चढण्याचा विचार सोडून देणे केव्हाही शहाणपणाचे ठरेल. परंतु इतर अनेक गोष्टींच्या छटा या उदाहरणाइतके स्पष्ट नसणार. त्यामुळे त्याबद्दलच्या भीतीला थारा द्यावे की *जे काय होईल ते होऊ दे* म्हणून बिनदिक्कत पुढे जावे अशा द्विधा मनस्थितीशी सामना करावा

लागेल. अशा वेळी ही कृती आपल्या जीवनमूल्यांच्या जवळ जाणारी आहे की नाही वा ती कितपत जवळ आहे हा विचार आपल्याला मार्गदर्शी ठरेल.

Acceptance and Commitment Therapy (ACT) या उपचार पद्धतीतसुद्धा भावनांना अव्हेरण्यापेक्षा त्यांचा स्वीकार करून आपल्या तत्वांशी बांधिल असण्यावर भर दिला आहे. ही थेरपी नकारात्मकतेवर जय मिळवण्याच्या प्रयत्नात आहे. नकारात्मक भावनेवर लक्ष केंद्रित केल्यामुळे त्यातून काहीही हाती लागत नाही. त्यामुळे आहे तशा स्थितीत भावनांचा स्वीकार करत राहणे याला पर्याय नाही. आपण आयोजित केलेल्या एखाद्या पार्टीत नको असलेले गेस्ट्स घुसत असले तरी आपण त्यांना हाकलून देत नाही, कारण पार्टीत रसभंग होऊ नये हा उद्देश त्यामागे असतो. तशाच प्रकारे या नकारात्मक भावना आपल्या आयुष्यात न बोलविता आलेले असतात व त्यांना सहन करण्यापलिकडे आपल्या हातात काहीही नसते याची जाणीव असणे हाच त्यावर उपाय असू शकेल. कितीही प्रयत्न केले तरी भीती किंवा इतर तत्सम भावना आपल्या मनाच्या कोपऱ्यात कुठे तरी ठाण मांडून असतात. व त्यांना बाहेर काढणे अशक्यातली गोष्ट ठरते. परंतु आपण याची जाणीव ठेवून आपली कृती करत राहणे हाच यावरील उपाय ठरू शकेल. भावना नेहमीच आपल्याला एखाद्या रोलरकोस्टरमध्ये नेल्यासारखे अनियंत्रित अवस्थेत नेण्यासारखे असतात. समुद्रातील लाटावर स्वार झाल्यासारखे त्यांच्यावर स्वार होण्याचे कौशल्य आपल्याकडे असल्यास या भावनांचा तितकासा त्रास होणार नाही हे मात्र निश्चित.



# शत – प्रतिशत हिंदुत्व... फक्त हिंदुत्व

धीरेंद्र झा यांच्या *शॅडो आर्मीज* या पुस्तकाचे उपशीर्षक Fringe Organizations and Foot Soldiers of Hindutva हे असून त्यावरून पुस्तकाचा रोख कुणाकडे आहे हे कळू शकेल. लेखकाने राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या छत्राखाली भारतभर सांस्कृतिक उन्नयनाचे कार्य करत असलेल्या सनातन संस्था, हिंदू युवा वाहिनी, बजरंग दल, श्री राम सेने, हिंदू ऐक्य वेदी, राष्ट्रीय शीख संगत इत्यादी निरनिराळ्या राज्यातील (कु)प्रसिद्धीच्या झोतात असलेल्या प्रमुख संघटनांची विस्तृतपणे माहिती दिली आहे.

जरी आरएसएस स्वतःला सांस्कृतिक संस्था म्हणून बिरूद मिरवत असली तरी तिची राजकीय महत्वाकांक्षा कधीच झाकलेली नव्हती व नाही. व याच महत्वाकांक्षेला खत – पाणी पुरवणाऱ्या या चेला संघटना आपल्या हिंसक व दहशतीसदृश कारवायामुळे बघता बघता मातृसंस्थेच्यापेक्षा मोठ्या दिसत आहेत. यांच्या एखाद्या आततायी कृत्यामुळे संघ बदनाम होण्याची शक्यता असल्यास आरएसएस त्या संघटनेशी आमचा संबंध नाही हे सांगून नामानिराळे राहते. म्हणूनच या संघटना बिनबोभाटपणे काहीही करण्यास तयार असतात, हे उघड गुपित आहे.

परंतु हे हिंदुत्व प्राप्त करण्यासाठी वाटेल ती किंमत देण्याच्या तयारीत सर्व घटक आहेत. एकदा का ही हिंदुत्वाची प्रक्रिया पूर्ण झाली की हा समाज *दुखभरे दिन बीतेरे भैया* असे सुस्कारा सोडत अच्छे दिनात न्हाऊन निघेल, याबद्दल सत्ताधारी पक्ष व त्यांचे खंदे पुरस्कर्ते यांच्या मनात तिळमात्रही संशय नाही. परंतु संपूर्ण देशाला हिंदुत्वाच्या दावणीला बांधण्याची ही कल्पना अत्यंत भयानक आहे, हे धीरेंद्र के झा यांनी लिहिलेल्या शॅडो आर्मीज (Shadow Armies) हे इंग्रजी पुस्तक वाचताना प्रकर्षाने जाणवू लागते.

लेखक, धीरेंद्र झा मात्र या परिवारातील काही चुने हुये संघटनांचा वेध घेत या भारतीय समाजापुढे काय वाढून ठेवले आहे याची थोडी फार कल्पना देण्याचे प्रयत्न करत आहेत. 1984च्या लोकसभेत फक्त दोन सदस्य असलेली भाजप 2014मध्ये 284 सदस्याना निवडून आणून सत्ता हाशिल करू शकली यातच हा समाज कुठल्या दिशेने जात आहे याची कल्पना येईल. भाजपच्या या यशस्वी दीर्घ प्रवासात झा यानी वर्णन केलेल्या या आठ प्रमुख संघटनांचा फार मोठा वाटा आहे. त्यामुळे या संघटनांचा इतिहास, त्यांची कार्यपद्धती व त्यांचे अंतर्गत ताणे बाणे समजून घेतल्यास हिदुत्व हे स्वप्न म्हणून न राहता वास्तव म्हणून स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर नाही, हे लक्षात येईल.

**सनातन संस्था**

या संस्थेतर्फे सनातन प्रभात नावाचे मराठी दैनिक काढले जाते व त्या पत्रिकेतून प. पू. आठवले आपल्या हिंदुत्वाबद्दलच्या विचारांचा प्रसार करत असतात. सनातन प्रभातच्या मते 2023पर्यंत हिंदू राष्ट्र प्रस्थापित होणार आहे. आठवले या माध्यमातून स्वतःची आरती ओवाळून घेत असतात. ही संस्था सर्व सत्ताधारी राजकीय पक्षांना चांगल्या प्रकारे हाताळू शकते याचा अनुभव दाभोलकरांच्या हत्येनंतर आला. काँग्रेसचे सरकार असूनही या संघटनेवर बंदी घातली नाही त्याचप्रमाणे आता सत्तेवर असलेले भाजपही त्यांना धक्का लावणार नाही याची तिला पूर्ण खात्री आहे म्हणूनच ती बिनधास्त आहे.

**हिंदू युवा वाहिनी**

गोरक्षा पीठ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संघटनेचे योगी आदित्यनाथ यांनी हिंदू युवा वाहिनी म्हणून पुनर्नामकरण करून त्याची व्याप्ती वाढवली. लेखकाने योगी आदित्यनाथ यांच्या राजकारणातील प्रवेशाबद्दल सविस्तरपणे लिहिले आहे. अजय मोहन बिस्त या ठाकुर जातीतल्या मुलाला गोरखपीठाच्या या पूर्वीच्या पीठाधीशानी वारसदार म्हणून नेमले व हाच वारसदार योगी

आदित्यनाथ म्हणून ओळखला जाऊ लागला. राजकारणात धर्मभावनेच्या वापर करत आपल्या क्षेत्रात निवडून येण्यासाठी योगीनी एक सुसज्ज यंत्रणा या संघटनेद्वारे उभी केलेली आहे. या संघटनेला सबकुछ योगीच आहेत हे जाणवते. याचे कार्यकर्ते योगी आदित्यनाथ असे उल्लेख न करता *गोरक्षा पीठाधीश्वर परमपूज्य योगीनाथजी महाराज* असे एखाद्या वाक्यातसुद्धा अनेक वेळा करतील. तुम्ही असे का करता हा प्रश्न विचारल्यास ते अस्वस्थ होऊन तुम्हाला मारहाण करण्यासही मागे पुढे पाहणार नाहीत.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचेच सर्व उद्दिष्ट राबवत असून सुद्धा ही संघटना स्वतःचेच स्वतंत्र धर्मकारण व राजकारण यांचा अजेंडा राबवण्याइतकी सशक्त झाली आहे. योगी आदित्यनाथ यांना 2-3 वेळा निवडून आणण्यात या संघटनेचा नक्कीच वाटा मोठा आहे, हे खुद्द आदित्यनाथही विसरू शकत नाहीत. म्हणूनच योगी उत्तर प्रदेशचे मुख्यमंत्रीपदी विराजमान झाल्यानंतर उत्तर प्रदेशातील तरुणांची फौज – 'डोक्यास भगवे मुंडासे, हाती भाला त्रिशूल किंवा असे मध्ययुगीन काहीही आणि मुखी सिया रामचंद्राचा घोष' – अशा प्रकारे सज्ज होऊन हिंदू धर्माच्या रक्षणासाठी सतत उभी राहणार आहे.

**बजरंग दल**

1984 साली स्थापन झालेल्या या युवा संघटनेचा प्रमुख उद्देश अयोध्येतील रामजन्मभूमीसाठी हिंदूंची मानसिकता तयार करणे हा होता. रामायण काळातील रामाला सर्वतोपरी मदत केलेल्या वानर सेनेप्रमाणे विश्व हिंदू परिषद व आरएसएस यांना मदत करण्यासाठी, रामभक्त मारुतीइतकी प्रचंड शक्ती आहे याचे उघड उघड प्रदर्शन करणारी म्हणून बजरंग दल नावाने ही संघटना उत्तर प्रदेशच्या कानाकोपऱ्यात उभी राहिली. बाबरी मशीदीच्या विध्वंसात सहभागी झालेले एकूण एक नेत्यांचा आशिर्वाद या संघटनेला लाभला आहे. बिहार व उत्तरप्रदेश या राज्यातील खेड्यापाड्यातील हिंदूंना संघटित करून

वाटेत शक्ती प्रदर्शन करत आयोध्येला पोचण्याचे काम या दलाने केले. तरुणांच्या या संघटनेचा *जो राम के काम न आये वो बेकार जवानी है* हा नारा होता. त्यामुळे लाखो तरुण या दलात सामील झाले कदाचित बजरंग दलाचा हिंस्र आक्रमकपणा नसता तर संघ वा विश्व हिंदू परिषद मशीद पाडण्यासाठी समर्थन दिले नसते असे पश्चात बुद्धीने म्हणता येईल. बजरंग दलाची वाढ मुख्यत्वे करून ओबीसी तरुणांच्या भरतीमुळे झाली असे म्हणण्यास वाव आहे. बेकार तरुणांच्या झुंडीच्या झुंडी या संघटनेत सामील झाले. त्यामुळे तत्वशून्य वा कुठल्याही प्रकारची नैतिकतेची चाड नसलेली ही संघटना संघाची रिझर्व फोर्स म्हणून कार्य करू लागली.

संघ परिवाराचा अजेंडा राबवण्यात ही संघटना नेहमीच पुढाकार घेते. हिंदू मुलींना मुस्लिमांच्या ताब्यातून सुटका करणे म्हणजे 100 गायी वाचवण्या-सारखे आहे, अशी मानसिकता त्या मागे होती. संघाच्या हिंदू - मुस्लिम समाजातील दरी वाढवण्याच्या कामाला ही संघटना खत पाणी घालते. त्यामुळे मुस्लिमांना आपल्या संख्याबळावर विसंबून राहण्याची पाळी आली. दंगलीत होरपळलेले मुस्लिम निराश्रित शहरी भागातील मुस्लिम वसतीत राहू लागले. एका प्रकारे मुस्लिमांचे छावणीकरण (ghettoization) होऊ लागले. एका ठिकाणाहून मुस्लिमांना पळवून लावल्यानंतर बजरंग दल मुस्लिम मुक्त ठिकाण म्हणून पोस्टर्स लावत होते.

**श्रीराम सेने**

श्रीराम सेनेचे सर्वे सर्वा असे म्हणवून घेणारा प्रमोद मुतालिक स्वतःबद्दल प्रौढी मिरवत असला तरी या संघटनेचा जन्म बजरंग दलातील अंतर्गत कुरबुरीमुळे झाला आहे, हे नाकारता येत नाही. कर्नाटकातील मंगळूरु येथील बजरंग दलातील भाजप व संघातील ब्राम्हण कार्यकर्त्यांच्या वर्चस्वामुळे तेथील इतर मागासवर्गीय कार्यकर्ते नाराज होते. निवडणुकीच्या काळात तर

सर्व महत्वाच्या पदावर उच्च जातीयांचीच निवड झाल्यामुळे बजरंग दलातील अंतर्गत जातीवाद उफाळला. ओबिसीच्या कार्यकर्त्यांना सभेतील खुर्च्या उचलण्याचे वा गाद्या अंथरण्याचेच कामं दिल्या गेल्यामुळे ते नवीन नेत्याच्या शोधात होते. नेमके त्याच वेळी प्रमोद मुतालिकाने दल/पक्षाची सूत्रे हातात घेतले व शिवसेनेत गेलेले इतर मागासवर्गीय कार्यकर्त्यांना बरोबर घेऊन राष्ट्रीय हिंदू सेना या नावाने एका वेगळ्या संघटनेची स्थापना केली व नंतर त्याचेच श्रीराम सेना म्हणून पुनर्नामकरण करण्यात आले.

**हिंदू ऐक्य वेदी**

उत्तर भारततातील राज्ये, महाराष्ट्र – गोवा आणि काही प्रमाणात कर्नाटक या राज्यात ज्या प्रकारे हिंदुत्वानी बस्तान बसवले आहे त्याप्रमाणे दक्षिणेतील केरळ, तमिळनाडू व आंध्र प्रदेश येथे हिंदू या शब्दाची जादुई जाणवत नाही. म्हणूनच संघ व पक्ष हे दोन्ही काही तरी निमित्त शोधून या राज्यात चंचुप्रवेश करण्याच्या बेतात असतात. याच रणनीतीचा भाग म्हणून केरळमध्ये हिंदू ऐक्य वेदी या नावाची संघटना हिंदुत्वाचा झेंडा फडकवण्यासाठी कार्यरत आहे. भाजपचे राजकारण केरळमध्ये आणण्यासाठी डावपेच म्हणून या संघटनेला भाजप रसद पुरवत आहे.

शासन नियंत्रित देवस्वम बोर्डच्या मगरमिठीतून केरळातील 3000 मंदिरांना मुक्त करण्याच्या आक्रमक पावित्र्यामुळे हिंदू ऐक्य वेदी अजूनही तग धरून आहे. ज्या प्रकारे मुस्लीम व ख्रिश्चन धार्मिकांची चर्च व मशीद पूर्णपणे त्या त्या धर्माच्या स्वाधीन असतात, त्याचप्रमाणे केरळ येथील देवळांची मालकी शासकीय बोर्डाच्या अखत्यारीत न राहता हिंदू भक्तांच्याकडेच असली पाहिजे या मागणीसाठी भाजप व हिंदू ऐक्य वेदी लढत आहेत. मुळात या मंदिरांचे उत्पन्न शासकीय तिजोरीत जाते व तेथून गोरगरीबांसाठी कल्याणकारी योजना राबवल्या जात आहेत यावरच हिंदू ऐक्य वेदीचा आक्षेप आहे. हिंदू भक्त या

देवळांना देणगी देतात परंतु भक्तांचा या देणगीवर अधिकार नाही याचे संघटनेला दुःख आहे.

**अभिनव भारत**

अभिनव भारत या संघटनेची सुरुवात कशी झाली हे एक गूढ आहे. 1905च्या सुमारास फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत असताना वीर सावरकर यानी इटलीतील माझिनीच्या प्रेरणेतून एका गुप्त संघटनेची स्थापना केली. या संघटनेचा सशस्त्र क्रांती व हिंसाचारावर विश्वास होता. परंतु 1906 साली सावरकरांना इंग्लंडला जाण्याची संधी मिळाल्यानंतर ही संघटना 1952 साली हिंदू महासभेने पुनर्जिवीत करेपर्यंत 46 वर्षे निद्रिस्तच राहिली. पुनर्जिवीत करण्यात कुणाचा हात होता याबद्दलही शंका आहेत. महात्मा गांधीचा खून करणाऱ्या नथुराम गोडसेचा भाऊ गोपाळ गोडसे याची कन्या व सावरकरांचे बंधू नारायण सावरकर यांची सून असलेल्या हिमानी सावरकरच्या मते मालेगाव बॉम्ब स्फोटातील समीर कुलकर्णी या आरोपीने अभिनव भारतला जीवदान दिले.

**भोंसला मिलिटरी स्कूल**

नाशिक येथील भोंसला मिलिटरी स्कूलची स्थापना डॉ. बाळकृष्ण मुंजे या कट्टर हिंदूनिष्ठाच्या प्रेरणेतून झाली. डॉ. मुंजे हे आरएसएसचे संस्थापक हेडगेवार यांचे राजकीय गुरु होते. हिंदूंची एके काळची क्षात्रवृत्ती पुनर्जीवित करण्यासाठी व मातृभूमीच्या रक्षणास कटिबद्ध असलेल्या हिंदू तरुणांना सनातन धर्माबरोबरच राष्ट्रीय संरक्षणाला उपयोगी पडणारे विज्ञान व युद्ध कला शिकवण्यासाठी एखादी शिक्षण संस्था उभारण्याचा उद्देश त्यामागे होता. या सोसायटीने पुढील काळात भोंसला मिलिटरी स्कूलची स्थापना केली. ही शाळा फक्त सैनिकी प्रशिक्षण देणारी शाळा नसून हिंदू सनातन धर्माचे जतन व संरक्षण करणारी शाळा आहे हेही त्यांनी या शाळेत प्रवेश करू

इच्छिणाऱ्यांच्या पालकांना पटवून दिले. शाळेच्या मैदानाला रामभूमी व शिक्षण घेणाऱ्या छात्रांना राम दांडी असे नावही देण्यात आले.

**राष्ट्रीय शीख संगत**

आरएसएसच्या मते संपूर्ण भारत हे एक हिंदू राष्ट्र असून येथील बौद्ध, जैन वा शीख धर्म हे हिंदू धर्मातील पंथ असून फार फार तर त्यांना हिंदू धर्मातील इतर जातीप्रमाणे जातीचा दर्जा देता येईल. याच गृहितकानुसार देशभर त्यांची प्रचार यंत्रणा काम करत आहे व त्यांना अडवणारेही कुणी नाहीत. अपवाद फक्त पंजाबचा. म्हणून 1986मध्ये हिंदू शीख संगतची स्थापना झाली. व या संगतचे काम पंजाबमधील शीख धर्माचे वर्चस्व हळू हळू कमी करत हिंदूंचा प्रभाव वाढवणे हा आहे. सुरुवातीपासूनच हिंदू शीख संबंधातील आरएसएसचे सिद्धांत पक्के होते. ब्रिटिशानी जेव्हा शीख आयडेंटिटी वेगळे ठेवण्याचे प्रयत्न करत होते तेव्हा हिंदू संघटनेचा त्याला विरोध असे.

मुळात राष्ट्रीय शीख संगतची स्थापना शीख विरोधाची धार कमी करण्यासाठी झाली होती. कारण इंदिरा गांधीची हत्या शीख अंगरक्षकांनी केल्यामुळे दिल्लीतील धार्मिक दंगलीमध्ये शिखांची मोठ्या प्रमाणात कत्तल करण्यात आली. दिल्लीच्या दंगलीतच 2733 शिंखांची हत्या झाली होती. दंगलीची आग कानपूर, बोकारो, जबलपूर व रूरकेलापर्यंत मोठ्या प्रमाणात पोचली. दंगलीतील शीख समुदायाची होरपळणे बघून त्याचा फायदा उठवण्यासाठीच संगतची स्थापना झाली असावी असे लेखकाला वाटते.

या संघटना आरएसएसचे केवळ होयबा संघटना नाहीत. त्यांनाही स्वतंत्र अस्तित्व आहे, त्यांची एक विचारधारा आहे, एक अजेंडा आहे व तो अजेंडा राबवण्याची ताकदही त्यांच्याकडे आहे. या ताकदीच्या जोरावर या संघटना काहीही करू शकतात, याचा प्रत्यय गेल्या काही वर्षातील घडामोडीतून आलेला आहे. डॉ. दाभोलकर, कॉम्रेड पानसरे व डॉ कलबुर्गी यांचा भरदिवसा

केलेल्या हत्या, मालेगावमधील बॉम्बस्फोट, इतर काही ठिकाणचे असफल झालेले काही दहशती प्रयत्न इत्यादीमध्ये सनातन संस्था व अभिनव भारतचा हात आहे, हा दोषारोप केला जात आहे. गौरक्षा, घर वापसी, लव्ह जिहाद सारख्या नॉन-इश्यूंचे निमित्त करून अल्पसंख्यांकांना नाहक त्रास देण्यास वा प्रसंगी हिंसाचाराचा उद्रेक करण्यात उत्तर प्रदेश येथील हिंदू युवा वाहिनीचे कार्यकर्ते माध्यमावर झळकत आहेत. बाबरी मशीदीच्या विध्वंसात व त्यानंतरच्या दंगलीत बजरंग दलाचा सक्रीय सहभाग होता. कर्नाटकातील श्रीराम सेने ही संघटना व्यक्ती स्वातंत्र्यावर गदा आणते. राष्ट्रीय शीख संगतला शीख हा वेगळा धर्म आहे हेच मान्य नाही. भोसला मिलिटरी स्कूल हिंदू फूट सोल्जर्स तयार करणारी संस्था आहे. अशा प्रकारे हिंदू चेला संघटनांच्या काळ्या कुट्ट इतिहासाबद्दल लेखकाने छानपणे टिप्पणी केली आहे.

पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या प्रत्येक प्रकरणासंबंधीच्या संदर्भसूचीवरून लेखकांची बहुतेक विधानं व निष्कर्ष केवळ लेखकाला वाटतात वा सांगोपांगी गोष्टीवरून केलेले नसून त्यामागे अविश्रांत संशोधन आहे हे पुस्तक वाचत असताना प्रकर्षाने जाणवू लागते. पुस्तकातील विषयासंबंधी एखाद्या फूट सोल्जरशी संवाद साधत असतानासुद्धा स्वतःची मतं न लादता किंवा आपले शब्द त्याच्या तोंडी न घालता समोरच्या व्यक्तीला बोलते केल्यामुळे पुस्तकाच्या आशयात नक्कीच भर पडली आहे.

आपल्या भारतीय समाजाची आजची स्थिती व भविष्यात काय वाढून ठेवले आहे हे समजून घेण्यासाठी हे पुस्तक नक्कीच उपयोगी पडेल व त्यासाठी लेखकाचे आभार मानायला हवेत.

**Shadow Armies:**

**Fringe Organizations and Foot Soldiers of Hindutva**

*Dhirendra K Jha*

# आर्थिक व्यवहारांना बुडवणारे सायकल समर्थक!

**कार वापरू नका... सायकल वापरा,** असे कंठशोष करणारे पर्यावरणवादी राष्ट्राच्या अर्थशास्त्रालाच सुरुंग लावायला निघाले आहेत असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

कारण सायकल स्वार

- वाहन कर्ज घेत नाही.
- वाहन विमा घेत नाही.
- इंधन विकत घेत नाही.
- सर्विस सेंटरमधील वाहनं धुण्याच्या वा वाहनं दुरुस्त करून घेण्याच्या सुविधा वापरत ऩाही.

एवढेच नव्हे तर स्वतःच्या आरोग्याची काळजी घेणारी ही मंडळी आर्थिक व्यवहारासाठी निरुपयोगी ठरतील. कारणः

- ते औषधं विकत घेत नाहीत.
- ते खासगी डॉक्टरांच्याकडे (भरमसाठ फी भरून सल्ला विचारण्यासाठी) जात नाहीत.
- यांच्यामुळे देशाच्या जीडीपीत काही भर पडत नाही.

या उलट मॅक्डोनाल्डची फ्रॅंचैजी घेतल्यास किमान 30 तज्ञांना तुम्ही श्रीमंत करू शकताः

- 10 दंतवैद्य
- 10 हृदयरोगतज्ञ
- 10 वेट लॉस तज्ञ

आता तुम्हीच ठरवा - सायकलीचे समर्थन की मॅक्डोनाल्ड...!!

# बाजार शरण 'गुरु' चरित्र

तथाकथित आध्यात्मिक सुख समाधानासाठी भारतातील अशिक्षित जनसामान्य (आणि शिकले सवरलेलेसुद्धा!) कुठल्याही 'गुरू'ला डोक्यावर चढवून घेतील याची प्रचिती भावदीप कांग या पत्रकर्तीने लिहिलेल्या Gurus हे इंग्रजी पुस्तक वाचताना नक्कीच येईल. यातील महर्षी महेश योगीपासून भय्यू महाराज पर्यंतच्या गुरुजनांच्या एकेका कारनाम्यावर ओझरती नजर टाकली तरी आधुनिक तंत्रज्ञान, व्यवस्थापन शास्त्र, मानसशास्त्र यांचा पुरेपूर वापर करत अध्यात्म हे एक प्रॉडक्ट म्हणून विकत आहेत व आपली तुंबडी भरून घेत आहेत, हे लक्षात येईल. जाहिरातींचा प्रचंड मारा करत सप्लाय-डिमांडच्या चक्रात भक्तगणांना अडकवून स्वतःचे ऐषारामी व पंचतारांकित जीवन हे गुरुजन जगत आहेत.

भावदीप कांग ही फ्री लान्स पत्रकार असून गेली 27 वर्षे ती वेगवेगळ्या पत्रिकेसाठी लिहित आहे. तिच्या या पुस्तकात महर्षी महेश योगी, धीरेंद्र ब्रह्मचारी, चंद्रास्वामी, माता अमृतानंदमयी, श्रीश्री रवीशंकर, मुरारी बापू, जग्गी वासुदेव, बाबा रामदेव व भय्यू महाराज यांच्या कर्तृम कर्तृत्वाचा शोध घेण्याचा प्रयत्न तिने केला आहे. एखादं अपवाद वगळता यातील बहुतेक गुरु, योग व ध्यान (आणि आयुर्वेद) यांच्या व्यापारीकरणातून त्या पदापर्यंत पोचलेले आहेत. हिमालयात तपस्या करून सिद्धी प्राप्त करून घेतलेले आहेत, असे ते दावे करतात. तेथे त्यांना साक्षात्कार झाला. जगातील दुष्ट शक्तींचा नाश करत या जगात कायमचे सुख शांती नांदण्याचा वसा त्यांनी घेतला आहे, असे ते छातीठोकपणे सांगत असतात.

माहिती तंत्रज्ञान व खासगीकरण-जागतिकीकरण-उदारीकरणामुळे व्यवहारातील आपल्या सर्व व्याख्या बदलत आहेत. 'गूगल अंकल'च फक्त आपल्या प्रश्नांना उत्तर देऊ शकतो हा समज दृढ होत चालला आहे. परंतु

गूगलपूर्व व गूगलोत्तरच्या संक्रमण कालखंडात भारतातील गुरू मंडळींनी परिस्थितीचा पूर्ण फायदा घेतला व जगभरातील लोकांना उल्लू बनवण्यात यशस्वी झाले. त्यामुळे लेखिकेने प्रसिद्धीच्या झोतात असलेले, वा त्यांच्याबद्दल गैरसमज असलेले वा भन्नाट व्यक्तिमत्व असलेले अशा गुरूंची निवड या पुस्तकासाठी केली आहे. यातील प्रत्येक गुरु या ना त्या त्या कारणाने प्रसिद्धीच्या झोतात आहेत. परमेश्वराच्या अवताराचे कार्य पुढे नेत आहेत, भरपूर बोलघेवडे आहेत, भक्तांच्या हाकेला ओ देणारे आहेत, त्याच्या शारीरिक व/वा मानसिक आजारांचे निदान करून आजारावर फुंकर घालणारे आहेत. परंतु हे सर्व आधुनिक तंत्रज्ञानाच्या आधारे करत आहेत, हे विशेष.

मुळात त्यांच्या प्रसिद्धीला माहिती तंत्रज्ञानाने व इलेक्ट्रॉनिक माध्यमाने फार मोठा हातभार लावला आहे, हे विसरू शकत नाही. या गोष्टींचा पुरेपूर फायदा या सर्वांनी करून घेतला आहे. याच्या आधारे त्यांना संपत्ती मिळाली, सत्तेत अप्रत्यक्षरित्या सहभागी होता आले, सत्ताधाऱ्यांशी जवळीक करता आली, आणि राष्ट्रीय व/वा स्थानिक राजकारण/अर्थकारण यावर कायमचा ठसा उमटवण्यात यशस्वी झाले. या जाहिरातबाजीमुळे गुरुंचे डीपर्सनलायझेशन होत होत ब्रँडिग वाढत गेले. त्याचाही त्यांनी पुरेपूर फायदा करून घेतला. त्यांचे प्रॉडक्ट्स चेल्यांच्या (ग्राहकांच्या) मागणीनुसार ठरू लागले. प्रवचन, सत्संग, ध्यान, योगसाधना, आयुर्वेद, कौटुंबिक सल्ला, कुटुंबातील हेवेदावे सोडवणे, जात-जमातीतील भांडण तंटा सोडवणे या स्वरूपात ग्राहकांच्या मागणीप्रमाणे प्रॉडक्ट्स बदलत गेले. टीव्ही चॅनेलवरील या ज्ञानाचे रतीब रोज 24 तास व वर्षातील बाराही महिने अव्याहतपणे चाललेले बघताना वीक्षक थक्क होऊन जातो. 70च्या शतकात टेप्स व डीव्हिडी, व्हिसीडी मधून हे ज्ञान पाझरत होते. परंतु या चॅनेल्सनी यांना कालबाह्य ठरवले. इंटरनेट, यूट्यूब वा मोबाइलनी सर्व

गुरुंना अभय देत अत्युच्च शिखरावर पोचविले. सामाजिक माध्यमातून यांच्या भक्तगणांनी स्वतःच्या गुरुंची आरती ओवाळली व इतर गुरुंची हेटाळणी केली.

भावदीप कांग यानी या पुस्तकासाठी गुरुंना निवडताना उद्यमशीलतेला प्राधान्य दिल्यासारखे वाटते. त्यामुळे त्या अर्थाने ब्रह्मकुमारी वा आर्यसमाज यासारख्या धार्मिक पीठ वा डेरा यांच्या प्रमुखांची निवड केली नाही. त्याचप्रमाणे येथील गुरु हिंदू धर्माचा आधार घेत आध्यात्मिकतेचा गाजावाजा करणारे आहेत. मुळात यात कुठल्याही प्रकारची शोध पत्रकारिता वा प्रचारकी/प्रसारकीचा थाट नाही. यातील गुरुंच्या बद्दल वाचताना हे फार मोठे तत्वज्ञ होते किंवा आहेत, धर्मांचा तुलनात्मक अभ्यास केलेले आहेत किंवा आध्यात्मिकतेबद्दल चिंतन केलेले आहेत, असे काही वाटत नाही. लेखिकेने त्यांच्या कर्तृत्वामागील मानसिकतेचेही विश्लेषण केले नाही किंवा यांच्यामुळे सामाजिक स्थित्यंतर झालेले आहेत असा दावाही करत नाही. टीव्हीच्या पडद्यावर हे गुरुजन कसे दिसतात व मनमानी विधान करतात यावरून त्यांचे व्यक्तिमत्व उभे करण्यात ती यशस्वी झालेली आहे. या गुरुंच्या आयुष्यातील घटना व घटनाक्रम उपलब्ध असलेल्या माहितीच्या आधारे मांडून यांच्याबद्दलच्या आपल्या ज्ञानात भर घातली आहे.

1970च्या सुमारास पॉप कलाकारांचा आवडता गुरु, महर्षी महेश योगी हे नाव जगभर (म्हणजे अमेरिकेत!) प्रसिद्धीच्या झोतात होते, हे अनेकांना आठवत असेल. इंग्रजी भाषेच्या शब्दकोशाला ‘मंत्र’ हा शब्द बहाल करणाऱ्या या योगींच्या शिष्यवर्गात शर्ले मॅक्लेन, बर्ट रेनॉल्ड्स, क्लायंट ईस्टवुडसारखे मातब्बर नट-नट्या होत्या. बीटल्सचा चमू याच्या प्रेमात पडला होता. बघता बघता तो प्रसिद्धीच्या शिखरावर चढला. ठिकठिकाणी योगाश्रम उभे केले. गुरुत्वाच्या नियमाचे उल्लंघन करणाऱ्या ‘ध्यानातून अधांतरित अवस्था’ (Levitation through meditation) या स्वर्गसुखाचे आमिष

दाखवत हजारोनी शिष्यसमुदाय जमवला. त्याचे ‘प्रत्ययातीत चिंतन’ (Transcendental Meditation – TM) जगातील कुठल्याही समस्येचा अक्सीर इलाज आहे असा तो दावा करू लागला. या त्याच्या प्रलोभनाला बळी पडून यासाठी शिष्य रांगेत उभे असत. कुठलाही उपास-तपास नाही, शारीरिक यातना नाहीत, त्यागाची भानगड नाही, चंगळवादी जीवनशैली बदलण्याची घाई नाही, या प्रकारच्या सुलभीकरण केलेल्या अध्यात्माला अमेरिकन जनता भुलली नसल्यास नवल म्हणावे लागेल.

मध्यप्रदेश येथील महेश वर्माने महेश योगी असे नामांतर करून आयुष्यात अनेक गोष्टी केल्या; हिमालयात जाऊन ब्रह्मचर्याची दीक्षा घेतली, जोशीमठाच्या गुहेत साधना केली, काही काळ शंकराचार्यांचा सेक्रेटरी म्हणून काम केले, उत्तरकाशी मठाचा ताबा घेतला, दक्षिणेतील रामेश्वरम व तिरुवनंतपुरम येथे जाहीर प्रवचन केली, ओंकारातून मुक्तीचा प्रचार केला, मुक्तीसाठी घरदार सोडण्याची गरज नाही – घरी बसूनसुद्धा मुक्ती मिळते असा विश्वास दिला. मुंबई, कोलकत्ता अशा 25 ठिकाणी ध्यानमंदिरांची स्थापना केली, TM सिद्धीसाठी 25000 शिक्षकांना प्रशिक्षित केले, डिस्नेलँड येथे साधना करून दाखवली, हसणारा गुरु (Giggling Guru) म्हणून प्रसिद्धी मिळवली, हेन्री नायबर्ग या श्रीमंत उद्योजकाच्या रोल्स रॉयसमधून युरोपचा दौरा करून तरुण-तरुणींना प्रभावित केले, पाच लाख चेल्यांना योग उड्डाण (Yogic flying) करायचे शिकवले, दोन लाख विद्यार्थ्यांना वैदिक शिक्षण दिले, कॅनडा, ब्रिटन व अमेरिकेमध्ये आयुर्वेद उपचार केंद्रांची साखळी उभी केली, राम राज्याचे स्वप्न दाखवले, ध्यानकेंद्राच्या प्रमुखाना ‘राम राजे’ करून टाकले, जगभरातील आश्रमातील दैनंदिन व्यवहारासाठी राम-मुद्रा नावाचे चलन अंमलात आणले, महर्षी इंटरनॅशनल विद्यापीठाची स्थापना केली....असे अनेक उपक्रम राबवत हा योगी महर्षीपदापर्यंत पोचला.

Spiritual Regeneration Movement (SRM) foundationच्या माध्यमातून भरपूर संपत्ती गोळा केली. 12000 एकर जागेवर ताबा मिळवला. त्याची किंमतच 60 हजार कोटी होती!

इंदिरा गांधी परिवाराचा गुरु म्हणून धीरेंद्र ब्रह्मचारी हे नाव सुपरिचित आहे. यानी अध्यात्माच्या काळया व्यवहारातून अफाट संपत्ती मिळवली. सत्तेचे सूत्र हलवले. या पूर्वीच्या एकाही गुरुने राजकीय सत्तेचा विचार केला नव्हता. परंतु धीरेंद्र ब्रह्मचारी यानी जागतिक सत्ताधाऱ्यांशी जवळीक साधून नाव कमविले. यावरून खरोखरच त्यांनी इतिहासाला कलाटणी दिली असेल का? हा प्रश्न विचारावासा वाटतो. याच्या असण्या-नसण्यामुळे काही फरक पडला असता का? या प्रश्नाचे उत्तर भविष्यकाळ देईल. एक मात्र खरे की गुरुजनांनी राजकीय नेत्यांच्या जवळ पास वावरण्याचा पायंडा ब्रह्मचारीनेच पाडला.

1975च्या सुमारास लोकनायक जयप्रकाश नारायण यांच्या नेतृत्वाखाली संपूर्ण क्रांतीचा नारा देशभर गाजत होता. त्याच सुमारास नेमीचंद उर्फ चंद्रास्वामी या तरुण साधूने जेपीना आकर्षित केले. परंतु पुढील 20 वर्षात या साधूने केलेल्या जागतिक पराक्रमांचा हिशोब मांडल्यास गुरु या पदास काळिमा आणणारा तो ठरेल. अनेक देशातील राजकीय नेत्यांशी गट्टी जमवण्यास तरबेज असलेल्या या चंद्रास्वामीवर शस्त्रास्त्रांची तस्करी करत असल्याचा आरोप होता. एका देशाच्या प्रधानमंत्र्याच्या खुनाचाही आरोप त्याच्यावर होता. त्याच्या वाढदिवसाच्या समारंभाला झाडून सर्व सत्ताधारी हजेरी लावत होते. परंतु 1996च्या सुमारास त्याच्या प्रसिद्धीला ओहोटी लागली. व जनसामान्यांच्या उपेक्षेला सामोरे जावे लागले. आता तो तिहार जेलमध्ये सडत आहे.

दैवी आलिंगनातून (Divine hug) करोडोंनी माया जमविलेल्या माता अमृतानंदमयीचे नाव सुपरिचित आहे. तिच्या भक्तगणांना एकदा-दोनदा नव्हे

तर हजारदा आलिंगन घेतले तरी समाधान वाटत नसेल. माय चाइल्ड, माय चाइल्ड हे शब्द पुटपुटल्यावर oxytocinचा क्षण आल्यासारखा भासत असेल. साडेतीन कोटी जणांना जादूची झप्पी देणाऱ्या या गुरुमातेचे नाव जागतिक रेकॉर्ड्सच्या यादीत नक्कीच नोंदलेले असेल. स्वतःच्या संपत्तीतील काही वाटा तिने ठिकठिकाणी अत्युच्च शिक्षण देणाऱ्या शैक्षणिक संस्था उभ्या केल्या. एक मात्र खरे की तिच्या शिक्षणसंस्थेतून बाहेर पडणाऱ्या उच्चशिक्षित पदवीधरांनासुद्धा या मातेजवळ दैवी शक्ती आहे याची खात्री पटलेली असते. त्यामुळेच ही सुधामणी बघता बघता अध्यात्माच्या अत्युच्च शिखरावर पोचली. ती स्वतःला अवतारी स्त्री समजत नसली तरी तिच्याजवळ अतींद्रिय शक्ती आहे याबद्दल तिच्या भक्तांना तिळमात्र शंका नाही. ती केवळ आध्यात्मिक गुरुमाता नसून शिक्षण, आरोग्य, पर्यावरण, दारिद्र्य याविषयीसुद्धा प्रवचन देत असते. जगाच्या सर्व समस्यावर आयुर्वेदामधून उत्तर मिळेल याबद्दल तिची खात्री आहे.

महर्षी महेश योगीच्या पठडीत तयार झालेल्यापैकी रामदेवबाबा व श्रीश्री रवी शंकर यांनी आपल्या देशाची virtual वाटणी केल्यासारखे उत्तरेकडील राज्यात रामदेव बाबा व दक्षिणेकडील राज्यात श्रीश्री रवी शंकर आध्यात्मिक राज्य करत आहेत. महेश योगीच्या सर्व व्यापारीतंत्रांचा वापर करत हे दोघेही आपले प्रॉडक्ट्स चेल्यांच्या माथी मारत आहेत. त्यामुळेच कदाचित श्रीश्री रवी शंकरचे आर्ट ऑफ लव्हिंग (AOL)नसून आर्ट ऑफ सेलिंग लव्ह म्हणून टीका केली जात आहे.

दहा दिवसाच्या मौनव्रताच्या काळात सुदर्शन क्रिया करत असताना रवी शंकरला दैवी साक्षात्कार झाला व त्यातून प्रेरणा घेत त्यानी ठिकठिकाणी वेदविज्ञान विद्यापीठाच्या शाखा उभारल्या. विद्यापीठाच्या ट्रस्टमध्ये माजी न्यायमूर्ती अय्यर, भगवती, बेंगळूरूचे मेयर अशी मातब्बर मंडळी असल्यामुळे

याला बस्तान बसविण्यात कुठलीही अडचण आली नसावी. कर्नाटक शासनाने नाम मात्र किमतीत बेंगळूरू येथे रवी शंकर यांना जागा दिली व 200 विद्यार्थ्यांची वेदविद्येची सोय केली. महर्षी महेश योगीनेसुद्धा हेच तंत्र वापरून दिल्ली येथील जागा बळकावली होती. सुदर्शन क्रिया योग यातून AOL च्या उद्योगाची मुहूर्तमेढ रोवली व बघता बघता रवी शंकरला जागतिक प्रसिद्धी मिळाली. ज्या प्रकारे AOLचे मार्केटिंग रवी शंकर करत आहे त्याला तोड नाही. मागणी तसा पुरवठा या बाजारीकरणाच्या संदेशाप्रमाणे आपल्या प्रत्येक शिष्याला समाधान करण्यात रवी शंकर यशस्वी होत आहे. किंबहुना शिष्यांचे ब्रेनवाशिंग करण्याची हतोटी त्याला सापडली आहे. रवी शंकर याच्या मते त्याच्या आध्यात्मिक व्यवसायात इतर स्वामी, गुरु, आचार्य, बाबा, बुवा यांच्या दुकानामुळे याच्या उद्योगाला कुठलेही अडचण येत नाही. कारण यासाठीच्या जागतिक बाजारपेठेत अशा लाखो गुरुंना समावून घेण्याची क्षमता आहे. या समाजाला अशा बाबा-बुवांची अत्यंत गरज आहे, असे त्याचे प्रांजळ मत आहे. राजकीय दृष्ट्या नरेंद्र मोदी व सत्ताधारी भाजप यांच्याशी घनिष्ठ संबंध असल्यामुळे त्याचे काही बिघडत नाही, असेही त्याचे मत आहे.

AOLच्या कोर्सचे इतके का वेड आहे? कदाचित AOL हे स्मार्ट म्हणवून घेणाऱ्यांसाठी असावी. ज्यांना रिकामा वेळ आहे वा शारीरिकरित्या आपण अस्वस्थ आहोत असे ज्यांना वाटते, वा आपण एखाद्या भव्य दिव्य गोष्टीशी जोडलेलो आहोत अशी ज्यांची भावना आहे तेच AOLचा पाठपुरावा करतात असे लेखिकेला वाटते. हरमिंदर साहिब वा अजमेरचा शरीफ दर्गा वा शिरडी साईबाबाला हजारो संख्येने जाणारे, त्यासाठी शारीरिक वेदना सहन करणारे AOLच्या भानगडीत पडणार नाहीत. कारण अशा ठिकाणी जाणाऱ्या सश्रद्धांच्या मनात हरमिंदर साहिब वा अजमेरचा शरीफ वा शिरडी साईबाबा

दुःखाचा पर्वतसुद्धा हलवू शकतात हा विश्वास असतो. तो विश्वास AOLच्या भक्तगणात नसावा असे वाटते.

लेखिकेच्या मते रामदेव बाबा हा virtual गुरु आहे. कारण त्याचा वावर प्रत्यक्षापेक्षा टीव्हीच्या पडद्यावरच जास्त असतो. हसताना, खिदळताना वा योगाच्या प्रात्यक्षिके करत असताना त्याचे दर्शन होत असते. गेल्या वीस वर्षात या योगी पुरुषावर इतकी टीका झाली तरी दाढीच्या आत लपलेल्या त्याच्या चेहऱ्यावरच्या सुरकुतीत थोडासाही बदल झालेला नसावा. गंमत म्हणजे त्याच्या भोवती इतके गूढ वलय आहे की तो कुणाच्याही आवाक्यात येत नाही. कदाचित रामदेव बाबा, योगगुरुच्या प्रतिमेबरोबरच सत्ताकांक्षाची प्रतिमासुद्धा जपत असावा. परंतु 2014च्या निवडणुकीत त्याच्या राजकीय आकांक्षेला खीळ बसली. त्याच्या मते तो फक्त आपली छाप पाडण्यासाठी राजकारणाच्या आखाड्यात उतरला होता म्हणे. अण्णा हजारेंच्या जनलोकपाल बिलसाठी पाठिंबा देण्याचे निमित्त साधून राजकारणात बस्तान बसवण्याच्या प्रयत्नात तो अयशस्वी ठरला. यापूर्वीसुद्धा 2011च्या दिल्ली येथील जाहीर सभेतून पोलिसांच्या तावडीतून सुटण्यासाठी त्याला स्त्रीवेषातून पळ काढावा लागला. योगविश्वाचा अधिपती व सर्व इंद्रियावर ताबा असलेल्या या गुरुला असे काही तरी करावे असे सुचलेच कसे? एक मात्र खरे की भाजपने याच्या ब्रँडचा आधार घेत सत्ता हाशील केली. परंतु शेवटी त्या पक्षानेसुद्धा त्याला झिडकारले. भाजपबरोबरच्या गाढ मैत्रीमुळे रामदेवबाबाच्या मागे लागलेला CBI व ED संचालनालयांचा ससेमिरा मात्र सुटला. आता रामदेव बाबा म्हणजे (पातंजलीची म्हणजे आद्य योगगुरु ही ओळख पुसून काढून) पातंजली ब्रँड साबण, मध, आटा यासारख्या गृहोपयोगी वस्तू वा वाण सामान अशी स्थिती आहे.

हे पुस्तक वाचत असताना या गुरुमालिकेत न शोभणारे गुरु म्हणजे मोरारी बापू, सद्गुरू जग्गी, व भय्यू महाराज असे म्हणता येईल. मोरारी बापूच्या 'रामकथा'ने उत्तर भारताला भुरळ घातली. व मोरारी बापू गुरु पदापर्यंत पोचले. परंतु त्यांच्याबद्दल वाचताना हे सर्व अर्थाने एक निरुपद्रवी गुरू आहेत असे वाटते. अण्णा हजारे यांच्या प्रेमात पडलेले जग्गी वासुदेव हे मूळचे कर्नाटकातले. इतर गुरुप्रमाणे यांच्याबद्दलही अनेक दंतकथा आहेत. योगाचे क्लासेस घेत घेत शक्ती चलन क्रिया, भाव स्पंदन यारखे उपक्रम राबवत त्यानी ईश आश्रमाची स्थापना केली.भव्य ध्यानगंगा मंदिर बांधले. शिष्यांची संख्या व त्यांच्या सेलिब्रिटी स्टेटस् वरून गुरूचे मूल्यमापन करत असल्यास जग्गी वासुदेवाचा प्रथम क्रमांक लागेल. लठ्ठ पगाराच्या नोकऱ्या सोडून अनेकांनी त्याचे शिष्यत्व पत्करले आहे. जग्गीच्या मते विनाशापासून या जगाला तोच फक्त वाचवू शकतो. महत्वाच्या पदावर असलेल्या 2000 विचारवंतांची (game changers) यादी त्याच्याकडे असून त्यांना दिलेल्या एका आठवड्याच्या प्रशिक्षणातून असाध्य ते साध्य करण्याची किमया त्याच्याकडे आहे, म्हणे.

रामदेवबाबाच्या उद्योजकत्वावर जग्गीचे प्रेम आहे. रामदेवबाबाइतके जग्गीला टीव्हीवर दिसण्याइतके वेड नसले तरी फुटबॉल, क्रिकेट खेळाडूंच्या शिबिरात, कार्पोरेट्सच्या अधिवेशनात त्याची हजेरी असते. तो फक्त आरामखुर्चीत बसून सत्संग करणारा गुरू नाही; तर धाडसी खेळ, वेगवान गाड्या व इतर खेळामध्ये प्रत्यक्ष भाग घेणारा सन्यासी आहे.

इंदौरच्या मध्यवर्ती ठिकाणी एका लहानशा जागेत राहणाऱ्या भय्यू महाराजांची छबी एखाद्या मध्यमवयीन सिनेनटासारखी आहे. पांढरे शुभ्र (खादी) कुर्ता, पायजमा व त्यांना मॅचिंग दिसणारे दंतपंक्ती, चेहऱ्यावर सुहास्य, यांच्या जोरावर त्यानी अनेक राजकीय नेत्यांना आपलेसे करून घेतले आहे.

बाळासाहेब ठाकरेपासून प्रतिभा पाटील, नितिन गडकरी वा गल्ली बोळातील कुठलाही होतकरू राजकीय कार्यकर्ता त्याच्यापर्यंत सहज पोचू शकतात. सामान्यपणे ते कुठल्याही देवळात जात नाहीत. धर्मामधून समाजसुधारणा हवी व कर्मकांडातून स्वतःचेच कल्याण करून घेणाऱ्या वृत्तीला आळा बसावा असे त्यांना वाटते. त्यांच्या आश्रमात नाथ संप्रदायातील कालिका माता, सूर्य भगवान आणि दत्तात्रेय यांचे फोटो आहेत. इतर गुरु आपण किती मानववादी आहोत याचे शेखी मिरवत असतात. भय्यू महाराज मात्र स्वतःला देशभक्त म्हणवून घेण्यात धन्य मानतात. एका हातात स्वस्तिक चिन्ह, एका हातात नांगर, एका हातात गंगाजल व एका हातात भगवद्गीता आणि केसात मोरपीस असलेल्या भारत मातेचे चित्र त्यांच्या घरी बघायला मिळते. देशभक्तीपर गाण्याचे त्याना वेड होते. शहीद भगतसिंग वा शिवाजी महाराजासारखे होण्याचे त्यांचे बालपणीचे स्वप्न होते.

लेखिकेच्या मते भय्यू महाराजानी आपली गुरु प्रतिमा फार काळजीपूर्वक उभी केलेली आहे. जे भक्तगणांना आवडते तेच देण्यात त्यांचा हातखंडा आहे. आध्यात्मिक समन्वयक, शेती तज्ञ, शिक्षण तज्ञ, समाज सुधारक, आणि धूर्त राजकारणी याचे एक चांगले मिश्रण यांच्या व्यक्तिमत्वात आहे.

पुस्तक वाचून संपवत असताना भावदीप कांग यानी हेच गुरू का निवडले याबद्दल आश्चर्य वाटू लागते. कारण आपल्या देशात बाबा बुवांचे अमाप पीक आहे. इतिहासात डोकावल्यास रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, जिद्दू कृष्णमूर्ती, सच्चिदानंद, योगी भजनसिंग, योगानंद, भगवान रजनीश, आसाराम बापू, निर्मल बाबा, माता निर्मलादेवी, सारखे अतिरथी महारथी तिला सापडले असते. त्या तुलनेने भावदीप कांग यानी निवडलेले गुरू किस झाड की पत्ती वाटतील. कदाचित या ‘गुरू’ परंपरेत लिंग पिसाटपणा, स्त्रियाबद्दल टोकाची भूमिका, आणि भ्रष्ट मार्गानेच प्रसिद्धीस आलेल्यांची संख्या जास्त

असल्यामुळे भावदीप कांग यांचे लक्ष तिकडे गेले नसेल. परंतु हे गुरु चरित्र वाचताना वाचकांना अस्वस्थ न करता मनोरंजनासाठी लिहिलेले आहे की काय असे वाटू लागेल.

एक मजेशीर पुस्तक म्हणून वाचत असतानाच या समाजाच्या आजच्या स्थितीला कारणीभूत ठरलेल्यांच्याबद्दल आपली भूमिका काय असावी याचा पुनर्विचार करणे गरजेचे आहे असे राहून राहून वाटते.

**गुरुज**

(स्टोरीज ऑफ लीडिंग बाबाज)

वेस्टलँड प्रकाशन

किंमतः 295 रु, पाः 266



# आयडेंटिटीच्या बंधनात..

जन्माला आलेल्या प्रत्येकाला (आवडणारे वा न आवडणारे) नाव/आडनाव असते; व त्या नावाने आपली ओळख करून दिली जात असते. परंतु काही महात्वाकांक्षी व्यक्तींना फक्त नाव/आडनाव यात समाधान मिळत नाही. म्हणून आपल्या नावापुढे/आडनावापुढे काही तरी हवे म्हणून ते आटापिटा करत असतात. उच्च शिक्षितांना तर नावाच्या पुढे लावण्यासाठी इंग्रजीतील सव्वीसपैकी सव्वीस मुळाक्षरही कमी पडतात. काहींना आपल्या घराण्याचा अभिमान असतो म्हणून त्याला अधोरेखित करतात. काहींना आपल्या धर्माबद्दलचा वा (जातीबद्दलचा) अभिमान झाकता येत नाही म्हणून काही चित्रविचित्र पद्धत वापरून आपली आयडेंटिटी व्यक्त करत असतात. आणि ही आयडेंटिटी एखाद्या लेबलसारखी वा उत्पादनाच्या ब्रँडिगसारखी सगळीकडे मिरवली जात असते.

याच आयडेंटिटीचे समूह रूपसुद्धा असू शकते. ‘एक मराठा, लाख मराठा’, ‘गर्वसे कहो हम हिंदू है’, ‘इस्लाम खतरेमें’ ‘आवाज कुणाचा, अमक्या तमक्याचा’ या प्रकारच्या नारेबाजीतील समान धागा म्हणजे वैयक्तिकरित्या मी या समूहाशी जोडलेलो आहे याचे प्रकटीकरण असते. यात फक्त नारेबाजी नसते, तर त्यासंबंधातील काही ठळक चिन्हं बाळगण्याची प्रथा रूढ होत जाते. उदाः वारकरी गळयात माळ घालतात; नरेंद्र महाराजाचे शिष्यगण छातीवर बिल्ला लावतात; लिंगायत समुदाय कपाळावर भस्माच्या तीन पट्ट्या लावून मिरवत असतात. त्यांच्या या बाह्य चिन्हांमुळे त्यांचे लेबल पटकन ओळखता येते. आणि समूह आपल्याला एक लेबल चिकटवतो. या लेबलमुळे आपली काही इप्सीतं साध्य होण्याची शक्यता वाढते. आपण समूहाच्या छत्राखाली सुरक्षित आहोत ही भावना जाणवते. आणि समूह आपल्या अडी-अडचणीच्या प्रसंगात धावून येतो, याची जाणीव असते. एवढेच नव्हे तर या समूहाची चिन्हं

वापरून आपणही कुणी तरी आहोत, आपणाकडे वाकड्या नजरेने बघू नका, वा दुर्लक्ष करू नका, हा संदेशही दिला जातो. गंमत म्हणजे ही समूह आयडेंटिटी उपयुक्त ठरेल की गोचीत आणेल हे त्या त्या वेळची परिस्थिती ठरवत असते. परंतु अशा प्रकारच्या आयडेंटिटीज वा लेबल्स आपल्या अभिव्यक्ती स्वातंत्र्याला, आपल्यातील क्षमतेला, जाचक ठरू शकतात हे आपण लक्षात घेत नाही. या आयडेंटीटीज आपल्याला आपल्या अस्मितेची आठवण सतत करून देत असतात. मग ही अस्मिता भाषेची, प्रदेशाची, जातीची, उपजातीची, अशी कोणतीही असू शकते.

भोवतालच्या असुरक्षिततेतून मार्ग काढण्यासाठी या लेबलची ढाल म्हणून वापरता येते. एखाद्या समूहाला चिकटून राहण्याची व आपण त्या समूहाचे भाग आहोत हे जाहीर करण्यासाठी या लेबलचा वारेमाप उपयोग केला जातो. काही वेळा या ब्रँडिंगमुळे अडचणीत आलो तरी अडचणीत आलेल्यांचासुद्धा वेगळा गट तयार होतो आणि आपण एकटेच नाही ही भावना वाढते व अजून एक लेबल चिकटवून घेतले जाते. परंतु लेबल्स आपल्याला सुरक्षितता देते हा एक भ्रम आहे, याचीही जाणीव हवी.

अशा प्रकारच्या आयडेंटिटी आपल्याला एका गटात बंदिस्त करतात. व यातून सुटका नाही याची जाणीवही करून देतात. दोनेक शब्दाचे हे लेबल्स असले तरी त्यांना गाळल्यास आपण गटांगळ्या खात आहेत की काय असे वाटू लागते. ज्या प्रकारे इमाने इतबारे आयुष्यभर नौकरी करणाऱ्यांना निवृत्तीनंतरचे आयुष्य नीरस वाटू लागते किंवा मुलं मोठी होऊन वेगळे राहू लागल्यानंतर आईला एका मोठ्या पोकळीचा सामना करावा लागतो त्याच प्रकारे आपले लेबल्स गाळल्यास आयुष्य सुने सुने वाटत असावे. म्हणूनच आपण कायम लेबल्सला चिकटून असतो.

ही आयडेंटिटी काही वेळा आपल्या मुक्त विचारांना बंधनकारक ठरते. एका विशिष्ट आयडेंटिटीत अडकून घेतल्यानंतर आपल्या विचारातील लवचिकता हळू हळू कमी होऊ लागते. आपण त्यातले नाही असे म्हणताना जीभ चाचरते. तुमच्या क्षमतेवर मर्यादा पडतात. व आपण आपले व्यक्तिमत्व आंदण दिल्यासारखे त्या समूहाला समर्पित करतो. समूहाच्या विरोधात भूमिका घेता येत नाही आणि सहजासहजी लेबलही बदलता येत नाही. आणि एकदा तुम्हाला चिकटलेले लेबल लोक विसरत नाहीत हेही लक्षात घ्यायला हवे.

आयडेंटिटीत फसणे हा एक संकुचित दृष्टिकोन आहे याची जाणीव झाल्यानंतर लेबल नको असे वाटू लागते. म्हणून अशा प्रकारच्या लेबलला आपला विरोध असतो. खरे पाहता आपल्याला लेबल्स आवडतात; परंतु ते इतरानी दिलेले आवडत नाही. इतर कुणीही न दिल्यास आपणच स्वतःला एखाद्या समूहाशी वा वैचारिक गटाशी जोडून घेतो व त्या समूहाचे लेबल घेवून मिरवत असतो. कारण तेथे एक बिरादरी प्रस्थापित होत असते. आपण एखाद्या गटाशी जोडलेलोही आहोत व आपण वैयक्तिकरित्या स्वतंत्रपणे निर्णयही घेऊ शकतो, अशी ही मानसिकता असते. परंतु यात विरोधाभास आहे हे चटकन लक्षात येत नाही.

आपल्याला अनिर्बंध व्यक्तीस्वातंत्र्यही हवे व समाजाशी जवळीकही हवे, ही एक द्विधा मनस्थितीचे लक्षण आहे. वास्तवाशी सामना करण्यासाठी काही विशिष्ट मर्यादेतच राहून या दोन्ही गोष्टी साध्य करता येवू शकतात. त्यामुळे लेबल्सच्या फंदात न पडता आपण आपल्या व्यक्तिमत्वाला आकार देऊ शकतो. मुळात लेबल्स तुमची (खरी) ओळखच करून देत नाहीत. व हे लेबल्स तुमच्यापुरतेच अर्थपूर्ण असल्यास ती इतरांना निरर्थक वाटू लागतात. कारण भाषा ही समाजातील इतराशी संवाद करण्यासाठी असते, स्वतःच्यापुरते नसते.

सर्वात खेदकारक गोष्ट म्हणजे आपल्या आयडेंटिटीचा वापर राजकारणात करणे हा असेल. आपण आपल्या आयडेंटिटीला उंच चढवण्यासाठी इतर आयडेंटिटीना कमी लेखतो. खरे पाहता त्यांनीसुद्धा आपली आयडेंटिटी टिकविण्यासाठी समूहाशी जोडून घेतलेले असतात. त्यामुळे आपण इतर आयडेंटिटींची टिंगल टवाळी न करता आदराने वागवायला हवे. म्हणूनच आयडेंटिटीची एका मर्यादा असते व आपणही ती मर्यादेतच ठेवायला हवे.



# संख्याजगताच्या अद्भुत कथा

*गणितातील अनेक संकल्पना आपल्या बुद्धीच्या आवाक्याच्या बाहेर आहेत किंवा आपल्या दैनंदिन व्यवहारात त्यांचा काडी इतकाही उपयोग होत नाही म्हणून आपण त्याकडे नेहमीच दुर्लक्ष करत आलो आहोत. गणिताचे जगच अमूर्त अशा अनेक संकल्पनांवर आधारित असल्यामुळे ते अत्यंत भासमय, विस्मयकारक, अंतःप्रेरणेला कस्पटासमान समजणारी, तर्काच्या जंजाळात अडकवून ठेवणारी असे वाटण्याची दाट शक्यता आहे. परंतु या अमूर्त जगाची तोंडओळख करून घेतल्यास वा जमल्यास या संख्याजगाची सफर केल्यास आपण एखाद्या अलीबाबा सदृश गुहेत तर नाही ना असे वाटू लागेल. गणितातील अशाच काही संकल्पनांचा वेध घेण्याचा हा एक छोटासा प्रयत्न..*

## शून्य (0): संख्या आहेसुद्धा व नाहीसुद्धा!

शून्य ही संख्या नाही असे तुम्हाला वाटत असल्यास काही हरकत नसावी. कारण संख्यांचा वापर मोजण्यासाठी असतो. व जेथे काहीच नसते तेथे मोजणार कसे?

मुळात माणूस प्राणी गेली पाच हजार वर्षे काही ना काही मोजण्याची प्रक्रिया करत आला आहे. परंतु शून्याच्या इतिहासाची सुरुवात इ.स.पू 1800च्या सुमारास झाली असून त्याची पाळेमुळे बॅबिलोनियन संस्कृतीत आढळतात. त्यावेळीसुद्धा 1 ते 9 आकड्याप्रमाणे, शून्याला पूर्णपणे संख्याचा दर्जा दिलेला नव्हता. 361 व 3601 यांच्यामधील फरक दर्शवण्यासाठी एक चिन्ह या स्वरूपात तेथे शून्य होता. स्थान दाखवणारे चिन्ह एवढेच त्याला महत्व दिले होते. शून्यासाठीची बॅबिलोनियन चिन्ह म्हणजे कर्णरेषेतील दोन बाण.

आताच्या अंड्याच्या आकाराचे चिन्ह, (0), इ.स. 800मध्ये वापरण्यात आले. इ.स. 520च्या सुमारास भारतीय गणितज्ञ आर्यभट्ट (476-550) यांनी शून्यासाठी ब्राह्मी लिपीतील 'ख' या अक्षराची सोय केली. संख्येच्या एकम्, दशम् हे स्थान दर्शवण्यासाठी ख चा वापर त्यानी केला होता. भारतीय गणितज्ञ, संख्या हे फक्त वस्तूंच्या मोजमापासाठीच नसून त्या अमूर्त स्वरूपातही असू शकतात यावर भर देत होते. ब्रह्मगुप्ता (इ.स. 598 – 670) या खगोल शास्त्रज्ञाने संख्यारेषाची संकल्पना मांडून शून्याच्या डाव्या बाजूला ऋणसंख्या व उजव्या बाजूला धनसंख्या अशी मोजण्याची सोय केली होती.

पश्चिमेतील शास्त्रज्ञांना या गोष्टी समजून घेण्यासाठी पुढील काही शतके लागली. भारतीय गणिताचा प्रवास अरबस्तानातून युरोपात गेला. संस्कृतमधील ग्रंथांचा अरेबिकमध्ये व अरेबिकमधून इंग्रजीत अनुवाद होत होत शून्य ते सिफर ते झिरो हे ज्ञान युरोपमधील तज्ञापर्यंत पोचले. ऋण संख्यांचा दरवाजा शून्याजवळ आहे व कर्जाची वा अक्कलखाती जमा झालेल्या रकमेची नोंद शून्याच्या डाव्या बाजूला मांडता येते हे त्यांना फार उशीरा कळाले.

19व्या शतकात गणिताच्या मागील तर्कशास्त्राचा (Logic of Mathematics) अभ्यास करण्यात आला होता. त्यावेळी गिसेपे पीनो (Giuseppe Peano) या इटालियन गणितज्ञाने अंकगणितातील संख्यासंबंधींच्या गृहितकांचे नियमन करत असताना शून्य ही संख्या आहे असे ठामपणे प्रतिपादन केले. शून्याशिवाय भूमापन करणे वा ऋण – धन या संख्येतील फरक समजून घेणे जड ठरले असते, यावर त्याचा भर होता.

शून्याचे 'स्थळ महात्म्य' गणितज्ञांच्या लक्षात येऊ लागले. आणि संपूर्ण (गणितीय) जग शून्याच्या प्रेमात पडले. परंतु शून्याची महती सेट सिद्धांताच्या वेळी लक्षात आली. 1874 मधील एका संशोधन प्रबंधातून सेट सिद्धांताची

कल्पना जिऑर्ग कँटर (1845 -1918) या गणितज्ञाने पहिल्यांदा मांडली. सेट सिद्धांत हा गणिताचा पाया समजला जातो. सेट म्हणजे एक अमूर्त भांडं वा पात्र. या भांड्यात काहीही ठेवता येते. हिमगौरी व सात बुटके या परीकथेतील सात बुटक्यापासून आठवड्यातील सात दिवसापर्यंत काहीही. फक्त सेटची मांडणीचा संदर्भ देत असताना त्यातील घटकांचे स्वरूप काय आहे हे माहित असायला हवे. त्या सेटमध्ये सात दिवस वा बारा महिने किंवा धृतराष्ट्राची शंभर मुलं असू शकतील. त्याचप्रमाणे रिक्त सेटची मांडणी केल्यास त्यात शून्य घटक आहेत हे नक्कीच लक्षात येईल.

शून्याचे वैशिष्ट्य म्हणजे शून्याची कुठल्याही संख्येत बेरीज वा वजाबाकी केली तरी त्या संख्येत बदल होत नाही. एखाद्या संख्येला शून्याने गुणिल्यास उत्तर शून्यच येते. शून्याला एखाद्या संख्येना भागणे ही क्रिया विसंगत असे समजली जाते. शून्य म्हणजे काहीही नाही हे माहित असूनसुद्धा त्याचे अमुक अमुक तुकडे करा हे बुचकळ्यात टाकणारे विधान ठरेल. त्याचप्रमाणे एखाद्या संख्येला शून्याने भागाकार करणेसुद्धा वेडपटपणाचे ठरेल. उदाहरणार्थ, तुमच्या जवळ असलेल्या २४ नाण्यांचा शून्य घटकात विभागणी करणे निरर्थक ठरू शकेल

## अनंतता (∞): गणिताला तारक व मारक अशी संकल्पना

लक्ष, दशलक्ष, कोटी, दशकोटी, शतकोटी, परार्ध, शत परार्ध.. शत परार्ध + 1 .... अशा प्रकारच्या मोठ मोठ्या संख्यांची लहानपणी खेळलेली स्पर्धा आपल्याला नक्कीच आठवत असेल. परंतु मोठेपणी संसाराच्या रहाटगाडग्यात अडकून पडल्यामुळे अशा मोठ-मोठ्या संख्यांचे कौतुक करणे आपण विसरून

गेलो. व त्यातही इन्फिनिटी (∞) ही संख्या पुसटशी होत गेली. परंतु ∞ मुळात अस्तित्वात होती वा आहे का?

उदाहरणार्थ, आइन्स्टाइनच्या सापेक्षता सिद्धांतात काळ व अवकाश (space & time) अनंतापर्यंत विस्तार होत होत, कृष्ण विवरात विरून जातात अशी संकल्पना मांडलेली आहे. त्याच प्रमाणे कॅल्क्युलसमध्ये कुठलीही प्रक्रिया सातत्याने बदलत गेल्यास अवकाश व काळ यांची अनंतामध्ये विभागणी करणे शक्य होईल.

याचा अर्थ भौतशास्त्रज्ञांना इन्फिनिटीचे महत्व कळले व इतरांना नाही असा अर्थ होत नाही. जेव्हा खगोल शास्त्रातील समीकरणांची उत्तरं इन्फिनिटीच्या जवळ पास असतात तेव्हा हे खगोलशास्त्रज्ञ सिद्धांतांचीच पुनर्लेखन करतात!

जरी या गृहितकांना बाजूला सारले तरी गणितातील सेट सिद्धांत मात्र इन्फिनिटीला चिकटून आहे. संख्यासंबंधी कठोरपणे विश्लेषण करत गेल्यास गणितातील हे अमूर्त भांडं कुठल्याही संख्याबद्दल जास्त विस्ताराने सांगू शकेल. शून्य सेटबद्दलचा आपला अनुभव ताजा आहे. सर्व संख्यांचे एक सेट आहे असे कल्पना करता येईल. मग हा सेट किती मोठा असू शकेल? तुम्ही कितीही मोजत गेला तरी त्या संख्या संपणार नाहीत व शेवटी आपण कंटाळून अनंतापर्यंत असे म्हणत त्याचा नाद सोडणार!

परंतु 1924 साली मांडलेल्या हिल्बर्टचे काल्पनिक हॉटेल याला छेद देणारा ठरू शकेल. कारण हिल्बर्टने त्या हॉटेलमध्ये इन्फायनेट खोल्या आहेत अशी मांडणी केली आहे. जेव्हा या सर्व खोल्या पूर्ण भरल्या तेव्हा कुठून तरी कित्येक बसलोड भरून प्रवासी आले व खोल्यांची मागणी करू लागले. हॉटेलच्या मॅनेजरने ही समस्या कशी हाताळली असेल?

आपली अंतःप्रेरणा हे शक्य नाही असे म्हणेल. परंतु गणिताला व विशेष करून इन्फिनिटीला हे मान्य असणार नाही. मॅनेजरच्या मते ही समस्या

सोडवणे शक्य आहे. त्यासाठी खोली नं 1 मधल्या प्रवाश्याला खोली नं 2 मध्ये, 2 मधल्याला 4 मध्ये, 3 मधल्याला 6 मध्ये असे हलवल्यास सर्व विषम संख्यांच्या खोल्या रिकामे होतील व आगंतुक प्रवाश्यांची रहायची व्यवस्था करता येईल.

काही अनंत संख्या इतर अनंत संख्यापेक्षा मोठ्या असू शकतात. यावरून सेटमधील संख्या कितीही वेगवेगळ्या प्रकारच्या असल्या तरीही त्या अनंतापर्यंत पोचतात. सेट सिद्धांताला अशा विसंगत गोष्टींची चांगलीच सवय जडली आहे. गंमत म्हणजे पूर्ण संख्यांची यादी अनंतापर्यंत जाते, एवढेच नव्हे तर त्या संख्यांचे दशांशसुद्धा अनंतापर्यंत जाऊ शकतात!

तर लहानपणच्या मोठ्या संख्येच्या स्पर्धेप्रमाणे लहानातील लहान संख्येची स्पर्धा ठेवायची का?

# सुवर्ण गुणोत्तर (φ) – एक शानदार संख्या

## फिबोनाची क्रमिका

काही तज्ञांच्या मते विश्वरचनेमध्येच एक सुप्त गणित भरलेले वा दडलेले दिसेल. सजीवांची शरीररचना वा या सजीवांनी निर्माण केलेल्या वस्तू यांच्यामध्ये वा निसर्गातील झाडं, पानं, फुलं, फळं इत्यादीमध्येसुद्धा लक्षपूर्वक शोधल्यास एका प्रकारचे गणित सापडेल, असे तज्ञांचा विश्वास आहे. या विधानाच्या पुष्ट्यर्थ गणितज्ञ नेहमीच फिबोनाची क्रमिका आणि सुवर्ण गुणोत्तर यांचे पुरावे म्हणून सादर करतात.

1,1,2,3,5,8,13,21,34,55,89,144,233,.... अशा संख्याची क्रमिका फिबोनाची क्रमिका म्हणून ओळखली जाते. या क्रमिकेत मागील संख्येच्या बेरजेतून पुढील संख्या मांडली जाते. उदाः 3,5,8,13,21,34... मध्ये 8 ही

संख्या 5 व त्यामागील 3च्या बेरजेतून, 13 8+5च्या बेरजेतून, 21 ही 13+8च्या बेरजेतून, 34 ही संख्या 21+13च्या बेरजेतून आलेले असतात. झाडाची पानं, सूर्यमुखी फुलातील बियांची रचना यात फिबोनाची क्रमिका सापडते. निसर्गातील अशा अनेक गोष्टीमध्ये फिबोनाची क्रमिका सापडतात.

परंतु या क्रमिकेत आणखी एक गंमत दडली आहे. पुढील व मागील संख्याचे गुणोत्तर काढत राहिल्यास उत्तरोत्तर हे गुणोत्तर 1.618च्या आसपास असेल. या गुणोत्तराला सुवर्ण गुणोत्तर या नावाने गणितज्ञ ओळखतात व याचे चिन्ह म्हणून ग्रीक लिपीतील φ या अक्षराचा वापर करतात. सुवर्ण गुणोत्तर हा गणितातील एक भन्नाट प्रकार आहे असे म्हणता येईल. अबक या सरळ रेषेवरील ब हा बिंदू अब/बक = अक(अब+बक)/अब या समीकरणाची पूर्तता करत असल्यास त्या गुणोत्तराला सुवर्ण गुणोत्तर म्हटले जाते. हे गुणोत्तर साधारणपणे 1.618च्या जवळपास असेल. फिबोनाची क्रमिकेतील 55/34 = (55+34)/55 = 1.61818..., किंवा (89+55)/89 = 1.617977... किंवा (233+144)/233 = 1.618025... इत्यादी आकड्यामध्ये हा गुणोत्तर डोकावतो.

## φ चे मूल्य

a आणि b या दोन संख्यांची मांडणी सुवर्ण गुणोत्तराप्रमाणे केल्यास

$(a + b)/a = a/b = \varphi$,

$b/a=1/\varphi$

$1+b/a = 1+ 1/\varphi = \varphi$

$\varphi +1 - \varphi^2 = 0$

$\varphi^2 - \varphi -1 = 0$

$\varphi = (1+\sqrt{5})/2 = 1.6180339887$

हा चमत्कारिक गुणोत्तर आपल्याला भूमितीच्या अनेक रचनामध्ये बघावयास मिळेल. समभुज पंचकोनातील समोरासमोरील दोन शिरोबिंदूना जोडलेल्या कर्ण रेषेला भुजाने भागिल्यास हा गुणोत्तर मिळतो. समभुज त्रिकोनाच्या आतील बाजूला तिन्ही भुजांना स्पर्ष करणारे वर्तुळ काढल्यास त्यातही हा गुणोत्तर सापडेल. समदशभुजाकृतीतही हे गुणोत्तर मिळेल. याच गुणोत्तराचा उपयोग करून काढलेल्या त्रिकोनाला 'गोल्डन ट्रँगल' आणि आयताकाराला 'गोल्डन रेक्टँगल' म्हणतात.

**सौंदर्याची मोजपट्टी**

गणितातील संख्यांची करामत म्हणून याकडे दुर्लक्ष करता येत नाही, हेही तितकेच खरे. इंटरनेटवर शोध घेतल्यास या गुणोत्तराचे आपल्या दैनंदिन जीवनात मोठ्या प्रमाणात केला आहे हे लक्षात येईल. सोळाव्या शतकातील केप्लर हा खगोलशास्त्रज्ञ या सुवर्ण गुणोत्तराच्या चमत्कारामुळे भारावून गेला होता. मध्ययुगातील अनेकानी सुवर्ण गुणोत्तराला दैवीशक्तीचा दर्जा दिला होता. एका मानसशास्त्रज्ञाने त्या काळच्या खिडक्या, फोटोफ्रेम, क्रॉसेस, अभिनंदन पत्रं, आरसे, पुस्तकं, तैलचित्र, वेगवेगळया आकारच्या चौकटी इत्यादींचे मोजमापाचा अभ्यास केला. बहुतांश गोष्टीत या गुणोत्तराचा वापर केलेला होता, हे त्याला आढळले. पेंटिंग्समध्ये काढलेल्या पुरुष व स्त्रियांच्या शरीर रचनेतही हा गुणोत्तर होता. सौंदर्याच्या मोजपट्टीचा दर्जा याला मिळाला होता. त्यामुळे प्राचीन ग्रीक, इटॅलियन संस्कृतीत या गुणोत्तराचा वारेमाप उपयोग केला असेल, असे म्हणण्यास वाव आहे.

परंतु सौंदर्य हे नेहमीच सापेक्ष असल्यामुळे गणिताच्या पदावलीतून वा समीकरणातून व्यक्त करणे किंचित धाडसाचे ठरेल. मुळात ग्रीक अभिजनांचे मन या गुणोत्तरावर जडलेले असावे म्हणून दिसेल त्या ठिकाणी याचा वापर

त्यांनी केला असावा. या सुवर्ण गुणोत्तराव्यतिरिक्तही गणितात अनेक मजेदार गोष्टी आहेत हे आपण विसरू शकत नाही.

## ऑयलर संख्या (e): ठेवीची रकम वाढतच का जात नाही?

बँकेत काही पैसे ठेव म्हणून ठेवल्यास बँक आपल्याला व्याजासकट काही रकम ठराविक मुदतीनंतर देते. समजा आपण एक हजार रुपये मुद्दल म्हणून बँकेत ठेवल्यास व बँकेचे सरळ व्याजाचे दर दरवर्षी 100 टक्के असल्यास वर्षाच्या शेवटी दोन हजार रुपये खात्यात जमा होतील. यात काही गुंतागुत नाही हे आपल्या लक्षात आले असेल. परंतु ठेवीवर मिळणारे व्याज वर्षाच्या शेवटी न देता दर सहा महिन्यानी द्यायचे ठरवल्यास वर्षाच्या शेवटी मिळणाऱ्या रकमेत फरक दिसेल. म्हणजेच 1000 रुपयाला सहा महिन्यानंतर व्याजासकट 1500 रुपये व वर्षाच्या शेवटी 2250 रुपये.

भगवान देता है तो छप्पर फाडके देता है..

समजा दर सहा महिन्याऐवजी दर तीन महिन्यानी व्याज द्यायचे ठरवल्यास वर्षाच्या शेवटी 2610 रुपये मिळतील. आणि हाच क्रम पुढे नेत नेत दर महिन्याला, दर आठवड्याला, दर दिवशी, दर तासाला, दर मिनिटाला ... असे काही करत गेल्यास फार मोठे घबाड मिळेल असे वाटण्याची शक्यता आहे. परंतु गणितीय सिद्धांताप्रमाणे अगदी सेकंदाच्या अवधीने व्याज दिले तरी ही रक्कम 2718 व काही चिल्लर असणार. म्हणजेच 1000 या मूळ ठेवीला 2.71828 याने गुणिल्यास मिळेल ती रकम! याच संख्येची मांडणी गणितज्ञ e या चिन्हाने करतात.

**चक्रवाढीचे सूत्र:**

$FV = PV (1+r/n)^n$

*यात FV = भविष्यात मिळणारी रकम, PV = मुद्दल, r = व्याजाचा दर (दशांशामध्ये) n = कालावधी*

*या समीकरणात $x = n/r$ बदल केल्यास $r/n$, $1/x$ होईल व n, xr होईल त्यामुळे $(1+r/n)^n$ समीकरण $(1+(1/x))^{xr}$ असे लिहिता येईल. परंतु e च्या सूत्रात n वाढत जाणार. व x इन्फिनिटीला पोचल्यास $(1+(1/x))^{xr}$ चे मूल्य $e^r$ होईल.*

2.71828…. ही संख्या π (पाय) प्रमाणे एक अपरिमेय संख्या आहे. या पदातील दशांशाच्या पुढचे आकडे कधीच संपत नाहीत. लिओनार्ड ऑयलर या स्विडिश गणितज्ञाने ही संकल्पना प्रथम मांडली. त्यामुळे या संख्येला ऑयलर संख्या असेही म्हटले जाते. परंतु ऑयलरपूर्वीसुद्धा ही संकल्पना काही गणितज्ञांना माहित होती.

नेपियरच्या लोगॅरिदमिक टेबलच्या संदर्भातील एका शोधनिबंधाला जोडलेल्या परिशिष्टात e या संख्येचा पहिल्यांदा उल्लेख झाला. 1624 मध्ये ब्रिग्स या गणितज्ञाने बेस 10 च्या लॉग टेबलचा उल्लेख करताना e चा साधा उल्लेखही केला नव्हता. 1647 साली सेंट व्हिन्सेंट यानी चौकोनी हायपरबोलाचे क्षेत्र काढत असताना e चा वापर केला. त्याला चौकोनी हायपरबोला व लोगॅरिदम यांचा एकमेकाशी संबंध आहे की नाही हेही माहित नसेल. परंतु 1661 साली ह्युजेन्स याला मात्र चौकोनी हायपरबोला व लोगॅरिदम यांचा एकमेकाशी असलेल्या संबंधाची कल्पना होती. ह्युजेन्स यानीच e चे मूल्य शोधताना बेस 10च्या लॉग टेबलचा वापर करून 17 दशांशापर्यंत त्याची मांडणी केली होती. परंतु त्यालाही e चे महत्व कळलेले नव्हते. 1683मध्ये जॅकोब बेर्नोली यानी $(1 + 1/n)^n$ चे लिमिट शोधताना या समीकरणात n ची किंमत इन्फिनिटी पर्यंत गेल्यास काय होईल याचा शोध घेत

असताना समीकरणाची किंमत 2 व 3च्या मध्ये असेल हे त्याच्या लक्षात आले. 1684मध्ये जेम्स ग्रेगरी यानी मात्र लोगॅरिदम व घातांक यात संबंध आहे हे निश्चित विधान केले. 1690 मध्ये लेब्निट्झ यांनी ह्युजेन्सला लिहिलेल्या पत्रामध्ये b हे अक्षर वापरून गणितासंबंधी काही माहिती दिली होती. परंतु हे b म्हणजेच e हे नंतर लक्षात आले. त्यानंतर ऑयलर यांनी e चा वापर करून काही गणितीय समस्यांची उत्तरं शोधली. त्यामुळे eला ऑयलर संख्या म्हणूनही ओळखले जाते.

## e चे सूत्रः

*e चे मूल्य काढण्यासाठी* $(1 + 1/n)^n$ *या सूत्राचा वापर केला जातो. त्यात n जस जसा मोठा होत जाईल तस तसे त्याचे मूल्य e (=2.71828..) च्या जवळपास येईल.*

*n = 1 असल्यास* $(1 + 1/n)^n = 2$, *n = 2 असल्यास* $(1 + 1/n)^n = 2.25$, *5 असल्यास 2.48832, 10 असल्यास 2.59374, 100 असल्यास 2.70481, 10000 असल्यास 2.71815, 100000 असल्यास 2.71827... अशा प्रकारे e च्या जवळ पास येईल.*

ऑयलर संख्या फक्त चक्रवाढीच्या हिशोबासाठीच्या संदर्भातच वापरतात असे नाही. काल्पनिक संख्या i व π या अपरिमेय संख्यांचा e शी संबंध जोडणारे $e^{i\pi} + 1 = 0$ गणिती जगातील एक आश्चर्यकारक समीकरण म्हणून ओळखले जाते. (हा एक वेगळाच लेख होऊ शकेल!) यात 0,1, i , π, व e यांना एकमेकाशी जोडणारे ऑयलर आयडेंटिटी हे समीकरण एक साधे, सरळ व शानदार समीकरण आहे. मोठमोठ्या संख्यांचे गुणाकार/भागाकार करण्यासाठी कॅल्क्युलेटर्स व संगणक यांचा शोध होण्यापूर्वी, e ला बेस समजून तयार केलेले नॅच्युरल लॉग टेबल (व नंतर बेस 10 चे लॉग टेबल,) फार

मोठ्या प्रमाणात वापरात होते. कदाचित माणसाने चंद्रावर पाठवलेल्या अपोलो 11 या अवकाशयानाच्या अभियांत्रिकी रचनेसाठी लॉग टेबल्सचाच वापर झाल्याची शक्यता नाकारता येत नाही.

खरे पाहता e ही संख्या वाटते तेवढी क्लिष्ट नाही. $e^x$ असलेल्या पदावलीचे (त्यातील स्थिर संख्या डावलून) इंटिग्रेशन केल्यास त्याचे उत्तर $e^x$ येईल. हे फक्त $e^x$ किंवा $e^x$ च्या साधारण विभाज्याच्या संदर्भात होऊ शकते. त्यामुळे गणितातील संज्ञांच्या पार्टीत $e^x$ हे कुठे तरी एका कोपऱ्यात कुणाशीही न मिसळता उभे असलेले दिसेल!

चक्रवाढीप्रमाणे $e^x$ चा वापर व्यवहारात अनेक ठिकाणी दिसेल. हवेचा प्रतिरोध, वेगवेगळ्या उंचीवरील हवेचा दाब, विद्युत मंडलातील कंपन, इलेक्ट्रॉन्सचे वायूतील गती, रेडियमसारख्या आण्विक मूलवस्तूंचे क्षयदर, रासायनिक प्रक्रियेच्या वेगाचे नियंत्रण, विद्युत चुंबकीय प्रक्रियेतून होणारे वीज उत्पादन अशा कित्येक ठिकाणी $e^x$ व $x^n$ ही सूत्रे उपयोगात आणल्या जातात. ऑयलर संख्येचा वापर व्यवहारातील काही क्लिष्ट समस्या सोडवण्यासाठी-सुद्धा केला जात आहे. एक्स रे क्रिस्टलेग्राफीच्या अभ्यासकांना स्फटिकांचे गुणधर्म शोधताना फोरियर विश्लेषणाचा आधार घ्यावा लागतो. त्यासाठीच्या फोरियर विश्लेषणात e ही संख्या प्रामुख्याने आढळते. त्याचप्रमाणे जनुकशास्त्रातील काही क्लिष्ट विश्लेषणातसुद्धा ऑयलर संख्येचा वापर होत आहे

## कल्पित संख्या (i): एक वेगळेच जग

गणितातील नियमाप्रमाणे +1ला +1ने गुणिल्यास त्याचे उत्तर +1 येते. त्याप्रमाणे -1ला -1ने गुणिल्यास त्याचे उत्तरसुद्धा +1 असते. जर हेच खरे असल्यास -1 हा वर्ग मिळण्यासाठी आपल्याला कुठल्या संख्येची निवड

करावी लागेल? हे काही कोडं नसून ही सर्व प्रक्रिया फक्त काल्पनिक आहे हे लक्षात आणून देण्यासाठी सुचलेला प्रश्न आहे.

बॅबिलोनियन गणितज्ञांनी वास्तव संख्यांच्याबद्दलच्या नियमांची मांडणी करताना $x^2=4$ या समीकरणाचे उत्तर (+2) x (+2) किंवा (-2) x (-2) आहे या पद्धतीने करत होते. परंतु $x^2=(-4)$ असल्यास नेमके काय करावे याची त्यांना कल्पना नव्हती. पुढे सातव्या शतकात भास्कर या भारतीय गणितज्ञाने एखाद्या संख्येला त्याच संख्येने गुणिल्यास त्या संख्येचा वर्ग येतो याचा शोध लावला. हाच धागा पकडून ब्रह्मगुप्त या गणितज्ञाने संख्येचा वर्गमूळही काढता येते असे विधान केले. व त्याच्या या पद्धतीला विलोमगती हे नाव त्यानी दिले. परंतु त्याच्याही समोर $x^2=(-4)$ या टाइपचे समीकरण होते व ते निरर्थक म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. पुढे 16 व्या शतकातील रॅफेल बोंबेली या गणितज्ञाने -1च्या वर्गमूळाला संख्याचा दर्जा देत काही समीकरण सोडवण्याचा प्रयत्न केला. कार्ल फ्रेडरिक् गॉस यानी या अभ्यासात भर घातली व हॅमिल्टन यानी $\sqrt{-1}$ च्या आधारे कॉम्प्लेक्स संख्याची शाखा उभारली.

ऋण संख्यांच्या वर्गमूळाला कल्पित संख्या (imaginary number) असे म्हटले जाते. 1631 साली रेने देकार्ते या गणितज्ञाने ऋण संख्येचे वर्गमूळ कल्पित संख्या असते ही कल्पना प्रथम मांडली.18व्या शतकात त्याला एक संज्ञा म्हणून i हे चिन्ह सुचवण्यात आले व i हे -1चे वर्गमूळ आहे हे जगन्मान्य झाले. त्यामुळे $i \times i = -1$ चा वापर मोठ्या प्रमाणात गणितात होऊ लागला.

बीजगणितातील समीकरण सोडवत असताना घातांक 2 असलेले समीकरण सुलभपणे सोडवता आले. $x^2=4$ या समीकरणातील x चे मूल्य = +2 वा -2 असू शकते. परंतु $x^2+5 = 0$ हे समीकरण सोडवताना x चे मूल्य -5 चे वर्गमूळ असेल. $\sqrt{-5}$ हे गणितीयदृष्ट्या विसंगत वाटू लागल्यामुळे त्यावर तोडगा काढण्यात आला. आणि कल्पित संख्यांचा वापर होऊ लागला.

त्यामुळे √-5 ही संख्या i√5 असे लिहिले गेले. आणि या काल्पनिक संख्येच्या कल्पनेतून कॉम्प्लेक्स संख्यांचे जग उभारण्यात आले. 2 पेक्षा जास्त घातांक असलेले समीकरण सोडवणे यामुळे शक्य झाले. समीकरण सोडवताना काही गुणकांची कॉम्प्लेक्स संख्येच्या स्वरूपात मांडणी करण्यात आली. त्यातील एक भाग वास्तव संख्यांचा व दुसरा भाग काल्पनिक संख्यांच्या (म्हणजे i ने गुणिलेला) अशी विभागणी करण्यात आली. या कॉम्प्लेक्स संख्यांची मांडणी भूमितीच्या स्वरूपात मांडत असताना क्ष अक्षावर वास्तव संख्या आणि य अक्षावर कल्पित संख्या ही मांडणी रूढ झाली. क्ष आणि य अक्षाचा छेद शून्यापाशी दाखवण्यात आला.

गंमत अशी आहे की संपूर्ण गणित शास्त्रच काल्पनिक असताना त्यात पुन्हा अजून एका कल्पित संख्येची भर घालणे वा कल्पित संख्यांचे एक काल्पनिक जग निर्माण करण्यात हशील नाही. 1843 मध्ये आयरिश गणितज्ञ हॅमिल्टन यानी iच्या पुढील j व kची भर घातली आणि x, y अक्षाबरोबर z अक्षाची भर घालून त्रिमितीची निर्मिती केली. आजकालच्या संगणकाच्या 3D गेम्ससाठी या गोष्टी सर्रासपणे वापरल्या जात आहेत.

त्यामुळे i, j व k पर्यंतच न थांबता याच्याही पुढे जात आपण काल्पनिक जगाचा विस्तार करू शकतो का? या प्रश्नाला उत्तर नाही.

## अर्किमिडिस स्थिरांक 'पाय्' (π): भूमितीचा आधारस्तंभ

10 वी 12 वीपर्यंत शाळा शिकलेल्यांनासुद्धा पाय् (π) ही संज्ञा नवीन नाही. वर्तुळाचा व्यास वा त्रिज्येवरून वर्तुळाचे परिघ व क्षेत्र काढण्यासाठी या संज्ञेचा वापर केला जातो. ( निदान एवढे तरी बहुतेकांना माहित असण्याची शक्यता आहे.)

ग्रीक मूळाक्षरातील 'प' साठी वापरात असलेली ही संज्ञा आता जवळ जवळ अंक म्हणूनच ओळखला जात आहे. या अंकाचे मूळ शोधणे तितकेसे कठिण नाही. पुरातन काळच्या इजिप्त, भारत, बॅबिलोनिया व ग्रीक येथील भूमितीचे जाणकार कुठल्याही वर्तुळाचा परिघ व त्याचे व्यास यातील गुणोत्तर स्थिर असते असे ढोबळमानाने ओळखत होते. काही इतिहासकारांच्या मते ग्रीक येथील अर्किमिडिस यानी π चे मूल्य शोधण्यासाठी परिघ - व्यास गुणोत्तराऐवजी वेगळी पद्धत वापरली. म्हणूनच याला अर्किमिडिस स्थिरांक असेसुद्धा म्हटले जाते. प्लुटोसारख्या प्रचंड आकाराच्या ग्रहापासून बोटात मावणाऱ्या आंगठीच्या बारीक सारीक वर्तुळाकार वस्तूंचे परिघ/क्षेत्र मोजण्यासाठी हा एकमेव गुणोत्तर असून त्याचे मूल्य सुमारे 3.14 (22/7) आहे हे जगन्मान्य झालेले आहे. यावरून वर्तुळाचा परिघ त्याच्या व्यासाच्या तिप्पटीपेक्षा थोडेसे जास्त असते हे लक्षात येते. आपल्याला जमीनीवर 10 मी परिघ असलेले वर्तुळ काढायचे असल्यास दोरी, खुंटी व खडूच्या सहाय्याने व या गुणोत्तराच्या मदतीने सहजपणे काढता येईल. 10 मी परिघ असल्यास 10 = 3x 3.3 (व्यास) = 3 x 2 x 1.65 (त्रिज्य) 1.65 मी लांबीच्या दोरीचे एक टोक खुंटीला व दुसरे टोक खडूला बांधून दोरी ताठ करून खुंटीभोवती फिरविल्यास 10 मी लांबीचा परिघ असलेला वर्तुळ काढता येईल.

परंतु वर्तुळाचा परिघ जास्तीत जास्त अचूकपणे मोजण्याचा प्रयत्न केल्यास गुणोत्तर π सुद्धा जास्तीत जास्त अचूक असणे आवश्यक आहे. इजिप्शियन्स π चे मूल्य म्हणून 25/8 व बॅबिलोनियन्स 256/81 ही संख्या वापरत होते. भारतातील शुक्ल यजुर्वेदातील शतपथ ब्राम्हण मध्ये ही संख्या 339/108 (= 3.139) आहे. 2009 साली संगणकाच्या मदतीने π चे मूल्य 1,240,000,000,000 अंशापर्यंत मोजला गेला. गंमत म्हणजे 0 ते 9 आकडे

असलेल्या या अपूर्णांकात कुठल्याही संख्येची पुनरावृत्ती झाली नाही. संख्या पुन्हा पुन्हा आल्या नाहीत. जर या गुणोत्तराचे मूल्य अनंत (infinity) अंशापर्यंत काढत गेल्यास या अपूर्णांकात कुठे ना कुठे तरी आपल्यातील प्रत्येकाचा मोबाइल क्रमांक, क्रेडिट कार्ड क्रमांक वा जन्मतारीख नक्कीच मिळेल. यासारखे वैशिष्ट्य इतर कुठल्याही साध्या अपूर्णांकात मिळणार नाही. एखाद्याची उंची जास्तीत जास्त अचूकपणे मोजण्याचे ठरवल्यास कदाचित ती 170.236283945 सें मी असे काही तरी असू शकेल व यानंतर ते तेथेच थांबून जाईल. किंवा यात आणखी काही आकडे जोडण्याचा प्रयत्न केल्यास त्या बहुतेक 00000.... असतील. इजिप्शियनांचा 25/8 = 3.125 नंतर आकडे थांबतील. फार फार तर आपल्याला 3.125000000 असेही लिहिता येईल. हे शून्य हजारो कोटी वेळा लिहूनही मूल्यात काही फरक पडणार नाही. कितीही प्रयत्न केले तरी नंतरच्या भागात शून्यव्यतिरिक्त दुसरा कुठलाही आकडा तेथे दिसणार नाही.

म्हणूनच **π** या संख्येला अपरिमेय अंक (irrational number) असे म्हटले जाते. (जी संख्या पूर्णांकाच्या रूपाने व/वा दोन पूर्णांकाच्या भागाकाराने, म्हणजेच अपूर्णांकाच्या रूपाने, व्यक्त करता येत नाही ती संख्या. उदा - **π**, √2, √3..इ.इ ) याचा अर्थ ही संख्या पूर्ण संख्येच्या गुणोत्तराच्या स्वरूपात मांडता येत नाही. अशा प्रकारच्या संख्या गणित क्षेत्रात विपुल प्रमाणात वापरात आहेत.

भूमितीच्या संदर्भात **π** संख्या रूढ असली तरी विज्ञानाच्या इतर क्षेत्रातही या संख्येचा वापर होत आहे. गिझा येथील पिरॅमिड्स बांधणाऱ्यांना **π** चे मूल्य माहित होते, असा दावा केला जातो. क्वांटम भौतिकीतील प्लॉंक स्थिरांकाच्या संदर्भात याचा वापर होतो. वर्तुळाच्या क्षेत्राएवढा क्षेत्र असलेला चौकोन काढणे (squaring the circle) हे आव्हान आजपर्यंत कुणी स्वीकारले नाही. आइन्स्टाइनने याचा वापर नदीच्या लांबीच्या संदर्भात करता येतो असे शोधून काढले आहे.

वाकडेतिकडे वाहणाऱ्या नदीचे वास्तविक अंतर व नदीच्या उगमापासून संगमापर्यंतचे थेट अंतर याचे गुणोत्तरसुद्धा π एवढे असते, असे त्यानी पहिल्यांदा सुचविले. नदीचा बाक जास्त असल्यास किनाऱ्यावरील मातीची धूप होण्याची शक्यता जास्त. जास्त धूप होत असल्यास नदी जास्त वेगाने वाहणार. जास्त वेगामुळे धूप होत होत नदीचा बाक वाढत जाणार. या चक्रातून सुटका करून घेण्यासाठी निसर्गाने काही मर्यादा आखून दिल्यासारखे नद्या वाहतात, असे वाटते. व ही मर्यादा π गुणोत्तरात आहे, असे आइन्स्टाइनला वाटले. ब्राझिल व सैबेरिया मधील समपातळीवरून वाहणाऱ्या नद्यांच्या बाबतीतील आकडेवारी या गृहितकाला पुष्टी देत आहे. π च्या मूल्याचा आधारावरून अनेक सिद्धांत व प्रमेय गणित विश्वात वापरात आहेत.

गणिताशी संबंध येत नसलेल्यांना या सर्व गोष्टी कंटाळवाणे वाटतील. रोजच्या वापरातील गोल गोल नाणी, कारमधील स्टिअरिंग व्हील, आकाशात दिसणारे सूर्य - चंद्र वर्तुळाकारात असूनही त्यांचे व्यास अचूकपणे ओळखता येत नाही हे सांगूनही खरे वाटणार नाही.

मार्च 14 तारीख π दिवस म्हणून साजरा केला जातो. कारण या तारखेत 3, 14 या संख्या π च्या मूल्यातील संख्येशी जुळतात. π अप्रॉक्झिमेट डे म्हणून जुलै 22 तारीख साजरा केला जातो. कारण हा दिवस 22/7 अपूर्णांक सुचवतो.

अशी आहे ही π ची सुरस कथा!



# मृत्यु अटळ आहे,
# परंतु सुखद मरणही आपल्या हातात नाही...

*(मुंबईचे पोटविकारतज्ज्ञ, डॉ. दीपक अमरापूरकर यांचा 29 ऑगस्टच्या मुसळधार पावसात मॅनहोलमध्ये पडून मृत्यु झाला. दोन दिवसानंतर छिन्न विछिन्नावस्थेत त्यांचा मृतदेह सापडला. आपण मृत्युला टाळू शकत नाही हे खरे असले तरी मृत्युचे हे राक्षसी थैमान व एकूणच मृत्युसंबंधीचे विचार आपल्याला नक्कीच सतावले असतील. यासंबंधात मनात आलेल्या विचारांना वाट करून द्यावी म्हणून हा लेखन प्रपंच.)*

१७व्या शतकातील वैद्यकीय इतिहासाच्या कागदपत्रांमध्ये क्षयरोगाची लागण झालेले रुग्ण राजाच्या हस्तस्पर्षामुळे रोगमुक्त झाले असे उल्लेख सापडतात. म्हणूनच कदाचित त्या रोगाला राजयक्ष्म असे म्हणत असावेत. इंग्रजांच्या सम्राज्यात या रोगाला King’s Evil या नावाने ओळखत जात होते. त्यामुळे सम्राटाच्या दरबारात रांग लावून टीबी रुग्ण उभे असत. पुढील कालखंडात ठिकठिकाणी या रुग्णासाठी सॅनिटोरियम बांधण्याची लाट आली. ज्यांना परवडत असेल ते टीबी रुग्ण आपल्या जवळच्या नातेवाईकासकट महिनो न महिने अशा ठिकाणी मुक्काम करत असत. व मृत्युला काही दिवसासाठी तरी दूर ठेवण्याचा प्रयत्न करत होते. परंतु राजा-महाराजांचा हस्तस्पर्ष होवो ना होवो, क्षयरोगाने मरणाऱ्यांची संख्या काही कमी नव्हती. म्हणूनच क्षयरोग हा क्रॉनिक रोग म्हणूनच त्याकाळी ओळखला जात होता.

मृत्युची अशा प्रकारे चोरपावलानी येवून आकस्मिकपणे माणसांचे जीवन संपवणे 20व्या शतकातील आधुनिक वैद्यकशास्त्रापूर्वीची नेहमीचीच घटना होती. 20व्या शतकापूर्वी माणसांचे सरासरी आयुष्य चिंपांझी वा घोड्याच्या आयुष्याइतकेसुद्धा नव्हते. वैद्यकीय प्रगतीमुळे 35-40 वर्षाचे आयुष्य आता

70-80च्या जवळपास पोचलेले आहे. कॉलरा, स्मालपॉक्स, प्लेग, यासारख्या सांक्रामिक रोगापासून जग मुक्त होत आहे. या दीर्घकाळच्या आयुष्यातील 25 टक्के आयुष्य वृद्धत्व व्यापत आहे. हेच वृद्धत्व काहीना काही शारीरिक तक्रारीचे मूळ असून सुख समाधानाचे आयुष्य जगू देत नाही. बहुतांश वृद्ध गोळ्या खावूनच दिवस ढकलत असतात. तरीसुद्धा आजची वैज्ञानिक व आर्थिक प्रगती मृत्युला इतके सहजासहजी जीव घेण्यास अशक्यप्राय करून टाकत आहे. आज मरण हे एक वैद्यकीय अनुभव असे वाटत आहे.

कुठे, कधी व कसे मरण येणार हे मागील शंभर वर्षात पूर्णपणे बदललेले आहे. नैसर्गिक संकट, अपघात वा आत्महत्या अशा दुर्घटनेमुळे मरणाऱ्यांचा अपवाद केल्यास 1990 पर्यंत 50 टक्के रुग्ण क्रॉनिक आजारामुळे मरणाच्या दारी जात होते. परंतु हे प्रमाण 2015 पर्यंत 30 टक्क्यावर आलेला आहे. विकसित देशातील रुग्णावरील उपचाराच्या वेळी अनपेक्षित वा गुंतागुंतीचे काहीतरी त्याच्या शरीरातील काही अवयव प्रयत्न करूनसुद्धा कुचकामी होत असल्यामुळे काही कालावधीनंतर ते मृत्यु पावतात. तसे काही न घडल्यास दीर्घकाळापर्यंत त्यांचा मुक्काम हॉस्पिटलमध्ये असतो. सुमारे 70 टक्के मृत्यु हॉस्पिटलच्या बेडवरच होतात. अगदी शेवटच्या क्षणापर्यंत तातडीचे उपचार करत जीव वाचवण्यासाठी शर्थीचे प्रयत्न केले जातात. 65 वर्षावरील बहुतेक अमेरिकन माणसं मृत्युपूर्वीचे काही दिवस वा महिने आयसीयूमध्ये काढत असतात. सुमारे 20 टक्के रुग्ण मृत्युपूर्वीच्या एक महिना अगोदर मोठ्या ऑपरेशनला सामोरे गेलेले असतात.

परंतु अशा प्रकारचा डॉक्टरी हस्तक्षेप रुग्ण वा रुग्णाच्या नातेवाईकांना क्लेशदायक ठरत आहे. एकदा रुग्ण हास्पिटलच्या तावडीत सापडला की त्यातून त्याला बाहेर काढणे नेक्स्ट टु इम्पॉसिबल ठरत आहे. महाभारताच्या कुरुक्षेत्रावरील चक्रव्यूहासारखी ही अवस्था आहे; आत जाणे माहित आहे

परंतु बाहेर सहीसलामत येणे शक्य नाही! हॉस्पिटलमध्ये प्रवेश घेतलेल्या कॅन्सरग्रस्त रुग्णाला घरातच जुजबी उपचार घेत असलेल्या रुग्णापेक्षा फार मोठ्या प्रमाणात ताण व विषण्णतेचा सामना करावा लागतो. त्याचे कुटुंबीय उपचार करणाऱ्या डॉक्टरांशी, हॉस्पिटलच्या व्यवस्थापकांशी वाद घालतात, भांडण उकरून काढतात, व कुणालाही न जुमानता प्रसंगी मारहाणही करतात. एवढ्या सर्व खर्चिक उपचारानंतर रुग्णावर मृत्यु ओढवल्यास संपूर्ण कुटुंब प्रचंड तणावाखाली वावरते. आणि त्यातून बाहेर पडायला त्यांना भरपूर वेळ लागतो.

महत्वाचे म्हणजे अशा प्रकारचा वैद्यकीय मृत्यु कुणालाच नको असतो. इकॉनॉमिस्ट या नियतकालिकाच्या पुढाकारानी घेतलेल्या एका सर्वेक्षणानुसार निरोगी असलेल्या बहुतांश नागरिकांना तशी वेळ आल्यास घरातच मृत्यु यावे असे वाटते. काही जणांना *तुमचे शेवटचे दिवस कसे असावेत* असे विचारल्यावर *जास्तीत जास्त जीवन जगता यावे* अशी इच्छा व्यक्त करत होते. या सर्वांना आपल्या घरात, आपल्या कुटुंबियांच्या सानिध्यात, वेदनारहित व शांत असा मृत्यु यावा असे वाटते. आपल्या मृत्युचे ओझे कुणावरही पडू नये ही प्रत्येकाची इच्छा असते. तरीसुद्धा काही जणांचा मृत्यु अत्यंत क्लेशदायक, जवळच्यांना त्रासदायक ठरतात.

एक मात्र खरे की शँपेनची बाटली उघडून कुणीही मृत्युला आमंत्रण देत नाही किंवा मृत्युला हसत हसत सामोरे जात नाही. म्हणूनच तुमचा मेंदू शाबूत असताना घरातच मरण यावे असे नमूद केलेल्या तुमच्या इच्छापत्राला डॉक्टर्स काडीइतकी किंमतसुद्धा देत नाहीत. त्यांच्या लेखी उपचाराची सर्व साधनं सुविधा हॉस्पिटलमध्ये असल्यास घरी मरावे या इच्छेला काही अर्थ नाही. त्यांच्या मते एखादा उपचार अत्यंत वेदना देणारा, अगदी जीव घेणारा असे वाटत असला तरी प्रत्यक्ष मरणापेक्षा तो नेहमीच उजवा ठरेल. व नंतरच्या

काळात सगळे काही ठीक झाल्यास उपचाराच्या वेळच्या वेदना विसरल्या जातील. म्हणूनच कित्येक रुग्णांना शेवटच्या क्षणापर्यंत मृत्युशी दोन हात करावेत असे वाटते व त्यासाठी डॉक्टरी उपचारातील वेदना सहन करण्याची त्यांच्या मनाची तयारी असते.

रुग्णांची (वा त्यांच्या नातेवाईकांची) काहीही इच्छा असली तरी डॉक्टर्स आपल्याला हवे तसे उपचार करतच राहतात. रुग्णाच्या वेगवेगळ्या अवयवामध्ये नळ्या घुसवून रुग्णाला होत असलेल्या वेदनांची पर्वा न करता हे उपचार चालू असतात. रुग्णाला हे उपचार अघोरी वाटत असले तरी डॉक्टरांना रुग्णाचा जीव वाचवण्याची जबाबदारी असते. उपलब्ध साधनं व स्वतःचे वैद्यकीय कौशल्य व अनुभव पणाला लावून रुग्णाचे जीव वाचवण्याची प्रतिज्ञा त्यानी प्रशिक्षणाच्या वेळी घेतलेली असते. त्यामुळे रुग्ण आयसीयूमध्ये नीट दिसतो की नाही, किंवा जवळच्या नातेवाईकांना रुग्णाला अशा स्थितीत बघून काय वाटत असेल, असले विचारच उपचार करणाऱ्या डॉक्टर्सना शिवत नाहीत. टर्मिनल कॅन्सरच्या रुग्णांना तुमची शेवटची इच्छा काय असे विचारल्यास 35 टक्के रुग्णांना, हॉस्पिटलमधून घरी जाण्याचा धोका पत्करूनसुद्धा, नातवाच्या वाढदिवसाला किंवा तत्सम एखाद्या घरगुती समारंभाला जावेसे वाटते. अनेक हृद्रोगतज्ञ नेहमीच मृत्यु प्रत्यक्षात बघत असतात, तरीसुद्धा मृत्युला सामोरे जात असलेल्या रुग्णाचे सांत्वन कसे करावे याची जाणच त्यांना नसते.

मानसिकरित्या सक्षम परंतु टर्मिनल आजार असलेल्या रुग्णांना डॉक्टरांच्या मदतीने दयामरणाची परवानगी देण्यास अनुमती असावी अशा एखाद्या कायद्याची अत्यंत गरज भासत आहे. कारण आयुष्याच्या शेवटी मरणाचा हक्कसुद्धा त्याच्यावरील उपचाराचाच एक भाग होऊ शकतो. परंतु सैद्धांतिकरित्या या कायद्याला होकार देणारे प्रत्यक्ष वेळ येईल तेव्हा फारच

कमी जण यासाठी पुढे येतात. सर्व्हैवल इन्स्टिंक्ट इतकी जबरदस्त असते की अगदी शेवटच्या क्षणापर्यंत मृत्युशी झुंज देण्याची तयारी त्यांच्यात असते. परंतु बहुतेक रुग्णांना वैद्यकशास्त्राने एकेक साधे सरळ, सोपे अशी पावलं टाकत मृत्युकडे नेण्यात काही गैर नाही असे वाटते.

या सर्व प्रकारात compassionate care फार महत्वाची ठरू शकते. वैद्यकशास्त्राच्या अभ्यासामध्ये वेदनारहित उपचार वा टर्मिनल आजार असलेल्यांना समुपदेशन या गोष्टींवर भर देण्यात येत आहे. परंतु प्रशिक्षण काळातील या गोष्टी प्रत्यक्ष प्रॅक्टीस करत असताना हवेत विरून जातात की काय अशी स्थिती आजची आहे. सांत्वनपर चार शब्द बोलण्याइतकाही वेळ या डॉक्टर मंडळीकडे नसतो याचे आश्चर्य वाटते. चार शब्द कसे बोलावेत यासाठी कुणीही पुढे येत नाही. कदाचित कसे बोलावे हेच कळत नसेल. चहा पीत पीत चार गोड गोड शब्द हे वैद्यकीय उपचाराच बसत नाहीत अशीच मनोधारणा यांची असावी. परंतु इतर सर्व उपचार थकल्यानंतर हे चार शब्दच रुग्णाला आजार सहन करण्यासाठी बळकटी देत असतात. सर्व उपचार थकल्यानंतर मरणासन्न अवस्थेतील रुग्णांना शेवटच्या क्षणापर्यंत उपचार घेण्याची सोय असलेल्या हॉस्पैस होममध्येसुद्धा या सांत्वनाचा अभाव असतो. परंतु हे सर्व चुकीच्या मार्गाने जात आहेत. कॅन्सर फारच बळावलेला असल्यास इतर उपचाराबरोबरच याही गोष्टी करू लागल्यास रुग्णांच्या वेदना काही प्रमाणात कमी होण्याची शक्यता आहे. एवढेच नव्हे तर अजून चार दिवस जगण्याची शक्यतासुद्धा!

बहुतेक डॉक्टरांचा उद्देश मृत्युला आणखी काही काळ लांबवण्याचा असतो, मृत्युबद्दल भाषणबाजी करणे नसते. परंतु त्यांनी सांत्वनपर चार शब्द बोलावे ही अपेक्षा अप्रस्तुत नाही. अमेरिकेतील शल्यविशारद व डॉक्टरी व्यवसायाबद्दल सातत्याने लिहिणारे डॉ अतुल गवांदे यांनी Serious Illness

Conversation Guide या त्यांच्या पुस्तकात क्रॉनिक रुग्णांच्याबाबतीत नेमके काय करावे, त्यांची आरोग्यस्थिती कशी आहे हे कुठले प्रश्न विचारून ओळखावे, यासंबंधीची माहिती दिली आहे. रुग्णाला हॉस्पिटलमध्ये प्रवेश दिल्या दिल्या सांत्वनपर संवाद साधल्यास रुग्णोपचारात त्याचा नक्कीच उपयोग होईल.

गंभीर आजारांसाठी रोगोपचार करताना अशा प्रकारचा बदल नक्कीच उपयोगी ठरेल. व मृत्युला सामोरे जाण्यास रुग्णाच्या मनाची तयारी करणे यातून शक्य होईल. व रुग्णाला एक चांगले मरण यातून प्राप्त होईल. यात धंदा म्हणून हॉस्पिटल्स चालवणाऱ्यांचे काही प्रमाणात नक्कीच नुकसान होईल. परंतु प्रॉफिट व सामाजिक बांधिलकी याचे बॅलन्स राखणे हेही तितकेच महत्वाचे असते. क्रॉनिक रुग्णांना हॉस्पैस होममध्ये पाठवून हॉस्पिटलचे बेड इतर रुग्णांना उपलब्ध करून देण्यासही या सांत्वनाचा उपयोग होऊ शकेल, हेही नसे थोडके!

संदर्भः इकॉनॉमिस्ट



# सांग सांग भोलानाथ..

शंभर -दीडशे वर्षापूर्वीच्या काही पुस्तकात किंवा त्याकाळच्या नियतकालिकात वर्णन केलेली सामाजिक परिस्थिती, रीती-रिवाज, रूढी-परंपरा किंवा एकूणच विचार करण्याची पद्धत इत्यादीबद्दल वाचत असताना, काही अपवाद वगळता, त्या कालखंडातील आपले पूर्वज किती राक्षसीवृत्तीचे होते असे अनेकदा वाटू लागते. सती प्रथेचे समर्थन, रखेल ठेवण्याची फॅशन, विधवा स्त्रियांचे केशवपन, विधवेवर होणारे जुलूम-अत्याचार, वेठबिगारी, श्रीमंतांचे दुर्वर्तन, सावकारीचा पाश, भाऊबंदकी, घराणेशाही, जीव घेणारे मानापमानांचे मापदंड, उच्चवर्णीयांची अरेरावी, जातीव्यवस्थेतून लादलेली गुलामगिरी, शेतकऱ्यावर उगारलेले आसूड, बालविवाह, जरठविवाह, बहुपत्नित्वाची हाव, स्त्री-शूद्र यांना शिक्षणाचे दरवाजे बंद, सोवळे-ओवळे यांचा अतिरेक, जुलूम-अत्याचार-बलात्कारांना मिळत असलेले अभय, लुच्चेगिरी, भामटेगिरी, इ.इ. गोष्टी माणूस म्हणून सामान्य कसे काय सहन करत होते? अगतिकतेचा, अज्ञानाचा फायदा घेणाऱ्यात सहानुभूतीचा थोडा तरी अंश होता की नाही? थोडासा तरी कळवळा, करुणा शिल्लक होती की नाही? एकूण एक सगळे एवढे स्वार्थी कसे काय होते? माणुसकी नावाची काही चीज होती की नाही? का सर्व जण मनोविकृत (सायकोपाथ) होते? असले प्रश्न विचारावेसे वाटतात.

मासलेवाईक उदाहरणच द्यायचे असल्यास विसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात प्रसिद्ध झालेल्या त्रिंबक नारायण अत्रे यांच्या *गावगाडा* या पुस्तकातील पेशवाई अखेरची खानदेशातील स्थिती संबंधीचा खालील परिच्छेदाचा देता येईल:

*अगदी साध्या गोष्टीतसुद्धा खरे काय आहे हे लोकांच्या तोंडून काढून घेण्यास यातायात पडते. लौकर दाद मिळवण्याच्या आशेने ते नेहमीच राईचा पर्वत*

*करतात. लांचलुचपती व एकमेकाशी अन्यायाचे वर्तन ह्यांचे प्रमाण इतके वाढले होते की ते सांगू गेल्यास कोणी खरेसुद्धा मानणार नाही. धाकटे घराण्यात अवश्य तितकी धूर्तता आणि रोकड मात्र पाहिजे की त्यानी वडील घराण्याच्या तोंडाला पाने पुसून त्याची मालमत्ता सरकारांतून आपल्याकडे ओढलीच समजा. त्यामुळे जिकडे तिकडे गृहकलहाचा वणवा पेटून सरकारी दप्तरातसुद्धा बनावट दस्तैवज घुसले. आणि अस्सल खरे दस्तैवज मिळविण्यासाठी मारामारी व ठोकाठोकी माजून राहिली. शेतकऱ्यांच्या अनाथ स्थितीला तोड उरली नाही असे झाले. मामलेदार, लष्करी लोक, सावकार, पाटील-कुळकर्णी, देशमुख-देशपांडे, ह्यांना मात्र अकरावा (भरभराटीचा काळ) आला. दुर्बल प्रबलांच्या झगड्यात लबाडी आणि कावेबाजपणा हीच काय ती हत्यारे दुर्बलाला कामास येतात. लोक जात्या लुच्चे किंवा पापपुण्याला न मानणारे असतात असे नाही. पण जुलमांतून कसेबसे निसटून जाण्याला त्यांना असत्याचा अवलंब करणे प्राप्त होते.*

ज्ञानप्रसारकच्या जानेवारी, 1852च्या अंकात, स्त्रीशिक्षणामुळे होणाऱ्या ‘ दुष्परिणामां’ ची यादीच एका पत्रलेखकाने दिली आहे.

• अती विद्येने स्त्रिया व्यभिचारी होतील.

• स्त्रियांस सोडचिठ्ठी द्यावयाची असेल तरच शिक्षणाविषयी अनुमोदन करावे.

• अनेक स्त्रिया करण्याची पुरुषांना आज मोकळीक आहे, आपल्या हातून कदाचित परद्वारी गमन होते. स्त्रिया शिकल्या की त्या प्रश्न विचारतील, “आम्हाला मोकळीक का नसावी?”

• स्त्रियांस शिकवून (पुरुषांनी) भाकऱ्या भाजाव्या काय?

• स्त्रिया विद्वान झाल्या तर भ्रतार, आप्त पुरुष, वडील माणसे ह्यांचा वचक बाळगणार नाहीत.

• स्वयंवर, पुनर्विवाह, पुरुषासारखे अधिकार मागणे याकरिता स्त्री बंड करेल.

• बायका शिकू लागल्या तर त्यांचे नवरे मरतात (?) .
• बायकांना शाळेत पाठवले तर पुरुषांच्या दर्शनाने भीड मर्यादा राहणार नाही.
• शाळेमध्ये कलावंतीण/हीन जातीच्या संसर्गाने पवित्रता व सदाचार जाईल.

जाऊ दे, एवढे मनाला वाईट वाटून घेण्याचे, भूतकाळ उकरून मनस्ताप करून घेण्याचे कारण नाही. कुठल्यातरी काळात, कुठे तरी अपरिचित ठिकाणी वा परदेशात या गोष्टी घडल्या अशी मनाची समजूत करून घेतल्यास कदाचित त्रास होणार नाही. केव्हा तरी आपल्याला न कळत, आपल्या डोळ्यादेखत न झालेल्या गोष्टींचा एवढा त्रास का म्हणून करून घ्यायचा? फक्त त्याकाळची ती 'माणसं' आजच्या पिढीसारखी नव्हती एवढे लक्षात ठेवले तरी पुरे.

याचा अर्थ अगदी अलिकडे म्हणजे 20व्या शतकाच्या उत्तरार्धातच मानवी मेंदूची उत्क्रांती पूर्ण झाली असे म्हणता येईल का? सर्व सहानुभूती, कळवळा, करुणा, माणुसकी इत्यादी गोष्टी या पूर्ण झालेल्या उत्क्रांतीचे फलित असे समजायचे का? किंवा आपण सर्व मानव वंशातून (होमोसेपियन) बाहेर पडलेले एका वेगळ्या प्रजातीशी संबंधित असलेले प्राणी आहोत का?

तसे काही नसावे.

त्या काळच्या कथा-कादंबऱ्या, नाटकं वाचत असल्यास आपण त्याच प्राणीवंशातलेच आहोत, त्यांच्यातल्या भावनेसारख्याच आपल्याही भावना आहेत, चांगले वा वाईट समजण्याचे 'शहाणपण' त्यावेळी जेवढे होते तेवढे आजही आहे, असे म्हणता येईल. त्याकाळीसुद्धा समाजाच्या वाईट प्रथेवर, वाईट वागणुकीवर, टीका करणारे ह.ना.आपटे, लोकहितवादी देशमुख, बाळशास्त्री जांभेकर, धोंडो केशव कर्वे, महात्मा जोतीबा फुले, सुधारककार आगरकर, विष्णुशास्त्री चिपळूणकर, महादेव गोविंद रानडे, वि. का. राजवाडे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादीसारखे मातब्बर लेखक, कादंबरीकार, पत्रकर्ते, इतिहासकार, समाज सुधारक होते व या विचारवंतानी त्या काळच्या

अनिष्ट प्रथांचे कधीच समर्थन केले नाही. वेळ प्रसंगी यातील बहुतेक जण धोका पत्करून समाजाच्या विरोधात उभे होते. परंतु त्याकाळच्या राज्यकर्त्यांच्या दडपशाहीमुळे ही विरोधाची धार बोथट झाली व त्या काळच्या समाजात फार मोठे स्थित्यंतर झाले नाही.

पुढील काळात या समाजधुरीणांच्या विचारांचा सन्मान झाला. व माणसं बदलू लागली. विज्ञान-तंत्रज्ञानाच्या रेट्यामुळे काही प्रथा गळून पडल्या व समाजव्यवस्था लवचिक होऊ लागली. त्या कालखंडातील व आताच्या समाजाची तुलना केल्यास फार मोठा फरक जाणवतो असे काहींना वाटते.

**खरोखरच फरक पडला आहे का?**

फरक असा नाही असेच म्हणता येईल.

कारण या पूर्वीच्या काळाइतकीच वाईट स्थिती आजही आहे. काही गोष्टीत कमी व काही गोष्टीत जास्त एवढाच तो फरक असेल. मुळातच त्या काळच्या जनसामान्यांच्या भोवती सामाजिकरित्या रचलेली गपचुप सहन करत रहाण्याची एक अदृश्य भिंत उभी होती. चुपचाप सहन करण्याची व मूकपणे बघत राहण्याची ती भिंत होती. आतासुद्धा जे काही क्रौर्य घडत आहे, अन्याय, अत्याचार घडत आहेत, त्यांच्या विरोधात उच्चार न करण्याची वेगळ्या प्रकारची भिंत आपल्याभोवती उभी आहे. सामाजिक समस्याबद्दल कितीही ओरडून सांगितले तरीही आख्खा समाजच बहिरेपणाचे ढोंग करत असल्यास समस्यांचे गांभीर्यच लक्षात येईनासे झाले आहे. ज्यांची समस्या आहे तेच उघडपणे सांगण्यास पुढे येत नसल्यामुळे परिस्थिती आणखी चिघळत आहे. ज्यांना या समस्या भेडसावत आहेत ते मात्र काहीही न घडल्यासारखे निःशब्द आहेत, मूकपणे सहन करत आहेत. (किंवा आत्महत्या करून जगाचा निरोप घेत आहेत.)

समाजाला लागलेली कीड असेच वर्णन करता येईल अशा रूढी-प्रथांच्या विरोधात आवाज उठवण्यापूर्वी या प्रथा चांगल्या की वाईट हेच समाजाला माहित नव्हते. या प्रथा पाळणाऱ्यांना त्या न्याय्य, नैतिक, व समाजाच्या स्थैर्यासाठी अत्यंत आवश्यक असेच वाटलेले असणार. त्यामुळे त्यांच्याविरोधात एकही शब्द न उच्चारता पिढ्यान पिढ्या त्या पाळल्या जात होत्या. यांच्या विरोधात कुणी ना कुणी तरी नक्कीच आवाज उठवला असेल. समाज मात्र त्यांना बाजूला सारून ऐकूनही न ऐकल्यासारखे केले असेल. काही वेळा या न्याय प्रथेविरुद्ध आवाज उठवल्याबद्दल शिक्षाही केली असेल. उन्मत्त जमीनदार शेतमजूरांना चाबकाने मारत असताना इतर शेतमजूर त्याचे विव्हळणे नक्कीच ऐकत असतील. त्यांच्या तोंडावाटे एखादा सुस्काराही सुटला असेल. परंतु तुम्ही काही म्हणालात का? असे विचारल्यावर गांगरून जाऊन छे, छे, मला काही ऐकूच आले नाही. असे उत्तर दिले असेल. व तेथून सर्व जण निमूटपणे निघून गेले असतील.

स्त्रियांना व बहुजनांना शिक्षणाचे दरवाजे बंद ठेवण्यात कुठल्याही प्रकारचे अपराधीपण त्या पिढीतल्यांना जाणवत नव्हते. परंतु म. फुले पती-पत्नींनी यातील दोष दाखवल्यानंतर पहिल्या पहिल्यांदा विरोध झाला व नंतर हळू हळू त्यांच्या विधानातील सत्यांशाबद्दल खात्री पटली व नंतरच्या पिढ्यातील स्त्रिया व इतर बहुजन शिक्षित होऊ लागले. जात – धर्म यातील अंधश्रद्धांच्या विरोधात फुले आगरकरापासून दाभोलकरापर्यंत गेली दीडशे वर्षे प्रयत्न केले जात आहेत. परंतु समाज अजूनही ढिम्म आहे. उलट धर्मांधतेला खत-पाणी घालणाऱ्या गोष्टींचे उदात्तीकरण केले जात आहे.

या नंतरची पुढची पिढीसुद्धा आजच्या पिढीबद्दल असेच उद्गार काढेल. आपले पूर्वज इतके क्रूर कसे काय होते? एवढे प्रदूषण होत असताना या लोकांनी विरोध का केला नाही? एवढे शेतकरी आत्महत्या करत असताना ते

थांबवता का आले नाही? जातीय हिंसाचाराचा प्रतिबंध का केला नाही? धार्मिक उन्मादामुळे शेकडोंची कत्तल होत असताना सत्ताधाऱ्यांना जाब का विचारला नाही? एवढा भ्रष्टाचार बोकाळलेला असताना वेळीच त्याला का थांबवता आला नाही? एवढी विषमता असताना जनता स्वस्थ कशी बसत होती? सर्वांच्यासाठी शौचालयांची सोय का केली नाही? काही देशात स्वच्छ रहा अशी सांगण्याची वेळ का आली? पृथ्वीला एवढे ओरबडताना यांचे कायदे कानून कुठे गेले होते? कुपोषण, भ्रूणहत्या, बालमृत्यू यांना कसे काय सहन केले जात होते? यांच्यात सहानुभूतीचा लवलेश होता की नाही? काही शहाणपण होते की नाही? का हे सर्व मनोविकृत होते?

खरे पाहता आपण जेव्हा मागे वळून पाहतो तेव्हासुद्धा त्यांच्याजवळ जीवनमूल्ये नव्हत्या, निर्णय घेण्याची कुवत नव्हती, न्यायिक बुद्धी नव्हती असे म्हणता येणार नाही. फक्त अन्याय, अत्याचारांच्या विरोधात लढा देण्यास ते असमर्थ होते. तीच स्थिती आजही आहे. आपण सर्व महत्वाच्या समस्याविषयी बधिर आहोत. गेंड्याची कातडी पांघरून निर्बुद्धासारखे वागत आहोत. जे काही जण आवाज उठवत आहेत त्यांचा आवाज ऐकू न आल्यासारखे आपण संवेदनाविहीन आहोत. उलट आपण त्यांची चेष्टा करतो, टर उडवतो, व प्रसंगी काही तरी असंबद्ध विधानं करून त्यांना नामोहरम करतो. मुळात आवाज उठवणाऱ्यांनासुद्धा हा निद्रिस्त समाज कृती करणार नाही याचा अंदाज असतो. कारण या जनसामान्यांना – त्यातल्या त्यात मध्यम वर्गातल्यांना – कुठल्याही भानगडीत पडायचे नसते. परस्पर काम होत असेल तर त्याचे श्रेय घेण्यासाठी मात्र ते तत्पर असतात. नाहीतर कुठल्यातरी क्षुल्लक गोष्टीवर चार शब्द बोलून ते पळून जाण्याच्या पावित्र्यात असतात. समाजाशी त्यांचे देणे-घेणे नसते. विरोधकांचे ऐकावे, कृती प्रवण व्हावे, त्यासाठी वेळ द्यावा, श्रम करावे असे त्यांना अजिबात वाटत नाही. ज्या काही समस्या

आपल्यासमोर ‘आ’ वासून उभे आहेत त्या समस्याच नाहीत अशी मानसिकता वाढत असल्यामुळे नैतिकदृष्ट्या त्या तातडीचे आहेत व त्यासाठी ताबडतोब कृती करायला हवी हा प्रश्नच त्यामुळे उद्भवत नाही.

आपण उभे असलेल्या पृथ्वीसंबंधीच्या काही महत्वाच्या समस्याकडे आपण वेळीच लक्ष न दिल्यास 6th Extinction फार दूर असणार नाही. कारण काही मानवनिर्मित गोष्टीमुळे हवामान, व भौगोलिक परिस्थिती झपाट्याने बदलत आहे. वातावरण कलुषित होत आहे. व त्याचे दूरगामी परिणाम होणार आहेत. जागतिक समस्यांचाच विचार केल्यास खाली नमूद केलेल्या गोष्टीकडे आपल्याला लक्ष द्यावे लागेलः

• जमिनीखालील नैसर्गिक इंधनासाठी अजून किती काळ प्रयत्न करत राहायचे? किंवा याविरोधात आवाजच उठवायचे नाही?

• जगभरातील जमिनीचे धूप होत असून पुढील 50-60 वर्षात जगातील बहुतेक जमीन नापीक होण्याचा संभव आहे. हे थांबवणे शक्य होईल का?

• कृषीउद्योगातील कार्पोरेट्सचे खिसे भरणे थांबवून शेतकऱ्यांना दिलासा मिळेल की नाही?

• वन्यजीवांच्या रक्षणाची जबाबदारी आपण घेणार की नाही? त्यासाठी जंगलतोड थांबवणार की नाही?

• जिभेचे चोचले पुरवण्यासाठी समुद्र वा महासागरातील जलजन्य प्राण्यांची कत्तल होत आहे. मासळींचे पुनरुत्पादन होणार की नाही, इतकी गंभीर ही समस्या आहे. याकडे लक्ष देणार की नाही?

• अण्वस्त्र व अणुऊर्जेच्या धोक्यापासून हे जग मुक्त होणार की नाही?

ही यादी अशीच वाढविता येईल.

या प्रकारच्या समस्या जगापुढे मांडण्यासाठी अनेक जण, अनेक संस्था आटोकाट प्रयत्न करत आहेत. परंतु प्रत्येक वेळी केवळ हां..... हूं...... शिवाय

दुसरे काही ऐकू येत नाही. या गोष्टींची ज्यांच्यावर जबाबदारी आहे ते दुर्लक्ष करत आहेत, तोंड उघडायलाही तयार नाहीत.

मुळात कुणीही, कुणाचेही ऐकण्याचा धोकाच पत्करत नाहीत. कारण ऐकले की आपण गुंतून जाऊ याची भीती सतत वाटत असते. माणसं अडचणींचा सामना करण्याऐवजी तेथून निसटण्याचे मार्ग शोधत आहेत. एका प्रकारे चेहऱ्यावर चिलखती मुखवटे चढवून वावरत आहेत. गांधीजींच्या माकडाच्या मूर्तीप्रमाणे ऐकणार नाही, बोलणार नाही व बघणार नाही या अवस्थेत आपण आहोत असे म्हणता येईल. त्यामुळे पुढच्या पिढ्या आपल्याला राक्षसी मनोवृत्तीचे ठरवल्यास वावगे ठरणार नाही. मानसिकवृत्त्या विकृत पिढी असे म्हटले तरी आपण ते निमूटपणे ऐकून घेऊ असे आपले आजचे वर्तन आहे.

यावर उपाय काय हा प्रश्न विचारल्यास पहिल्यांदा जनसामान्यांमध्ये ऐकून घेण्याची ताकद निर्माण करावा लागेल, त्यांना समस्येसंबंधी बोलते करावे लागेल. तज्ञ (बोलघेवड्या) जाणकारांची नव्हे तर, आजूबाजूला वावरत असलेल्या लोकांच्या व्यथा जाणून घेण्याची, मूकवेदना समजून घेण्याची, सहिष्णुता आपल्यात यायला हवी. प्रसिद्धी माध्यमात न झळकलेल्या घटनांची इत्थंभूत माहिती करून घेण्याची उत्सुकता हवी. केवळ शब्दानी नव्हे तर कृतीतूनही या स्मशान शांततेचा भंग करण्याची वेळ आता आली आहे. सामाजिकरित्या आपण बधिर नाही, आपल्यात अजूनही संवेदना शिल्लक आहेत, हे इतरांना कळण्याइतपत आपली कृती हवी. भविष्यातल्या पिढ्या भलत्याच देशातली माहिती वाचत आहेत असे त्यांना वाटू नये अशी कृती आपल्या हातून घडत रहावी.

तंत्रज्ञानामुळे जवळ येत असलेल्या या जगात कुठेही अन्याय, अत्याचार होत असल्यास एक माणूस म्हणून या अन्याय-अत्याचारांच्या विरोधात

आवाज वठविणे आपले कर्तव्य आहे. दहा हजार किलोमीटर्स दूरवरील एका आडरानात ते घडले आहे म्हणून आपण गप्प बसल्यास ती दुष्ट प्रवृत्ती तुमच्या दारात कधी येईल, कशी येईल याचा अंदाज करता येत नाही. त्यामुळे वेळीच सावध राहण्याची नितांत गरज आहे. ज्या प्रकारे प्रदूषणात भर घातली जात आहे त्याविरुद्ध आवाज उठविणे गरजेचे ठरेल. आपल्या हातून वातावरणाला हानी पोहोचेल अशी कुठलिही कृती होणार नाही याची खबरदारी घ्यावी लागेल. सगळे जण करतात, मी का करू नये ही मानसिकता बदलायला हवी. वातावरणातील प्रदूषण, जमिनीची धूप, जंगल तोड, समुद्र-महासागरांचा बिघडलेला समतोल, इत्यादीमुळे जागतिक हवामानावर दुष्ट परिणाम होत आहेत, हे आता मान्य करण्याची वेळ आली आहे. आताच दुष्काळ, अतीवृष्टी, अनावृष्टी, ढगफुटी, पिण्याच्या पाण्याचे दुर्भिक्ष, इत्यादिंचे संकेत मिळत आहेत. कुठलेही तंत्रज्ञान यांना रोखू शकत नाही. वेळीच व सातत्याने सामूहिकरित्या कृती केल्यास व सत्ताधाऱ्यांवर दबाव आणल्यास काही प्रमाणात सुधारणा होण्याची शक्यता आहे. आज ज्या समस्या स्थानिक आहेत असे वाटतात, त्याच यानंतर जागतिक समस्या म्हणून उग्रस्वरूप घेणारे ठरतात. या पुढच्या पिढ्या उपासमारीने मरून जाऊन नामशेष होऊ नये असे वाटत असल्यास आताच उपाय शोधावे लागतील.

आपली ही वसुंधरा मागच्या पिढीने देणगीच्या स्वरूपात आपल्या हातात सुपूर्द केलेली आहे. व हीच देणगी, त्याला धक्का न लावता, पुढच्या पिढीच्या हातात सोपवायची आहे, हे लक्षात ठेवूनच आपल्याला जीवन जगावे लागेल व त्यासाठी आपल्या जीवनशैलीत बदल करायची वेळ आल्यास, त्याचीही तयारी ठेवावी लागेल. त्यामुळेच

*सांग, सांग भोलानाथ,*
*माणसं सुधारतील का?*
हा प्रश्न अत्यंत कळीचा ठरत आहे.
●●●

# मनात रेंगाळत राहणारा कलाप्रवास

सई परांजपे या हरहुन्नरी व मनस्वी कलाकाराने शब्दातून चित्रित केलेले ‘सय - माझा कलाप्रवास’ हे पुस्तक 2016 साली प्रकाशित झालेला असला तरी आजही ते पुस्तक तितकेच वाचनीय व उत्कंठावर्धक आहे. कारण मागील 2-3 पिढ्यांना कलास्वाद म्हणजे नेमके काय काय असू शकते याची प्रचीती देणाऱ्या काही मोजक्या आर्टिस्ट्सपैकी सई परांजपे हे एक नाव, विशेष करून मराठी कलाविश्वात, नक्कीच लक्षात राहण्यासारखे आहे. सईची सर्जनशीलता, रसिकता, मनमोकळेपणा, विनोदबुद्धी इत्यादी सर्व गोष्टींची गोळाबेरीज म्हणून हे पुस्तक मराठी वाचकांना स्मृतीरंजनाचा अनोखा आनंद देते.

रेडिओ, दूरदर्शन, चित्रपट यासारख्या नवीन तंत्रज्ञानाला आपलेसे करत सर्जनशीलतेची उंची गाठलेल्या लेखिकेच्या बरोबरच्या या कलाप्रवासाला निघाल्यानंतर गेली 60-70 वर्षांचा काळ आपल्या डोळ्यासमोर उभा राहतो. कलाक्षेत्रातील स्थित्यंतरांची, सादरीकरणातील नावीन्यतेची, तंत्रज्ञानातून कला सादर करण्याच्या परिश्रमांची, वर्णनं वाचत असताना वाचक भूतकाळात जातो व त्याकाळी अनुभवलेल्या कलास्वादाची आठवण ताजी करतो. आयुष्यात घडत असलेल्या प्रसंगांकडे पहात असताना, त्यातील बारकावे समजून घेत प्रेक्षकांच्या रसिकतेला, त्यांच्यातील संवेदनशीलतेला एक वेगळी उंची देण्याचे कार्य सई परांजपेसकट त्या काळातील अनेक कलाकारांनी केले व त्यांचे हे ऋण आपण सहजासहजी विसरू शकत नाही. हे पुस्तक वाचून संपल्यानंतर आपण या प्रसंगांचे साक्षीदार होतो याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही.

पुणे आकाशवाणीवरील बालोद्यान या कार्यक्रमापासून सुरुवात झालेल्या सई परांजपेच्या या कलाप्रवासात आपण तिने दिग्दर्शित केलेल्या अनेक नाटकांचा, चित्रपटांचा रसास्वाद घेत घेत समारोपापर्यंत केव्हा पोचतो हे लक्षात येत नाही. पुस्तकाची भाषा ओघवती ठेवण्यात व एखाद्या कसलेल्या

सिनेएडिटरप्रमाणे पुस्तकातसुद्धा अनावश्यक गोष्टींचा तपशील गाळत एक सुंदर दृश्यात्मक पुस्तक लेखिकेने लिहिले आहे. यासाठी पूर्ण वर्षभर ‘सय’ हे साप्ताहिक सदर लिहिण्यास प्रोत्साहन देणाऱ्या लोकसत्ता या दैनिकाचे व तत्परतेने ते पुस्तक स्वरूपात उपलब्ध करून देणाऱ्या राजहंस प्रकाशनाचे कितीही आभार मानले तरी ते कमीच ठरतील.

समारोपात उल्लेख केल्याप्रमाणे "*वयाचा एक टप्पा गाठला, की काढता पाय घेण्याआधी आपण होतो याची कुठे तरी सुसूत्र नोंद करून ठेवावी, असं वाटू लागतं. स्वतःच आत्मचरित्र लिहायचं हा एक सर्वमान्य सरधोपट मार्ग आहे. पण या लेखनप्रकाराबद्दल मी नेहमीच साशंक राहिले आहे. प्रांजल आत्मकथाही हातचं काही राखून ठेवत नाही. आयुष्यातली प्रत्येक नाट्यपूर्ण घटना, गौरव, मानहानीचे प्रसंग, प्रणयगाथा, प्रेमभंग, कलह, ठाऊक असलेली इतरांची लफडी-कुलंगडी – अशा कितीतरी गोष्टी उजेडात आणाव्या लागतात. कोणत्याही आत्मकथेमधला समरप्रसंगाचा वृत्तांत चवीनं वाचताना एक विचार नेहमीच माझ्या मनात डोकावतो – “ही झाली तुमची बाजू. पण विरुद्ध पार्टीच काय?” अर्थात या एकतर्फी कथनातून ते आपल्याला कधीच समजू शकत नाही. म्हणून मला आत्मचरित्र हा लेखनप्रकार हा नेहमी दीड दांडीनं चोरट माप देणारा तराजू वाटतो.*” असे जरी लेखिकेला वाटत असले तरी तिच्या आयुष्यातील ‘कलापूर्ण धाडसाच्या प्रयोगा’बद्दल वाचत असताना वाचक पूर्णपणे हरवून जातो, हेही तितकेच खरे.

तिच्या या लेखनात वर्णन केलेल्या आकाशवाणी, बालरंगभूमी, दूरदर्शन, हिंदी आणि मराठी रंगभूमी, चित्रपट- लघुपट-बालचित्रपट- दिग्दर्शन, नाट्यदिग्दर्शन इत्यादी माध्यमामधील तिचा सहज वावर व त्यातील थरारक नाट्य वाचकांना मंत्रमुग्ध केल्यावाचून राहणार नाही. महत्वाचे म्हणजे या 60 – 70 वर्षाच्या कालावधीत तिला अनेक वेळा कटु प्रसंगाना सामोरे जावे

लागले. कित्येक व्यक्तींनी कळत न कळत तिला नामोहरम केले. परंतु हा कला प्रवास लिहित असताना या सर्व जणांना तिने माफ केले आहे व मनात कुठलेही किल्मिश न ठेवता प्रांजळपणे सर्व घटनांचा आढावा घेतला आहे, हे जाणवते. सईच्या आयुष्यात अनेक चढ-उतार असूनसुद्धा या कलाप्रवासाचा आलेख सादर करत असताना भावनेच्या भरात काही तरी लिहिले आहे असेही जाणवत नाही. सर्व घटनांकडे तिऱ्हाइत नजरेने पाहण्याच्या तिच्या हतोटीमुळे अपल्यासारखे सर्वसामान्य वाचकही तिच्या दृष्टिकोनातूनच त्या प्रसंगांकडे पाहू लागतो.

तरुणपणी अकस्मातपणे पुणे आकाशवाणीवर निवेदिका म्हणून नोकरीला लागल्यानंतर लहान मुलांच्या कार्यक्रमाच्या आयोजनाचीसुद्धा जबाबदारी तिने स्वतःहून पत्करली. रविवारच्या बालोद्यान कार्यक्रम म्हणजे नाना (गोपीनाथ तळवलकर), हरबा (नेमीनाथ उपाध्ये) व ताई (खुद्द सई परांजपे) यांची ती जणू मैफलच होती. आपल्यातील अनेकांना त्या कार्यक्रमात सहभागी होण्याची वा प्रत्यक्षपणे केंद्रावर जाऊन (मूकपणे) बघण्याची वा रेडिओवर ऐकण्याची आठवण नक्कीच असेल. पुणे आकाशवाणी केंद्राने सईला लहान मुलांसाठी काही नवीन उपक्रम करण्याची संधी दिली व तिने बालनाटिका लिहून व/वा दिग्दर्शित करून बालरंगभूमी समृद्ध केली.

सईच्या सर्जनशीलतेला दिल्ली येथील नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा या संस्थेत प्रवेश मिळाल्यानंतर चांगल्यापैकी वाव मिळाला. हिंदी – इंग्रजी नाटकात सहभाग घेतल्यामुळे तिला तिच्या पुढील आयुष्यात या अनुभवाचा चांगला फायदा झाला. या संस्थेचे प्रमुख, अब्राहम अल्काझी हे नाव दिल्लीच्या कलाविश्वात फार मोठ्या आदराने घेतले जात होते. सईच्या शब्दातच सांगायचे तर ‘अल्काझी एक चैतन्यमूर्ती’ होते. एकापाठोपाठ एक अशा इंग्रजीतील विस्मयकारक नाट्यनिर्मिती सादर करून त्यांनी त्याकाळच्या

कलावंताना घडवले. शेक्सपियर, इब्सेन, चेकॉव्ह, आयनेस्को अशा महान नाटककारांच्या श्रेष्ठ नाट्यकृतीमध्ये विद्यार्थ्यांना पूर्णपणे वाव देत दिल्लीकरासमोर त्या नाट्यकृतींना सादर करून त्यांच्या कडून वाहव्वा मिळवत होते. प्रेक्षकासमोर विद्यार्थ्यांच्या कलाकृतींचे प्रयोग सादर करण्याचा नवीन पायंडा त्यांनी पाडला.

राष्ट्रीय नाट्यविद्यालयाचा कोर्स पूर्ण करून परत पुण्याला आल्यानंतर येथील फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये विद्यार्थ्यांना अभिनय तंत्रज्ञान व प्रात्यक्षिके आणि आवाज व शब्दोच्चारण शिकवण्यासाठी तिला बोलावण्यात आले. अनेक होनहार विद्यार्थ्यांना या विषयावर तयार करून तिने हिंदी चित्रपट सृष्टीसाठी काही उत्तम कलाकारांना घडवले. तेथील राष्ट्रीय चित्रपट संग्रहालयातील मास्टरपीस असे गणले गेलेले चित्रपटांचा अभ्यास करण्याची व तेथील समृद्ध वाचनालयातील चित्रपटाविषयीची पुस्तक वाचण्याची अपूर्व संधी तिला मिळाली. त्या संधीचे तिने सोने केले. चित्रपटाविषयीचा अनुभव व पुस्तकी ज्ञान व तेथील वातावरण यातून बाहेर पडताना चित्रपट क्षेत्रात आपणही काही तरी करावे ही अदम्य इच्छा ती बाळगून होती. काही वर्षानंतर तीन उनाड मित्रांची व ‘चमको’ विक्रेती दीप्ती नवल यांच्यातील खेळकर ‘चष्मेबद्दूर’, अस्सल हलके फुलके भोळया खुळया चाळीतील मराठी कुटुंबावरील हिंदी चित्रपट ‘कथा’, अंध व्यक्तीचे आयुष्य उलगडून सांगणारा ‘स्पर्श’, चिपको चळवळीचा ‘पपीहा’, बारा वर्षे हाताने विहिर खोदणाऱ्या सोमावरील ‘दिशा’, संगीत क्षेत्रातील बाजारू स्पर्धेच्या भोवती चित्रित झालेला ‘साज’ इत्यादी चित्रपटांची निर्मिती केली. या चित्रपट निर्मितीबद्दलच्या कथा मुळातूनच वाचायला हवेत. तिच्या कित्येक चित्रपटांना आंतरराष्ट्रीय पारितोषकं मिळाली. व तिच्यातील कलागुणांना प्रेक्षकांनी भरभरून प्रतिसाद दिला.

या मधल्या काळात सईने दूरदर्शन व चिल्ड्रन फिल्म सोसायटी ऑफ इंडिया यासारख्या सरकारी संस्थांच्या चौकटीत राहूनसुद्धा आपला ठसा उमटवला. याच कालखंडात तिने पॅरिस व लंडनमध्ये राहून त्या देशातील कलाप्रकारांचा अभ्यास केला. त्या देशातील कलेबद्दलची आस्था व प्रेम याचा वेगळा अनुभव तिला आला.

मुळात कुठल्या ना कुठल्या गोष्टीत स्वतःला अडकवून घेण्याशिवाय चैन न पडण्याच्या सवयीमुळे या बहुआयामी व्यक्तित्वाने नाट्यक्षेत्रात काहीतरी करून दाखवावे म्हणून उडी घेतली. त्याकाळात तिने काही उत्कृष्ट नाटकं दिग्दर्शित करून यशस्वी करूनही दाखवले. तिच्याच 'नाट्यद्वयी' संस्थेतर्फे हिंदी व मराठी नाटकं ती सादर करू लागली. नाटक अगदी वेगळ्या प्रकारे उभे करण्याचा तिचा मानस होता. 'नाटकाच्या अंग-प्रत्यंगातून वेगळी अनुभूती जाणवली पाहिजे. मराठी रंगभूमीवर सांघिक रचना, हालचाली, पात्रांची देवाणघेवाण, नेपथ्याचा नेमका वापर, पोशाखाची रंगसंगती, इ. गोष्टीकडे फारसं लक्ष पुरवल जातं नाही. आपलं नाटक दृश्य झालं पाहिजे.' या अट्टाहासापायी तिने घेतलेले कष्ट, केलेल्या उचापती, (व काही वेळा तडजोड!) इत्यादी गोष्टी तिच्या रिव्ह्यू टाइप नाटकांच्या सादरीकरणातून दिसून येत होत्या. 'नांदा सौख्य भरे', हे त्याच मुशीतून तयार झालेले नाटक होते व ते भरपूर गाजले. मराठी 'अंमलदार'चा हिंदीतील 'जी हुजूर' हे नाटक तिच्याच संस्थेतर्फे सादर केलेले नाटकही हिंदी भाषिकात भरपूर प्रसिद्धी मिळवू शकली. मराठीतील काही गाजलेल्या नाटकांचे हिंदीत रूपांतर करून उत्तर भारतातील हिंदी प्रेक्षकासमोर यशस्वीरित्या सादर करून तिने वाहव्वा मिळवले. हिंदीत मराठी टाइप तमाशा, 'एक तमाशा अच्छा खासा', हा प्रयोग सादर करून सईने सर्व नाट्यरसिकांना सुखद धक्का दिला. *जास्वंदी, बिकट वाट वहिवाट, सख्खे*

*शेजारी, सोयरीक, माझा खेळ मांडू दे* इत्यादी नाटकाबद्दलचे सईचे अनुभव मुळातूनच वाचायला हवे.

सई परांजपेचा असा हा दीर्घकाळ मनात रेंगाळत राहणारा कलाप्रवास या पुस्तकाचे कुठलेही पान उघडून वाचायला सुरुवात केल्यास दरवेळी नवीन काही तरी वाचत आहोत असे वाटू लागते. इतरांच्या आत्मचरित्रातील तारीख, भेटी दिलेली ठिकाणं वा आवडलेल्या (वा न आवडलेल्या!) माणसांच्या बद्दलच्या आठवणींची यादी व त्याचे वर्णन वाचण्यापेक्षा हा कलाप्रवास नक्की वाचकांना भावेल.

**सय - माझा कलाप्रवास**

*सई परांजपे*

राजहंस प्रकाशन

किं 360 रु, पृ. सं 358



# ऐसा भी होता है!

सर्व टीव्ही चॅनेल्सवर दिवसभर ‘रोपण माणसा’चीच चर्चा होत होती. मुळात त्याचे नाव सुभाष सारेपाटील असे होते. परंतु चॅनेल्सवर तो ‘रोपण माणूस’ म्हणूनच ओळखला जात होता. मुंबईच्या एका नावाजलेल्या हॉस्पिटलमध्ये ऑपरेशनच्या वेळी ‘अल्पशी चूक’ झाल्यामुळे त्याच्या जनुकांमध्ये – विशेषकरून stem cell मध्ये – काही बदल झाले होते. हे जनुकं आता त्याच्या शरीरातील कुठल्याही अवयवातील मृत पेशींना ताबडतोब जिवंत करत होत्या. त्याची प्रत्यक्षरित्या खात्री करून घेणेसुद्धा शक्य झाले होते. त्याचे एखादे बोट कापले तरी 2-3 दिवसात त्या जागी दुसरे बोट तयार होऊन तुटलेल्या बोटाची जागा भरून काढत होती. एक हात कापून ठेवला तरी महिन्याच्या आत तेथे नवीन हात उगवत होता. हात कापल्याचे वा नवीन हात आल्याच्या खुणासुद्धा तेथे दिसत नव्हत्या. टीव्ही प्रेक्षकांना हे सर्व मजेशीर वाटत होते.

काही दिवसांनी सुभाषचे शरीर या जनुकांना साथ देईनासे झाले. बघता बघता त्याचे एकेक अवयव निकामी होऊ लागले. डॉक्टरांना फार काळजी वाटू लागली. त्याला वाचवण्याचा शेवटचा उपाय म्हणून त्यांनी त्याच्या डोक्यातील मेंदूला अलगद बाहेर काढून दुसऱ्या एका मृतशरीरामध्ये रोपण केले. या ऑपरेशनच्या वेळीसुद्धा झालेल्या घोर चुकीमुळे त्याच्या मेंदूचे दोन भाग झाले. डावा मेंदू उजव्या मेंदूपासून वेगळा झाला. डॉक्टरांनी शर्थीचे प्रयत्न करून या दोन्ही मेंदूंचे दोन मृतशरीरात रोपण करून सुभाषचे ‘जीव’ वाचविले.

ऑपरेशननंतर हा सुभाष दोन्ही शरीरात होता. या दोन्ही शरीरातील मेंदूतही बदल/वाढ होऊन प्रत्येक शरीरात स्वतंत्रपणे मेंदू कार्य करू लागले. परंतु आता एक सुभाषऐवजी दोन सुभाष आपल्यासमोर उभे होते. दिसण्यात जुळ्या भावासारखे नसले तरी त्यांची मानसिक अवस्था (अंकुर वा जुडवा

चित्रपटातील) जुळया भावासारखीच होती. सुभाषच्या शारीरिक हालचाली, त्याचे स्वभाव विशेष, त्याच्या गतकालच्या आठवणी, इतराशी वर्तणूक हे सर्व या दोन्ही शरीरात तंतोतंत जुळत होत्या. सुभाषच्या मित्र-मैत्रिणी वा नातलगांनी कितीही खोदून विचारले तरी हे दोन्ही 'सुभाष' ऑपरेशन पूर्वीच्या खऱ्याखुऱ्या 'सुभाष'सारखे उत्तरं देत होते. संशयाला अजिबात जागा नव्हती.

याच सुमारास काही कायदेशीर बाबी समोर आल्या. हिंदू वारसा कायद्यानुसार सुभाष सारेपाटिलाला काही मालमत्ता मिळणार होती. जमीनीत वाटा मिळणार होता. परंतु या दोन 'सुभाष'पैकी कुणाच्या नावे या संपत्तीची नोंद करायची? यातला खरा सुभाष कोण? दोघेही खरे असण्याची शक्यता नाही. परंतु कदाचित असतील का?

(Reasons and Persons – Derek Parfit)

** ** **

शेर्लाक होम्ससारख्या गुप्तहेराप्रमाणे आपण प्रथम येथे नेमके काय झाले, घटना कशा घडत गेल्या, व फॅक्ट्स काय आहेत याचा शोध घेणे गरजेचे ठरेल. आपल्या समोर दोन सुभाष आहेत – हवे असल्यास त्यातील एकाला - ज्याच्यात उजवा मेंदू आहे त्याला - उजवा सुभाष व दुसऱ्याला - ज्याच्यात डावा मेंदू आहे त्याला - डावा सुभाष असे आपण म्हणू शकतो. यापैकी खरा सुभाष कोण याचा आपल्याला शोध घ्यायचा आहे.

दोघेही सुभाष नाहीत हे मात्र नक्की. कारण मेंदूचे दोन भाग झाल्यानंतर त्या मेंदूचे दोन शरीरात रोपण झाले आहे. जर उजवा सुभाषचा काही कारणामुळे मृत्यु झाल्यास व डावा सुभाष जिवंत असल्यास सुभाष जिवंत आहे असे म्हणता येईल का? एकाच वेळी माणूस जिवंतही असू शकतो व मृतही असे होऊ शकत नाही. त्यामुळे खरा सुभाष हा डावा-उजवा सुभाष यातला होऊ शकत नाही.

उदाहरणार्थ ऑपरेशनच्या वेळी उजवा मेंदू जिवंत व डावा मेंदू मृतावस्थेत असता तर उजवा सुभाषच मूळ सुभाष असे गृहित धरून सर्व मालमत्ता त्याच्या नावे केल्यास कुणीही हरकत घेतली नसती. परंतु डाव्या मेंदूची पुनर्निमिती झालेली असल्यामुळे आपल्याला डावा – उजवा सुभाषमध्ये मूळ सुभाष कोण हे ओळखता येईनासे झाले आहे. कदाचित डावा वा उजवा सुभाष हे मूळ सुभाषच नाहीत असेही आपण दावा करू शकतो. परंतु हे जरा विचित्रच वाटेल. मूळ सुभाषच्या शरीराच्या बाहेर काही तरी अघटित घडल्यामुळे कुणालाही मालमत्ता देऊ नये हा निर्णय योग्य ठरणार नाही.

फार फार तर (छाप-काटा टाकून) आपणच - डावा किंवा उजवा सुभाष - यापैकी एकाची खरा सुभाष म्हणून निवड करून त्याच्या नावे मालमत्ता करून हे प्रकरण मिटवायचे (दाबायचे) असेही ठरवू शकतो. परंतु असे करणे दुसऱ्या सुभाषवर अन्यायकारक ठरेल. कारण यातील प्रत्येकाची सुभाष म्हणूनच ओळख निःसंशयपणे सिद्ध झाली आहे. व ही ओळख मनमानी नव्हती याचे पुरावेही आपल्याकडे आहेत. त्यामुळे दोघेही वा यापैकी एक जण, किंवा यापैकी कोणीही नाही या शक्यता असून या तिन्ही शक्यता चुकीच्या आहेत असे म्हणण्यास नक्कीच वाव आहे. परंतु यातील एक तरी बरोबर आहे व त्याला पर्याय नाही.

एखाद्या प्रश्नाला दिलेल्या उत्तरापैकी एकही उत्तर पुरेसे ठरत नसेल तर आपण चुकीचे प्रश्न विचारत आहोत की काय असे म्हणता येईल. तुम्ही तुमच्या बायकोला रोज मारायचे हे कधी थांबवलात? या प्रश्नाला होय किंवा नाही हे उत्तर पुरेसे ठरत नाही. कारण होय म्हटल्यास मी रोज मारत होतो व अलीकडेच मारणे थांबवले आहे असा अर्थ ध्वनित होऊ शकतो. किंवा नाही म्हटल्यास मी अजूनही बायकोला मारतो अशी कबूली दिल्यासारखे होईल. परंतु बायकोला कधीच मारत नव्हता अशा व्यक्तीचे उत्तर काय असू शकेल?

या रोपण माणसाच्या संदर्भातील प्रश्नामध्ये आपण त्याची ओळख यापूर्वीच्या गतकाळातील घटनाक्रमावरून व त्याच्या सत्यतेवरून खचित केली होती. परंतु ओळख नेहमीच बुचकळ्यात टाकणारी गोष्ट आहे. केवळ भूतकाळावरून आपण व्यक्तित्वाला जोखत असल्यास ते पुरेसे ठरणार नाही. भूतकालापेक्षा वर्तमान व भविष्य यातील सातत्य टिकवण्यातच आपले व्यक्तित्व उभारून येत असते. त्यामुळे या प्रकरणात सातत्याच्या संदर्भातील प्रश्न विचारून निर्णय घेणे शक्य झाले असते.

सातत्यात नेमके काय हवे? आपले शरीर? आपला मेंदू? आपली चेतना? आपल्यातील आत्मभान? की आणखी काही तरी..



# कलाकारांचे अजब जग...

अफाट समुद्राच्या तीरावर असलेल्या एका डोंगर माथ्यावर बसून अभय दातार बायनाक्युलर्समधून भोवतालचे दृश्य न्याहाळत होता. समुद्राच्या लाटा, लाटावरून उडणारे पक्षी, दूर कुठेतरी मच्छीमारांच्या होड्या इत्यादी गोष्टी बघत असताना त्याचे मन भरून येत होते. हाडाचा कलावंत असल्यामुळे प्रत्येक दृश्य नवीन काही तरी सांगत आहे, असे त्याला वाटत होते. तितक्यात त्याच्या बायनाक्युलर्सचा रोख समुद्राच्या काठावर पसरलेल्या निर्जन वाटणाऱ्या वाळूत केंद्रित झाला. काही क्षण रोखून पाहिल्यानंतर तेथे दूर कुठेतरी हालचाल दिसत होती. बायनाक्युलर्समधून जास्त फोकस करून बघितल्यानंतर त्या रेतीत प्रसिद्ध चित्रकार वासुदेव गायतोंडे त्रिमितीत चित्र काढताना दिसले. अभयला आश्चर्याचा धक्काच बसला. प्रत्यक्ष गायतोंडेना चित्र काढत असताना बघण्याचा योग! चक्क वासुदेव गायतोंडे आणि त्यांचे वाळूवरील चित्र! अभयला स्वतःच्या डोळ्यावर विश्वास बसेना.

काही वेळानी स्वतःला सावरल्यानंतर हे वाळूतील चित्र क्षणिक ठरेल अशी भीती त्याला वाटू लागली. समुद्राच्या लाटा तीरावर येऊन चित्र पुसून टाकतील याची धास्ती त्याला वाटू लागली. ते चित्र वाचवण्यासाठी काय करता येईल याचा तो विचार करू लागला. समुद्राला मागे सरकवणे वा लाटा येऊ न देणे हे व्यावहारिकपणे शक्य नाही, हे त्याला उमगले. वाळूतील त्या त्रिमितीतील चित्राचा साचा (mould) करून त्याची हुबेहूब प्रतिकृती एखाद्या दालनात ठेवता येईल हाही विचार त्याच्या मनात आला. फार फार तर लॉजवर जाऊन झूम कॅमेरा घेऊन यायचे व पाण्याच्या लाटामुळे पुसून जायच्या अगोदर त्या चित्राचे फोटो काढून या कलाकृतीला अमरत्व प्राप्त करून देता आले असते. परंतु वेळ इतका कमी होता की असे काहीही करणे अशक्यातली गोष्ट ठरली असती. शिवाय प्रत्यक्ष चित्रातील सौंदर्य कॅमेरातील फोटोत असणार

नाही याची त्याला कल्पना होती. आता या क्षणी फार फार तर समुद्रतीरावर जवळ जाऊन डोळे भरून चित्र न्याहाळायचे एवढेच तो करू शकला असता.

एका अप्रतिम कलाकाराची कृती बघण्यास मिळाली म्हणून आनंदित व्हायचे की ती कलाकृती काही क्षणात काळाच्या पडद्याआड कायमचे जाणार म्हणून दुःखी व्हायचे हा प्रश्न आता त्याच्या समोर होता.

** ** **

एखादी अत्युत्तम कलाकृती दीर्घकाळ टिकत नसल्यास त्याचे दुःख होणे स्वाभाविक आहे. परंतु शिल्पकलेप्रमाणे इतरही कलाकृती – पेंटिंग्स, भित्तीचित्रं, नाटकं, चित्रपट, संगीत, इ.इ. – जास्तीत जास्त काळ सुस्थितीत असावेत ही अपेक्षा ठेवणेसुद्धा चुकीचे ठरेल. कलेच्या सादरीकरणासाठी वापरलेल्या माध्यमाच्या काही मूलभूत मर्यादा असतात. व त्या मर्यादेत राहूनच कलाकृतींचा आस्वाद घेणे योग्य ठरेल. आताच्या प्रगत तंत्रज्ञानाच्या युगात फार फार तर एखादी चित्रफीत काढून त्या कलाप्रकाराचे वा त्याच्या सादरीकरणाचे चित्रण करून कलाप्रकाराला इलेक्ट्रॉनिक माध्यमाद्वारे दीर्घकाळ टिकवून ठेवता येईल. परंतु हे प्रकार अभिजात कलाकृतीला न्याय देणारे नाहीत, हे रसिकांना व कलावंतांनासुद्धा माहित आहे. म्हणूनच डॉल्बी – बोस सारख्या उच्चदर्जाचे स्पीकर सिस्टिम उपलब्ध असूनसुद्धा 1000-1500 रुपये मोजून संगीताच्या लाइव्ह कार्यक्रमांना रसिक गर्दी करतात. नाटकाचे कॅसेट्स उपलब्ध असले तरी नाट्यगृहात सादर केलेल्या नाटकाचा आस्वाद घेण्याची मजा और असते.

अजंठाच्या लेण्यामध्ये असलेल्या भित्तीचित्रासारख्या वा खजुराहोसारख्या ठिकाणी कोरलेल्या शिल्पासारख्या कलाकृती त्यातल्या त्यात दीर्घ काळ टिकणारे आहेत. त्या कलाकृतींचीही वाट लावणारे उतावळया रसिकांची संख्यासुद्धा कमी नाही, हेही तितकेच खरे. परंतु लोककला, नृत्य, गझल-

ठुमरी-शास्त्रीय संगीताची मैफल, नाटक, एकपात्री प्रयोग, यासारख्या कलाप्रकारांचे सादरीकरण पुढच्या अनेक पिढ्यापर्यंत पोचवण्यासाठी नेमके काय करायला हवे याचे उत्तर आज तरी आपल्याकडे नाही. गायतोंडेचे अप्रतिम चित्र तर फारच अल्पजीवी ठरेल. त्यामुळे कलाकृतीचे आयुष्य कलावंताने निवडलेल्या माध्यमाच्या आयुष्यावरून मोजावे की काय असे वाटू वागते. फार फार तर चित्रफितीच्या स्वरूपात इलेक्ट्रॉनिक्सच्या (सिलिकॉन-प्लॅस्टिकच्या) माध्यमातून कलाकृतीला थोडे फार जास्त आयुष्य देणे शक्य आहे. मुळात जतन करणाऱ्या या इलेक्ट्रॉनिक पद्धतीच्यासुद्दा मर्यादा आहेत आणि त्याची पूर्ण कल्पना अजून संशोधकांनासुद्धा नाही. उदाहरणार्थ, गाण्यांचे आयुष्य वाढवण्यासाठी प्रथम रेकॉर्ड्सची सोय आली. त्यांनतर स्पूल्स आले. स्पूल्सनंतर व्हीसीआरचे कॅसेट्स आले. वाकमनसाठीचे कॅसेट्स आले. सीडीज आल्या, व्हीसीडीज आल्या, यूएसबीवर रेकॉर्डिंग करता येवू लागले. पोर्टेबल हार्ड डिस्क आले. तरीसुद्धा रेकॉर्डिग किता काळ टिकेल याची कल्पना नाही. बायनरी कोडिंगमुळे 0 आणि 1 ला पर्याय नाही. व हे 0 व 1 साठी चुंबक शक्तीचा वापर होतो. परंतु या चुंबकांच्या गुणधर्मात थोडासा बदल झाला तरी सर्व गणित चुकते.

काही काळानंतर सिलिकॉन-प्लॅस्टिकच्या अंगभूत गुणधर्मामुळे कलाकृतीची गुणवत्ता नष्ट होत चाललेली दिसू लागेल. कदाचित कलाकृती कशी ऱ्हास होते हासुद्धा कलाविष्काराचा भाग म्हणून पुढच्या पिढीला दाखविता येईल.

कलावंत माध्यम निवडतानाच या सर्व गोष्टींचा विचार करत असला पाहिजे. चित्रकार ब्रशेस, रंग, रंगसंगती, कागद-कापड व इतर वस्तू यांची परख करूनच चित्राला सुरुवात करत असेल. त्यामुळे कलावंतच आपल्या कलाकृतीचे आयुष्य ठरवत असतो असे म्हणण्यास हरकत नसावी.

मुळात कलावंत असो वा सामान्य माणूस, प्रत्येक जण आपल्याला अमरत्व प्राप्त व्हायला हवे अशी एक सुप्त इच्छा मनात बाळगून असतो. किडा मुंग्यासारखे आयुष्य काढणाऱ्या सामान्य माणसांना हे जमत नाही. परंतु कलाकार मात्र मृत्युपश्चातही आपल्या कलाकृतीतून अमरत्व प्राप्त करून घेवू शकतो, असे त्याला वाटते. परंतु रसिक म्हणून आपण कलेचा आस्वाद घेत असताना बहुतेक वेळा कलाकार विस्मृतीतच ढकललेला असतो. त्यामुळे काही अपवाद वगळता कलाकाराचे अमरत्वाचे स्वप्न पूर्ण होत नाही. कलाकृती पूर्ण ऱ्हास होईपर्यंतच proxy कलावंताचे आयुष्य असते, असे फार फार तर म्हणता येईल.

वैध-अवैध मार्गाने पुढील सात-आठ पिढ्याला पुरेल एवढी संपत्ती साठवून ठेवणाऱ्यांच्या नंतरच्या पिढ्यासुद्धा मूळ पुरुषाला विसरतात. तिसऱ्या पिढीतल्यांना आजोबा-पणजोबांची नावे प्रयत्नपूर्वक आठवावे लागतात. त्यामुळे अमरत्व हे मृगजळ असून यासाठी एवढा उपद्व्याप करण्याची गरज नाही, हे लक्षात ठेवल्यास संपत्तीची हाव तरी कमी होईल.

कला असो वा कलावंत, हे दोन्ही मर्त्य असून कलेची खरी किंमत कलास्वादातच आहे, कलानुभवातच आहे असे आपण निःसंकोचपणे म्हणू शकतो.



# प्रार्थनेने आजार बरे होऊ शकतात का?

अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठातील गर्भधारणेवर संशोधन करणाऱ्या तज्ञांनी वैज्ञानिकांना बुचकळ्यात टाकणारा एक शोधनिबंध 2001 साली प्रसिद्ध केला होता. त्यांच्या निष्कर्षानुसार ख्रिश्चन बांधवाने केलेल्या प्रार्थनेमुळे सुखद बाळंतीण होण्याचे प्रमाण प्रार्थना न केलेल्या बाळंतिणींच्या दुप्पट आहे. प्रार्थनेचा अशा प्रकारच्या उपयोगाबद्दलचा हा निष्कर्ष ख्रिश्चन धार्मिकांना सुखावणारा होता आणि इतर धार्मिकसुद्धा आपापल्या धर्मातील प्रार्थनेविषयक गोष्टींना पुनरुज्जीवित करण्यास प्रेत्साहन देणारा होता. तीन वर्षानंतर यातील एका संशोधकाने आपला शोधनिबंध चुकीच्या विदावर आधारलेला होता व आम्ही इतर शास्त्रज्ञांना फसवण्यासाठी विदामध्ये अफरातफर केली होती अशी जाहीर कबूली दिली. तो शोधनिबंध नंतरच्या काळात अंतर्जालावरून काढून टाकण्यात आला व विद्यापीठातर्फे त्या तज्ञांवर कारवाई करण्यात आली. यातील एक तज्ञ मात्र आपल्या निष्कर्षाप्रती निष्ठा ठेऊन होता.

या शोधनिबंधाच्या निमित्ताने तज्ञांच्या वर्तुळात पुन्हा एकदा प्रार्थनेने आजार बरे होऊ शकतात का? हा परस्पर अंतर्विरोध असलेला विषय चर्चेला आला.

गंमत म्हणजे अमेरिकन शासनाने या अत्यंत अवैज्ञानिक स्वरूपातील विषयावरील संशोधनासाठी सुमारे 25 लाख डॉलर्स अगोदरच खर्ची घातलेले असल्यामुळे वैज्ञानिक जगतात शासनाची छी थू होत होती. अनेक वैज्ञानिकांच्या क्षोभाला शासन लक्ष्य झालेले होते. कुठल्याही दृष्टीने विज्ञानाशी संबंध नसलेल्या विषयावर करदात्यांचा पैसा खर्च करणे निव्वळ अपव्यय ठरेल असे वैज्ञानिकांना वाटत होते. शासन मात्र एकदा या विषयाचा सोक्ष मोक्ष लावण्यासाठी पैसा खर्च करत आहे या बचावाच्या पावित्र्यात होते.

हॉर्वर्डच्या एका मानसतज्ज्ञाच्या मते प्रार्थनेच्या प्रकारात अतींद्रिय शक्तीचा सहभाग असतो आणि तो विज्ञानाच्या कक्षेत येत नाही. यातून काही मिळणार नाही; एवढेच नव्हे तर याबद्दलच्या संशोधनात श्रम व पैसा व्यर्थ जातात असे त्याने ठाम विधान केले होते. परंतु प्रार्थनेचा पुरस्कार करणाऱ्या संशोधकांचा प्रार्थनेच्या रोगोपचार क्षमतेवर भलताच विश्वास असल्यामुळे *प्रार्थनेचे परिणाम कसे होतात किंवा त्या तपासण्याची रीत कोणती याबद्दल मुख्य प्रवाहातील वैज्ञानिक अनभिज्ञ असतात म्हणून ते सरधोपट विधान करतात; त्यामुळे त्यांना समजून घेण्याची गरज नाही* .असे प्रतिवाद करत होते.

नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ हेल्थ या संस्थेच्या पर्यायी रोगोपचार विभागाच्या मुख्यस्थाच्या मते हा प्रश्न धर्माचा नसून प्रत्यक्ष व्यवहारात याचा काही उपयोग होऊ शकतो का यावर भर द्यायला हवा. अस्पिरिनच्या गोळया डोकेदुखीवरील इलाजाप्रमाणे हृदयासंबंधीच्या रोगावरही परिणामकारी ठरू शकतात, हे आता आम्हाला कळले. कदाचित प्रार्थनेच्या अभ्यासातून हाती काही तरी लागेल असे या संस्थेला वाटत होते.

शासनाच्या एका सर्वेक्षणानुसार सुमारे 45 टक्के रुग्ण रोगोपचाराच्या कालावधीत प्रार्थनेचा अवलंब करतात व त्यांच्यातील बहुतेक, महागडे औषधोपचार न परवडणारे गरीब असतात. सार्वजनिक आरोग्योपचारासाठी प्रार्थनेतून काही लाभ मिळत असल्यास ते नाकारण्यात हशील नाही, असे शासनालाही वाटते.

काही समाजशास्त्रज्ञांच्या मते प्रार्थना हे रुग्णांच्या वेदनेविषयी सहानुभूती दाखवण्याचा एक प्रकार असून त्यात गैर काही नाही.

**प्लासिबो परिणाम**

2000 सालापासून प्रार्थनेचा रुग्णावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास किमान वेगवेगळया दहा ठिकाणी झाला असेल. त्यात बोस्टन येथील

Mind/Body Medical Institute आणि शासन पुरस्कृत National Institute of Health (NIH - एनआयएच) या प्रमुख संस्थांचाही सहभाग होता. एनआयएच संस्था अपघातात इजा झालेल्यांच्यावर रुग्णाची ओळख असलेल्यांनी व ओळख नसलेल्यांनी केलेल्या प्रार्थनेमुळे होणाऱ्या प्लासिबो परिणामावर संशोधन करत होती. स्तनविकार झालेल्या काही स्त्री रुग्णांच्या संमतीने त्यांच्या पाठीवर मुद्दामहून थोडीशी इजा करण्यात आली. आणि दूर दूर ठिकाणी असलेल्या त्यांच्या नातेवाइकांना प्रार्थना करण्याची विनंती करण्यात आली. प्रार्थना करणाऱ्यांमध्ये वेगवेगळे उत्पन्न गटातील व वेगवेगळ्या चर्चशी संबंधित असलेले कॅथोलिक धर्मपंथीय होते. परंतु या अभ्यासातून हाती काही लागले नाही. अशाच प्रकारचे इतर अभ्यासही निष्फळ ठरले.

प्रार्थनोपचाराचे समर्थकसुद्धा अशा प्रकारचे अभ्यास फार फार क्लिष्ट असल्यामुळे ठाम निर्णयापर्यंत पोचणे अवघड जाते, अशी टीका करत होते. पुरस्कर्त्यांमध्येच 'इजा' कमी होण्यासाठी प्रार्थनेचा कुठला 'डोज' द्यायला हवे होते याबद्दल टोकाची मतं होती. काहींच्या मते एकेकट्यासाठी प्रार्थना केली तरी चालेल. परंतु इतरांच्या मते मोठ्या समूहानी प्रार्थना केल्यास अपेक्षित परिणाम दिसू लागतील. या समर्थकांमध्ये काही ख्रिश्चन धर्म प्रचारक, काही ज्यू धर्मगुरू, काही बुद्ध धर्मीय, आणि काही पर्यायी उपचार करणारे होते.

प्रार्थनेच्या उपचारासंबंधी अजून एका गृहितकाची मांडणी केली जाते. खरोखरच प्रार्थनेमुळे रुग्ण बरा होत असल्यास – या बद्दलच मुळात शंका उपस्थित केले जात होते – त्यात धर्म वा परमेश्वरावरील श्रद्धा वा बळजबरी नसल्यास – जे काही होत आहे ते 'आंतरिक ऊर्जा' वा दोन मनाचे संभाषण किंवा ज्ञात काळ – अवकाश या पलीकडील एखादी अदृश्य मिती या सदरात मोडते. वैज्ञानिकांनी मात्र या सर्व शक्यतांना नकार दिला. त्यांच्या मते

आंतरिक ऊर्जा वा मना-मनामधील संभाषण या गोष्टी फक्त कल्पनेतच असू शकतात, वास्तवात नाही. काल व अवकाश या पलिकडे एखादी मिती असू शकते याबद्दलही ठाम पुरावे नाहीत. काहींना मात्र रुग्णाला आपल्यासाठी प्रार्थना केली जात आहे हे माहित झाल्यावर त्याच्या आजारावर सकारात्मक परिणाम होऊ शकतात असे वाटत होते. येथे एका प्रकारे feel good factor काम करत असावे.

एक मात्र खरे की मंदिराला नियमितपणे जाणाऱ्यातील कित्येकांना प्रार्थना हा प्रकार विज्ञानाच्या अखत्यारीतील विषय नाही, असेच वाटत आले आहे. कारण प्रार्थनेचा उद्देश व त्यातील आशय यामध्ये फार मोठ्या प्रमाणात विविधता असते – काही जण प्रार्थनेच्या वेळी परमेश्वराचे वर्णन करतात, काही जण (सहन) शक्ती देण्याची याचना करतात, तर काही जण सर्व काही भगवान के हाथ में या मनस्थितीतून प्रार्थना करत असतात. काहीना तर परमेश्वराला विनंती केल्यास तो नक्कीच विनंतीला मान्यता देऊन पदरी काही तरी टाकेल यावर विश्वास असतो.

परमेश्वराला अशा प्रकारे चाचणीला सामोरे करणे व प्रार्थनेचा पडताळा पाहणे हेच चुकीचे आहे, असे धर्मगुरूंना वाटते. हा सर्व प्रकार धर्माचरणाला काळिमा फासणारा आहे. जोपर्यंत परमेश्वर ज्ञात नैसर्गिक नियमांच्या आवाक्यात न येणारा आणि या नियमांच्यापेक्षा वेगळे काहीही करू शकणारा यावर वैज्ञानिक विश्वास ठेवत नाही तोपर्यंत त्यांचे निष्कर्ष चुकीचेच ठरणार, असे स्पष्ट मत धर्मगुरू नोंदवतात.

**प्रार्थना आणि हृदय रोग**

प्रार्थनेचे पुरस्कर्ते नेहमीच प्रार्थनेमुळे हृदय विकार कमी झालेले दाखले देत असतात. या दाव्यातील तथ्यांश शोधण्यासाठी सॅन फ्रान्सिस्को येथील एका हॉस्पिटलमध्ये चाचणी करण्यात आली. पुनर्जन्मावर विश्वास असलेले काही

ख्रिश्चन, हृदयविकारग्रस्त 393 रुग्णापेंकी 192 रुग्णासाठी प्रार्थना करत होते. त्या हॉस्पिटलमधील तज्ज्ञांच्या मते इतर रुग्णापेक्षा प्रार्थना केलेल्या रुग्णांच्या आरोग्यस्थितीत भरपूर सुधारणा दिसत होत्या. नेहमीच्या औषधांपेक्षा फार कमी औषधं ते घेऊ लागले. श्वासोच्छ्वासाचा त्रास कमी झाला.
शोधनिबंधाच्या शेवटच्या ओळीत या तज्ज्ञांनी परमेश्वराचे आभार मानून प्रार्थना किती उपकारक आहे असे निष्कर्ष काढले होते. अजून एका अभ्यासात 990 हृदयविकारग्रस्त रुग्णांसाठी कित्येक अनोळखी व्यक्तींनी प्रार्थना केल्यामुळे या रुग्णांच्या आजारासंबंधींच्या सुमारे 30 घटकावर सकारात्मक परिणाम झाला होता. या निबंधाच्या संशोधकांच्या मते डार्विनचा सिद्धांतच मुळात अंदाजपंचे आहे, तसेच त्यांचे निष्कर्षही त्यास मिळते जुळते आहेत.

गंमत म्हणजे या दोन्ही प्रयोगात संशोधकांना नेमके काय घडत आहे याची पुसटशीसुद्धा कल्पना नव्हती. कोण, कुणासाठी, केव्हा, कुठे प्रार्थना करत आहेत, प्रार्थनेचा आशय कोणता, किती वेळ प्रार्थना केली इत्यादींच्या नोंदी नव्हत्या, माहिती नव्हती. इतर चिकित्सकांच्या मते सरधोपटपणे केलेल्या अशा प्रकारच्या चाचणींच्या निष्कर्षावर विश्वास ठेवणे विज्ञानाशी प्रतारणा ठरेल. रुग्णाच्या आजारापणावरील घटकातील सुधारणा योगायोगानेसुद्धा झाली असण्याच्या शक्यतेला नाकारता येत नाही. संख्याशास्त्रज्ञांच्या मते जोपर्यंत अपेक्षित निष्कर्ष मिळत नाहीत तोपर्यंत प्रयोगानंतर प्रयोग करत राहणे असे काही तरी येथे घडल्यासारखे वाटते. यातील एका संशोधकाने स्वतःच एक फॉर्म्युला तयार करून सर्व विदा त्यात कोंबून निष्कर्ष काढलेला होता. परंतु मुळातच फॉर्म्युलाच्या योग्यायोग्यतेची दखल घेतलेली नव्हती. अनेक तज्ज्ञांनी या प्रकारच्या निष्कर्षावर सडकून टीका केली. अतींद्रिय शक्तीवर विश्वास ठेवणारेच असे काही तरी निष्कर्ष काढतील अशी एक तिखट प्रतिक्रिया त्याबद्दल होती. तरीसुद्धा धर्मोपासक व पर्यायी उपचारांचे समर्थक

प्रार्थनेमुळे होणाऱ्या परिणामांची चिकित्सा संशोधकांनी करायलाच हवे असे आग्रह धरत होते. हा एक open minded चिकित्सा असेल यावर त्यांचा भर होता.

**संशोधनातच अफरातफर**

Distant healing वरील संशोधनासाठी एका संशोधकाने विद्यापीठाकडून निधीची तरतूद केली होती. यात दूर अंतरावरील व्यक्तींनी रुग्णासाठी प्रार्थना केल्यास रुग्णावर काय परिणाम होऊ शकतात हा संशोधनाचा विषय होता. वेगवेगळया धर्मातील धार्मिकांनी व परमेश्वरच्या चमत्कारशक्तीवर श्रद्धा असणाऱ्यांनी प्रार्थनेमुळे रुग्णावर सकारात्मक परिणाम होतात याचा बराच बोलबाला झालेला असल्यामुळे या संशोधकाला हा विषय संशोधनासाठी घ्यावासा वाटला. या संशोधकाने काही एड्सग्रस्त रुग्ण व काही मेंदूचे कॅन्सर असलेले रुग्ण यांच्यावर दूर अंतरावरून केलेल्या प्रार्थनेचा काही उपयोग होतो का यासाठी निधी मागितली होती. हे दोन्ही प्रयोग सॅन फ्रान्सिस्को येथील एका हॉस्पिटलमध्ये करण्यात आले. परंतु हा संशोधकच काही दिवसानी ब्रेन कॅन्सरचा बळी ठरला. हॉस्पिटलने या संशोधनातील दूर अंतरावरून केलेल्या प्रार्थनेमुळे रुग्णावर होणाऱ्या सकारात्मक निष्कर्षाला भरपूर प्रसिद्धी दिली. परंतु संशोधकाच्या मृत्युनंतर त्यानी यापूर्वी केलेल्या चाचणीतील पुराव्यांची पुनर्तपासणी करण्यात आले. पुराव्यात भरपूर तफावत होती. मोठ्या प्रमाणात चुका होत्या. निष्कर्षात विसंगती होती. प्रयोगासाठी नोंदी केलेल्या रुग्णांची नावे व पत्ता आणि निष्कर्षातील रुग्णांची नावे व पत्ता यात ताळमेळ नव्हता. हॉस्पिटलचे मुख्यस्थ मात्र आमच्याजवळ निष्कर्ष होते व त्यावर आमचा विश्वास बसत नव्हता. आम्ही त्याची छाननी करू शकलो नाही, विश्लेषण करू शकलो नाही, तरीसुद्धा आम्ही निष्कर्षांना जाहीर प्रसिद्धी दिली असे कबूल केले. कदाचित निधी मिळवण्यासाठी अपरातफर केल्याची शक्यता वर्तविली

जात होती. या सर्व व्यवहारात सुमारे 20 लाख डॉलर्सची अफरातफर झाली होती. संबंधितावर खटलेही भरले गेले. सुरुवातीला उल्लेख केलेल्या कोलंबिया विद्यापीठातील संशोधनातही असाच प्रकार घडला होता अशी बातमी न्यूयॉर्क टाइम्स या वृत्तपत्राने छापली.

जॉन टेंपलटन फौंडेशनने 25 लाख डॉलर्सची निधी Mind/Body Medical Instituteला प्रार्थनेच्या परिणामावरील संशोधनासाठी दिले होते. मन व शरीर यामधील अंतर्गत संबंधावर संशोधन करत असलेली ही संस्था होती. या संशोधनात 1800 रुग्णांनी आपणहून भाग घेतला. हृदयाचे बाय पास शस्त्रक्रिया झालेल्या या रुग्णांना शहरातील सहा हॉस्पिटल्समध्ये शस्त्रक्रिये-नंतरचे निरीक्षण व उपचारासाठी ठेवलेले होते. वैद्यकीय मार्गदर्शनानुसार त्यांच्यावर प्रार्थनेचा काय परिणाम होतो याची माहिती गोळा करण्यात आली. काही डॉक्टर्सच्या मते हे संशोधन अगदी बारीक सारीक तपशिलासह अतिशय गांभिर्याने केले जात होते. वैद्यकीय जगतात उत्सुकता शिगेला पोचली होती. परंतु या संशोधनाचे निष्कर्षच कधी प्रसिद्ध झाले नाहीत. नावाजलेल्या दोन वैद्यकीय विषयक नियकालिकांनी शोधनिबंध प्रसिद्ध करण्यास नकार दिला. या निबंधाच्या संशोधकाच्या मते हे सामान्य शोधनिबंध नसून वैद्यकीय शास्त्राला कलाटणी देणारे निबंध असेल. विज्ञान व धर्म यांचे सांधेजोड करणारा हा पुरावा असेल. तरीसुद्धा हे संशोधन कधीच प्रकाशात आला नाही. संशोधकांचे वैयक्तिकरित्या ईश्वर व धर्म यावर असलेली श्रद्धा संशोधनाकडे वस्तुनिष्ठ रीतीने पाहण्यास आडकाठी आणली असेल असे त्यावर टीका करणाऱ्यांचे मत होते.

अजून एका प्रयोगात 40 व्यसनाधीन रुग्णावर प्रार्थनेच्या परिणामांचा अभ्यास केला. तेथेही काही हाती लागले नाही. या रुग्णांना आपल्यासाठी

प्रार्थना केली जात आहे हे माहित होते तरीही त्यांची स्थिती आणखी बिघडत गेली.

**प्रार्थनेसंबंधीच्या समस्या**

प्रार्थनेच्या विषयात संशोधन करत असताना संशोधकांना डोकेदुखी ठरणाऱ्या काही प्रश्नांचा सामना करावा लागतो.

- प्रार्थनेचे संख्यात्मक व गुणात्मक अशी विभागणी केल्यास संख्यात्मक विभागणीत प्रार्थनेची वारंवारता, प्रार्थनेची संख्या, प्रार्थनेसाठी दिलेला वेळ, प्रार्थना करणाऱ्यांची संख्या इत्यादी घटकांचा अभ्यास करता येईल का?
- गुणात्मक विभागणीत प्रार्थना करणाऱ्यांची संवेदनशीलता, त्यांची तीव्रता, त्याचे गांभीर्य इत्यादी गोष्टी तपासता येतील का? परंतु हे घटक व्यक्तिनिष्ठ असल्यामुळे वस्तुनिष्ठतेला प्राधान्यक्रम देणाऱ्या वैज्ञानिकांना याचा काहीही उपयोग होत नसावा.
- प्रार्थनेतील आशयामुळे प्रार्थनेचे यशापयश ठरत असल्यास – काहींची प्रार्थना जास्त appealing असू शकेल – त्याचे मोजमाप करता येईल का?
- प्रार्थना श्रद्धा या प्रकारात मोडत असल्यामुळे श्रद्धेचे मोजमाप करता येईल का?
- प्रार्थनेचे यशापयश रुग्णासाठी किती जणांनी प्रार्थना केली यांच्यावर अवलंबून असू शकेल का?
- प्रार्थना करणाऱ्या व्यक्तीचे लिंग, वय, धार्मिकतेकडील कल, अनुभव, प्रार्थनेचे कौशल्य यावरून प्रार्थनेचे यशापयश ठरत असेल का?
- प्रार्थना करणाऱ्या व्यक्तीची नैतिकता, सामाजिक बांधिलकी, सहानुभूती, संवेदनशीलता, सहिष्णुता, औदार्य, आस्तिकता इत्यादी

घटकांचा प्रार्थनेच्या अनुकूल वा प्रतिकूल परिणामावर प्रभाव असू शकेल का?

- कुणासाठी प्रार्थना केली जात आहे याचाही प्रभाव होत असेल का?
- प्रार्थनेचे चांगले परिणाम दिसून येण्यासाठीचे निकष कोणते?

या प्रकारच्या प्रश्नांची उत्तरं शोधणे वैज्ञानिकांना जिकिरीचे ठरते. त्यामुळे संशोधन पुढे सरकत नाही. संशोधक, श्रद्धावंतांच्या परमेश्वराला मानवी पातळीवर – माणसाचे सर्व गुणावगुणासकट - आणण्याचा प्रयत्न करत आहेत, असा आरोप केला जातो. संशोधकामुळे आस्तिकांच्या सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी परमेश्वराच्या अस्तित्वाला धक्का बसतो. त्यामुळे प्रार्थना हे वैज्ञानिकांचा संशोधनाचा विषय न राहता धर्माशी निगडित अशी एक entity म्हणून त्याकडे बघावे लागत आहे. जेव्हा परमेश्वराला अशा प्रकारे मानवी पातळीवर आणण्याचा प्रयत्न केला जातो तेव्हासुद्धा अनेक प्रश्न उपस्थित होऊ शकतात.

- आस्तिकांचा हा परमेश्वर एका कुशल व्यापाऱ्याप्रमाणे प्रार्थना करणाऱ्यांची संख्या, त्याची वारंवारता वा प्रार्थनेतील आशय बघून रुग्णावर परिणाम करत असेल का?
- परमेश्वर फक्त उत्कृष्ट प्रार्थनेलाच प्रतिसाद देत असेल का?
- प्रार्थनेचा योग्य प्रकार हेच निकष असल्यास अधिकृत फॉर्मवरील विनंतीची मागणी करणाऱ्या सरकारी नोकरामध्ये व परमेश्वरामध्ये काहीही फरक नाही असे म्हणता येईल का?
- प्रार्थना करणाऱ्या व्यक्तीचा त्याग, वा त्यानी प्रार्थनेच्या वेळी दिलेली आश्वासनं यावर प्रार्थनेची फलनिष्पत्ती होत असल्यास परमेश्वर हा मुरलेला व्यवहारी आहे असे म्हणता येईल का?

- प्रार्थना करणाऱ्यांची संवेदनशीलता प्रार्थनेतून व्यक्त होत असल्यास त्यातील बारकावे परमेश्वराच्या लक्षात येत असतील का?
- प्रार्थनेच्या वेळी दिलेली आश्वासनं व विनंती परमेश्वर कशाप्रकारे विश्लेषण करत असेल कुठली विनंती योग्य आहे हे त्याला कसे कळत असेल?
- प्रार्थनेतील विनंती वा आश्वासनं यापेक्षा प्रार्थना करणाऱ्यांची श्रद्धा हा निकष महत्वाचा ठरत असेल का?
- प्रार्थना करणाऱ्या व्यक्तीची नैतिकता, धार्मिकता, सत्याबद्दलचे प्रेम, प्रामाणिकपणा इत्यादी गुणविशेषांना परमेश्वर महत्व देत असेल का? जर या गुणविशेषांना प्राधान्य देत असल्यास परमेश्वरासमोर सर्व जण सारखेच या उक्तीचे काय?
- परमेश्वर हा करुणाळू आहे असे सर्व धर्म सांगत असतात. परंतु ही करुणा फक्त काही निवडक लोकापुरते मर्यादित असल्यास रुग्णावर होणाऱ्या परिणामांना जबाबदार कोण?
- प्रार्थनेचे यशापयश, प्रार्थना करणाऱ्याचे धर्म, जात, वा कुठल्या देवतेला तो/ती शरण जात आहे यावर अवलंबून असेल का? देव देवतांच्यामध्ये कार्यविभागणी असेल का? आपण कुठल्या देवतेला शरण गेल्यास आपली मनोकामना पूर्ण होईल हे कसे कळू शकेल?
- हत्तीसाठी केलेली प्रार्थना व मुंगीसाठी केलेली प्रार्थना यात काही फरक असू शकेल का?
- प्रार्थनेमुळे रुग्ण बरा होणे हे एक चमत्कार वा चमत्कारसदृश घटना असेल तर हा चमत्कार सरसकट सर्व रुग्णाच्या बाबतीत का होत नाही?

या प्रश्नांना विज्ञानात उत्तरं नाहीत. धार्मिक दृष्टिकोनातून उत्तर शोधत असल्यास आपापले धर्मगुरू सांगतील तेच व तेवढेच उत्तर असे म्हणता येईल. वैज्ञानिक दृष्ट्या मोजमाप करण्यास येथे वाव नाही.

- एखाद्याची श्रद्धा, अनुकंपा, सहानुभूती, धार्मिकता, नैतिकता कसे मोजणार?
- प्रार्थनेचे यशापयश कसे मोजणार? कारण काही वेळा रुग्णामध्ये थोडासा फरक पडलेला दिसतो व काही वेळा लक्षणीय प्रमाणात. यात प्रार्थनेचा वाटा किती व औषधोपचारांचा वाटा किती?

हे शक्य होत नसल्यास प्रत्येक चाचणीसाठी वेगवेगळे निकष निर्धारित करावे लागतील. त्यामुळे या चाचण्या वस्तुनिष्ठ राहणार नाहीत.

प्रार्थनेसाठी संघटित धर्मातील देव-देवताऐवजी एखाद्या अज्ञात शक्तीची वा ऊर्जेची प्रार्थनासुद्धा करता येईल. या शक्तीला शरण गेल्यास रुग्ण बरे होतील का? ही शक्ती कुठे असते? त्याची दिशा ठरलेली असते का? त्याच दिशेला उभे राहून प्रार्थना करावे का? निर्दिष्ट वेळेलाच प्रार्थना करायला हवे अशी अट असेल का? असे अनेक प्रश्न आपल्याला उपस्थित करता येतील

एक मात्र खरे की प्रार्थनेमुळे कर्करोगाच्या गाठी नाहिश्या झालेले नाहीत वा पक्षघाताची तीव्रता नष्ट झालेली नाही किंवा मृत मेंदू जिवंत झाला नाही हे सत्य आपण स्वीकारायला हवे. आतापर्यंत झालेल्या अभ्यासावरून प्रार्थना हा काही soft outcome साठी उपयोगी ठरला आहे असे म्हणता येईल. उदा – सुरक्षित बाळंतपण वा शरीरावरील क्षुल्लक इजा. प्रार्थनेपासून यापेक्षा जास्त अपेक्षा करणे निरर्थक ठरू शकेल.

वर उल्लेख केलेल्या चर्चेतून आपण काही शिकणार आहोत की नाही हा आपल्यासमोरचा प्रश्न आहे. मृगजळामागे पळण्यात काही अर्थ नाही हे स्पष्ट दिसत असतानासुद्धा अजूनही प्रार्थनेतून रोग बरा होऊ शकतो, पाऊस पडू शकतो, अडचणी दूर होऊ शकतात, आंधळ्याला दिसू लागते, पांगळा डोंगर चढू शकतो इत्यादीवर विश्वास ठेवणाऱ्यांची व त्याचे समर्थन करणाऱ्यांची संख्या काही झाले तरी कमी होत नाही. कदाचित ही श्रद्धाळूंची अगतिकता असेल. परंतु याच अगतिकतेचा फायदा घेणाऱ्यांचे त्यामुळे आयतेच फावते. म्हणूनच अधून मधून

अशा बातम्यांचे पीकही येत असते व फसविणाऱ्यांची थोडी फार छी थू होते. परंतु या छी थूला ते कधीच घाबरत नसतात. या गल्लीत छी थू झाले की आणखी एका गल्लीत, वा गावात वा कुठेतरी ते दुकान मांडतात व सावजाला हेरत असतात. गंमत म्हणजे त्यांची भरभराटीही होते.

म्हणूनच सावधान! हा इशारा द्यावासा वाटतो.



# वीरचक्र

हवालदार शिवाजी विठ्ठल जाधव याला मरणोत्तर वीरचक्र मिळाले नाही याबद्दल त्याच्या नातेवाईकात प्रचंड नाराजी होती. कारण हा उमदा तरुण काश्मीर कारवाईच्या धुमश्चक्रीत मारला गेला होता. त्याच्या शरीराचे तुकडे छिन्न विछिन्न अवस्थेत सापडले होते. जमिनीत पुरलेले भूसुरुंग निकामी करत असताना त्याचा जीव गेला होता. परंतु त्याच्यामुळे 20-25 भारतीय सैनिकांचे जीव वाचले होते. इतक्या सैनिकांचे जीव वाचवताना जीव गमावलेल्या जाधवला वीरचक्र देत नसल्यास कुणाला ते पदक दिले जाते हा प्रश्न त्याच्या कुटुंबियानी उपस्थित केला होता. खरे तर गावातील ग्रामस्थांचा हा इभ्रतीचा प्रश्न झाला होता.

ग्रामस्थानी पुढाकार घेऊन जाधवच्या रेजिमेंटच्या कमांडंटशी संपर्क साधला. रीतसर पत्र लिहून आपली व्यथा प्रगट केली. व जाधवला वीरचक्र का दिले नाही यामागील कारणे विशद करण्याची विनंती केली. बरेच दिवसानंतर रेजिमेंटकडून उत्तर आले. त्यात सैनिक म्हणून असामान्य कर्तृत्व दाखविणाऱ्यांना वीरचक्रसारखी शौर्यपदकं देण्याची प्रथा भारतीय सैन्यात फार पूर्वीपासून आहे. दरवर्षी या पदकासाठी नावांची शिफारस करणारी समिती याबद्दल निर्णय घेते. या समितीने जाधव यांना पदक न देण्याचा निर्णय घेतला आहे. कारण समितीच्या मते नेमून दिलेले कर्तव्य करत असताना मृत्यु आल्यास त्याला असामान्य कर्तृत्व असे म्हणता येणार नाही. त्यामुळे पदक न देण्याची शिफारस करत आहे. जाधव यांच्या अकाली मृत्युबद्दल रेजिमेंटच्या सर्व सैनिकांनी हळहळ व्यक्त केली, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. व पदक न मिळाल्याबद्दल विषाद वाटते असे लिहिलेले होते.

या पत्रातील तर्कसुसंगती गावातील मोजक्या सुज्ञांच्या लक्षात आले तरी बहुतेक ग्रामस्थ व जाधवचे कुटुंबीय यांना पत्राची भाषा व त्यातील मतितार्थ

कळला नाही. काही असले तरी कुटुंबियांची नाराजी कशी दूर करायची हा ग्रामस्थासमोरचा प्रश्न होता. पुन्हा एकदा रेजिमेंटच्या विरोधात ब्रिगेड लेव्हलपर्यंत जाऊन विनंती करायची की आपल्यावर होत असलेला अन्याय सहन करत चुपचाप बसायचे?

** ** **

हवालदार जाधवच्या कुटुंबियांना आपला मुलगा मोठा शूर होता असे वाटणे स्वाभाविक आहे. परंतु शिफारस समितीच्या सदस्यांनी याबद्दल विचार/चर्चा करताना काही महत्वाचे मुद्दे मांडले होते. त्यांच्या मते ज्यांनी आपला जीव धोक्यात घालून इतर अनेकांचे जीव वाचविले त्यांना वीरचक्रसारखे पदक द्यायला हवे. येथे तर हवालदार जाधवचा जीव ड्यूटी करत असताना गेला होता. भूसुरुंग निकामी करणे हे त्या रेजिमेंटला दिलेले काम होते. आणि जाधवकडून ही ड्यूटी अपेक्षित होती. कामात हयगय झाल्यास त्याला कोर्ट ऑफ इन्क्वायरीसमोर उभे केले असते. त्यामुळे जे निर्दिष्ट काम दिले आहे ते करत असताना जीव गेल्यास त्याला अपघात समजून त्यासाठी मिलिटरीच्या नियमानुसार जी काही भरपाई मिळणार आहेत ते त्याला द्यायला हवेत. त्यासाठी वीरचक्र देऊन त्याच्या मृत्युचे उदात्तीकरण करण्याची गरज नाही. याचेच स्पष्टीकरण म्हणून खालील उदाहरण समितीने नमूद केले होते.

तळ्याच्या काठी तुम्ही उभे असताना एखादा पोहायला न येणारा मुलगा बुडत असल्यास त्याला वाचवणे हे तुमचे नैतिक कर्तव्य ठरते. त्यामुळे फार तोशीस न घेता त्या बुडत्याला बाहेर काढून त्याचा जीव वाचविल्याबद्दल त्या मुलाचे कुटुंबीय तुम्हाला धन्यवाद देतील. आणि तुम्हालाही एखाद्याचा जीव वाचविल्याबद्दल समाधान मिळेल. परंतु या उलट मुलगा तळ्याच्या मध्यभागी गटांगळ्या खात आहे, जीवाचा आकांत करत वाचवण्यासाठी ओरडत आहे,

अशा वेळी तुम्ही स्वतःचा जीव धोक्यात घालून उडी मारून पोहत पोहत त्याच्यापर्यंत पोचून त्याला खोल पाण्यातून बाहेर काढून त्याचा जीव वाचवता. त्यावेळी मात्र तुमची ही कृती असामान्य व अनुकरणीय अशी समजली जाईल. स्वतःच्या जीवाची परवा न करता बुडत्याचा जीव वाचविल्याबद्दल तुम्हाला शौर्यपदकसमान काही देणे उचितही ठरू शकेल. व नैतिकदृष्ट्याही ते योग्य ठरेल. काही वेळा अशा प्रकारचे धाडस केल्याबद्दल तुमचे वारेमाप स्तुती, कौतुक केले जाईल. परंतु तुम्ही तेथे असूनसुद्धा काहीही न केल्यास तुम्हाला कुणी दोषही देणार नाहीत.

तुमचे कर्तव्य आणि out of the way जाऊन केलेले धाडसी कृत्य यात फरक करायला हवे. जर हा फरक केला जात नसल्यास नैतिकतेला बाधा पोचू शकते. याचीच पुढची पायरी म्हणजे उपयुक्ततावाद. या वादामध्ये जास्तीत जास्त लोकांचा फायदा होईल अशी कृती केल्यास ते नैतिकदृष्ट्या योग्य ठरेल.

हेच जर खरे असल्यास बहुतेक वेळा बहुतेक जण थोडेसे वैयक्तिक त्याग करून जास्तीत जास्त लोकांचा फायदा करून देणारी कृती करण्यास टाळाटाळ करत असतात. पाण्याची कपात असताना माझी कार चकचकीत पाहिजे या दुराग्रहापायी आणि माझ्याकडे पाणी उपलब्ध आहे या अट्टाहासापायी पाण्याचा अपव्यय करणे अनैतिक ठरेल. स्वच्छता-अस्वच्छता यासंबंधीच्या आपल्या स्वभावाला थोडेसे मुरड घातल्यास आकाश कोसळून पडणार नाही की जमीन दुभंगून जाणार नाही. हजारो – लाखो लोक झोपडपट्टीत राहतात. हे माहित असूनसुद्धा कुटुंबातील दोघा – तिघासांठी 4-5 मजली बंगल्यातील वास्तव्य कितपत योग्य? याचा अर्थ आपण झोपडपट्टीत जाऊन रहायला हवे असे नसून भोवतालच्या परिस्थितीचे भान ठेऊन आपल्या जीवनशैलीला आकार देणे नैतिकतेला धरून असेल. शक्य होईल तेथे, शक्य होईल तितके गरीबांना मदत करणे हेही आपले कर्तव्य ठरू शकेल. आणि यासाठी फार

मोठ्या त्यागाची गरजही नाही. आपल्या काही सुखसोई आपणहून सोडून द्यावे एवढीच माफक अपेक्षा यात आहे.

याच न्यायाने हवालदार जाधव यांच्या कर्तव्यकठोरतेचा विचार करावा लागेल. त्यानी जर मनात आणले असते तर कामचुकारपणा करून स्वतःचा जीव नक्कीच वाचवू शकला असता. फार फार तर कामचुकार म्हणून शिक्का त्याच्यावर बसला असता. कदाचित त्याला कोणीही दोषी ठरवले नसते. त्या रेजिमेंटमध्ये असे सैनिक असतीलही. परंतु जाधव यांनी त्या परिस्थितीत एखाद्या कर्तव्यदक्ष माणसाप्रमाणे आपल्या कर्तव्यात कसूर न करता भूसुरुंग निकामी करून इतरांचा जीव वाचविला. परंतु अपघाताने त्याचा जीव गेला.

आजकाल तुम्हाला नेमून दिलेले काम करत असले तरी सत्काराची अपेक्षा केली जाते. सरकारी पब्लिक प्रॉसीक्यूटरला खटल्यातील आरोपींना शिक्षा मिळाली की त्याचा उधो उधो करायला पाहिजे असे वाटते. व तसे सत्कार घडवून आणण्याची कुशलताही त्याच्याकडे असते. खरे बोलणे चोरी न करणे, दुसऱ्यांना न फसविणे, संवेदनशील असणे, या गोष्टी माणसाच्या स्वभावातच असले पाहिजेत. परंतु कुणीही (चुकून) खरे बोलले तरी त्यांचा सत्कार होत असतो. थोडे फार दुष्काळ निधीसाठी पैसे दिले तरी पेपरमध्ये ठळक अक्षरात मथळे छापून आणण्याची सोय केलेली असते.

नैतिकतेला धरून केलेले कर्तव्य की धाडसी कृत्य ही चर्चा कदाचित बौद्धिक कसरत ठरू शकेल. काही कृत्यासाठी धाडसाची गरज असते. व हे धाडस काही जणात उपजतच असते, असे म्हणता येईल. यात कुठलेही नैतिकतेचा आव नसून तो त्यांच्या स्वभावाचाच भाग असतो. त्यामुळे नैतिकतेच्या पलिकडे जाऊन धाडस करणारे, वा काहीही न करता स्वस्थ बसणारे यांच्यामुळे समाजजीवनात फार फरक पडत नाही हेही तितकेच खरे!



# ऑयलर संख्या e ची अद्भुत कहाणी!

गणित जगतात π, e, i, 0 आणि 1 याबद्दल जितकी चर्चा होत असेल तितकी इतर कुठल्याही अंकाच्या वा संख्येच्याबद्दल होत नसावी. π इतकी नसली तरी ऑयलर संख्या eचा सुद्धा गणिताच्या इतिहासात फार मोठा वाटा आहे. π च्या इतिहासाइतका e चा इतिहास मनोरंजक नसेलही. परंतु गणित जगतात त्यालाही मानाचे स्थान आहे. तुलनेने e ही संकल्पना अलिकडची असल्यामुळे इतिहासाची पानं कदाचित भरलेली नसतील.

गणितात e चा उल्लेख अनेक ठिकाणी होत आहे. 1618 साली जॉन नेपियर (John Napier, 1550-1617) या स्कॉटिश शास्त्रज्ञाने लॉगरिदम तक्त्यांचा (Logarithm Tables) शोध लावला. सतराव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात युरोपमध्ये सागरी वाहतूक व नौकानयनाला अतिशय महत्व प्राप्त झाले होते. अथांग महासागराच्या मध्यावर बोटीत असताना आपण नेमके कुठे आहोत, आपल्याला कुठल्या दिशेने जायला हवे, वादळी हवामानामुळे जहाज हेलकावे खात असल्यास ते मूळपदावर आले की नाही याची खातरजमा अशा अनेक गोष्टींचा सामना जहाजाच्या कप्तानाला करावा लागत होता. त्यामुळे खगोल शास्त्रज्ञांना भरपूर मागणी होती. आकाश निरीक्षणातून अक्षांश-रेखांशांचा अंदाज बांधण्यासाठी मोठ्या प्रमाणात आकडेमोड - तेही काही क्षणाच्या अवधीत आणि अचूकपणे – करावे लागत असे. लांबच्या लांब आकडे असलेल्या संख्यांचे गुणाकार-भागाकार करावे लागत असे. त्या तुलनेने बेरीज वजाबाकी सोपे वाटत होते. नेपियरच्या लॉग व अँटिलॉग टेबल्समुळे कंटाळवाण्या गुणाकारा-भागाकाराऐवजी सुटसुटीत असलेल्या बेरीज-वजाबाकीतून आकडेमोड करणे शक्य झाले.

Logarithm याचा अर्थ गुणोत्तर संख्या असा होतो. निर्दिष्ट ठिकाणाचे अक्षांश-रेखांश शोधण्यासाठी गोलीय त्रिकोनमितीतील (spherical Trigonometry) सात सात आकडी संख्याचा वापर होत असे. म्हणूनच नेपियरच्या NapLog (x) = $-10^7 \log (x/10^7)$ या समीकरणात 7 असा उल्लेख आहे. नेपियरचे हे टेबल्स नॅच्युरल लॉग म्हणून ओळखले जातात. कारण या लॉगच्या हिशोबासाठी आधारांक (Base) म्हणून e चे मूल्य वापरलेले होते. परंतु हेन्री ब्रिग्स (Henri Briggs,1561-1631) या नेपियरच्या समकालीन गणितज्ञानी आधारांक e ऐवजी 10 वापरल्यामुळे होणाऱ्या फायद्यांची यादीच त्यानी दिली व त्याप्रमाणे एक तक्ताही करून पाठविला. काही महिन्यानी प्रसिद्ध झालेल्या नेपियरच्या पुस्तकात ब्रिग्सच्या टेबलला परिशिष्टात स्थान मिळाले.

गंमत म्हणजे लॉग टेबलचा जनक म्हणून नेपियरला पूर्णपणे श्रेय द्यावे की नाही याबद्दल इतिहासकारात मतभेद आहेत. कारण याच सुमारास जूस्ट बर्गी (Joost Burgi) या स्विस वॉचमेकरने स्वतंत्ररित्या लॉग टेबलची मांडणी केली होती. कॅल्क्युलसचा शोध न्यूटनने लावला की लेब्निट्झने, या वादासारखा हाही वाद गणित जगतात प्रसिद्ध आहे. ब्रिग्सच्या लॉगच्या तक्त्याचा आधारांक 10 होता व त्यासाठीच्या समीकरणात e असूनसुद्धा e चा उल्लेख त्यानी टाळला होता. 1647मध्ये सेंट व्हिन्सेंट या गणितज्ञाने काटकोनी अपास्त (Rectangular Hyperbola) चे क्षेत्रफळ काढताना e च्या मूल्याचा वापर नक्कीच केला असेल. परंतु त्याच्याही लेखनात e चा उल्लेख नव्हता. परंतु हायपरबोलाचे क्षेत्रफळ काढणाऱ्या ख्रिश्चियन हॉयगन्सला (की ह्युजेन्स? ) (Christian Huygens, 1629-1695) मात्र e आणि लॉग यांच्यात परस्पर संबंध आहे हे लक्षात आलेले होते. त्या कालखंडातील अनेक गणितज्ञ कळत

न कळत e चा वापर करत होते. परंतु त्याचे नीटसे आकलन त्यांना होत नव्हते. 1661 साली हॉयगन्स यानी अजून एका वक्ररेषेची मांडणी करताना

$y = ka^x$

या समीकरणाचा वापर केला होता. यातही लॉगचा आधारांक 10 आणि संख्या e होती. हॉयगन्स यानी या समीकरणाचा वापर करून eच्या मूल्यातील 17 दशांश स्थळं शोधून काढल्या होत्या. याच्याही या कर्तृत्वाला प्रतिसाद मिळाला नाही आणि e पुन्हा एकदा अज्ञातच राहिले.

1668मध्ये डच गणितज्ञ, निकोलस मेर्काटेर (Nicolous Mercater, 1620-1687) यानी log (1+x) याचे विस्तारित श्रेढीमध्ये मांडणी केली. येथे e आधारांक असलेल्या नॅच्युरल लॉगचा वापर केला होता. परंतु यावेळीसुद्धा कुणालाही e चे कौतुक करावेसे वाटले नाही.

गणिताच्या जगात दुय्यम स्थानावर असलेला हा e आर्थिक व्यवहारातील चक्रवाढीच्या संदर्भातील आकडेमोडीत मात्र आघाडीवर होता. चक्रवाढीच्या हिशोबात e ला पर्याय नाही हे 1683मध्ये जॅकोब बेर्नोली यांनी प्रथम ओळखले. त्याला limit $(1+1/n)^n$ यात n, इन्फिनिटी (∞) पर्यंत गेल्यास काय होईल याबद्दल कुतूहल होते. बायनॉमियल सिद्धांत वापरून limit काढत असताना याचे मूल्य 2 व 3 च्या मध्ये कुठेतरी असणार हे त्याच्या लक्षात आले. गंमत म्हणजे त्याला मिळालेले उत्तर आणि यापूर्वी लॉगमध्ये वापरलेला आधारांक यांचा काहीतरी परस्पर संबंध असू शकतो हे त्याच्या लक्षात आले नाही. परंतु या eने चक्रवाढ व्याजाच्या मर्यादा अधोरेखीत केले.

गणिताच्या सोईसाठी एखादी कंपनी 100 टक्के व्याज देते असे समजू या. या कंपनीत 1 रू मुद्दल म्हणून गुंतविल्यास व वर्षाच्या शेवटी व्याजाचा हिशोब करत असल्यास आपल्याला वर्षानंतर मिळणारी रक्कम दुप्पट होऊन आपल्या हातात दोन रु पडतील. दर सहा महिन्यानी व्याजाचा हिशोब होत असल्यास

वर्षाच्या शेवटी 1.50+0.75 = 2.25 रु मिळतील. 6 महिन्याच्या ऐवजी दर 3 महिन्यानी हिशोब होत असल्यास बँकेतील आपली ठेव 2.44 रु एवढे वाढेल. जर वर्षभरात n वेळा व्याजाचा हिशोब होत असल्यास आपल्याला मिळणारा परतावा $A=P(1+r/n)^n$ (यात A परतावा, P मूळ मुद्दल, r वार्षिक व्याज दर आणि n व्याजाच्या हिशोबाची कालावधी) या समीकरणातून काढता येईल. दर आठवड्यानी व्याज जमा होत असल्यास सरळ व्याजापेक्षा नक्कीच जास्त पैसे मिळतील. परंतु यानंतर मात्र काही पैशांचाच फरक होत असल्यामुळे त्या हिशोबाला काही अर्थ नाही. परंतु आपली गुंतवणूक कोटीच्या घरातली असल्यास 6-7 आकडी संख्येतही मोठ्या प्रमाणात वाढ होईल.

गंमत म्हणून व्याजाच्या हिशोबाची कालावधी प्रती ताशी, वा प्रती मिनिट वा प्रती सेकंद असे न काढता प्रत्येक क्षणाची कालावधीने हिशोब केल्यास जमा रकम
2.718281828459045235360287471352662497757247093699
957496696762724076630353547594571382178525166427.... या संख्येतील दशांशाचे आकडे अनंतापर्यंत जात आहेत. या संख्येला कुठल्याही गुणोत्तरच्या स्वरूपात मांडता येत नसल्यामुळे याला 'बीजातीत संख्या' (Transcendental Number) असे म्हटले जाते. सर्व बीजातीत संख्या अपरिमेय असतात परंतु सर्व अपरिमेय संख्या बीजातीत नसतात. (All transcendental numbers are irrational, but not all irrational numbers are transcendental. (Transcendental numbers are a subset of irrational numbers).)आणि याचेच e असे नामकरण झाले

2.71828... या संख्येला e म्हणून संबोधण्याचे अजून एक कारण म्हणजे याचा संबंध घातांकीय वृद्धीशी (exponential growth) जोडता येईल. चक्रवाढ व्याजाप्रमाणे घातांकीय वृद्धीचे अजून एक उदाहरण म्हणजे

इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञानातील मूरचा नियम (Moor's Law)असू शकेल. 1965 मध्ये हा नियम अस्तित्वात आला. 1971 ते 2015 पर्यंत $2^{20}$ या हिशोबाने ट्रान्झिस्टरच्या क्षमतेत वाढ व आकारमान कमी कमी होत गेले. 1 x 1 सेंमीच्या एवढ्याशा चिपवर 10 लाख ट्रान्झिस्टरची रचना करणे शक्य झाले. मायक्रोप्रोसेसर्सच्या क्षमता 70च्या दशकाच्या तंत्रज्ञानाच्या तुलनेत अनेक पटीने वाढलेल्या आहेत.

संभाव्यतेसंबंधीचे आडाखे बांधत असताना संख्याशास्त्रज्ञसुद्धा eच्या मूल्याबद्दल जागरूक असतात. झाडांच्या फांद्यावर कोळीष्टक विणणाऱ्या कोळीच्या धाग्याची रचनासुद्धा e शी संबंधित आहे. स्वतःच्या वजनाने जर चेन लोंबकळत असल्यास त्यातून तयार होणाऱ्या वक्ररेषेच्या आकाराच्या समीकरणात

$y=a/2(e^{x/a} + e^{-x/a})$ eला महत्वाचे स्थान दिलेले आहे. (हा आकार कॅटेनरी वक्ररेषा म्हणून ओळखला जातो.) 0 ते 1 दरम्यान असलेल्या यदृच्छ संख्यांच्या (random number) शोधासाठी संगणकाला e वर अवलंबून रहावे लागते.

गूगलच्या कार्पोरेट ऑफिसलासुद्धा या e ने अक्षरशः वेड लावले होते. काही संगणक तज्ञांची भरती त्यांना करायची होती. त्यांच्या ऑफीससाठी गणित व संगणक शास्त्रातील विशेषज्ञांची मागणी होती. परंतु त्यांना कुठल्या निकषांवर बोलवावे याचा नीटसा अंदाज येत नव्हता. व ते खरोखरच पारंगत आहेत का याचा अंदाज त्यांना घ्यावयाचा होता. त्यासाठी त्यांनी एक नामी युक्ती शोधून काढली.

अमेरिकेतील मोठमोठ्या शहरात{first 10-digit prime find in consecutive digits of e}.com या नावाचे मोठमोठे पोस्टर्स लावले होते व या संस्थळावर जाऊन माहिती गोळा करण्याचा सल्ला दिला होता. परंतु या

संस्थळापर्यंत पोचण्यासाठी पहिल्यांदा e संख्येतील दशांश स्थळाच्या बाजूतील 10 अंकाची अविभाज्य संख्या (prime number) शोधावे लागणार होते. त्यानंतरच इतर माहिती मिळू शकली असती. जे तज्ञ होते त्यांनी जावामध्ये एक छोटासा प्रोग्राम लिहून अविभाज्य संख्या शोधून काढले व संस्थळाला भेट दिली. e च्या दशांश स्थळातील 99व्या अंकापासूनचे पुढील 10 आकडे असलेली ही 7427466391 संख्या अविभाज्य आहे. गूगलला भरतीच्या या नवीन पद्धतीतून अनेक विशेषज्ञ मिळाले. गूगलला 2004 साली भाग भांडवल वाढवायचे होते. त्यासाठी त्यांनी e चे पहिले 10 आकडे असलेल्या संख्येच्या – 2718281828 - एवढे भांडवल विक्रीचे उद्दिष्ट ठेवले होते. व विक्री पूर्ण झाली.

**π** प्रमाणे e चे आकडेसुद्धा तोंडपाठ म्हणून दाखविण्याचे खूळसुद्धा अजूनही टिकून आहे व याविषयी नवीन नवीन दाखले स्थापण्यासाठी चढाओढ असते. 2004 मध्ये जर्मनी येथील अँड्रियास लिएटझो (Andrias Lietzow) यानी हातात पाच चेंडू झेलत झेलतच 316 आकडे म्हणून दाखविले. 25 नोव्हेंबर 2007 रोजी भास्कर करमरकर या भारतीयाने 1 तास 29 मिनिटे व 52 सेकंदात 5002 आकडे सांगत नवा विक्रम प्रस्थापित केला. त्याच दिवशी हेच आकडे उलटे म्हणत अजून एका विक्रमाची नोंद केली. e संबंधी अशा अनेक अफवा अधून मधून ऐकू येतात.

आपल्याला e चे अशा प्रकारे आकडे लक्षात ठेवायचे असल्यास खालील वाक्य तोंडपाठ असले तरी पुरेसे ठरेलः

I’m forming a mnemonic to remember a function in analysis.

यातील प्रत्येक शब्दातील अक्षरांच्या संख्येवरून e संख्या लक्षात ठेवता येईल. (2, 7, 1, 8, 2, 8, 1, 8, 2, 8 )

या अपरिमेय संख्याचे नामकरण कसे झाले असेल याबद्दलही अनेक तर्क वितर्क लढविले जातात. ऑयलरचे स्वतःच्या नावातील आद्याक्षरावरून हे नाव दिले असे एक सार्वत्रिक मत आहे. हे तितकेसे खरे वाटत नाही. कारण a, b, c, d प्रमाणे हेही एक गणितीय चिन्ह म्हणून त्यानी वापरले असण्याची शक्यता आहे. e हे एक्स्पोनन्शियल (exponential) चे आद्याक्षर असल्यामुळे त्याचा वापर झाला असावा. परंतु तेसुद्धा खरे नाही. एवढे मात्र खरे की 1631 साली ऑयलर यांनी गोल्डबाख या त्याच्या मित्राला लिहिलेल्या पत्रात e नावाने या संख्येचा उल्लेख केला होता. 1748 साली प्रकाशित झालेल्या गणितीय ग्रंथात e संबंधी मोठ्या प्रमाणात बरेच काही लिहिलेले सापडते.

e = 1+1/1!+1/2!+1/3!+1/4!..... आणि limit $(1+1/n)^n$, n ते ∞ होत गेल्यास त्याचे उत्तर e असणार हे ऑयलरने या ग्रंथात सिद्ध करून दाखवले होते. ऑयलरने आकडेमोड करून e च्या दशांश स्थळातील 18 आकडे शोधून काढले होते. परंतु हे आकडे कसे आले याचा उल्लेख मात्र पुस्तकात नाही! परंपरित अपूर्णांक (Continued fraction) वापरून सुद्धा e चे मूल्य निर्धारित करता येते हेही ऑयलरने शोधून काढले.

हातात कॅल्क्युलेटरसारखे साधन नसतानासुद्धा π चे आकडे शोधणाऱ्या शॉंक्स याने eचे 137 आकडे व नंतर 205 आकडे शोधले होते, हे सांगूनही खरे वाटणार नाही. e मधील 200 आकडे शोधण्यासाठी e = 1+1/1!+1/2!+1/3!+1/4!..... या समीकरणाचे 120 टर्म्स पर्यंत जावे लागेल. आता गूगलवर क्लिक केल्यास e चे 10000 आकडे सापडतील. नासाच्या संस्थळावर e चे दहा लाख आकडे सापडतील.

**e, i, π, 1, आणि 0 यांचे एकमेकाशी असलेले नाते**

लिओनार्ड ऑयलरचा गणित जगाला दिलेल्या देणगीत $\pi$, e, i, 0 आणि 1 यांचा एकमेकाशी संबंधित असलेल्या समीकरणाच्या शोधाला प्रथम क्रमांक द्यावे लागेल. या पाचही संख्यांची एकजूट करत $e^{i\pi} + 1 = 0$ समीकरणात बसवून त्यानी आपल्या अगाध गणितीय ज्ञानाचे प्रदर्शन केले होते.

टेलरश्रेढीच्या अनुसार

$e^x=1+x/1!+x^2/2!+x^3/3!+x^4/4!+.....$ येथे x चे मूल्य काहीही असू शकेल.

जर x ऐवजी $\pi$ वापरल्यास

$e^{\pi}=1+\pi/1! + \pi^2/2! + \pi^3/3! + \pi^4/4! +.....$

असे हे समीकरण दिसेल. $i^2= -1$ मधील i वापरून x ऐवजी ix असे हे समीकरण लिहिल्यास

$e^{ix}=1+ix/1!+(ix)^2/2!+(ix)^3/3!+(ix)^4/4!+.....$

ते असे दिसेल. परंतु $i^2= -1$ असल्यामुळे या समिकरणाची पुनर्मांडणी असेही करता येईलः

$e^{ix} = \{1-x^2/2! + x^4/4! – x^6/6!.....\} + i\{x/1!-x^3/3!+x^5/5!-.....\}$

टेलर श्रेढीच्या अजून एका विधानानुसार

$\sin x=\{x/1!-x^3/3!+x^5/5!- x^7/7!.....\}$ व

$\cos x=\{1-x^2/2! + x^4/4! – x^6/6!.....\}$

त्यामुळे $e^{ix} = \cos x + i \sin x$ होईल.

परंतु ऑयलरच्या समीकरणात x ऐवजी $\pi$ लिहिल्यास

$e^{i\pi} = \cos\pi + i \sin\pi$ मुळातच $\pi$ कोननिर्धारिक असून $2\pi = 360^0$ आहे. त्यामुळे

$\sin\pi = 0$ व $\cos\pi = -1$ होत असल्यामुळे

$e^{i\pi} = 0 - 1$ असे होईल. किंवा

$e^{i\pi} + 1 = 0$

शेक्सपियरच्या नाटकातील वा त्यांनी लिहिलेल्या सॉनेटमध्ये वर्णन केलेल्या प्रेम या शब्दात जो अचूकपणा व बंदिस्तपणा आहे तसाच बंदिस्तपणा ऑयलरच्या या समीकरणात आहे हे वाचकांच्या नक्कीच लक्षात येईल.

अशी आहे ही e ची अद्भुत कहाणी!



# अत्युत्कृष्टतेचा पाठलाग करणे हितावह ठरेल का?

जे जे काही आपण करतो ते अत्युत्कृष्ट (perfect) असायलाच हवे, आपल्या जीवनाची घडण उच्च श्रेणीचीच असायला हवी, असे एक आपले स्वप्न असते. परंतु प्रत्यक्ष जीवनात टक्के टोणपे खात असताना आपला स्वप्नभंग होतो, पदरी निराशा येते, आपण दुःखी होतो व कुढत कुढत जीवन जगू लागतो. त्यामुळे उत्कृष्टता, प्राविण्य, उच्च श्रेणी, परिपूर्णता या गोष्टी बकवास वाटू लागतात व आपणही चार चौघासारखे सुमार, सामान्य प्रतीचे राहिल्यास बिघडले कुठे म्हणत, आहे त्यात समाधान मानून आयुष्याची पानं उलगडू लागतो. कदाचित या मागे आपण उच्च श्रेणीचा बळी ठरू नये ही एक सुप्त इच्छा असेल. अशा प्रकारे समाधान मानून घ्यावे की नको हा आपल्यासमोरचा यक्ष प्रश्न आहे.

एक मात्र खरे की उत्कृष्टतेची आस नसल्यास आपण आळशी होण्याची भीती असते. कुठलीही गोष्ट करत असताना चूक केल्यास काही बिघडत नाही ही वृत्ती बळावते. कमीत कमी श्रम करण्याची, निष्काळजीपणाची सवय जडते. परंतु ‘हे’ किंवा ‘ते’ असे काही असू शकते का? कदाचित उत्कृष्टता की सुमार हा आपल्या विचारातलाच द्वैत असावा की काय असे वाटू लागते. उत्कृष्टता नसल्यास आपले आयुष्य विफल अशी एक मानसिकता विकसित होऊ लागते.

विवेकी जीवन पद्धतीचे (रॅशनल इमोटिव्ह बिहेवियर थेरपी – REBT) आल्बर्ट एलिस नेहमीच ताठरपणा व परिपूर्णता (perfection) यांच्या मागे लागून कशा प्रकारे आपले हाल होतात याबद्दल सावधानतेचा इशारा देत असतात. आपले जीवन सार्थकी होण्यासाठी आपण शंभर टक्के यशस्वी

व्हायलाच हवे हा समज समर्थनीय नाही वा विवेकशीलही नाही. परिपूर्णता ही अशक्यप्राय गोष्ट आहे, हे जितके लवकर समजेल तितके बरे होईल. कारण परिपूर्णतेसाठी कितीही प्रयत्न केले तरी ते अपुरेच पडतील. मुळात अमुक अमुक केल्यास परिपूर्णता गाठेन ही अपेक्षाच अत्यंत चुकीचे ठरेल. अंतिम परिणामाचा ध्यास आपली विचारशक्ती कुंठित करू शकते.

म्हणूनच ग्रीक तत्वज्ञ, तुम्हाला धनुर्विद्येत पारंगत व्हायचे असल्यास जास्तीत जास्त कौशल्य वापरून बाण सोडा, परंतु सुटलेला बाण लक्ष्य भेदू शकेल याची खात्री बाळगू नका, हा सल्ला देत असत. बाण सोडणे आपल्या हातात आहे, परंतु एकदा धनुष्यातून बाण सुटला की त्यावर तुमचे नियंत्रण असणार नाही. आपण नेहमीच आपल्या बळाचे नियंत्रण व त्याच्या परिणामांचेही नियंत्रण करण्याची अपेक्षा धरत असतो. आपल्याला जे काही करायचे आहे ते उत्कृष्ट करून दाखविण्यासाठी जास्तीत जास्त प्रयत्न करायला हवे, परंतु ते करत असताना थोडीशी तरी चूक राहू शकेल याचेही भान ठेवावे. धनुर्विद्येच्या बाबतीतच नव्हे तर इतर अनेक बाबतीतसुद्धा फिनिशिंग लाइनपेक्षा त्यासाठीचे उचललेले पहिले पाऊल केव्हाही महत्वाचे ठरते.

काही गोष्टींच्या बाबतीत कितीही डोकेफोड केली तरी मनासारखे घडत नाही म्हणून आपण वैतागत असतो. अशा वेळी तात्विक चिंतनाला शरण जाणे योग्य ठरू शकेल. काही तत्वज्ञ बरेच काही सांगून जातात. उदाहरणार्थ, कांट या तत्वज्ञाने ought implies can म्हणून सांगितलेले आहे. (अजून एका तत्वज्ञाने ought implies cannot म्हणूनही सांगितले आहे!) तुम्हाला शक्य होत असेल तरच त्या कामाला हात घालावे, नाहीतर सोडून द्यावे. उंटाचा मुका घेण्याच्या भानगडीत पडू नये. एखाद्या भिकाऱ्याला लाख रुपये देणगी देशील का म्हणून विचारण्यात अर्थ नाही. याचा अर्थ अत्युत्कृष्टतेचा ध्यास धरायचाच नाही असे नाही. कारण जेव्हा आपण आपल्या कृतीबद्दल

समाधानी असतो तेव्हा आपण संपलेलो असतो. असमाधानातूनच काही तरी सुचू शकते, प्रश्न विचारता येतात, व समस्यांना उत्तरं शोधण्यासाठी धडपडायला संधी मिळते. परंतु काही गोष्टींच्या बाबतीत अंतिम असे काही नसते हेही लक्षात ठेवायला हवे. उदाहरणार्थ, शेजाऱ्यावर प्रेम करा याबाबतीत आपण कधीच समाधानी होऊ शकत नाही. आई-वडिलांच्या बाबतीतील कर्तव्यसुद्धा असेच अपूर्ण असते.

आपण करत असलेल्या गोष्टीत उत्कृष्टता असावी याचा प्रयत्न करणे म्हणजे अशक्यप्राय गोष्टींना हात घालणे असा होत नाही. अशक्यप्राय गोष्टीसाठी टप्प्या टप्प्याने प्रयत्न करून ते मिळवता येणे शक्य असल्यास प्रयत्न करायला हरकत नसावी. तुम्हाला एखाद्या ठराविक ठिकाणी ठराविक वेळी हजर राहायचे असल्यास अर्ध्या वाटेपर्यंत पोचलो यात समाधान मानून घेण्याला काही अर्थ नाही. तुम्ही जर सर्वोत्कृष्टतेचे उद्दिष्ट ठेवून उत्कृष्टतेपर्यंत मजल मारली तरी प्रयत्न सार्थकी लागले असे म्हणता येईल. एक मात्र खरे की सर्वोत्कृष्टतेच्या मागे लागलेल्यांना दुसरा क्रमांक मंजूर नसतो. मुळात ते एक आव्हान म्हणून स्वीकारत असतात. आणि त्यांना स्वतःच्या क्षमतेबद्दल खात्री असते. अशक्यप्राय गोष्टीसांठी प्रयत्न करत असताना मध्येच केव्हातरी हे अशक्य आहे याचा विसर पडल्यास आपण गोत्यात येऊ शकतो. मारलेल्या उडीच्या अर्ध्या वाटेवरून मागे परत येता येत नाही. त्यानंतर मात्र आपण स्वतःला माफ करू शकत नाही. नंतरचे जीवन नीरस वाटू लागते. उत्कृष्टतेच्या मागे लागणाऱ्यांची उत्कृष्टतेसाठीचे प्रयत्न कमी पडत आहेत म्हणून उद्दिष्ट सफल होत नाही असे नसून त्यांचा आपल्या कतृत्वावर अनाठायी विश्वास असतो म्हणून त्यांना हार मानावी लागते.



# विनोद दुआ के साथ: वृत्तपत्र स्वतंत्रता दिवस

*विनोद दुआ हे मुक्त वृत्तपत्रकार असून आजकाल 'दि वायर'साठी दर आठवड्याला 'जन मन धन की बात' नावाचा कार्यक्रम सादर करत असतात. कदाचित आपले वाचक नक्कीच विनोद दुआंचे एपिसोड बघतही असतील. आतापर्यंत त्यांनी 237 एपिसोड सादर केले आहेत. आपल्या देशाच्या राजकीय व सामाजिक घडामोडीवरील त्यांची टीका-टिप्पणी नक्कीच उद्बोधक असते.*

*एपिसोड 137 (9 मे 2018) मधील त्यांच्याच शब्दातील संपादित आशय ऐसी अक्षरेच्या वाचकांसाठी पोचवावे म्हणून हा एक प्रयत्न.*

ही गोष्ट आहे 2011 सालची. मी अहमदाबादला व्हिडिओ शूटिंगसाठी गेलो होतो. सामाजिक व राजकीय कार्यक्रमाबरोबर ठिकठिकाणच्या खवैयांच्या गल्लीवर मी कार्यक्रम करत होतो. अहमदाबादमध्ये भटियार गल्ली ही रुचकर आहार पदार्थासाठी प्रसिद्ध आहे. हा एक मुस्लिम बहुल भाग आहे. रात्रीची वेळ होती. बारा-साडे बारा वाजले असतील. मी रमत गमत गाणे गुणगुणत त्या गल्लीत भटकत होतो. माझा एक टीम मेंबर पहिल्यादाच औटडोर शूटिंग करत होता. त्याचे आतापर्यंतचे आयुष्य प्रोडक्शन कंट्रोलच्या बंद खोलीत गेले असावे.

"तुम्हाला भीती वाटत नाही का?" त्याचा प्रश्न

"का?"

"आपण एका मुस्लिम वस्तीत आहोत. अहमदाबादसारख्या शहरात रात्री फिरत आहोत. असे कसे तुम्ही बिनधास्त फिरू शकता?" त्याचा भाबडा प्रश्न. मी त्याला जिगर मुरादाबादी यांच्या शेरच्या काही ओळी सुनावल्या. डोंगराच्या कड्यावर, झाडांच्या पानावर, कधी फुलांच्या कळयावर, कधी फुलांच्या काट्यावर.. मी कुठेही जाऊ शकतो. मी कुठेही राहू शकतो. या सृष्टी

सौंदर्यावर माझा हक्क आहे. निसर्गाने मला ही जमीन दिली आहे. समुद्र दिले आहे. पाणी दिले आहे. आम्ही शहरे वसवली. हा देश आमचा आहे. आम्ही स्वतंत्र देशाचे स्वतंत्र नागरिक आहोत.

आम्ही कुठेही फिरू शकतो.

हे सर्व मी तुम्हाला का सांगत आहे?

आज वृत्तपत्र स्वातंत्र्य दिवस आहे. (3 मे) जगभरातील सर्व मुद्रित, इलेक्ट्रॉनिक वा समाज माध्यमं यांच्यासाठी स्वतंत्रता दिवस आहे. या दिवशी आज आपण कितपत स्वतंत्र आहोत याचा आढावा घेणे उचित ठरेल. हा देश आपला आहे. आपल्या मनाप्रमाणे आपण कुठेही जाऊ शकतो. हे जरी खरे असले तरी आपली वृत्तपत्रे किती स्वतंत्रबाण्याचे आहोत याचा विचार करू या.

या संदर्भात मी तुमच्यासमोर काही मुद्दे ठेवणार आहे.

रिपोर्टर विदौट बॉर्डर नावाची जागतिक पातळीवर एक संस्था असून ही संस्था दर वर्षी जगातील 180 देशांतील माध्यमस्वातंत्र्याचा आलेख तयार करून त्या देशाला क्रमवारी देत असते. (अशाच प्रकारची अजून एक संस्था फ्रान्समध्येही आहे.) या संस्थेने अलीकडेच 2017-18 सालची सूची प्रकाशित केली असून त्यात आपल्या भारत देशाचा क्रमांक 138वा आहे. 2014 साली हा क्रमांक 140 होता. म्हणजे आपण 2 गुणानी वर चढलेलो आहोत. तेव्हा काँग्रेस प्रणीत युपीएचे शासन होते व त्या काळीसुद्धा आपली स्थिती नीट नव्हती. आणि आज भाजपाच्या संयुक्त आघाडीचा कारभार असूनसुद्धा फार फरक पडला नाही. 2017 मध्ये 136 व 2017 मध्ये 133 अशी थोडी फार सुधारणा झाली असे वाटत असले तरी आज आपण 138व्या क्रमांकावर आहोत. आपल्या प्रेसचे तथाकथित स्वातंत्र्य यातून कळू शकते.

देशाची क्रमवारी ठरवताना ही संस्था देशातील वृत्तपत्रस्वातंत्र्यासंबंधीच्या काही मुद्द्यांचा विचार करते. देशातील वैविध्यतेला (प्लुरलिजम) कितपत मान्यता आहे? कपाळावर टिक्का लावणारे, गळ्यात पक्षाच्या प्रतीकांचे टॉवेल गुंडाळणारे किंवा भगवे कापडे घालणारे वा डोक्यावर पांढरी स्कल् कॅप घालून धर्माचे उघड प्रदर्शन करणारे इत्यादींच्याबद्दलचा हा आढावा आहे. आपण निवडून दिलेले सरकारच आपण काय खावे, काय प्यावे, कुठले कपडे घालावीत हे ठरवत असल्यास देशातील विविधता कशी काय टिकू शकते? सगळ्यांना एकाच साचेत का ढकलले जात आहे? जगभरात भरपूर विविधता आहे. कपड्यात, खाण्या-पिण्यात विविधता असणे अगदी नैसर्गिक असते. माणूस म्हणून जिवंत राहण्यासाठी जे स्वातंत्र्य हवे ते सर्व या विविधतेत असते. सगळ्यांना एकाच साचेत बसवण्याचा आग्रह केला जातो. वैविध्यतेच्या संदर्भात आपला क्रमांक 138वा आहे.

अजून एक निकषाप्रमाणे देशातील सत्ता वृत्तपत्रांच्या स्वातंत्र्याला कितपत अनुकूल आहे? आपल्या देशात उघडपणे आणिबाणी जाहीर केलेली नसली तरी माध्यमांवर अनऑफिशियली आणिबाणी लादलेली आहे. कित्येक वार्ताहरांना धमक्या दिल्या जात आहेत, त्यांचे खून केले जात आहेत, बातम्या देण्यास अटी पाळाव्या लागत आहेत, वार्ताहरांना उध्वस्त केले जात आहे. याची सर्व जबाबदारी माध्यमांच्या मालकावर आहे असे मी समजतो. या मालकांकडे काही तरी लपवण्यासारखे आहे म्हणून ही लाचारी असू शकेल. किंवा त्यांना कुणीतरी ब्लॅकमेल करत असतील. म्हणून त्यांचे पगारी वार्ताहर स्पष्टपणे लिहिण्यास घाबरत असावेत. काही अपवाद वगळता सगळ्या माध्यमांची हीच दुस्थिती आहे. मी सादर करत असलेल्या दि वायरवरसुद्धा अब्रू नुकसानीचे खटले घातलेले आहेत. माझ्यासारख्या वार्ताहरांना धमक्या दिल्या जात आहेत.

अजून एका निकषानुसार त्या देशात environment of self censorship – प्रसिद्धीपूर्व नियंत्रण – कितपत आहे, याचाही क्रमांक देताना विचार केला जात असावा. बातम्या देणारेच सर्व गोष्टींचा विचार करून – सामान्यपणे एखाद्या कमकुवत समाजाचे जीवितहानी, वित्तहानी होणार नाही, देशाचे नुकसान होणार नाही, दंगल भडकणार नाही इत्यादींचा विचार करून - बातम्या देणे येथे अपेक्षित आहे. कुठल्या तरी भीतीने बातम्या दडपणे योग्य ठरणार नाही. वृत्तपत्र स्वातंत्र्यासाठी त्या त्या देशात पारदर्शकता किती आहे हाही एक मुद्दा ठरू शकतो. आपल्या देशात किती पारदर्शकता आहे हे सर्वश्रुत आहे. दिवसे न दिवस माहितीच्या आधिकाराचा संकोच होत असून सर्व संबंधित याकडे दुर्लक्ष करत आहे. माहिती अधिकाराच्या कार्यकर्त्यांवर खुनी हल्ले केले जात आहेत. त्यांचा आवाज बंद केला जात आहे.

देशातील न्याययंत्रणा कितपत सक्षम आहे, हासुद्धा एक निकष असू शकेल. वार्ताहरांवरील बदनामीचे खटले जिल्हा न्यायालयापासून सर्वोच्च न्यायालयापर्यंत वर्षानुवर्षे साचलेले आहेत. न्यायपालिकेवरील विश्वास कमी होत आहे. गुंड-पुंड मोकाट सुटलेले आहेत. आपल्या येथील न्यायव्यवस्थेची आपल्या नक्कीच असेल.

बातम्याच्या उपलब्धतेच्या संदर्भात देशातील इन्फ्रास्ट्रक्चर कितपत अनुकूल आहे त्याची गुणवत्ता किती आहे हाही एक निकष असेल. माहिती वा बातमी कुठून मिळते, बातमी कोण देत आहे, वा बातमीत कितपत तथ्यांश आहे इत्यादी गोष्टींचा विचार केल्यास आपल्या येथील माहितीसंबंधीचा इन्फ्रास्ट्रक्चर फारच तकलादू आहे असे म्हणता येईल. साधारणपणे आपल्या येथील बातमीसाठी नोकरशाहीवर अवलंबून रहावे लागते. संपूर्ण नोकरशाही नागरिकांच्या विरोधात काम करत असते. नोकरशाही स्वतःहून काहीही सांगायला तयार नसते, वा सांगितले तरी त्यात खोटे नाटे असू शकते. ते नागरिकांना कधीच मदत करत

नाहीत. सरकारी कार्य़ालयात आपण गेल्यास ताटकळत तास न तास उभे राहून काम करून घ्यावे लागते. पाणी तर सोडा, बसण्याचीसुद्धा सुविधा नसते. तुम्ही या देशाचे नागरिक आहात, तुमचे काही हक्क आहेत याची जाणीवच सरकारी ऑफिसमध्ये नसते. त्यामुळे आपल्या येथील इन्फ्रास्ट्रक्चरची गुणवत्ता अत्यंत खालावलेली आहे असे म्हणता येईल.

वृत्तपत्र स्वातंत्र्याच्या प्रथम क्रमांकावर नार्वे, दुसऱ्या क्रमांकावर स्विडन आहे. सर्वात शेवटी 180व्या क्रमांकावर दक्षिण कोरिया आहे. पाकिस्तान आपल्यापेक्षा एका क्रमांकाने खाली आहे. तेथेसुद्धा परिस्थिती सुधारत आहे. चीन 176, श्रीलंका 131, नेपाळ 106, मालदीव 120, भूतान 94, बांगला देश 146 अशा क्रमांकावर आहेत. आपल्यापेक्षा भूतान वरचढ आहे.

या संस्थेने आपल्या अहवालात इंडिया टुडे या नियतकालिकेतील लेखाचा उल्लेख केला आहे. वार्ताहरांच्या विरोधातील हेट स्पीचचा त्यात संदर्भ आहे. समाज माध्यमांमध्ये मोठ्या प्रमाणात ट्रोलिंग होत आहे. व या ट्रोलिंगमध्ये सत्ताधारी पक्षाचा फार मोठा वाटा आहे. पंतप्रधानांच्या पक्षातील अनेक पगारी कार्यकर्ते समाज माध्यमावरील ट्रोलिंगमध्ये सहभागी आहेत. जे वार्ताहर स्वातंत्र्याचे पुरस्कार करत आहेत, त्यांच्या विरोधात हे ट्रोलिंग करणारे कठोरपणे टीका टिप्पणी करत आहेत.

वृत्तपत्र स्वातंत्र्याच्या दिवशी आपल्या देशाची याबद्दलची स्थिती काय आहे याचा आढावा मला घ्यावासा वाटला. गेल्या चार वर्षात काय घडले हे सांगावेसे वाटले.



# विनोद दुआके साथः गंगेची साफसफाई

*विनोद दुवा हे मुक्त वृत्तपत्रकार असून आजकाल 'दि वायर'साठी दर आठवड्याला 'जन मन धन की बात' नावाचा कार्यक्रम सादर करत असतात. आपल्या देशाच्या राजकीय व सामाजिक घडामोडीवरील त्यांची टीका-टिप्पणी नक्कीच उद्बोधक असते.*एपीसोड 240 (14/05/2018 ) *मधील त्यांच्याच शब्दातील संपादित आशय ऐसी अक्षरेच्या वाचकांपर्यंत पोचवावे म्हणून हा प्रयत्न.*

नमस्कार,

एक गोष्ट स्पष्ट होत आहे की आताच्या आपल्या शासन व्यवस्थेनी चार वर्षे वाया घालवली. चांगले काम करून दाखवण्याची चांगली संधी गमावली. त्यांना अपेक्षित असलेले स्पष्ट बहुमत आहे, 19 राज्यात त्यांच्याच पक्षाची सत्ता आहे, शिवाय आपल्याला हवे त्या लोकांची मोक्याच्या ठिकाणी बसवण्याची मुभा आहे. हे सर्व असूनसुद्धा (पूर्वीच्या भ्रष्ट शासनाच्या तुलनेत) एक चांगली संधी या शासनाने गमावली आहे. हे शेवटचे वर्ष आहे. नरेंद्र मोदीच्या सरकारकडून हिशोब मागण्याची ही वेळ आहे. प्रधान सेवक नरेंद्र मोदी यांनी गेली चार वर्षे वेळोवेळी घेतलेल्या निर्णयांचा आढावा घेण्याची ही वेळ आहे. आमचे त्यांच्याशी कुठलेही वैरत्व नाही. नाराजी नाही. ज्या प्रकारे कर संकलन अधिकारी उत्पन्नाच्या स्रोताचा हिशोब मागतो, ते, 10 हजार असो वा एक लाख, कुठून आले, कसे खर्च केले अशी पूछताछ करू शकतो, तशाच प्रकारे एक नागरिक म्हणून आपल्याला आपण निवडून दिलेल्या सरकारला प्रश्न विचारणे हा आपला मूलभूत हक्क आहे. व एक कर्तव्यही आहे. आम्ही कर रूपात भरत असलेल्या पैशाचे काय केले?

चार वर्षापूर्वी 24 एप्रिल 2014 रोजी एका जाहीर सभेत नरेंद्र मोदी - अजून ते प्रधान सेवक झाले नव्हते – यांनी आपल्या भावपूर्ण भाषणात गंगामाई, एका

पुत्राच्या प्रतीक्षेत आहे, जो तिचे शुद्धीकरण करेल असे विधान केले होते. परंतु चार वर्षे झाली, अजूनही गंगामाई स्वच्छ झाली नाही. परंतु त्यासाठी केलेल्या पैशाच्या तरतुदीचा, साफसफाईवर केलेल्या खर्चाचा लेखाजोखा मी मागत आहे.

या शुद्धीकरणाच्या वेगवेगळया 195 प्रकल्पासाठी मार्च 2018 पर्यंत 26101 कोटी रुपयांची तरतूद केली होती. त्यातील फक्त 4254 कोटी रुपयेच आतापर्यंत खर्च झाले आहेत. म्हणजे केवळ 20 टक्के! या नदीच्या साफसफाईच्या कामासाठी इन्फ्रास्ट्रक्चर लीडींग अँड फायनान्स या खाजगी कंपनीला कंत्राट दिलेले आहे. त्यांच्या अहवालात गंगानदीवरील 93 घाटांपैकी अनेक घाटांचे स्वच्छ करण्याचे काम पूर्ण झाले आहे, असे नमूद केले आहे. परंतु बनारस हिंदू विद्यापीठाच्या आयआयटीतील केमिकल इंजिनियरिंगचे प्राध्यापक पी के मिश्रा यांच्या मते या कंपनीने गंगेच्या खोलात जावून स्वच्छता केली नसून फक्त दाखवण्यापुरती कॉस्मेटिक बदल केले आहेत. लहान सहान कामे पूर्ण झाली असतील, परंतु घाट स्वच्छ ठेवणे म्हणजे गंगानदी स्वच्छ केले आहे असे होत नाही.

गंगानदीची समस्या फार वेगळी आहे. या संबंधात राष्ट्रीय हरित आयोगानेसुद्धा उत्तर प्रदेशच्या सरकारला वेळोवेळी धारेवर धरलेले आहे. 2016 साली गंगानदीच्या साफसफाईच्यासंबंधी टिप्पणी करताना राष्ट्रीय हरित आयोगाने गंगानदीत मृत शरीरांची विल्हेवाट लावली जाणे हे एक कारण असू शकते, असे विधान केले होते. नदीकाठच्या स्थानिक लोकांच्या म्हणण्यानुसार हिंदू धार्मिक पद्धतीप्रमाणे लग्न न झालेल्या कुमारिका वा लहान मुलं मृत झाल्यास त्यांच्या मृत शरीराला अग्नी न देता नदीत फेकल्या जातात, हेही एक कारण असू शकते. नदीकाठचे दवाखाने नातलगांनी ताबा न घेतलेल्या बेवारशी प्रेतांची विल्हेवाटसुद्धा या नदीत फेकून करतात. यांचा प्रतिवाद

करताना उत्तर प्रदेशचे पोल्यूशन कंट्रोल बोर्डचे मुख्यस्थ एकही प्रेत नदीत फेकले जात नाहीत, फक्त घाटावर अस्थीविसर्जन केले जाते व तेही कढल्या जात आहेत असे सांगत आहेत. परंतु स्थानिक लोक या प्रतिवादाशी सहमत नाहीत.

वाराणसी शहरातून दर दिवशी 321.5 मिलियन लिटर्स एवढे घाण पाणी भुयारी गटारातून वाहते. त्यापैकी येथील मैला शुद्धीकरण प्लँटमधून 101.8 मिलियन लिटर्स पाणी शुद्ध करून शेती कामासाठी वापरले जाते. बाकी सर्व घाण पाणी गंगानदीत सोडले जात आहे. वरुणा व असी या नदीद्वारे हे घाण पाणी गंगेत जाते. वाराणसी हे नावसुद्धा या नदीवरून पडले आहे. या शहराला बनारस या नावानेसुद्धा ओळखले जाते. यापूर्वी या शहराला काशीसुद्धा म्हणत असत. या शहरातील अनेक मैला पाणी शुद्धीकरण प्लँट्स राजीव गांधीच्या शासनाच्या वेळी मंजूर झाले होते. आता हे प्लँट्स जुने झालेले आहेत. त्यांचे तंत्रज्ञान जुने आहे. येथील कर्मचारी वर्ग प्रशिक्षित नाही. शिवाय विजेच्या तुटवड्यामुळे प्लँट्स पूर्ण क्षमतेने काम करू शकत नाहीत. विजेच्या तुटवड्याबद्दलच्या टिप्पणीशी पूर्वांचल वीज बोर्ड सहमत नाही.

वाराणसीतील घाण पाणी वाहून नेणारी भुयारी गटार यंत्रणा ब्रिटिशांच्या काळातील 1917 सालची असून शंभर वर्षे जुनी आहे. भुयारी पाइप्स मोडकळीस आलेली आहेत. मानवी आणि प्राण्यांची विष्टासुद्दा या पाइप्समधून नदीत जात असावे. पावसाळ्यात पावसाचे पाणी गटारातील अशुद्ध पाण्याबरोबर गंगेत जात असावे. जपानच्या एक इंटरनॅशनल कंपनीकडून अत्याधुनिक शुद्धीकरण प्लँट विकत घेतले जात आहे. या सर्वांच्या तपशिलात जायचे कारण नाही.

मला एवढेच सांगायचे आहे की गंगानदीच्या शुद्धीकरणासाठीचे पैसे खर्च झाले नाहीत. चार वर्षे झाले तरी अजूनही काम रेंगाळत आहे. 20 हजार

कोटीपैकी फक्त चार हजार कोटी रुपये खर्च झाले आहेत. 65पैकी 24 प्रकल्पावर हे पैसे खर्च झालेले आहेत. परंतु हे प्रकल्प फारच फुटकळ असून नदीच्या काठावरील घाटांची डागडुजी वा नदीच्या तोंडावरील साफसफाई किंवा नदीच्या पृष्ठभागावर साचलेल्या बाटल्या, निर्माल्य, हार तुराई इत्यादींच्या विल्हेवाटीची कामे पूर्ण झाली असावीत. परंतु मूळ गंगानदीची अजूनही साफसफाई झाली नाही. 11 राज्यातून वाहत येणाऱ्या या नदीत रोज 12000 मिलियन लिटर्स अशुद्ध पाणी मिसळते. या नदीच्या जवळ पास केवळ 4000 मिलियन लिटर्स क्षमता असलेल्या अशुद्ध पाण्याचे शुद्धीकरण यंत्रणा आहे. त्यापैकी फक्त 1000 मिलियन लिटर्स पाण्याचे शुद्धीकरण होत आहे. बाकी सर्व घाण पाणी नदीतून वाहत जाते. जेथे खरोखरच समस्या आहे त्याकडे लक्ष दिले जात नाही. त्याचा विचार केला जात नाही. कानपूर शहरातील चामड्याच्या उद्योगामूळे होणारे जल प्रदूषण, नदीकाठावरील इतर उद्योगामूळे होत असलेले जल प्रदूषण इत्यादीबद्दल काही उपाय योजनांचा गंभीरपणे विचार झालेला दिसत नाही.

राजीव गांधीच्या कालखंडात सुरु झालेला हा प्रकल्प मोदींच्या कालखंडात अजून त्याच अवस्थेत आहे. *गंगामाई मला खुणावते आहे, माझ्यासारख्या पुत्राच्या शोधात आहे,* असली अभिनिवेशपूर्ण भाषणं गंगेला शुद्ध करत नाहीत. वाराणसी तर प्रधानसेवकाचा मतदार संघ आहे. अलीकडेच जगातील अत्यंत प्रदूषित असलेल्या 20 शहरांची यादी प्रसिद्ध झाली आहे. या 20 पैकी 14 शहरं भारतातील, त्यातही उत्तर भारतातील शहरं आहेत. त्या यादीत वाराणसीचासुद्धा समावेश आहे. वाराणसीला जपानमधील क्योटोसारखे शहर बनवण्याची स्वप्नं दाखवले जात होते. क्योटो नसले तरी चालेल, परंतु जी काही आश्वासनं दिली होती ती तरी पूर्ण करावेत. चार वर्ष

संपली. अजून एक वर्ष शिल्लक आहे. या एका वर्षात आपण किती परिवर्तन आणू शकता याची कल्पना मला नाही व त्याचा अंदाजही करत येत नाही.

उमा भारतीने गंगेचे शुद्धीकरण न झाल्यास आत्मसमर्पण करणार असे विधान एका भाषणाच्या वेळी केले होते. तशी वेळ तिच्यावर येणार नाही, अशी आशा करू या.



# कर्तव्यपूर्ती

कंपनीच्या एकाच ऑफीसमध्ये दामले, जाधव, जगताप व मेश्राम हे चार जण काम करत होते. त्यांच्या बॉसचे नाव होते कारखानीस. कामाचे वाटप करणे, इतरांकडून व सहकाऱ्यांकडून झालेल्या कामाचा अहवाल तयार करणे, कामाचा पाठपुरावा करणे, आणि यानंतर नेमके काय करायचे याचा निर्णय घेणे याची पूर्ण जबाबदारी कारखानीस यांच्यावर होती. कारखानीस व त्यांच्या चार सहकाऱ्यांची टीम कार्यक्षम होती. कुठल्याही तक्रारीला येथे जागा नव्हती.

कारखानीस यांना त्यांच्या वैयक्तिक कामानिमित्त अमेरिकेला जायचे होते. कामावर परत रुजू होण्यासाठी कमीत कमी सहा महिने लागणार असा अंदाज होता. कारखानीस यांच्या मते या आधुनिक तंत्रज्ञानयुगात अमेरिकेत बसूनही इथल्या कामावर देखरेख ठेवता येईल. त्यामुळे त्यानी कंपनीला त्यांच्या गैरहाजरीमध्ये substitute ची गरज नाही असे कळविले. कंपनीलाही तेच हवे होते. त्याप्रमाणे कारखानीस यांनी त्यांच्या चारी सहकाऱ्यांना बोलवून या सर्व गोष्टींची कल्पना दिली. प्रत्येकाला त्या त्या दिवसाच्या कामाचा अहवाल फोन, मोबाइल, SMS वा email द्वारा (WhatsApp अजून उपलब्ध नव्हते) कळवण्यास सांगितले. आणि कारखानीस अमेरिकेला निघून गेले.

पहिला आठवडा तसा बऱ्यापैकी गेला. कारखानीस यांना चारी सहकारी काय करत आहेत याची कल्पना त्यांनी पाठवत असलेल्या मेसेजवरून कळू लागली. कामाचे नियोजन करून प्रत्येकाला यानंतर काय करायचे याचे प्रतिमेसेज कारखानीस पाठवत होते. त्यामुळे कारखानीस यांच्या गैरहजेरीतही काम होऊ शकते याची खात्री पटू लागली. परंतु पुढच्या आठवड्यात त्यातील नियमिततेला धक्का बसला.दामले यांचा मोबाइल बिघडला. त्यामुळे संपर्क तुटला.

जाधव यांना SMS करताना अडचणी येत होत्या. पाठवलेल्या SMS मध्ये बारीक सारीक गोष्टींचा उल्लेख टाळत असल्यामुळे कारखानीस यांना कामाच्या अद्यावत स्थितीची कल्पना येत नव्हती. जगताप यांचा internet connection तुटला होता. त्यांना फोनवर बोलणे जमत नसल्यामुळे त्यांचा कामाचा अहवाल अगदीच तुटपुंज्या स्वरूपात कारखानीस यांना मिळाला.

जेव्हा जेव्हा मेश्राम कारखानीसाशी फोनवरून संपर्क साधण्याचे प्रयत्न करायचे तेव्हा तेव्हा call drop होत होते किंवा कारखानिसाशी संपर्क तुटत होता.

शेवटी काय तर कारखानीस यांचे remote control managementचे मनसुबे धुळीस मिळाले.

** ** **

दुष्काळ, दहशतीचे वातावरण, रस्त्यावरील वाढते अपघात, शेतकऱ्यांची आत्महत्या, धार्मिक हिंसाचार इत्यादीसारख्या गंभीर घटना भोवताली घडत असताना एका ऑफीसमधील एवढ्या क्षुल्लक समस्येबाबत चर्चा करावी हे काही योग्य नाही असेच अनेक वाचकांना वाटण्याची शक्यता आहे. परंतु वर उल्लेख केलेले उदाहरण नैतिकदृष्ट्या काही गोष्टी सुचवण्याचा प्रयत्न करत आहे, हे पटकन लक्षात येत नाही. वरवरून क्षुल्लक वाटत असली तरी नैतिकतेचे महत्व बाजूला सारता येत नाही.

आपल्यावर असलेली जबाबदारी पूर्ण झाली असे आपण कधी म्हणू शकतो? हे फक्त केवळ कारखानीस यांच्याशी संपर्क साधण्याच्या संदर्भात नसून लोकव्यवहारातील – घरातल्या कचऱ्याची विल्हेवाट लावण्यापासून अण्वस्त्राचा साठा वाढवण्यापर्यंतच्या – प्रत्येक निर्णयप्रक्रियेत नैतिकता डोकावत असते. आजच्या धकाधकीच्या युगात कुठलेही काम सांघिकरित्या करावे लागते. व टीमचा एक सदस्य म्हणून जबाबदारी झटकता येत नाही.

जेव्हा आपण केलेल्या कामाचे योग्य व अपेक्षित परिणाम झालेले आहेत व त्याचे दुष्परिणाम होण्याची शक्यता फारच कमी आहे हे लक्षात आल्यानंतरच आपण आपले कार्य पूर्ण केले आहे असे म्हणू शकतो. परंतु अनेक वेळा परिणामाची कल्पनाच येत नाही. पाट्या टाकल्यासारखे काम करत राहणे एवढेच आपल्या हातात असते. कारखानीस यांचे सहकारी त्यंच्याशी संपर्क साधण्याचा आटोकाट प्रयत्न अगदी मनापासून करत होते. परंतु त्यात काही (तांत्रिक) अडचणी आल्या. त्यात त्यांचा काय दोष असे म्हणण्यास येथे नक्कीच वाव आहे. त्यामुळे या चौघांचे चुकले असे म्हणता येणार नाही. अशा प्रसंगी एखाद्याकडून एखादी गोष्ट अपूर्ण राहिली वा अपेक्षित परिणाम मिळाले नाहीत तर आपण त्याला/तिला जबाबदार धरत नाही. कारण त्यानी त्यासंबंधी प्रयत्न केले होते, असे समजून त्याला दोषमुक्त करतो व पर्यायी निर्णय घेत असतो.

खरे पाहता कारखानीस यांचे चौघे सहकारी पुरेसे प्रयत्न केले आहेत असे वाटत असले तरी कामाचा अहवाल कारखानीस यांच्यापर्यंत पोचवणे हाच मूळ उद्देश असताना ते उद्दिष्ट पूर्ण झाले नाही ही वस्तुस्थिती आहे. कदाचित तांत्रिक अडचणी पुढे करून हे चौघे जबाबदारमुक्त होतीलही. कदाचित आपण त्या चौघांवर कर्तव्यच्युतीचा आरोपही करू शकतो. येथे कारखानीस यांना रोजच्या कामाचा अहवाल पोचायला हवा व हा अहवाल कसा पाठवावा हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. त्यासाठी नेमके काय करायला हवे हा विचार टीम म्हणून करायला हवा होता. पर्यायी व्यवस्था करायला हवी होती. कारखानीस यानी emergency उपाय ठरवायला हवे होते. या गोष्टी न करता तंत्रज्ञानातील त्रुटीवर चूक ढकलणे नैतिकदृष्ट्या योग्य ठरणार नाही.

कामाचे नियोजन करून त्यातील खाचखळगे समजून उमजून कार्य करणे हे महत्वाचे असते. युद्धजन्य परिस्थितीत एखाद्या प्रदेशावर अण्वस्त्रांचा मारा करू

नये असे ठरलेले असल्यास त्यासंबंधीची पूर्ण काळजी घेणे निर्णय प्रक्रियेतील प्रत्येकाचे नैतिक कर्तव्य ठरेल. त्यातील एखाद्याच्या चुकीमुळे त्या प्रदेशाची राखरांगोळी होण्याची शक्यता असते. व ती चूक सुधारण्याची संधी कधीच मिळणार नाही. त्यामुळे तुम्ही जे काही करत आहात त्याचे अंतिम परिणाम समजून घेऊनच व ती जबाबदारी पूर्णपणे उचलून कर्तव्य करणे गरजेचे आहे. बँकेत काम करणारे ज्या प्रकारे ग्राहकांना या खुर्चीपासून त्या खुर्चीकडे, तेथून आणखी तिसऱ्या खुर्चीकडे असे संगीत खुर्चीचा खेळ खेळवताना वा संगणक down म्हणून हात वर करताना चीड येते. याविषयी त्यांना छेडण्याचा प्रयत्न केल्यास वरच्या (हजर नसलेल्या) अधिकाऱ्याकडे बोट दाखवून नामानिराळे राहण्यात धन्यता मानतात. अशा प्रकारचा (कटु) अनुभव प्रत्येक ठिकाणी – सार्वजनिक वा खाजगी – येथे नक्कीच येत असतात व आपण हताश होऊन हे सर्व सहन करत असतो. जर या साखळीतील प्रत्येक जण जबाबदारीने वागण्याचे ठरवल्यास कर्तव्यपूर्तीचे समाधानही मिळेल व व्यवस्थेला शिस्तही लागेल.

जरी कारखानीस यांच्या सहकाऱ्यांचे वर्तन या क्षणी तरी क्षुल्लक वाटत असले तरी अशा प्रकारचा बेजबाबदारपणा दूरगामी परिणाम करू शकतात हे विसरता येत नाही.



# विवेकनिष्ठतेच्या वाटेवर

पृथ्वीवरील चराचर सृष्टी व सर्व नैसर्गिक घटना निसर्ग नियमानुसार घडत असताना व हे नियम कुणीही बदलू शकत नाही, त्यावर आक्रमण करू शकत नाही, त्याचे उल्लंघन करू शकत नाही, ही परिस्थिती माहित असूनसुद्धा सुशिक्षित माणसांसकट सर्व फल-ज्योतिषाच्या नादी का लागतात? आत्मा, पुनर्जन्म, मोक्ष अशा भ्रामक कल्पनावर विश्वास का ठेवतात? अंत्यसंस्कारात दहावे-बारावे-तेरावे, मासिक श्राद्ध करून सहस्रावधी रुपये व्यर्थ का घालवतात? दहा रुपये किंमतीचा निरुपयोगी पत्र्याला पाचशे रुपयांना विकत घेऊन श्रीयंत्र म्हणून त्याची पूजा का करतात? लक्ष्मी प्रसन्न होईल असे त्यांना का वाटते? माणसाची बुद्धी इतकी रसातळाला कशी जाते? असे अनेक प्रश्न त्यांना पडतात. व या प्रश्नांच्या उत्तरांचा शोध घेताना श्रद्धा हो एकमेव कारण असू शकेल या निष्कर्षापर्यंत ते पोचतात. आणि यासंबंधात सुचलेल्या लेखांचा हा एक अप्रतिम संग्रह आहे.

या पुस्तकातील काही लेख लेखकाच्या वैयक्तिक अनुभवावर बेतलेले आहेत. त्यांना भेटलेल्या व्यक्ती, त्यांच्याशी झालेला संवाद, त्यांनी श्रद्धेच्या पुष्ट्यर्थ केलेला वाद-प्रतिवाद, वादातील तार्किक दोष इत्यादीवर नेमके बोट ठेवलेले चर्चा स्वरूपातील हे लेख अत्यंत वाचनीय आहेत. हे लेख वाचत असताना ही मंडळी इतके अतार्किक वाद कसे काय करू शकतात याचे आश्चर्य वाटू लागते. काही लेख विवेकवादाशी संबंधित संकल्पनेवर संवादाच्या स्वरूपात लिहिलेले आहेत. संवादाच्या स्वरूपातील लेख वाचत असताना लेखक आपल्या मनातील प्रश्नांचेच उत्तरं देत आहेत की काय असे वाटते. हे संवाद वाचत असताना त्या त्या विषयावरील तर्कसंगती ( व विसंगती) पटकन लक्षात येतात. लेखकाने लिहिलेल्या ओवीच्या स्वरूपातील काही कविताही या पुस्तकात समाविष्ट केलेले आहेत. त्याचप्रमाणे प्रा.

वालावलकर यांनी मराठी वृत्तपत्रांसाठी वेळोवेळी लिहिलेले पत्रसुद्धा यात आहेत. या प्रकारे विवेकावादासारख्या गंभीर विषयावर विविध शैलीतील कथा, संवाद, लेख, कविता, स्फुट लेख वाचताना वाचक नक्कीच हरवून जातो.

काही स्वतंत्र लेखात प्रा. य. ना. वालावलकर अंधश्रद्धांच्या संदर्भातील अनेक संकल्पनांचा ऊहापोह घेत सामान्यांच्या मनात असलेल्या समजुती-गैरसमजुती, वर्षानुवर्षे पाळत आलेल्या रूढी-परंपरा यातील गुणदोष वाचकांपुढे मांडतात. *सर्वधर्म समभाव, विश्वास-श्रद्धा-निष्ठा, आत्मा आणि मानवी मेंदू, सत्य आणि श्रद्धा, निरीश्वरवाद्यांना शिक्षा, ज्ञान व श्रद्धा, श्रद्धावंताचे तत्वज्ञान* इत्यादी लेखातून परमेश्वरावर विश्वास ठेवणाऱ्यातील अंतर्गत विसंगती प्रकाशात आणतात. मुळात देव, धर्म, श्रद्धा, आत्मा, पुनर्जन्म, मोक्ष, परलोक इ.इ. ज्ञानाचे विषय नाहीतच. त्यामुळे त्यावरील चर्चा, वाद-प्रतिवाद, तर्कसंगती लावण्याचा वृथा प्रयत्न व या संकल्पनामागील भूमिका इत्यादी गोष्टी फोल ठरतात, यावर लेखकानी भर दिला आहे. अनेक वेळा काही 'बुद्धिवंत' उपनिषद, वेद, दर्शन, वा भगवद्गीता यासारख्या ग्रंथांच्या आधारे आत्मा, परमात्मा यासारख्या पारलौकिक संकल्पनांच्या अस्तित्वाविषयी, त्यांच्या सुसंबद्धतेविषयी तावातावाने वाद घालत समोरच्याला नामोहरम करण्याच्या प्रयत्नात असतात. लेखकानी यातील काही लेखातून त्याच ग्रंथातील इतर काही परिच्छेद व श्लोक यांच्या आधारे या वादाच्या मुद्द्यातील विसंगती व प्रत्यक्ष चर्चेतील मुद्द्यांना बगल देवून केलेले स्पष्टीकरण किती तकलादू आहे हे दाखवून देतात. मुळात वाद घालणारे आपल्याला मुद्द्यांना पुष्टी देणारेच उतारे निवडलेले असतात हे लक्षात येऊ लागते. त्यामुळे वाद फिका पडतो. गीतेतील *श्रद्धावान् लभते ज्ञानम्* हे गीतावचन न पटणारे आहे याबद्दल लेखकाच्या मनात शंका नाही. श्रद्धा हे

ज्ञानप्राप्तीचे साधन नाही. शिवाय श्रद्धा हा मानवजातीला जडलेला सर्वात भीषण आणि गंभीर रोग आहे असे लेखकाचे स्पष्ट मत आहे.

श्रद्धेचे विश्लेषण करत असताना लेखकाला पारंपरिक श्रद्धा (उदा. सोमवारी शिवपिंडीवर बेलपत्रे वाहावी), गतानुगतिक श्रद्धा ( उदा. लालबागचा राजा नवसाला पावतो), आशावती स्पर्धा (उदा. श्रीयंत्राचे पूजन केले तर धनप्राप्ती होते) व भयोद्भव श्रद्धा (उदा. मृतांचे अंत्यसंस्कार केले नाही तर त्याचा अतृप्त आत्मा कुटुंबाला पीडा देतो) असे चार प्रकार करावेसे वाटतात. . लेखक या सर्व श्रद्धाप्रकारांच्या बाबतीत विचारपूर्वक व तर्कसुसंगत भूमिका घेत आहेत. अंधश्रद्धांचा उपहास या लेखात अंधश्रद्धावर घाला घालत असताना लेचापेची भूमिका न घेता चेष्टा, टवाळी, खिल्ली, अवहेलना अशा गोष्टींचा सर्रास उपयोग करावा असे लेखकाचे मत आहे. फक्त हा उपहास अंधश्रध्दांचा असावा व कोणत्याही व्यक्तीचा नसावा हा इषारा ते देवू इच्छितात.

अजून एका लेखात लेखक स्वतःची भूमिका मांडत असताना सश्रद्धांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार करण्यास सांगणे यात गैर काही नाही, कारण तो घटनादत्त अधिकार आहे अशी मांडणी करतात. जरी उपासनेचे वा आपल्या मताप्रमाणे श्रद्धा बाळगण्याचे स्वातंत्र्य घटनादत्त असले तरी योग्य काय व अयोग्य काय हे सांगण्याचे अभिव्यक्ति स्वातंत्र्यही घटनेने आपल्याला दिलेले आहे याचे स्मरण लेखक करून देतात. यावरून प्रा. य. ना. वालावलकर श्रद्धा-अंधश्रद्धांच्या विरोधात इतक्या तळमळीने, इतक्या पोटतिडिकीने इतकी वर्षे का लिहित आहेत याची कल्पना येऊ शकते.

या पुस्तकातील काही लेख संवादाच्या प्रश्नोत्तरांच्या स्वरूपात असून त्यावरून श्रद्धा, निष्ठा, निरीश्वरवाद, राशीभविष्य, भाविकांची मानसिकता, नैतिकता, धर्माचे आकर्षण, आस्तिकांची मानसिकता इत्यादी विषयावरील वाद- संवाद वाचत असताना या संकल्पनामागील बारकावे कळू लागतात. व

लेखकांची ही मनोरंजक पद्धतीने केलेले सादरीकरण वाचनीय ठरू लागते. खोचक प्रश्न व त्यांना दिलेली अचूक उत्तरं यातून विषय समजून घेण्यास मदत होते. म्हातारीची गोष्ट व इंदीची गोष्ट या कथेतूनही लेखक अंधश्रद्धा विरोधी संदेश देत आहेत.

या पुस्तकाचे अजून एक वैशिष्ट्य म्हणजे लेखकानी लिहिलेल्या ओवीच्या स्वरूपातील श्रद्धेविषयीच्या कविता असेल. मुळात अशा विवेकी विचार केंद्रित विषयावर अभंगाच्या शैलीत निरूपण करता येऊ शकते हेच मुळात आश्चर्यजनक कल्पना आहे. लेखकांचे मरणभय, आत्मा पुनर्जन्म, अध्यात्म-विज्ञान समन्वय, श्रद्धा आख्यान, आनंददायी इहलोक इत्यादी कविता वाचताना कमीत कमी शब्दात जास्तीत जास्त आशय लेखकानी पोचवले आहे हे लक्षात येऊ लागते.

प्रा. वालावलकर यांनी अंधश्रद्धेच्या विरोधातील लढ्यात प्रत्यक्षपणे मैदानात उतरलेले नसले तरी या लढ्याला जे सैद्धांतिक पाठबळ लागते ते पुरवण्यात नेहमीच पुढाकार घेत आलेले आहेत. यासाठी ते सातत्याने वेगवेगळ्या मराठी दैनिकात पत्र लिहून श्रद्धाविरोधी भूमिका सामान्य वाचकापर्यंत पोचवत आले आहेत. व या पत्राद्वारे जनमत तयार करण्यात ते काही प्रमाणात यशस्वी झाले आहेत. या पुस्तकात त्यांनी वेळोवेळी लिहिलेल्या पत्रं समाविष्ट केले असून ते श्रद्धाविरोधातील एका प्रकारे स्फुट लेख आहेत असे म्हणता येईल. पत्रांच्या आशयाला मुख्यत्वे करून त्या त्या वेळच्या वृत्तपत्रातील बातम्या वा लेखांचा संदर्भ आहे. त्यात काही गोष्टींचे स्पष्टीकरण दिलेले असल्यामुळे वाचकांना बातम्यातील वा एखाद्या आस्तिक लेखकाच्या लेखातील भूलथापा पटकन लक्षात येतात. ज्ञान म्हणजे नेमके काय, पुनर्जन्माची संकल्पना, धार्मिक विधींचा स्तोम, साडेसाती निवारणासाठी सुरक्षाकवच, आत्महत्येचे कोडे, वास्तवाचा स्वीकार, ज्योतिषशास्त्राचा

फोलपणा, वैचारिक प्रगती, प्रसारमाध्यमांची जबाबदारी, ईश्वराचा निर्दयपणा, अज्ञानाचा उदोउदो, निरुपयोगी यज्ञ, सत्यनारायण पूजा, वैदिक धर्म इत्यादीबद्दलची पत्रातील मांडणी जणू स्फुटलेखच वाटतात. व हे लेखन वाचताना समाजमानस कसा आहे, समाजाची दिशा कशी हवी, या गोष्टी स्पष्ट होत जातात. यातील काही पत्रं प्रकाशित झालेले नसतीलही. परंतु या सर्व पत्रांना एक श्रद्धाविषयक दस्तावेज म्हणून बघता येणे शक्य झाले आहे. याच पुस्तकातील लेखकाचे मित्र, भालचंद्र काळीकर यांनी लिहिलेले तीन लेखसुद्धा वाचनीय आहेत.

अनेकांना श्रद्धेविना जीवन अशक्य आहे असे वाटत असते. अशावेळी लेखक श्रद्धाविसर्जन करण्यास सुचवतात, हे त्यांना कदापि रुचणार नाही. कदाचित पुस्तकाचे शीर्षक अंधश्रद्धा विसर्जन असे चालले असते, परंतु श्रद्धा विसर्जन योग्य नाही असे सश्रद्ध सुचवतील. परंतु लेखकाच्या मते अंधश्रद्धा निर्मूलन करायचे तर कोणीतरी दाभोलकरांसारखा प्रबोधनकार लागतो. पण आपले श्रद्धा विसर्जन मात्र प्रत्येकाला स्वतःहून पुढाकार घेऊन करायचे असते. त्यासाठी भावनेवर मात करत बुद्धिनिष्ठपणे विचार करत राहिल्यास हे काम सोपे होईल. या विवेकनिष्ठतेचा खडतर मार्गावर चालण्यासाठी हे पुस्तक नक्कीच मदत करू शकेल.

विवेकाची चाड असलेल्या प्रत्येकाच्या संग्रही असायला हवे असे हे पुस्तक आहे.

**श्रद्धाविसर्जन**

लेः प्रा. य. ना. वालावलकर

वरदा प्रकाशन प्रा. लि. पुणे

पृ. सं 256, किंमत 300 रु



# माणूस नावाच्या प्राण्याची आतापर्यंतची वाटचाल

'आपल्या पूर्वग्रहांना धक्का न लावणाऱ्या विचारांकडे आपला नेहमीच कल असतो. आपल्या मतांच्या विरोधातील किंवा आपल्या विचारांना छेद देणारा एखादा विचार असल्यास तसले विचार करण्यापेक्षा मरण पत्करलेले बरे, असेच आपल्याला वाटत असते.' बर्ट्रांड रसेल यांनी 1925 साली हा विचार मांडला होता. गेल्या 90-95 वर्षात अजूनही आपण त्याच अविचारांच्या गर्तेत आहोत. या गर्तेतून बाहेर काढणाऱ्या काही मोजक्या विचारवंतापैकी 'मानव-विजय' या पुस्तकाचे लेखक शरद बेडेकर आहेत, असे आपण निश्चितपणे म्हणू शकतो.

आयुष्याचा प्रवास करताना आपल्याला अनेक प्रश्न पडत असतात, पृथ्वीवर माणूस केव्हा व कसा आला, आपल्याला घडवण्यात संतांचे योगदान किती, पाप, पुण्य, कर्मफलसिद्धांत, आत्मा, साक्षात्कार, इत्यादींचे निकष कोणते, प्राचीन हिंदू वाङ्मयात वैज्ञानिक दाखले सापडतात का धर्माची वाटचाल कशी असते. अज्ञेयवाद व निरीश्वरवाद यामधील फरक काय, मानवतावाद म्हणजे नेमके काय इत्यादी प्रश्नांना समर्पक उत्तरं शोधण्याचा प्रामाणिक प्रयत्न शरद बेडेकर यांनी या पुस्तकात केला आहे. हे पुस्तक म्हणजे बुद्धीप्रामाण्यवादाकडे वाटचाल करणाऱ्यांसाठी वाटाड्या ठरू शकेल.

*मानव-विजय* हे पुस्तक, साप्ताहिक सदर म्हणून लोकसत्तासाठी लेखकाने लिहिलेल्या लेखांची पुनःसंस्करित पुस्तकी आवृत्ती आहे. मनोगतात लेखकाने व्यक्त केल्याप्रमाणे "उत्क्रांतीने प्राप्त झालेल्या गुणांनी व क्षमतांनी माणसाने संपूर्ण पृथ्वी व्यापली. शेती, कोठारे, घरे, इत्यादीद्वारे वर्षभराच्या अन्न-पाण्याची सोय करून तो घरात व समाजात स्थिर, सुखी व प्रगत जीवन जगू

लागला. शेवटच्या तीन चार शतकामध्ये विज्ञान-संशोधनाद्वारे निसर्गसृष्टीच्या नियमनाचे काहीसे सत्य ज्ञान माणसांने प्राप्त करून घेतले. हेच मानवाचे विजय होत.” परंतु या पुस्तकात केवळ मानवी विजय गाथा नसून मानवजातीच्या काही अघोरी चुकामुळे मानववंशाबरोबर संबंध सजीवसृष्टीचाही विनाश होण्याच्या शक्यतेच्या धोक्याचा इशाराही लेखकानी दिला आहे.

मनोगताचा शेवट “हे पुस्तक वाचणाऱ्या अनेकांना माझे निरीश्वरवादी विचार पटतील, आवडतील असा मला विश्वास आहे” असे लेखकाने केले असून या पुस्तकातील लेखांचा ओघ कुठल्या दिशेने वाहणार आहे याची कल्पना यावरून येऊ शकते. रानटी अवस्थेतून आधुनिक, सुसंकृत जीवन जगण्यापर्यंत मजल मारलेल्या मानवी वंशाचा हा विजय स्वतःच्या काही वैचारिक प्रमादामुळे वाया जाता कामा नये या कळकळीतून पुस्तकातील बहुतेक लेख लिहिलेले आहेत याचा प्रत्यय वाचकांना होते. देव, धर्म, पंथ, संप्रदाय, ईश्वर, भक्ती, श्रद्धा इत्यादी सर्व बाबी एके काळी मानवी हिताचे वा मानवाच्या अस्तित्वाला पूरक ठरले असतील. परंतु 19व्या शतकात मानवाच्या बुद्धीची झेप इतकी उंच होती की या सर्व संकल्पनांचा पुनर्विचार करावा लागला, त्यातील बहुतेक बाबी काही समाजांना निरर्थक वाटले, काह गळून पडल्या. आधुनिक जगातील या वैचारिक क्रांतीमुळे मानवी जीवन सुखकर झाले व माणूस अधिकाधिक चिकित्सकखोर होत गेला व कुठे आहे तो ईश्वर हा प्रश्न विचारण्याचे धारिष्ट्य त्याच्या अंगात आले.

डार्विनच्या उत्क्रांतीच्या सिद्धांतामुळे या जगामागे कुणी स्वयंभू ईश्वर आहे आणि त्याने माणसाला निर्माण केले आहे या गृहितकाला प्रचंड धक्का बसला. पृथ्वीवरील मानव प्राणीच्या विकासाच्या टप्प्याविषयीचे वर्णन व सर्वांना सोईस्कर अशी जीवन पद्धती स्थापित झालेल्याचा तपशील एका लेखात आहे. या संदर्भात सजीवतेची पार्श्वभूमी काय असेल, एकपेशीय

प्राण्यापासून बहुपेशीय प्राणी, त्यातून इतर सजीव व माणूस, माणसाच्या मेंदूचा होत गेलेला विकास इत्यादींचे विस्तृत वर्णन वाचत असताना आस्तिक विचारधारा कशी प्रचलित होत गेली याचीसुद्धा कल्पना येऊ शकेल. गंमत म्हणजे या सर्व गोष्टींच्याबद्दल गेली अनेक वर्षे कित्येक विचारवंत आपापल्या पुस्तकातून मांडणी करत आलेले आहेत. तरीसुद्धा महाराष्ट्रातील समाज मात्र अजूनही रूढी परंपरांच्या विळख्यातून बाहेर पडत नसल्यामुळे शरद बेडेकरासारख्या विचारवंताना या गोष्टी पुन्ह पुन्हा सांगणे भाग पडत आहे.

मानवी विकासाच्या संदर्भात मराठी वाचकांना सिंधूसंस्कृती ते वेदसंस्कृतीबद्दल जास्त कुतूहल असते. जे जे आताचे आधुनिक विज्ञान व तंत्रज्ञान आहे ते सर्व भारतभूमीवर शेकडो वर्षापूर्वी होते आणि नंतरच्या काळात परकीय हल्ल्यामुळे ते सर्व गुप्त झाले व परकीयानी त्याची चोरी करून आपल्या नावाने खपवत आहे, याबद्दल त्यांच्या मनात अजिबात संशय नाही. म्हणूनच लेखक इ.स.पू 3000 पासून आतापर्यंत भारतात झालेल्या स्थित्यंतरांचा आढावा घेण्याचा प्रयत्न केला आहे. सिंधूसंस्कृतीचा काळ पाच हजार वर्षापूर्वीचा असून आर्यांचे आगमन होण्यापूर्वी भूमध्य समुद्रीय लोक भारतातील अनेक ठिकाणी स्थिरावलेले होते. त्यामुळे सिंधूसंस्कृतीत त्या काळातील इतर संस्कृतांचे अंशही सापडतील असे लेखकाना वाटते. आर्यांनी भारतात प्रवेश केल्यांनतर आर्य व अनार्य यांचा संमिलित समाज तयार होण्याची प्रक्रिया चालू झाली. त्याच कालखंडात चार वेदांच्या रचना झाल्या. आणि हा वेदकाळ इ.स.पू. 3000 पासून इ.स. 1000 पर्यंत अस्तित्वात होता. परंतु तो काळ कसा होता, त्यांची जीवन पद्धती कशी होती, वेदविचारांच्या प्रभुत्वाची कारणे कोणती होती, त्याकाळी जातीभेद, चातुर्वण्यभेद होते की नाही, इत्यादिबद्दलचे तपशील एका लेखात आहे. उपनिषद व भारतीय दर्शने यामुळे भारतीय जीवनावर झालेला परिणाम, जैन व बौद्ध धर्मांचा उदयकाल,

इत्यादीबद्दल वाचत असताना आपले पूर्वज निसर्गाचे व निसर्गशक्तीचे भौतिक नियम शोधून काढण्याऐवजी म्हणजे, विज्ञानाच्या मार्गाने जाण्याऐवजी उलट दिशेला वळून भजन, कीर्तन, पूजा, प्रार्थना पुण्यसंचय इत्यादींच्या मागे लागले, हा लेखकानी काढलेला निष्कर्ष योग्य आहे असे वाटू लागते. म्हणूनच लेखकाला “इंग्रजासारख्या प्रगत युरोपीय राजवटीने शे-दीडशे वर्षे भारतावर राज्य केले. त्यामुळे आपण आधुनिक जगाच्या मुख्य प्रवाहात सामील झालो. त्यामुळे कालांतराने संगणक, माहिती व दूरसंचार क्रांतीत सामील होऊ शकलो आणि आपली इस्रो अभिमानाने मंगळयानसुद्धा सोडू शकली! नाही तर, जग अनेक क्षेत्रांत वैज्ञानिक प्रगती करून संपन्न होत असताना आपण यज्ञात आहुती टाकत तपश्चर्या, व्रते करत अनेक देवांना प्रसन्न करून घेत राहिलो असतो. आज आपण स्वतःच्या पायांवर उभे आहोत आणि आपल्याला ज्या दिशेला वळायचे आहे त्या दिशेला वळू शकतो.” असे सुचवावेसे वाटले.

धर्म व धर्मदर्शनाच्या प्रभुत्वाखालील आस्तिक नेहमीच दृष्टांत, साक्षात्कार, नामस्मरण, नाम साधना इत्यादी तथाकथित आध्यात्म मार्गांचा आधार घेत ईश्वरीय अनुभवांचे भलावण करत असतात. जगात अलौकिक असे काही तरी आहे, चमत्कारांना नाकारणे योग्य नाही असेही प्रतिवाद करत असतात. लेखकानी आपल्या एका लेखात यासंबंधीचे समज गैरसमजाबद्दल विस्तृतपणे टीका टिप्पणी केली आहे. दैव, ललाटलेख, विधिलिखित, नियती प्रारब्ध, नशीब इत्यादी शब्द वापरत आपला भार ईश्वरावर सोपवून शांत बसावे ही दैववादी वृत्ती मानवी प्रगतीला हानिकारक आहे, असे स्पष्ट मत लेखकानी व्यक्त केली आहे.

आपल्यातील अनेक जण, ईश्वराचे अस्तित्व मान्य नसले तरी, जन्म पत्रिकेतील भविष्यवाणी, ग्रहांचे सामर्थ्य, मंत्र-तंत्रांचा प्रभाव, रंगीत खडे, रुद्राक्ष इत्यादी मधील संकटविमोचक शक्ती इत्यादीविषयी सकारात्मक मत

व्यक्त करत असतात. आपली दैवदत्त बुद्धी वापरून भविष्यात डोकावता येते याबद्दल त्यांच्या मनात तिळमात्रही संशय नसतो. परंतु लेखकाला मात्र प्रत्येकाचे भविष्य जन्मतः ठरलेले आहे, ग्रह-तारे इत्यादींचा प्रभाव माणसाच्या व्यवहारावर पडू शकतो, वा मंत्र-तंत्रमाध्ये अगाध शक्ती असू शकते इत्यादी गोष्टी मान्य नाहीत. त्यामुळे कुठल्याही पद्धतीने मानवी भविष्य आधी समजण्याचा प्रश्न उद्भवत नाही. असे ते ठामपणे सांगू इच्छितात.

याच प्रकारे नियतीवाद या संकल्पनेप्रमाणे कर्मफलसिद्धांत, पाप पुण्य, आत्मा, श्रद्धा, पूर्वजन्म, पुनर्जन्म इत्यादी आपल्या परिचयातील संकल्पना किती तकलादू आहेत, याबद्दलची सडेतोड चर्चा लेखकानी केली आहे. वेद, उपनिषद, व पुराण या प्राचीन ग्रंथापेक्षा भगवद्गीतेतील या संकल्पना-संबंधातील मांडणीबद्दल अनेकांना वृथा अभिमान असतो. परंतु लेखकाच्या मते "भगवद्गीतेने उचलून धरलेली व आधुनिक काळात बदनाम ठरलेली चातुर्वर्ण्य व्यवस्था ही आत्मा या संकल्पनेला व कर्मफलसिद्धांताला एकत्र करून ताणून रचलेल्या पूर्वजन्म व पुनर्जन्म या सिद्धांतावर उभारलेली कल्पनांची भरारी आहे. दरिद्री व अन्यायग्रस्त ऐहिक जीवन जगणाऱ्या दुर्दैवी जनतेने त्याविरुद्ध बंड करून उठी नये, यासाठी ती उपयुक्त ठरत असल्याने या कल्पनारंजनाला धर्मामध्ये स्थान देण्यात आले असावे. "श्रद्धेच्या संदर्भातील "जगातील सर्व धर्म-पंथांच्या श्रद्धा परस्पर भिन्न आणि परस्पर विरोधीही आहेत. त्यात 'वैश्विक सत्य' असे काही नसते. त्यामुळे आपापले धर्म, पंथ, गुरु सांगतात त्याप्रमाणे आपण सर्व काही श्रद्धेने स्वीकारू शकत नाही. निसर्गाने व उत्क्रांतीने ज्या मनुष्य प्राण्याला मेंदू व मनबुद्धी प्राप्त झालेली आहे, त्याच्या जवळ सत्यशोधनासाठी व अज्ञान-अंधारातील त्याच्या सुखमय प्रवासासाठी त्याची बुद्धी हेच एकमेव साधन आहे. त्यामुळे मानवी बुद्धीला

प्रमाण मान'ले पाहिजे. ईश्वरावरील श्रद्धा हे प्रमाण होऊ शकत नाही. ", हे लेखकाचे मत सर्व बुद्धीप्रामाण्यवाद्यांना नक्कीच मान्य होईल.

भारतात उपलब्ध असलेल्या प्राचीन हिंदूंच्या वाङमयात आपले पूर्वज मोठे कल्पक, बुद्धीमान व तर्कप्रज्ञावान होते याबाबतीतील अनेक उदाहरणं आपल्याला सापडतील. स्मृतीपुराणे, मनुस्मृती, धर्मसूत्रे इत्यादी ग्रंथात ईश्वरविषयक उल्लेख, जगाची उत्पती, स्थिती व लय याबद्दलची भाकितं, हे सर्व जग ब्रह्मनिर्मित आहे याची खात्री इत्यादी काल्पनिक गोष्टी व त्यांच्या पुषट्यर्थ केलेले तार्किकवाद सापडत असले तरी इतर काही ग्रंथात विज्ञानासंबंधीचे काही उल्लेखही सापडतात. अंकगणित, बीजगणित, रेखा गणित, त्रिकोणमिती, या शास्त्राबद्दलचे ज्ञान भारतीयांना अवगत होते याचेही काही पुरावे सापडतात. खगोलशास्त्रातील काही उल्लेख आधुनिक निरीक्षणाशी जुळतात. पदार्थ विज्ञान, शिलाशिल्प, धातुविज्ञान शास्त्र इत्यादी अभ्यास क्षेत्रात आपल्या पूर्वजांचे योगदान होते हेही नाकारता येत नाही. परंतु पूर्वजांनी सुखी मानवी जीवनासाठी प्रखर तर्कप्रज्ञा वापरून निसर्ग व विश्वातील भौतिक शक्तींचा शोध न घेता स्वतःच्या अंतप्रज्ञे (intuition)वर भर देण्यात आयुष्य खर्ची घातले. अध्यात्म व ईश्वराचा शोधातच ते मशगुल राहिले. त्यातच समाधान मानू लागले. त्याच वेळी युरोपातील घडामोडीने विज्ञानयुग प्रत्यक्षात आमून जगाला आधुनिक दृष्टी दिली. मानवी वंशाला ऐहिक सुख व समाधानाचे दिवस दाखवले. त्यामुळे आमच्याकडे विमानं होती, ब्रह्मास्त्रे होती, प्लॅस्टिक सर्जरीचे तंत्र अवगत होते, अवयवरोपणाची उदाहरण होती या निराधार स्वप्न रंजनेत आहोत याची आठवण लेखक करून देत आहेत.

मानव विजयाचा अजून एका टप्प्यात आपल्या महाराष्ट्रातील संत व समाजसुधारकांचा योगदान आपण कधीच विसरू शकत नाही. पंधराव्या व सोळाव्य शतकामध्ये युरोपातील प्रबोधन चळवळीत प्रमाण भाषा असलेल्या

लॅटिन भाषेतील बंदिस्त ज्ञान सर्व सामान्याना कळणाऱ्या स्थानिक भाषेत आणल्यामुळे युरोपमध्ये फार मोठ्या प्रमाणात उलथापालथ झाली. युरोपियन समाजात चौकस वृत्ती व वैज्ञानिक दृष्टिकोन रुजण्याला व विकसित होण्याला प्रेरणा मिळाली. तसाच काहीसा प्रकार आपल्या महाराष्ट्रातही ज्ञानेश्वर तुकाराम आदी संतांनी बंडखोरी करून समाजाला वेगळ्या दिशेला नेण्याचा प्रयत्न केला. ही संत चळवळ सुमारे पाच शतके आवश्यक व उपयुक्त लोकशिक्षण देण्यात प्रभावी कार्य केले. तरीसुद्धा भक्त म्हणविणाऱ्यांनी त्यांच्या नावांशी चमत्कार व मिथके जोडून त्यंच्या मूळ विचारांना बगल दिले. भक्तीमार्गी संतानीसुद्धा तथाकथित धार्मिक, कर्मठ आचारांची उपयुक्तता नाकारून दैनंदिन जीवनातील निर्मळ आचरणाला महत्व दिले. वेद नाकारला. त्यंचे पाठांतर नाकारले. लोकभाषा हे माध्यम वापरून बहुजनांना उन्नयनाचा मार्ग दाखवला. तरीसुद्धा वर्णधर्माची चौकट, जातीभेदांच्या भिंती, स्पृश्यास्पृश्यतेची दुष्टचाल, स्त्रियाबाबतचे भेदभाव अशा अन्याय्य व्वस्थेला हे संत मोडू शकले नाहीत.

परंतु या पूर्वाच्या समाजसुधारकांचा वारसा एकोणीसाव्या व विसाव्या शतकातील आगरकरसकट अनेक समाजसुधारकांनी चालवला. बदलत्या परिस्थितीतील जीवनातले जे प्रश्न संतांना कळणे शक्य नव्हते ते सुधारकांना चांगल्या प्रकारे कळू लागल्यामुळे देशभक्ती आणि स्थितीप्रिय मार्गापेक्षा मानवतावादी आणि चैतन्यमय मार्गाने वाटचाल झाली पाहिजे अशी आग्रहाची मांडणी त्यांनी केली. अनेक समाजसुधारकांनी ईश्वराच्या अस्तित्वाला कुठलाही पुरावा नाही असे म्हणत निरीश्वरवाद व मानवतावाद यांचा पुरस्कार केला. मानवता हे तत्वज्ञान वैज्ञानिक दृष्टिकोन आणि निरीश्वरवाद या दोन मूळ विचारांवर आधारित असते अशी मांडणी लेखक करत आहेत. अनेकांना ही विचारसरणी रुचत नसली तरी ईश्वराला उघडपणे

विरोध करणारा निरीश्वरवाद जास्तीत जास्त लोकांनी स्वीकारल्यास मानवतावादाला बळ येईल. मानवतावादात नीतीला प्रथम स्थान असून सहानुभूती मैत्री, दया, व प्रेम यांच्या पायावर ती उभी असते. ही नैतिकता मानवाच्य यानंतरच्या वाटचालीत अत्यंत गरजेचे आहे.

लेखक शेवटी शेवटी धर्मातिरेकातून, प्रदूषणातिरेकातून व लोकसंख्यातिरेकातून विनाशाकडे चाललेल्या मानव वंशाला वेळीच सावध होण्याचा इशारा देत आहेत. "मानवाने पृथ्वी व्यापणे, विविध संस्कृती निर्मिणे आणि विज्ञान शोधून काढणे ही विजयाची पावले असले तरी या अतिरेकातून पृथ्वीवरील सर्व सजीवांच्या संपूर्ण विनाशाची शक्यता निर्माण झालेली आहे. या विनाशापासून मानवजातीला वाचवण्यासाठी मानवाने स्वतःच उपाय शोधून अमलात आणले पाहिजेत. ते आपले कर्तव्य आहे." हा धोक्याचा इशारा देत मानव विजयाचा थोडक्यातल्या इतिहासाची सांगता करत आहेत.

**मानव-विजय**

*शरद बेडेकर,*

डायमंड पब्लिकेशन्स, पुणे,

पृ. सं – 162 किंमतः 195 रु



# रक्ताच्या नातींची ओझे

***रक्ताच्या नातींची ओझे वाहण्याची सक्ती का म्हणून सहन करावे?***

आपल्यापैकी बहुतेकांनी दिवाळी नक्कीच साजरी केली असेल. या काळात कुटुंबियांबरोबर, नातलगांच्या गराड्यात, मित्र - मैत्रिणीबरोबर गेलेला वेळ, मारलेल्या गप्पा, खाल्लेले पदार्थ यांची अजूनही आठवण असेल. कदाचित तसे नसेलही!.... कारण आजकाल बहुतेक वेळा अशा प्रकारचे गेट-टुगेदर, कौटुंबिक मेळावे, आनंद देण्याऐवजी काही ना काही कटकटी, कटु अनुभव मागे सोडत असतात. अनेकांना हे उत्सव, मेळावे, म्हणजे ताणाचे, वैतागाचे प्रसंग वाटतात. परंतु टीव्ही सिरियल्सप्रमाणे सास-बहू - जावई, आई -बाबा, भाऊ-बहिण, मावश्या, मेहुणे.... हा खेळ - आवडो न आवडो - चालूच ठेवण्याची सक्ती असते. या गोष्टीत तुमचा प्रत्यक्ष सहभाग असल्यास हे आपण का थांबवू शकत नाही, हाही विचार तुमच्या डोक्यात येऊन गेला असेल. हा घाट पुन्हा पुन्हा घालण्यात काय हशील आहे? या कटुप्रसंगातून आपली सुटका होऊ शकत नाही का? पुढच्या वर्षी या नातलगांपासून लांब कुठे तरी जाऊन सुट्टी साजरी करावी का? हे सर्व विसरून जाणे शक्य होईल का? असे अनेक प्रश्न तुमच्या डोक्यात घोळत असतील. तुम्ही स्त्री असल्यास ही कुचंबणा काही वेळा सहन करण्याच्या पलिकडे असते असे तुम्हाला वाटत असेल. तरीसुद्धा मन मारून, चेहऱ्यावर खोटे खोटे हसू आणून नातलगांची सरबराई करायला तुम्ही हजर राहत असाल.

विभक्त, चौकोनी कुटुंब पद्धती रूढ झालेली असूनसुद्धा नातलगांचे शुक्लकाष्ट अजून का सुटले नाही याचे आश्चर्य वाटते. सर्व बंधनं तोडून आपापल्या मनाप्रमाणे आपण का वागत नाही? रक्ताच्या नातींची ओझे वाहण्याची सक्ती का म्हणून सहन करावे? जन्माला घातलेल्या आई - वडिलांपासून आपण दूर राहू शकतो. परंतु इतर समवयस्क नातलगांशी एवढे

चिटकून राहण्याची खरोखरच गरज आहे का? चार नातेवाइक जमले की एकमेकाची उणे-दुणे काढण्याव्यतिरिक्त दुसरा विषयच सुचत नसतो. आपापल्या श्रीमंतीची वारेमाप स्तुती, आपल्या पिलावळांची नको तेवढे कौतुक, नाहीतर इतिहासकाळातील जुने - जुनाट प्रसंगांची उजळणी... तेच तेच ऐकून कान विटलेले असतात. परस्पर विरोधी वैचारिक भूमिकेमुळे हा मौखिक सामना अटीतटीचा होत शेवटी कटू प्रसंगात त्याचा समारोप होतो. आपण काय बोलत आहोत हे दुसऱ्याला कळत नाही व तो/ती काय बोलत आहे हे आपल्याला कळत नाही. त्यामुळे या गेट-टुगेदरचा विचका होतो. परंतु आपणच होकार दिलेला असल्यामुळे वा आपलाच या गोष्टीसाठी पुढाकार असल्यामुळे असहायपणे या प्रसंगाला सामोरे जाण्याशिवाय पर्याय नसतो.

या संबंधात एक प्रश्न विचारावासा वाटतो. आपण आपल्या कौटुंबिक सौख्यासाठी किती किंमत मोजू शकतो? हा प्रश्न कदाचित बालिश वा मूर्खपणाचा आहे, असेच वाटेल. कारण आपल्या कौटुंबिक सौख्यासाठी वाटेल ती किंमत द्यायला तयार आहोत, असेच आपल्याला वाटत असते. परंतु आपण आपल्या कुटुंबियांवर जिवापाड प्रेम करावे वा कुटुंबियांच्या सहवासातील आनंद उपभोगत राहावे असा कुठलाही लिखित वा अलिखित वा वैश्विक नियम नाही. गंमत म्हणजे याविषयी आपल्याला काय वाटते हे महत्वाचे असून काय वाटायला हवे हे महत्वाचे नाही.

तुमच्या या विषयाबद्दलच्या भावना सुस्पष्ट आहेत. परंतु इतर काही अनिवार्य गोष्टीमुळे तुम्ही त्यातून सहजासहजी बाहेर पडू शकत नाही, हेही तितकेच खरे. उदाहरणार्थ ती एक जबाबदारी असू शकते, वा आपल्याला आवडत नसले तरी दुसऱ्यांच्या समाधानासाठी वा त्यांना दुखवू नये यासाठी थोडीशी कळ सोसली तरी काही बिघडत नाही, असाही विचार त्यामागे असू शकतो. अगदीच मजा येत नसले तरी वा अस्वस्थ वाटत असले तरी कौटुंबिक

सौख्याचा दूरगामी परिणामांचा विचार करून आपण अशा प्रसंगी कसे वागायचे हे ठरवत असतो.

यातून काही मार्ग काढता येईल का हा प्रश्न आता आपल्यासमोर आहे. काही तडजोड काढण्यासारखे असल्यास त्याचा विचार करणे गरजेचे ठरेल. या चक्रव्यूहातून बाहेर पडण्यासाठी काही रणनीती ठरवता येईल का, याचाही विचार करावा लागेल. आपले काय चुकले याचाही आढावा घेता येईल. आपण नेहमीप्रमाणे चाकोरीत अडकलो आहोत का? चाकोरीबद्धता, गतानुगतिकता, रूढी, परंपरा यातून सुटका नाही असे आपल्याला वाटत आहे का? त्याच वेळी मनस्ताप सहन करून घेण्याची तयारीसुद्धा आपल्यात आहे का? एक मात्र खरे की गोष्टी हाताबाहेर जाण्याआधीच काही उपाय शोधणे गरजेचे आहे. अन्यथा आयुष्यभर एकमेकाची तोंड न पाहण्याची पाळी आपल्यावर येईल. म्हणूनच थोडीशी मनाला मुरड घातल्यास नंतर होणारा मनस्ताप, त्रास कमी होण्याची शक्यता आहे व तेवढी मानसिक तयारी आपल्याला ठेवावीच लागेल. तोडण्यासाठी वेळ लागत नाही; परंतु तुटलेली नाती जोडणे अशक्यातली गोष्ट ठरू शकते.

नातेसंबंध जपण्यासाठीच्या इतरांच्या अवास्तव अपेक्षाबद्दल तुमच्या मनात नक्कीच अढी असेल. परंतु त्याचवेळी इतरांनी तुम्ही जसे आहात तसे तुम्हाला स्वीकारावे ही तुमची अपेक्षा रास्त आहे का, याचाही विचार करणे गरजेचे आहे. अशा नको असलेल्या मेळाव्यात कमीत कमी वेळ देणे, उशीरा येणे. लवकर निघून जाणे, वा हे आवडत नाही, ते आवडत नाही असे म्हणत जमलेल्या मैफलीचा रसभंग करणे, इतरांशी तुटकपणाने वागणे, यातून काही साध्य होईल का याचाही विचार करणे जरूरीचे आहे.

अनेक वेळा हे कटू प्रसंग तुमच्या स्वाभिमानाला धक्का पोचवतात. तुम्ही जपत असलेल्या मूल्यांची खिल्ली उडवतात. काही नाती इतके त्रासदायक

ठरतात की त्यांचा सहवास एका मिनिटासाठीसुद्धा सहन करणे अशक्यप्राय ठरते. ब्लड रिलेटिव्ह्ज नव्हे तर ब्लडी रिलेटिव्ह्ज वाटू लागतात. तुमच्या प्रत्येक गोष्टीवर त्यानी केलेला टीकेचा भडिमार सहनशक्तीच्या पलिकडचा ठरतो. त्यामुळे तुम्ही लवकरात लवकर कुठल्यातरी प्रवासी कंपनीला गाठून दूर कुठेतरी - फक्त तुम्ही नवरा-बायको व मुलं - लांब सहलीला जाणे सर्वांच्या दृष्टीने सोइस्कर ठरेल.

परंतु यातून प्रश्न सुटत नाही. अशा प्रकारच्या तडकाफडकी निर्णयातून मूळ समस्येला उत्तर मिळेल का याचाही विचार करणे गरजेचे आहे. आपले कर्तव्य, आपली जबाबदारी, यापूर्वीच्या कटुप्रसंगांचे दाखले, इतर नातलगांची आपल्या पडत्या काळातील वागणूक, इत्यादी सर्व गोष्टींच्या रसायनातून अशा गेट टुगेदरचा विचका होत असतो हे आपण विसरू शकत नाही. काही तरी निमित्त काढून मुळात रक्ताची नाती उधळून टाकण्याचा हा आपला अट्टाहास तर नसेल ना? ही शक्यतासुद्धा विचारात घ्यावी लागेल. आपण कुठल्यातरी काल्पनिक नैतिक दबावाखाली आपले निर्णय घेत नाही ना याची तपासणी करावी लागेल.

एका मानसतज्ञाच्या मते असल्या प्रकारचे ताण तणाव आपण equal footing वर नसल्यामुळे होत असतात. काही कारणामुळे आपण स्वत:ला इतरांपेक्षा वेगळे (वा अत्युच्च) समजत असतो. व इतरही तसेच समजत असल्यामुळे कोंडी फुटत नाही. आपलं म्हणजे बाळ, इतरांच कार्टं.... ही मनोवृत्ती आपण जोपासत असल्यामुळे ताण वाढत जातो. कदाचित आपल्यापैकी कुणी तरी स्वत:च्या अपत्यापेक्षा इतराच्या अपत्याला झुकते माप देण्याचा प्रयत्न केल्यास तो सर्वांच्या दृष्टीने गुन्हेगार ठरू शकतो. A moral monster.... कदाचित हे काही काळापुरते असले तरी आपल्यावर रक्ताच्या नात्यांचा नैतिक दबाव असतो हे मान्य करायला हवे. म्हणूनच आपण

आपले श्रम, वेळ, पैसा इतर अपरिचितांपेक्षा आपापल्या जवळच्या नात्यावरतीच खर्ची घालत असतो. आपले नातलग (व काही प्रमाणात आपले काही निवडक मित्र) इतर अपरिचितांपेक्षा जवळचे वाटतात. आपल्या दु:खद प्रसंगी त्यांचाच आधार वाटतो. माणसांच्या उत्क्रांती काळापासूनच कळप करून राहणे हा गुणविशेष आपल्या सर्वांच्यात आहे. या हार्डवायरिंगपासून सुटका नाही. जर आपण सर्व आपल्या रक्ताच्या नात्यांना जवळ न करता इतर अपरिचितांना झुकते माप देऊ लागल्यास आणखी गोत्यात सापडण्याची शक्यता आहे. त्यामुळे फार मनस्ताप करून न घेता (व कुणालाही न दुखवता) या परिस्थितीतून मार्ग काढणे हेच शहाणपणाचे ठरू शकेल.

खरे पाहता नैतिकता सर्वांना एकसारखे वागवलेच पाहिजे अशी अपेक्षा करत नाही. काही अपवादात्मक परिस्थिती वगळता, आपली नैतिक जबाबदारी प्रथम आपल्या जवळचे नातलग, त्यानंतर मित्र व त्यानंतर इतर या उतरंडीच्या क्रमात विभागली जात असते. आवडो न आवडो काही गोष्टी पाळण्याचे आपल्यावर बंधन आहे. वृद्ध माता पित्यांना भेटण्यात तुम्हाला समाधान मिळत नसले तरी वा त्यांना त्याची गरज वाटत नसली तरी तुम्हाला ते ओझे वाहावे लागेल. कारण हा तिढा आपली आवड, आपले समाधान व आपले कर्तव्य यांच्यातला आहे. याला पर्याय नाही.



# एक्सपायरी डेट

## *आपल्याला मृत्यू गाठण्यापूर्वी कुठल्या कुठल्या अनुभवांची शिदोरी जमवावी?*

या प्रश्नाचे उत्तर आपल्याला अनेक पुस्तकातून, धर्मग्रंथातून वा टीव्हीवर (रतीब घालणाऱ्या) विविध चॅनेल्समधून शोध घेतल्यास नक्कीच मिळू शकेल. आपल्या आयुष्यभरात कुठली प्रेक्षणीय स्थळं पहावीत, कुठली पुस्तकं वाचावीत, कुठल्या मैफलीत हजेरी लावावी, कुठले चित्रपट, कुठली नाटकं, लोककला (तमाशा!) पाहावीत, कुठल्या चित्तथरारक खेळांचा आस्वाद घ्यावा, कुठली छंदं जपावीत, कुठली भाषा शिकावी इत्यादींची एक लांबलचक यादी प्रत्येकाला नक्कीच करता येईल. नेमकी डेट माहित नसली तरी प्रत्येकाची एक्स्पायरी डेट ठरलेली असते. कधी ना कधी मृत्यू आपल्याला गाठतोच. त्यामुळे वेळ व उपभोगवायचे अनुभव यांचा मेळ बसविणे जिकिरीचे वाटू लागते.

हे सर्व वाचताना काही तरी खटकल्यासारखे (काहींना!) वाटेल. प्रत्येक जण आपापल्या कुवतीनुसारच या अनुभवांची गाठ बांधत असतो. तरीसुद्धा काही तरी राहून गेले अशी चुटपुट मनाला टोचत असते. परंतु अशा प्रकारचे अनुभव घेत राहण्यासाठी आपल्यावर कुठूनतरी दबाव येत असतो हे तरी मान्य करायला हवे. इतरांचे ऐकत असताना आपण अमुक अमुक एक गोष्ट केलेली नसेल तर आपले आयुष्य निरर्थक आहे असेसुद्धा वाटू लागेल.

एक मात्र खरे की आपले हे आयुष्य मर्यादित काळासाठी असते. त्यातूनही उत्स्फूर्ततेने बिनधास्तपणे अनुभव उपभोगण्यासाठी शरीराची साथ हवी असते. परंतु ती फार काळ टिकत नसते. त्यामुळेच आपला वेळ सार्थकी लावायला हवे हे पालुपद अगदी लहानपणापासून आपल्याला ऐकविले जात असते. चाकोरीबद्ध आयुष्य घालविण्यापेक्षा - थोडासा त्रासदायक असला तरी -

नवीन नवीन अनुभवांना सामोरे जाण्यातच आयुष्य सार्थकी लागेल ही मानसिकता बळावत असते. भरमसाट वस्तूंची खरेदी करून राहत्या घराचे वस्तू संग्रहालय बनविण्यापेक्षा व त्यासाठी पैसा उधळण्यापेक्षा विविध अनुभवासाठी पैसा खर्च केल्यास माणूस जास्त समाधानी राहतो, असे संशोधकांचे मत आहे.

परंतु आपण अशा प्रकारच्या सांस्कृतिक/सामाजिक दबावाला बळी पडता कामा नये.

मुळात आपली अनुभव घेण्याची क्षमता आपले व्यक्तिमत्व, आपण जोपासत असलेली जीवनमूल्ये व त्यासाठी मोजावी लागणारी किंमत यावर निर्भर असते. एकच गोष्ट जास्तीत जास्त वेळा केल्यास वेळेचा सदुपयोग होतो, हे मात्र खरे नाही. याचप्रमाणे प्रत्येक वेळी अत्यंत नवीन चित्तथरारक अनुभवाच्या शोधात असल्यास त्याचाही कंटाळा येणे स्वाभाविक आहे. म्हणूनच रोजच्या कामातच थोडा फार वेगळेपणा आणण्याचा प्रयत्न केल्यास आपल्या अनुभवात नक्कीच भर पडू शकेल. नाविन्यपूर्ण अनुभवात मन रमत असले तरी अशा अनुभवाव्यतिरिक्त करण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत व त्यातूनही थोडे फार समाधान मिळू शकते, याचेही भान हवे. समृद्ध आयुष्य म्हणजे असल्या छोट्यामोठ्या अनुभवात आणि असले अनुभव मनापासून enjoy करण्यातच आहे हेही लक्षात ठेवणे गरजेचे आहे.

त्यामुळे शीर्षकातील प्रश्नाचे उत्तर *यासाठी मुद्दामहून काहीही करायची गरज नाही* असे असू शकेल. अनुभवातील विविधता ही एक अट ठरल्यास आपण कुठे थांबावे याची कल्पना येणार नाही. आपण अनेक गोष्टी करू शकतो हे कितीही खरे असले तरीही आपण या सर्व गोष्टी करायलाच हव्यात असे काही नाही. त्यामुळे अगदी छोट्या छोट्या गोष्टी करण्यातसुद्धा आपण आनंद मिळवू शकतो, समाधानी राहू शकतो.

आपली 'मुदत' संपायच्या आतच जास्तीत जास्त गोष्टी करण्याच्या हव्यासापोटी आपण जेव्हा rat raceमध्ये सहभागी झालो हेच कळत नाही. प्रत्येक सेकंदाचा हिशोब करत थराराच्या मागे लागल्यामुळे आपल्या हाती काहीच लागत नाही. मोठमोठे छिद्र असलेल्या भांड्यातून पेय पिल्यासारखी ती अवस्था असते. वर्तमान काळ आपल्या हातातून निसटून केव्हा भूतकाळ होतो याची कल्पनाच येत नाही.

प्रत्येक संवेदनशील व्यक्तीला समृद्ध जीवन जगण्याची (सुप्त) इच्छा असते. परंतु जगत असलेले आयुष्य ही एक वर्तमानातील घटना असते. आपण भूतकाळ आठवू शकतो; भविष्याचा विचार करू शकतो. परंतु आपल्याला वर्तमानकाळातच पाय रोवून जगायचे आहे. कदाचित काहीना हे अर्धसत्य वाटेल. कारण वर्तमानकाळात जगत असतानासुद्धा आपण भूतकाळ विसरू शकत नाही. त्या उत्कट कडू/गोड आठवणी, आपल्या इच्छा - आकांक्षा, आपल्या अपेक्षा, आपण हाती घेतलेले प्रकल्प आपल्याला कायम सतावत असतात. काही क्षण रोमांचकारी अनुभवाचे असले तरी आयुष्याच्या रहाटगाडग्यातून कुणालाही सुटका नाही. त्याचबरोबर फक्त आजचाच विचार करत जिवंत राहत असल्यास तीच उद्याची डोकेदुखी ठरू शकते.

जगत असलेला प्रत्येक क्षण महत्वाचा असला तरी त्या क्षणाचे नेमके मूल्य किती याचा आपल्याला अंदाज येत नाही. आनंदाच्या परमोच्च बिंदूचे मूल्य वेगवेगळया क्षणी वेगवेगळे असू शकेल. किंवा व्यक्तिसापेक्ष असू शकेल. चांगले जेवण म्हणजे अन्न घटकांचे तुमच्या taste bud शी होत असलेली रासायनिक प्रक्रिया एवढ्यापुरते ती मर्यादित नसते. तुमचे हे जेवण कुठे, कधी, कुणाबरोबर यावरही अवलंबून असते.

आपण आपल्या आयुष्यातील प्रत्येक क्षण अनुभवायला हवे याबद्दल दुमत नसले तरी जिवंत अनुभवासाठी जीवनमार्गातील प्रत्येक टप्प्यावर थांबतच जावे याची गरज नाही!.



# मुहूर्त, कुंडली, शुभराशी वगैरे, वगैरे...

*( प्रो. हरीमोहन झा (1908 – 1984) यांच्या 'खट्टर काका' पुस्तकातील 'फलित ज्योतीष' या मूळ हिंदी लेखाचे स्वैर रूपांतर ऐसी अक्षरेच्या वाचकांसाठी देत आहे. हा लेख 1948 साली लिहिलेला असला तरी आजही त्यातील विनोद व आशय आपल्याला अंतर्मुख करणारा आहे.*

*खट्टर काका हे त्यांचे विनोदी अंगाने लिहिलेले हिंदी भाषेतील पुस्तक भरपूर गाजले. परंतु हरीमोहन झा यांना केवळ विनोदी लेखक म्हणून ओळखणे त्यांच्यावर अन्याय केल्यासारखे होईल. ते मुळात तत्वज्ञानाचे अभ्यासक होते व संस्कृत, इंग्रजी भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. पाटणा विद्यापीठाचे हे मैथिली भाषेचे तज्ञ होते. मैथिली भाषेतील सौंदर्य फुलवून सांगणाऱ्या त्यांच्या पुस्तकांना भरपूर प्रसिद्धी मिळाली. )*

त्या दिवशी आमच्या घराच्या कट्ट्यावर भटजीबुवा बसले होते. गावातील देव देवस्कीबरोबरच भटजीबुवांचा कदाचित थोडाफार ज्योतिषाचा अभ्यास असावा. त्यामुळे गावकरी घरातल्या छोट्या मोठ्या कार्यासाठी त्यांना मुहुर्ताची वेळ विचारत असत. जन्म वेळेच्या आधारे प्राथमिक स्वरूपात कुंडलीची मांडणीही ते करत असत. गावात त्यांचा चागलाच जम बसला होता. फक्त खट्टर काकांची त्यांना अडचण वाटत होती. ते दिसले की भटजीबुवा आहे तेथून निसटत असत. आज मात्र त्यांचा अंदाज चुकला. काकानी आज त्याना बरोबर गाठले. बुवा निसटण्या आधीच काकानी बुवांना उद्देशून, "बुवा काय चाललय?" हा प्रश्न केलाच.

"काही नाही, नवी नवरी सासरी जाणार आहे. तर प्रवासासाठी चांगला दिवस कुठला हे शोधत होतो."

"तिला जेव्हा पाहिजे तेव्हा जाऊ दे. तुम्हाला त्याची का एवढी चिंता?"

"तसे नव्हे, प्रवासाचा मुहूर्त चांगला असला की वाटेत अडचणी येत नाहीत.

म्हणून मी...”
“अगदी बरोबर, पावसात, वादळ बिदळ असल्यास शक्यतो प्रवास करू नये हे मान्य.”
“परंतु या महिन्यात एकही दिवस चांगला नाही.” इती भटजीबुवा.
“अहो बुवा, महिन्यात 30 दिवस असतात हे तुमच्या लक्षात असू दे.”
“परंतु या महिन्यात कालपुरुषाचे तोंड पूर्वेला आहे.”
“बुवा, मला फसवू नका. कालपुरुष म्हणजे सांड-बिंड आहे का काय ज्याचे सोंड पूर्वेला चरायला गेला जायला. हा तुमचा कालपुरुष सगळ्या ठिकाणी सदासर्वकाळ असतोच. त्याची भीती कशाला?”
“तुम्ही शास्त्र मानत नाही म्हणून असे बोलता. आता सूर्य दक्षिणायनात आहे.”
“असू दे की. या नवरीचा त्यात काय दोष? तिला का सासरी जाण्यापासून थांबवता?”
“मी तरी काय करू, या पंचागाप्रमाणे पुढील तीन महिने आपण तिला सासरी पाठवू शकत नाही.”
“का नाही पाठवू शकत?”
“पुष्यमासात पाठवू शकत नाही.”
“पुष्य महिन्याने एवढे काय पाप केले आहेत की त्यामुळे मुलगी सासरी जाऊ शकत नाही?”
“आता तुमच्याशी वाद घालण्यात काही अर्थ नाही. माघ – फाल्गुण महिन्यातसुद्धा कालपुरुष आडवा येतो आणि चैत्रात चंद्र.”
“कुठल्याही दिवशी बाहेर पडला तरी यांचा देवच सगळीकडे आडवा येतो. भटजीबुवा जरा नीट बघा. नाही तर आजच तिला पाठवून द्यायचे का?”
“अहो आज तर सोमवार आहे पूर्वेकडे गेल्यास दिशाशूल होईल.”
“असले कसले शूल होईल? वाटेत कोणी काही खिळे टाकतील की काय?”

"तुम्ही तर नास्तिक आहात. तुम्ही असेच बोलणार."
"अहो, सोमवारचा दिवस प्रवासाला वर्ज्य असल्यास मुंबईहून कलकत्त्याला जाणारी आजची गाडी कशी काय तेथे पोचते? ही पृथ्वीच पश्चिमेकडून पूर्वेकडे भ्रमण करते. त्याचे काय?"
"जो शहाणा असतो तोच दिशेचे बळाबळ जाणतो."
"भटजीबुवा, आपण सोळा आणे खरे बोलत आहात. दिशेचे बळ बघून चालणाऱ्यांना सोनं सापडत की काय? मी रोज हजारो ठिकाणी चहू बाजूला फिरत असतो. मला कधी शूल बील झाले नाहीत की एखादं गाठोड सापडल नाही."
"म्हणजे... तुम्हाला कधीच दिक्शूल जाणवले नाही?"
"बुवा, ज्याला तुम्ही दिक्शूल म्हणता ते एक दृष्टीशूल आहे. तो तुमचा भ्रम आहे. व ते मानणाऱ्यावर असते."
"तर आपल्याला वारदोष माहित नाही की काय?"
"अगदी रोममात्रही दोष नाही हे मात्र मला माहित आहे. हा वारदोष आपला देश वगळता इतर देशात का जाणवत नाही? सर्वात भाबडे, बावळट आपणच आहोत की काय?"
"जर शास्त्रावर विश्वास नसल्यास बोलणेच खुंटले. परंतु मुहूर्तचिंतामणी बघा...."
काका त्यांना मध्येच आडवत, "मुहूर्तचिंतामणी नव्हे, धूर्तचिंतामणी म्हणा! स्वतःचे पोट भरण्यासाठी व दुसऱ्यांना मूर्ख बनविण्यासाठी मुहूर्ताच्या फेऱ्यात लोकांना अडकवता! राजासाठी अभिषेक मुहूर्त! सैन्यासाठी अश्वगज संचालन मुहूर्त! शिपायांच्यासाठी शस्त्रधारण मुहुर्त! व्यापाऱ्यांसाठी क्रय-विक्रय मुहूर्त! नर्तकीसाठी नृत्यारंभ मुहूर्त! अभिजनांसाठी ऋणदान मुहूर्त! सोनारांसाठी भूषणघटन मुहूर्त! धोब्यांच्यासाठी वस्त्रप्रक्षालन मुहूर्त!.... हे चाललय तरी

काय? बिचाऱ्या शेतकऱ्यांना तर यानी मुहुर्ताचे निमित्त करून वेठीस धरून ठेवलेले आहे. नांगरण्यासाठी हलप्रवण मुहूर्त! बिया पेरण्यासाठी बीजोप्तीमुहुर्त! रोपटे रोवण्यासाठी सस्यरोपणमुहुर्त! धान्य काटण्यासाठी धान्यच्छेदन मुहूर्त! सामान्यांना लुबाडण्यासाठी कसल्या कसल्या युक्त्या-प्रयुक्त्या लढवल्या आहोत! स्त्रियांना तर मुहूर्ताच्या जंजाळात घट्टपणे पकडून ठेवत आहात. वेणी घालण्यासाठी केशबंधन मुहूर्त! चूल बेटवण्यासाठी चुल्हीकास्थापन मुहूर्त! आंघोळीसाठी स्नान मुहूर्त! बाळाला दूध पाजायचे असले तरी त्यासाठीसुद्धा स्तनपान मुहूर्त!" असे सांगू लागले.

माझ्या आश्चर्यचकित चेहऱ्याकडे बघतच काका पुढे सांगू लागले. "मी काही चेष्टा करत नाही. स्तनावरही या ज्योतिषांची मालकी आहे की काय? दुधपित्या लहान बाळाला सुध्दा यांच्या मुहुर्तापासून सुटका नाही. विश्वास वाटत नसेल तर देवज्ञवल्लभ, बृहज्योतिषसार हे ग्रंथ वाच. ही कसली चेष्टा? एखादी बाळतींण आपल्या बाळाला मंगळवारी दूध पाजणार असेल तर मंगळ ग्रह आडवा येणार? त्याला काय स्तनपानाशी वैर आहे की काय?"

"कदाचित असेलही." मी मध्येच बोललो, "ग्रह-नक्षत्रांचा सूक्ष्म प्रभाव पडू शकतो म्हणून तरच काळ-वेळ यांचा विचार केला जात असावा."

"अरे कसलं काळ आणि कसली वेळ? हा काळच आपल्यासाठी महाकाळ झाला आहे. प्रत्येक गोष्टीसाठी काळ आणि वेळ बाहेर जाण्यासाठी मुहूर्त, आत येण्यासाठी मुहूर्त, लग्न करता, मुहूर्त बघा, घर बांधता मुहूर्त बघा, गृहप्रवेश करता मुहूर्त बघा, एवढेच नव्हे तर मधुचंद्रासाठीसुध्दा मुहूर्त, हा कसला मूर्खपणा!"

"काका, मला नाही वाटत मधुचंद्रासाठीसुध्दा मुहूर्त बघत असतील."

"अरे, आता तुम्ही मधुचंद्र म्हणता. परंतु पूर्वीच्या काळी याला गर्भदान म्हणत. ज्योतिषाच्या मते षष्टी, अष्टमी, पूर्णिमा, अमावस्या, चतुर्दशीच्या दिवशी

अनुमती नाही! आठवड्यातील सोमवार, बुधवार व शुक्रवारी फक्त लायसेन्स! पौर्णिमेच्या पिठुर चांदण्यात वर-कन्या मिथुन लग्न करत असतील तर च्रंदाला ग्रहण लागेल का? का आकाश कोसळून पडेल? रविवारी दांपत्य संयोग झाल्यास सूर्याचा रथ मोडून जाईल का? की रथाच्या घोड्याचे पाय मोडून जातील? तरीसुध्दा हे ज्योतिषी गप्प बसत नाहीत? या राशी भविष्याचे थोतांड का म्हणून सहन केले जाते?"

"काका, तुमचा राशीफलावर विश्वास नाही का?"

"राशीफल खरोखरच फल सांगत असेल तर आतापर्यंत मी दोन-अडीच हजार वेळा मरून जायला हवे होते."

"ते कसे काय?"

"माझ्या राशीच्याबद्दल हे लोक काय लिहितात ते बघ. रविवारी तेल लावून आंघोळ करू नये म्हणून लिहितात. सोमवारी, अमुक रंगाचे कपडे वापरू नये, मंगळवारी मृत्युयोग, बुधवारी, लक्ष्मी पळून जाईल, गुरुवारी, दारिद्र्य, शुक्रवारी, कामात अडचणी, शनिवार सुखाचा.. असे काहीबाही लिहिलेले सापडेल. यांच्यात एकमेकाशी कुठला कार्य-कारण संबंध असेल हे त्यांच्या देवालाच माहित असेल. गेली पन्नास वर्षे मी तेल लावून आंघोळ करतो. मला काहीही झाले नाही. या पन्नास वर्षात सुमारे अडीच हजार मंगळवार आले असतील, तरीसुद्धा मी अजून जिवंत आहे. आणि तू म्हणतोस की राशीभविष्यावर विश्वास ठेवा!"

"काका, याचे उत्तर ज्योतिषीच देवू शकतील."

"ज्योतिषी कसले उत्तर देणार? ते स्वतःच या जंजाळात पूर्णपणे फसलेले आहेत. या मुहूर्तवाल्यांचे एकेक कारनामे ऐकल्यास भोवळ येईल. स्त्रियांच्या पहिल्या मासिक पाळी संबंधात तर यांनी कहर केला आहे. एखादी स्त्री रविवारी ऋतुमती झाल्यास विधवा होईल असे लिहिले आहे. आणि अजून

एके ठिकाणी पंचमीला ऋतुमती झाल्यास सौभाग्यवती होईल असे नमूद केले आहे. मला या ज्योतिष महाराजाला विचारायचे आहे की जर पंचमी तिथी रविवारी आल्यास व एखादी स्त्री ऋतुमती झाल्यास तिचे काय होईल? एवढेच नव्हे, अजून एके ठिकाणी माघ महिन्यात रजोदर्शन झाल्यास स्त्री पुत्रवती होईल आणि कृतिका नक्षत्रच्या दिवशी झाल्यास वांझ राहील असे लिहिले आहे. आता तूच सांग, माघ महिन्यातील कृतिका नक्षत्राच्या दिवशी एखादी स्त्री ऋतुमती झाल्यामुळे तिला जे मूल होईल त्याला वांझपुत्र म्हणणार की काय?"
भटजीबुवा गप्प बसून ऐकत होते.
"तर मी काय सांगत होतो? हाँ, आणखी एके ठिकाणी धनुराशीची बाई शनिवारी रजस्वला झाल्यास ती व्यभिचारी होईल असे लिहिले आहे. समज, एखादी बाई त्या दिवशी रजस्वला झाल्यास तिने जीव द्यायचा की काय? असले चित्र विचित्र वर्णन अगदी महापुराणातसुद्धा सापडतील. तरीसुद्धा आपण प्रत्येक गोष्टीसाठी या लोकांचे पाय धरतो."
इतक्यात आमच्याच नात्यातला एक जण पळत पळत भटजीबुवाकडे आला व धापा टाकतच म्हणाला, "भटजीबुवा, आताच माझ्या घरी एक बाळ जन्माला आलाय. मुलगा आहे. त्या बाळाची जन्मकुंडली मांडून काय गुणदोष आहेत ते सांगाल का?"
"किती वाजता बाळ जन्मला आला?"
"अहो, आताच. 10-15 मिनिटंसुद्धा झाले नसतील."
भटजीबुवा पंचांगातील काही पाने उलटत कागदावर आकडेमोड करत काही तरी हिशोब करू लागले. व गप्प बसले. हा आमचा नातेवाईक ओरडलाच, "काय झालं? आपण गप्प का?"
"काय झालं? विंचू बिंचू चावला की काय?" काका विचारले.
"मी काय बोलणार? मूळा नक्षत्राच्या प्रथम चरणी मुलाचा जन्म झाला आहे.

मृत्युयोग आहे. स्वतःही जाईल व बापालाही गिळंकृत करेल.”
हा नातेवाईक अगदीच रडकुंडीला आला. भटजीबुवा पुढे बोलू लागले. “हे मूल तुमच्या जिवावर उठणार. पंचागच सांगत आहे. परंतु यावर एक उपाय आहे. या बाळाला दुर कुठेतरी पाठवून द्या. आठ वर्षे त्याचे तोंडसुद्धा पाहू नका. आणि आतापासून गोदान, स्वर्णदान, नवग्रहपूजा हे सर्व करण्याच्या तयारीला लागा. कदाचित मृत्युयोग टळून जाईल.”
काकांना राहवले नाही. “अरे, हे मुहूर्त व कुंडलीच्या नावे जे काही लिहिले असेल ते सपशेल खोटे आहे. लिहिणारा तुम्हाला लुटत आहे. तुम्हीच मुळा नक्षत्राचा उगीचच बाऊ करत आहात. लोकांना भीती घालत आहात. नक्षत्राच्या नावाचा गैरवापर करून आपला फायदा करून घेत आहात. का म्हणून या बिचाऱ्याला घाबरवता व तुमच्या जंजाळात अडकवत आहात?”
तो बिचारा निघून गेला.
“तुमचा जन्मकुंडलीवर विश्वास नाही का?”, भटजीबुवा
“मला कुंडली-बिंडली काही माहित नाही. कुंडलीच्या नावे जे काही लिहिले जात आहे वा सांगितले जात आहे ते तद्दन खोटे आहे. या क्षणी जगभर लाखो मुलं जन्माला आले असतील. ती मुलं आणि त्यांचे बाप, सगळे मरतील की काय? त्या सर्वांचे भाग्य-कर्म एकच असू शकेल का? अहो एकाच पोटातून जन्माला आलेल्या जुळयापैकी एक मरतो व दुसरा जिवंत राहतो. एकच जन्मवेळ, एकच ठिकाण, एकच जन्मकुंडली असूनसुद्धा परस्पर विरोधातील फळ कसे काय असू शकेल?”
भटजीबुवांना राहवले नाही, “भृगू - पराशर या ऋषीमुनींनी विचार करून मांडलेले जातक विचार खोटे आहेत की काय?”
“याच ऋषी-मुनींच्या नावांचा वापर करून गेली हजार वर्षे आपण दुकान मांडून बसलेले आहात. राजरोसपणे लोकांना फसवत आहात. मनाला येईल

तो श्लोक म्हणायचे व पाराशर यांच्या नावाने खपवायचे. मीसुद्धा ज्योतिषावरील अनेक ग्रंथ चाळलेले आहेत व ते सर्व लबाडांनी लिहिलेले आहेत असे माझे स्वच्छ मत आहे. घरातल्या एकूण एक लोकांना फसवण्याचा हा धंदा आहे.''

भटजीबुवांना राग आवरेना. ''फसवणुकीच एखादं तरी उदाहरणं सांगा''

''एक दोन नव्हे तर भरपूर उदाहरण यांच्या पुस्तकातच सापडतील. कुंडलीच्या पायी खून पडलेले आहेत. नरबळी दिल्या जातात. पत्नीचा खून, बहिण-भावंडांचे खून झालेले आहेत. हे सर्व यांच्या ग्रंथातील श्लोकापायी!''

''खरोखरच असे काही पुस्तकात लिहिले आहे का?'' माझा प्रश्न.

''मी काय माझ्या पदरचे सांगत आहे की काय? त्यांनाच विचार, अशा अर्थाची पदं पाराशर होरासार या ग्रंथात आहेत की नाही?''

''अशा प्रकारचे श्लोक आहेत हे मात्र खरे. खरे पाहता पाराशर होरासार हे एक अभ्यासपूर्वक ग्रंथ आहे. त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल शंका घेणे योग्य वाटत नाही. परंतु तुम्ही त्याला खोटे पाडता.''

''केवळ खोटेच नव्हे तर हा ग्रंथ अश्लीलसुद्धा आहे. इतकी घाण - घाण वर्णनं आहेत की पुन्हा कधी वाचावेसे वाटणार नाही. आई – बहिणींना शिव्या शाप दिलेल्या आहेत. स्त्रियांचा अपमान केला आहे. महिलांबद्दल अनादरयुक्त भाषा हे विद्वानांना शोभत नाही.''

''शास्त्रात अशा गोष्टी असू शकतात यावर माझा विश्वास नाही,'' मी मध्येच म्हणालो.

''तू कधी ज्योतिषाचा अभ्यास केला आहेस का? बृहज्जातक पाराशर वाचल्यास तुला कळेल.''

''हे सर्व खोटे आहे याला पुरावा काय?'' भटजीबुवांचा प्रश्न

''मी स्वतःच एक पुरावा आहे. माझ्या कुंडलीनुसार मला राजयोग आहे. राजा

जाऊ दे, एक चपराशी म्हणूनसुद्धा कुणी मला ठेवून घेत नाहीत. राजयोगाऐवजी मला प्रत्येक गोष्टीसाठी हठयोग करावा लागतो. सगळ्या गोष्टीसाठी हट्ट. पूर्वीच्या काळी ज्योतिष वर्तविणाऱ्यांना गणक म्हणजे मोजणारे या अर्थाने म्हणत होते. व वेश्यांना गणिका म्हणत होते. आणि हे गणक व गणिका लोकांना मोहित करून खिसे रिकामे करत होते. गणक कुंडली उघडून दाखवतो व गणिका छाती!"

"तुम्ही काहीही म्हणा, ज्योतिष हे एक खरेखुरे शास्त्र आहे व ते लिहिणारे भृगुमुनी त्रिकालज्ञानी होते." भटजीबुवांची निर्वाणीची भाषा.

"बुवा, तुमचा तरी तुमच्या कुंडलीवर विश्वास आहे का?"

"पूर्णपणे!"

"मांडा बघू तुमची कुंडली."

थोडेसे घाबरतच बुवा कुंडली मांडतात.

कुंडलीकडे बघत "भटजीबुवा, मी या कुंडलीप्रमाणे फळ सांगू का? पळून तर जाणार नाही ना?"

"मी कशाला पळून जाईन?"

खट्टर काका तोंडातच काही तरी पुटपुटत होते व ते फक्त भटजीबुवाना ऐकू जात होते. बघता बघता बुवा उठले आणि आपले सामान घेऊन पसार झाले. काका त्यांच्या मागे "बुवा सुपारी तरी खाऊन जा..." असे म्हणत म्हणत गेले.



# आयुर्वेदः एक सुंदर कवी कल्पना

*(* प्रो. हरी मोहन झा *(1908 – 1984) यांच्या 'खट्टर काका' पुस्तकातील आयुर्वेद या मूळ हिंदी लेखाचे स्वैर रूपांतर ऐसी अक्षरेच्या वाचकांसाठी देत आहे. या पुस्तकातील लेख 1950च्या दशकात लिहिलेले असले तरी आजही त्यातील विनोद व आशय आपल्याला अंतर्मुख करणारे आहेत.*
*'खट्टर काका' हे त्यांचे विनोदी अंगाने लिहिलेले हिंदी भाषेतील पुस्तक भरपूर गाजले. परंतु प्रो. हरीमोहन झा यांना केवळ विनोदी लेखक म्हणून ओळखणे त्यांच्यावर अन्याय केल्यासारखे होईल. ते मुळात तत्वज्ञानाचे अभ्यासक होते व संस्कृत, इंग्रजी भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. पाटणा विद्यापीठाचे हे मैथिली भाषेचे तज्ञ होते. मैथिली भाषेतील सौंदर्य फुलवून सांगणाऱ्या त्यांच्या पुस्तकांना भरपूर प्रसिद्धी मिळाली. )*

*डिस्क्लेमरः हा लेख कुणाच्याही भावना दुखवण्यासाठी लिहिलेला नसून आयुर्वेदाच्या संबंधातील एक (गंमतीशीर) विचार एवढाच त्यामागचा हेतू आहे याची कृपया नोंद घ्यावी.*

मी त्या दिवशी आमच्या शहरातील नामांकित वैद्यांच्या दवाखान्यात वैद्यासमोर बसलो होतो. तितक्यात खट्टर काका डोकावून पाहत आतच आले. वैद्यांच्या हातात आयुर्वेदाचा भावप्रकाश हा ग्रंथ होता. ते पुस्तक बघून
“आहा! काय सुंदर महाकाव्य आहे हा भावप्रकाश!”
वैद्यबुवा आश्चर्यचकित होत “भावप्रकाश हे एक आयुर्वेदाचा प्रमाणित ग्रंथ आहे. आणि तुम्ही त्याला चक्क महाकाव्य म्हणता?”
“मी तर पूर्ण आयुर्वेदालाच महाकाव्य म्हणतो. आयुर्वेदात ताप कशामुळे येतो याबद्दल काय लिहिले आहे ते सांगा बघू.” वैद्यांना आव्हान देत काका म्हणाले.
वैद्यानी भावप्रकाशमधील काही पानं उलटून त्यातील संस्कृत श्लोकाचा अर्थ

सांगू लागले-
“जेव्हा दक्षप्रजापतीच्या येथे भगवान शंकराचा अपमान झाला तेव्हा शंकर कृद्ध होत श्वास सोडू लागला. त्यातून जो दाह उत्पन्न झाला त्यालाच ताप म्हणतात.”
“वैद्य महाशय, तुम्हीच बघा! जगातील कुठल्याही डॉक्टराच्या डोक्यात अशी कल्पना येऊ शकेल का?”
“परंतु आयुर्वेदामध्ये मोठ्या प्रमाणात इतर अनेक पदार्थाबद्दल चर्चा केलेली आहे.” – वैद्य
“त्यातही अलंकारिक भाषाच आहे. पारा काय असतो हे सांगा बघू जरा.”
वैद्य पुन्हा एकदा पुस्तकात डोकावून “शंकराच्या जननेंद्रियातून पडलेल्या वीर्याचा पारा झाला.”
“म्हणूनच तो इतका पांढरा शुभ्र! इतका चिवट! व रसराज! मग गंधकाबद्दल काय आहे?”
पुन्हा श्लोकाचा आधार घेत वैद्य सांगू लागले- “एकदा श्वेतद्वीपाच्या येथे खेळत असताना देवीचे स्खलन झाले. तेव्हा तिने दुग्धसागरात स्नान केले. आणि त्या कपड्यातून मळ बाहेर पडला. तोच गंधक आहे.”
“वा! क्या बात है! अगाध बुद्धीशक्ती! यालाच गंधयुक्त! यातूनच पारा शोधण्याची शक्ती! वैद्य महाशय, याप्रकारच्या कल्पना कधीतरी विज्ञानात सापडतील का?”
मी मध्येच म्हणालो- “खट्टर काका, अशा गोष्टी आयुर्वेदामध्ये कसे काय आले?”
“अरे, या देशाच्या जलवायूंच्या कणाकणात रसिकता तुडुंब भरलेली आहे. जेव्हा थोडे तरी विज्ञानाने डोके वर करण्याचा प्रयत्न केला की हे काव्य त्याच्या छातीवर ठाण मांडून बसते. आपल्या देशातील विज्ञानाला कवी कल्पनेने

गिळून टाकले आहे. काव्येन गिलितम् शास्त्रम्!
म्हणूनच आयुर्वेदाला काव्याच्या स्वरूपात सादर केलेल्या भावप्रकाश ग्रंथात आणि कवी कल्पनेतील भामिनीविलास यात विशेष फरक मला तरी जाणवत नाही. त्यामुळेच वैद्य मंडळीना कविराज म्हणून संबोधले जात असावे. हा काही साधासुधा कवी नाही, प्रत्यक्ष कविराज"
"वा फारच गंमतीदार किस्सा आहे."
"तुला माझ्याकडून अशाच गमती-जमतीच्या गोष्टी ऐकायला मिळतील. शंकराला वैद्यनाथ का म्हणतात हे माहित आहे का?"
"नाही, खट्टर काका." माझे उत्तर.
"शंकराच्या श्वासातून उत्पन्न झालेल्या दाहातून माणसांना ताप येतो व त्यातूनच वैद्य लोकांचे पोट भरते. शंकराच्या वीर्यातून पारा निघाला व त्यापासून वैद्य मकरध्वज बनवतात. शंकराच्या आवडत्या भांगेचे मोदक विकून दाम दुप्पट कमावतात. त्यामुळेच शंकराला वैद्यनाथ न म्हणतील तर आणखी काय म्हणतील?"
"धन्य आहात काका, तुम्ही काय सिद्ध करू शकत नाही?"
"एवढेच नाही तर वैद्य प्रत्यक्ष भगवान शंकरच असतात. शंकराप्रमाणे भस्मप्रेमी! भांग परमप्रिय वस्तू! शंकरचा जसा त्रिशूल तसाच यांचाही उदरशूल, हृदयशूल व मस्तकशूल! शंकरानी भस्मासुराचा संहार केला व हे भस्म्या रोगाचा संहार करतात. त्यानी त्रिपुराचा अंत केला व हे कित्येक 'पुरां'चे अंत करत आहेत."
"वैद्य जरा रागारागानेच "वैद्य रक्षणही करतात. आयुर्वेदात एकापेक्षा एक असे चमत्कार करणारी रसायनं आहेत, हे तुम्हाला कदाचित माहित नसावे."
त्यांच्याकडे दुर्लक्ष करत काका पुढे बोलू लागले. "यांच्या रसायनातील सर्वात श्रेष्ठ रस म्हणजे श्रृंगार रस...!"

मी आश्चर्यचकित झालो – “आयुर्वेदात श्रृंगार रस... ?”
“असच समज. आयुर्वेदाचार्य लोलिम्बराज अंगावरील कढत तापावर काय उपाय सांगतो हे जरा ऐक – सुगंधित फुलांचा हार व चंदन शीतल शरीराच्या पुष्टनितम्बिनीच्या आलिंगनातून ताप उतरतो. चंदन – कापूर यांचा लेप लावून नितम्ब हलवित जात असलेल्या मणिमेखलयुक्त रमणीला वनलतेप्रमाणे बिलगल्यास कुठलाही ताप असो, शांत होणारच. तूच सांग, हे रोगशास्त्र आहे की भोगशास्त्र?”
“वैद्यराज, तुमचे यावर काय म्हणणे आहे?” मी अडखळत विचारलो.
वैद्य थोडेसे घाबरतच “होय हा श्लोक आहे खरे. परंतु केवळ तापावरील उपचारासाठी याचा वापर केला जातो.”
“केवळ तापावरच नव्हे तर सर्दीसाठीचे औषधही तितकेच रसभरित आहे. हे बघ, मांसल मांड्या व स्थूल नितम्ब असलेल्या पूर्ण आकारयुक्त स्तनांचे आलिंगन केल्यास सर्दी पळून जाते! अशा अर्थाचाही श्लोक आहे. अशा प्रकारचा फॉर्म्युला कुठल्या डॉक्टराच्या पुस्तकात मिळू शकेल का? थंडी असली तरी युवती आणि उष्णतेमुळे ताप असला तरी युवतीच! युवती कसली, चहाचा कपच! महाशय, युवती जर औषधीवर्गात मोडत असल्यास इतर औषधाप्रमाणे तिला कपाटात बंद करून का ठेवत नाही?”
वैद्य ततपप करू लागले.
मी काकाना म्हणालो – “काका, ही रसिकता आयुर्वेदात कशी काय आली?”
“मुळात आयुर्वेद हा विलासी राजा-महाराजांसाठीच होता. आणि या राजा-महाराजांचा एकमेव व्यायाम म्हणजे तोंडात बोट घालून नख कुरतडणे! मनाला उत्तेजन देण्यासाठी दरबारात कवीराज व शरीरासाठी वैद्यराज! एक रसाद्वारे व दुसरे रसायनाद्वारे! काव्य आणि आयुर्वेद हे जुळे भाऊ आहेत. एकाच दरबारात वाढलेले! कवी जगन्नाथाचा जो रंग आहे तोच लोलिम्बराजाचा!

कालिदासाचा ऋतुसंहार असो की सुश्रुताचा ऋतुचर्या, दोन्ही सारखेच!"
"तुम्ही असे कसे काय म्हणू शकता?" वैद्यांचा प्रश्न.
खट्टर काका भावप्रकाशातील पान उलटून "हे बघा... ही हेमंतचर्या कुणासाठी आहे? ज्याच्या अंतःपुरात केसर – कस्तूरी – कदम्ब – कलित कामिनी गंमती – जंमती करत असतात त्यांच्यासाठी! इतरांसाठी अग्रहण शब्दच सार्थकी लागतो. आयुर्वेद ही राजा-महाराजांची मालमत्ता. म्हणूनच ऋतुचर्याचा अर्थच कुठल्या वेळी संभोग करावा असा होऊ शकतो."
"कदाचित याचा अर्थ संभोगासाठीचे नियमन व मर्यादा असाव्यात असे होत नाही का?" – वैद्य
"कसल्या मर्यादा आणि कसले नियमन?" काका अजून काही पानं उलटवीत "या मर्यादेबद्दलच आयुर्वेदाचार्यामध्ये भांडण आहे. एक आचार्य म्हणतो की दर तीन दिवसांनी संभोग करावे. दुसऱ्याला हे पटत नाही. तो म्हणतो की थंडीच्या दिवसात कसला हिशोब? जितक्या वेळा मनात येईल तितक्या वेळा गमन करायला हरकत नाही. तिसरा आचार्य याच्याही पुढे जातो – थंडी असो की गरमी, रोज बालिकेशी गमन करावे. चौथा आचार्य तर वेळापत्रकच घालून देतो. थंडीच्या दिवसात रात्री, उन्हाळयात दिवसा, वसंतऋतूत रात्री किंवा दिवसा कुठल्याही वेळी, वर्षाऋतूत ढगांच्या गडगडाटाच्या वेळी, शरदऋतूत जेव्हा तीव्रतेने जाणवते तेव्हा! पाचवा आचार्य तर यावर कढी करतो. उन्हाळयात व शरदऋतूत बालिकेशी, थंडीत तरुणीशी, वर्षा व वसंतऋतूत प्रौढ असे पथ्या पाळावे. हे म्हणजे पपई केव्हा खावे, सफरचंद केव्हा खावे असे म्हटल्यासारखे वाटते. आता या तिन्ही प्रकारच्या महिलांचा 'सेट' दर वर्षी तयार करून ठेवल्यास ऋतुचर्याचे योग्य प्रकारे पालन करता येईल. असे फक्त ज्यांच्या बागेत बदरीफळापासून श्रीफळापर्यंतचा फळ उपलब्ध असतील त्यानाच हे शक्य होईल."

“काका, मला बालिका, तरूणी व प्रौढा यांच्यात नेमका काय फरक असतो हे समजले नाही.”

“हेसुद्धा याच ग्रंथात लिहिले आहे. सोळा वर्षाची बालिका, बत्तीस वर्षापर्यंत तरुणी आणि पन्नास वर्षापर्यंत प्रौढा असे यांचे म्हणणे आहे. आता तूच मला सांग, ही ऋतुचर्या कुणासाठी आहे? ज्यांच्या रंगभवनात मुग्ध बालिकेपासून प्रौढ स्त्रीपर्यंत अनेक पर्याय उपलब्ध असतील त्यांनाच ऋतुबदलानुसार कामज्वराला शांत करता येईल. हे काय चिकित्सा शास्त्र आहे की कामशास्त्र?”

“आयुर्वेदात कामशास्त्रातल्या या गोष्टी कशा काय आल्या?” माझा प्रश्न.

“जेव्हा वृद्ध च्यवनऋषी संभोग करण्यास असमर्थ झाले तेव्हा आदिवैद्य अश्विनीने रसायनाच्या सहायाने त्यांना पुनः तारुण्य प्राप्त करून दिले. ज्या प्रकारे आदिकवी वाल्मिकीला क्रौंचपक्ष्यांची मैथुनेच्छा बघितल्यावर महाकाव्याची प्रेरणा मिळाली, त्याचप्रमाणे आदिवैद्याला वृद्ध मुनीच्या कामेच्छातून आयुर्वेदासाठी प्रेरणा मिळाली. एकाने अनुष्टुभ छंदात रचना केली व दुसऱ्याने च्यवनप्राशाची. त्या काळापासून आयुर्वेदाची वाटचाल याच दृष्टिकोनातून झाला व रतीक्रीडेतील विजयध्वज फडफडू लागला. राजाच्या राज्याचा ध्वजभंग होणार नाही यासाठी राजदरबारात मंत्री-सेनापती आणि राजाचा ‘ध्वज’भंग होऊ नये यासाठी राजवैद्य काळजी घेत होते!"

माझ्या आश्चर्यचकित चेहऱ्याकडे बघत काका सांगू लागले – “मी काही चेष्टा करत नाही. पूर्वीच्या काळच्या राजा-महाराजांच्या जीवनात फक्त दोन गोष्टींना महत्व – पाचक व मोदक!भोडन शक्तीला उद्युक्त करण्यासाठी क्षुधाग्नी संदीपन! आणि संभोगशक्तीला उद्युक्त करण्यासाठी कामाग्नी संदीपन! हे राजे रात्रंदिवस आडवे पडून या दोन्ही प्रकारचे कुमारिकासव पीत होते. त्यांचे फक्त हेच काम! हीच त्यांची दिनचर्या! कसे सहन करत असतील? बिचारे

वैद्यमंडळी रात्रंदिवस या कामोत्तेजक मोदकाच्या संशोधनात कार्यरत असत. एकापेक्षा एक स्तंभनवटी, वानरी गुटिका, कामिनी विद्रावण! यासाठीच सर्वबुद्धी खर्ची घातली जात होती. ”
“अहो वैद्य आपण काही बोलत नाही?” माझा प्रश्न.
काका – “ते काय बोलणार? यांनीसुद्धा तोच कित्ता गिरवला आहे. घोकंपट्टी केली आहे. आता येथे काय लिहिलेले आहे बघ. एका आयुर्वेदाचाऱ्याने अशी खीर बनवली की एखाद्या म्हाताऱ्याने तरी ती घेतली तरी दहा बायकांना लोळवण्याइतकी शक्ती त्याला प्राप्त होईल. दुसऱ्या आचाऱ्याच्या एका चूर्णामुळे नपुंसकालासुद्धा पौरुषत्व मिळाले. मधाबरोबर हे चूर्ण घेतल्यास कामिनीच्या गर्वाचा चूर्ण करून टाकेल. कामिनीच्या गर्वाचा चक्काचूर झाला की नाही हे फक्त कामिनीच सांगू शकेल. मात्र यातून वैद्यांचे भाग्य उजळून निघेल यात शंका नाही. सुंदरींच्या चिरंतन यौवनाची जबाबदारीसुद्धा यांच्याकडेच होती. एका आयुर्वेदाचाऱ्याने त्याची गॅरंटीसहित असा उपाय सुचवला आहे – पहिल्या कुसुम काळात नवयौवनेने तांदळाच्या स्टार्चचा नाकपुडीत नस्य केल्यास तिचे यौवन कधीच ढळणार नाही. दुसऱ्या आचाऱ्याने आणकी जबरदस्त दावा केला आहे – श्रीपर्णीच्या रसात तयार झालेल्या तिळाच्या तेलाने अंग चोळून घेतल्यास पुनः एकदा यौवन प्राप्त होऊ शकते.
या प्रकारे पुरुषांच्या बिंदूपातापासून राणींच्या कुचपातापर्यंत सर्व अधःपतनाना वैद्यराजानी ब्रेक लावला आहे. त्यांचा हा मुष्टियोग कितपत सफल होत होता हे माहित नाही. परंतु त्यांची मुष्टी मात्र (सोन्याच्या) नाण्याने गरम होत होती.”
“आमचे सर्व मुष्टियोग अनुभवातून सिद्ध झालेले आहेत” - इती वैद्य.
“जर तुमचे मुष्टियोग खरोखरच परिणामकारक असतील तर त्यातून तुम्ही करोडो डॉलर्सची विदेशी मुद्रा कमावली असती! परंतु यात ते अपयशी ठरले

तर यांचे तोंड कसे दिसले असते?"
वैद्यांना राहवेना. "तुम्ही या ग्रंथातील बारीक सारीक वर्णन वाचून पहा."
"या ग्रंथातसुद्धा अशाच गोष्टींचा भरणा आहे. अभ्रकाबद्दल येथे काय लिहिलेले आहे ते पहा. अभ्रकाच्या प्रभावामुळे रोज शंभर स्त्रियांशी समागम करता येईल! जणू काही जास्तीत जास्त स्त्रियांशी संभोग करणे हेच जीवनाचे ध्येय आहे की काय? जी व्यक्ती शंभर वेळा संभोग करत असल्यास त्या व्यक्तीला दुसऱ्या कुठल्या कामासाठी वेळ मिळेल? तो किती दिवस टिकेल? त्यामुळेच पूर्वीच्या काळच्या राजे-महाराजे क्षयरोगाचे बळी ठरत होते. आणि वैद्य मात्र त्या रोगाला राजयोग म्हणत होते. अशा शास्त्राला आयुर्वेद म्हणावे की आयुर्भेद म्हणावे हे तुम्हीच ठरवा."
"परंतु इतर कित्येक रोगांबद्दल आयुर्वेदात उपचार आहेतच की?" - वैद्य
"आहेत! परंतु त्यातही इतके विचित्र गोष्टी आहेत की उपचाराचा विचका होतो आणि आयुर्वेद निर्वेद होतो."
"एक उदाहरण द्या बघू" - वैद्य
काका पुस्तकातील पानं उलटत "येथे वंध्यत्वावर उपचार सांगितलेले आहेत. ऋतुस्नान केलेल्या स्त्रीने पुष्य नक्षत्राच्या काळात लक्ष्मणाची मुळ उपटून दुधात उगाळून लेप पिल्यास कुमारिका गर्भवती होईल यात संशय नाही! या आचार्याला संशय नसेल परंतु मला आहे. गर्भ धारणेची शक्ती कशात आहे हा माझा पहिला प्रश्न – लक्ष्मणाच्या झाडाच्या जडीबुटीत की पुष्य नक्षत्रात की कुमारिकेच्य हातात? की या तिन्ही गोष्टींच्या संयोगामुळे? याला वैद्यकी म्हणायचे की जोतिष्य म्हणायचे की मंत्र-तंत्र की या तिन्हीची खिचडी?"
"परंतु काही उपचार असेही आहेत की त्यात कुठल्याही नक्षत्रांचे बंधन नाही." – वैद्य.
"आहेत की! पळसाचे एक पान दुधातून उगाळून घेतल्यास गर्भिणीला नक्कीच

मुलगा होईल. साधारण मुलगा नव्हे, अत्यंत शूर - वीर! अहो महाशय, पुत्रप्राप्तीचा एवढा सोपा उपाय असल्यास गावभर गवंडी पिटवून भारतवर्षाची जगाला दिलेली अमूल्य देणगी म्हणून प्रचार का करत नाही? त्यामुळे जगभरात आपल्या भारतवर्षाचे नाव होईल! जर हे खोटे असल्यास आताच या ग्रंथामधून त्याची हकालपट्टी करा. अशा प्रकारे खोटे नाटे लिहिलेला आयुर्वेद असल्यास त्याला शास्त्र असे कसे म्हणता?" काकांचा सवाल.

वैद्य काही बोलत नव्हते.

काकाच पुढे बोलू लागले. "दुसऱ्या देशात रोगोपचाराची प्रगती वैज्ञानिकरित्या झाली आहे. परंतु या देशात बाबा वाक्यं प्रमाणम् याची चलती आहे. त्यामुळे आधुनिक वैद्यकशास्त्र ज्या उंचीला पोचली आहे तेथे आयुर्वेद अजूनही कुठल्यातरी रस – काढ्यात बुडवून घेत आहे. आधुनिक शल्य विशारद कृत्रिम अवयवारोपण करून रोग दूर करत आहेत तेथे वैद्य मंडळी धन्वंतरीची गर्जना करत आहेत. नाकाचा फाटलेला भाग जेथे जोडता येत नाही तिथे कुठला रोगोपचार मिळू शकेल? त्यामुळेच रजःपरिवर्तिनीपर्यंतच या आयुर्वेदाची उडी आहे. आणि तेथून ते पुढे सरकतच नाही."

"आयुर्वेदातील आचार्य नवीन संशोधन का करत नाहीत?" माझा प्रश्न.

काका हसत म्हणाले – "गधा नावाचा हा रोग आहे. त्यावर रोगोपचार करणारे या पदाला सार्थक करत आहेत. फक्त प्रखर स्वरूपात या शास्त्राचे ओझे वाहणे एवढेच त्यांना माहित आहे. उदरभरणासाठी काही खोटे नाटे कशाय, आसव, काढे इत्यंदींची नावं पुढे करतात. अरिष्ट या नावाने आपल्यावरील 'अरिष्टा'ला दूर करतात."

वैद्यांचा उतरलेला चेहरा पाहून काका म्हणाले – "वैद्यजी, मी आपल्याला दोष देत नाही. ज्या विहिरीत खारे पाणी आहे हे माहित असूनसुद्धा फक्त बापानी खोदलेली ती विहिर आहे म्हणत तेच पाणी पिणाऱ्यांसाठी मी हे सर्व सांगत

आहे.”
“काका, तुम्ही विनाकारण वैद्यांच्यावर तुटून पडत आहात. बिचाऱ्यांना राजाश्रय नसल्यामुळे त्यांची ही अवस्था झाली आहे. ते तरी काय करतील?”
काका हसतच म्हणाले – “एकदा राजाश्रय मिळाला होता. म्हणून हजार वर्षे मदनानमद मोदक करत बसले. आता पुन्हा एकदा राजाश्रय मिळाल्यास गर्भ-कुठार-रस कुटत बसतील!”
इतक्यात काकांचे लक्ष तेथील पाचकाच्या बाटलीवर गेले.
“काहीही असो, वैद्य लोक पाचक मात्र छानपैकी बनवू शकतात. लवणभास्कर! हिंगाष्टक! दाडिमाष्टक! एकापेक्षा एक रुचकर! असल्या स्वादिष्ट गोष्टी डाक्टरांच्याकडे कधी मिळतील का? खारट-गोड पाचक चूर्ण खाऊन पाणी पिल्यानंतर मजा येते. आणखी कुठल्याही औषधाची गरज भासत नाही. वैद्यराजाची ही जडीबूटी जवळ असल्यास वैद्यांच्या खुशामतीला तोटा नाही!”
काकानी शेवटी वैद्याला विनयपूर्वकपणे “वाईट वाटून घेऊ नका. मी माझ्या मनातला भावप्रकाश तुमच्यासमोर उघडण्याचा प्रयत्न केला. तुम्ही आता तुमचा भावप्रकाश उघडा करा. मी निघतो!”



# खट्टरकाकांची भगवद्गीता

माझ्या हातातील भगवद्गीतेचे पुस्तक बघून खट्टर काका अवाक झाले व घाबरतच म्हणाले,

“आजकाल तू गीतापाठ करत आहेस की काय? तुझ्यापासून आता चार हात दूर असलेले बरे.”

“काहो काका, असे का म्हणता?” मी आश्चर्यचकित होत म्हणालो.

काका सांगू लागले, “पहिल्या पहिल्यांदा अर्जुनाजवळ थोडी फार तरी माणुसकी शिल्लक होती. हा भाऊ आहे, हा काका आहे, हा माझा पुतण्या आहे, हे आजोबा आहेत.... या रक्ताच्या नात्यांवर बाण कसे चालवायचे? असे त्याला मनोमन वाटायचे. परंतु गीतेचे सार पिऊन झाल्यावर असे काही बाणांचा वर्षाव त्यानी सुरु केला की सर्वांच्या छातीची चाळणी झाली. म्हणून मी गीता हातात असणाऱ्यांना घाबरतो. कुठल्या तरी निमित्ताने आपल्या दोघांच्यात मतभेद झाले व तू अर्जुनासारखे विचार करू लागल्यास माझे काही खरे नाही. खट्टर काकाच्या आत्म्याला काही होणार नाही असे म्हणत मला मारून टाकल्यास तुझी काकू धाय मोकलून रडू लागेल. हे शरीर जीर्ण कापडासारखे आहे व ते गेले तरी काही फरक पडणार नाही हे तिला कोण समजावून सांगणार? काकाजी कपडे बदलल्यासारखे शरीर बदलत आहेत, त्यांना नवीन शरीर मिळेल. तुम्ही रडू नका, आनंदित रहा असे तू सांगणार आहेस का?

या गावातील तरुण गीतेतील उपदेशाप्रमाणे वागू लागल्यास येथील कित्येक काका, मामा मरून जातील. काकी, मामी विधवा होतील. कृपा करून गीतेच्या भानगडीत पडू नकोस. हवे असल्यास गीत रामायण वाच किंवा गीत गोविंद.

परंतु गीता नको.”
“काका, गीता अहिंसा, वैराग्य यांचे शिक्षण देते असे जाणकार नेहमी म्हणतात.”
“हे बघ मी साधा सरळ विचार करणारा माणूस. अर्जुनाने गीतेतील उपदेश ऐकून जर गांडीव धनुष्य तोडून भगवे वस्त्र धारण केले असते, कवच कुंडले उतरून कमंडलू हातात घेतला असता आणि कुरूक्षेत्राची युद्ध भूमी सोडून तीर्थक्षेत्राला गेला असता तर गीतेत अहिंसा-वैराग्य यांचे पाठ आहेत असे मी म्हणू शकलो असतो. परंतु हा तर मत्स्यवेधासारखे भावांचे मस्तकवेध करू लागला!
हे बघ काही कारण नसताना सुध्दा आजकाल तलवारी बाहेर काढतात. जर त्यांना गीतेच्या उपदेशाची नशा चढल्यास प्रत्येक गाव कुरूक्षेत्र होतील. तरी कृपा करून तुझ्यात तरूण रक्त वाहत असताना गीता वाचू नकोस.”
“खट्टर काका, गीता लिहिणाऱ्यांचा वास्तविक अभिप्राय अंत्यत वेगळा असण्याची शक्यता नाकारता येत नाही.”
काका थोडेसे रागाच्या भरातच, “कुठला दुसरा अभिप्राय असू शकेल हे मला कसे कळेल? गीता सांगणाराच रथात सारथी होऊन पुढे बसला. तेव्हाच रथ का मोडून टाकला नाही? अर्जुना मी तुला शरीर नश्वर आहे, संसार क्षणभंगूर आहे, व हस्तिनापुरातील हस्ती एका दिवशी मातीमोल होतील. यासाठी रक्ताचे पाट वाहवणार आहेस का? सांसारीक सुख तुच्छ आहेत. राज्याची आशा सोडून दे. सिंहासनासाठी वृध्द पितामह व पूज्य द्रोणाचार्यांवर बाण मारणे तुला शोभेल का? फार फार तर क्षत्रिय असून रणांगणातून पळून गेला म्हणून लोक हसतील. पंरतु जे खरोखर ज्ञानी आहेत ते निंदा व प्रंशसा यांच्या पलिकडे असतात. त्यांची मने विचलित होत नसतात. हे सर्व उपद्व्याप सोडून दे व माझ्याबरोबर हिमालयाला चल. असे काही तो म्हणाला नाही. उलट तो

अर्जुनाला भडकावत होता युद्ध करण्यास भाग पाडत होता. आणि तुला वाटते की गीतेत अहिंसा व वैराग्य आहे. तुझी अक्कल कुठे गेली आहे?"

"काका, मोठ-मोठी शहाणी सुरती माणसं गीतेद्वारा विश्वशांती स्थापित करत आहेत. आणि तुम्हाला मात्र त्यात युध्दाचा संदेश दिसतो!"

काका थोडे हसतच म्हणाले, "तू कधी पोवाडे ऐकले आहेस का? त्यात गाणे म्हणत तुमच्यात जोश आणतात. शेवटी काय तर एका दिवशी मरूनच जायचे असते. याच बोलीवरून कित्येक जण मरण्यास तयार होतात. मला तर हे सगळे गीतेत दिसते. पंरतु कधी तरी मरायचे असते म्हणून आत्ताच मरून जा हे काही मला पटत नाही."

"काका, भगवान श्रीकृष्णाच्या मते जीव कधी नष्ट होत नाही."

"जीव जर नष्ट होत नसेल तर खून करणाऱ्यांना फाशीची शिक्षा का दिली जाते? अभिमन्यूच्या वधानंतर एवढे आकाश पाताळ एक करण्याची गरज काय होती? जयद्रथावर सूड का उगवला? तेव्हा त्याला आपले शब्द आठवले नाहीत का? तू अजूनही बच्चा आहेस या गोष्टी तुला कळणार नाहीत."

"खट्टर काका, सर्व उपनिषदांचे मंथन करून भगवान श्रीकृष्णाने गीतारूपी अमृत अर्जुनाला पाजले असे म्हटले जाते."

"हा अर्जुन म्हणजे कुक्कुल बाळंच होता! म्हणूनच श्रीकृष्णाने त्याला चुचकारत युध्दाला जुंपले. अर्जुनाला चुचकारण्यासाठीच गीता लिहिली की काय असे वाटू लागते. मुळात श्रीकृष्णाला युद्धाची इच्छा होती. अर्जुनाला छू करून सोडून दिला व महाभारताचा तमाशा बघण्यात श्रीकृष्ण दंग झाला. अर्जुनाला इतका चेव चढला होता की त्यांनी संपूर्ण वंशच निर्वंश करून टाकले."

"काका, अर्जुन तर अनासक्त होऊन युद्ध करत होता त्याला राज्याचा लोभ नव्हता."

काका हसतच म्हणाले, “हस्तिनापूरच्या गादीचा वारस तूच जणू आहेस की काय! अर्जुन अनासक्त असता तर सर्व चुलतभावांना मारून दिल्लीत राज्याभिषेक करून घेतला असता का? कसली ही दिल्ली! दिल्लीने इतके रक्तपात पाहिले आहेत की तेथील किल्ल्याचे नाव सुध्दा लाल किल्लाच आहे!”

“धन्य आहात काका, कुठल्या कुठे गोष्टी नेऊन ठेवता?”

काका आपल्याच तंद्रीत, “बघ श्रीकृष्णाला युद्ध हवे होते व अर्जुनाकडे स्वत:ची अशी बुध्दी नव्हती. त्यामुळे मनाला येईल तसे श्रीकृष्ण बडबडत गेला – शरीर नाशवंत आहे कर युद्ध, आत्मा अमर आहे कर युद्ध, तू क्षत्रिय आहेस कर युद्ध, युद्ध नाही केलेस तर छी थू होईल, कर युद्ध! गंमत म्हणजे क्षत्रियांनी युद्धभूमी सोडून पळून जाण्यापेक्षा मरण पत्करलेले बरे असे म्हणणारा श्रीकृष्णच रणछोडदास होता! यालाच परोपदेशे पांडित्य म्हणता येईल! फक्त अर्जुन ऐकत सुटला! सर्व काही ऐकूनसुद्धा पदरी काही पडले नाही म्हणून श्रीकृष्णानी आपले अक्राळ विक्राळ रूप दाखवून अर्जुनाला भीती दाखविली. तसे सांगूनही तुला कळत नाही तर हे बघून तरी कळेल! लहान मुलांना भीती दाखवतात तसे हे झाले!”

“काका, गीतेत ज्ञानयोग, भक्तीयोग, कर्मयोग इत्यादी आहेत की......”

“सर्व योगाचा मूळ उद्दिष्ट तस्मात् युद्धस्य भारत! म्हणजे कौरवांना मारून टाक. कसे तरी करून अर्जुनाला लढण्यास प्रवृत्त करायचे होते म्हणून निष्काम कर्म आणि अनासक्ती योगाचा महाजाल त्यानी उभा केला. अर्जुनाने अगोदरच बुद्धी गहाण टाकली होती व तो श्रीकृष्णाच्या तालावर नाचू लागला. परंतु ज्याला समजण्याची शक्ती आहे तो भगवान श्रीकृष्णच चालाख निघाला.”

“काका भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला भरीस पाडले? मला तसे वाटत नाही!”

काका म्हणाले, “तुझी काय बिशाद, मोठमोठ्या पंडितानासुद्धा तसे वाटत

नाही. परंतु मला स्पष्ट दिसते. सगळया इच्छांचा त्याग करणारेच यथार्थ ज्ञानी असतात असे सांगणारेच राज्य व स्वर्गाचे प्रलोभन का दाखवतात? अर्जुना, लढता लढता तू मेल्यास स्वर्ग मिळेल व जिंकल्यास राज्य मिळेल. दोन्ही हातात लाडूच लाडू. त्यामुळे अर्जुना, उठ आणि युद्धास सज्ज हो!

मुळात अर्जुनाला तर्क माहित नसावे. त्यामुळे तो उभयसंकटात पडला. मी त्याच्या जागी असतो तर हे भगवान यासाठी तिसरा मार्गही आहे. अर्जुनाला बंदी करून ठेवणे. परंतु अर्जुनाला फक्त धनुष्यबाण चालवण्याचेच ज्ञान होते. त्याला वितंडवाद करणारे कुणी भेटले नसतील. मी श्रीकृष्णालाच विचारले असते की भगवान, सर्व मनोरथ व्यर्थ असल्यास हा रथ तू का चालवत आहेस?"

"काका, आपण सर्व ठिकाणी हे तर्कशास्त्राचे घोडे पुढे का दामटता?"

"का म्हणून दामटू नये? हेच तर आपल्या देशाची महान परंपरा आहे. खंडन-मंडनमधील ही सूक्ष्मदृष्टी अजून कुठल्याही संस्कृतीची असू शकत नाही. गंमत म्हणजे हाच श्रीकृष्ण एके ठिकाणी निंदा व प्रशंसा यांना समान समजले पाहिजे असे म्हणतो. व पुढे दुसऱ्या ठिकाणी युद्ध केला नाहीस तर निंदा-नालस्ती होईल. त्यापेक्षा मरण पत्करलेले बरे असे म्हणतो. या अनासक्त कर्माबद्दल प्रबोधन करत असताना यशापयाशांना सारखे समजून युद्ध करण्यास सांगतो. आणि नंतर मात्र जिंकण्यासाठी प्रलोभन दाखवत शत्रूला जिंकून राज्य कर असेही म्हणतो. जर सुख-दुःख, यश-अपयश, सगळे सारखेच असतील तर युद्ध जिंकण्यासाठी भगवान श्रीकृष्ण एवढा का आग्रही असतो?"

मी काही बोलत नाही हे बघून काका म्हणाले, "अरे मला एक गोष्ट कळत नाही. परमेश्वराची माया अगाध आहे. त्या मायाजालात आम्हा सर्वांना तो कठपुतळीसारखे नाचवत असतो. हेच जर खरे असेल तर गीता सांगण्याचे सोंग कशाला हवे? हवेत हात फिरवले की अर्जुनाची युद्धाला नाही म्हणण्याची काय

बिशाद? मुकाट्याने तो युद्ध केला असता. परमेश्वराच्या इच्छेनुसार हे जग चालत असल्यास त्यानी तसे करून दाखवावे. तू सर्व काही त्याज्य करून मला शरण ये. तुला सर्व पापातून मी मुक्त करतो. असे त्याला का म्हणावेसे वाटते? हे तर अगदी पाद्री वा बिशप बोलल्यासारखे वाटते. परमेश्वराला हे शोभते का? शेवटी शेवटी तर अर्जुना, मी तुला आज्ञा देतो, तू युद्ध कर अशी आज्ञा देतो.”

“काका, माझ्या मते संपूर्ण गीतेचा निष्कर्ष निष्काम कर्म आहे.”

“हेच मला समजत नाही. इच्छा बाळगून केलेले कुठलेही कर्म निष्काम कसे काय असू शकते? जे पण कार्य केले जात असताना त्यामागे काहीना काही कामना असणारच. सर्व कामनांचा त्याग कर हीसुद्धा एक कामनाच आहे. निष्काम कर्म हे माझ्या मते शुद्ध विरोधाभास आहे.”

“काका, तुमच्या तर्कविचारापुढे मी काही टिकणार नाही. परंतु जीवनमुक्त असणाऱ्याला कुठलीही कामना नसते, हे तरी तुम्हाला मान्य आहे की नाही?”

“मला अजूनपर्यंत जीवनमुक्त असा कोणीही सापडला नाही. तसा कुणी भेटल्यास काठीने बदडल्यास त्याची स्थितप्रज्ञता किती काळ टिकते ते मला बघायचे आहे. या गोष्टी फक्त ऐकण्यात बोलण्यात बरे वाटतात. प्रत्यक्ष व्यवहारात नाही.”

मी थोडा गंभीर होऊन “काका, तुमच्या मते ही भगवद्गीता केवळ अर्जुनाला युद्ध करण्यास भाग पाडण्यासाठी लिहिलेली आहे की काय?” म्हणालो.

काका हसत हसत म्हणाले, “अरे, तू आहेस कुठे? ही सर्व कवी कल्पना आहे. कवीला काही वास्तव प्रसंगांचा आधार घ्यावा लागतो. आपल्या काव्यातील चमत्कार सदृश प्रसंगांचे वर्णन करण्यासाठी एखादा कवी रामचंद्राच्या आयुष्यातील प्रसंगावरून रामगीता लिहितो. आणखी एखादा शंकराच्या आयुष्यावरून शिवगीता लिहितो. आणखी एखादा कवी यमुनेच्या तीरावर प्रच्छन्नपणे बागडणाऱ्या गोपिकांवरून गोपीगीत लिहितो. त्याचप्रमाणे आपल्या कवित्वाचे प्रदर्शन करण्यासाठी कुरुक्षेत्रातील युद्ध प्रसंगाचा खुबीने वापरून भगवद्गीता लिहिली

असेल. गंमत म्हणजे एवढा मोठा अठरा दिवसाच्या महायुद्धाच्या धुमश्चक्रीत गीतेतील अठरा अध्याय ऐकून घेण्यास कुणाला तरी फुरसत असेल का? अठरा अक्षौहिणी सैन्याच्या धमासान युद्धाच्या वेळी कुंभक प्राणायाम करूनच हे ऐकावे लागेल. संजयच्या डोळयात टीव्ही कॅमेरा बसवलेले असतील का? हा कवी जरा वेगळया प्रकारचा होता. त्याला सांख्ययोग व वेदांतातील पांडित्याचे प्रदर्शन करायचे होते. म्हणून त्याचे प्रदर्शन या गीतेत सापडते.''

''काका, तुमच्या दृष्टीने गीतेपासून काहीच फायदा झाला नाही?''

''फायदा झाला की! या काव्यामुळे कुटुंब नियोजनाला नक्कीच चालना मिळू शकते!''

''ते कसे काय?'' मी आश्चर्यचकित होऊन विचारलो.

''केवळ कर्म करत रहा, फलापेक्षा धरू नका. आणि हे फळ संतानसुद्धा असू शकेल. आणखी किती स्पष्ट करू? तुला नंतर समजेल.''

''काय काका, प्रत्येक गोष्ट तुम्ही विनोदी अंगानेच घेता. गीतेचा उपदेश आहे की अनासक्त होऊन कर्म करावे.''

''बरोबर! मीसुद्धा तेच म्हणतो. या उपदेशाप्रमाणे जर सर्व जण वागू लागल्यास या देशात कधीच क्रांती होणार नाही. विषमता जाणार नाही. कामगार पगारवाढीसाठी संप-हरताळ करणार नाहीत. दंगे होणार नाहीत. म्हणूनच मला एक नवीन गीता हवी. चंगळवादाची लाट थोपवणारी, कर्म व फळ दोन्ही हातात हात घालून जाणारी हवी. या गीतेला कुरुक्षेत्र नको, कृषीक्षेत्र हवे. या गीतेत कृतीचा मंत्र असेल. त्यातूनच आपल्या राष्ट्रगीतेतील सुजलाम सुफलाम खरे होतील.''

चुपचाप गीता झाकून ठेवत तेथून मी निसटलो.



# विवेकी विचार करण्यास प्रवृत्त करणारे पुस्तक

अविचारी, अविवेकी व हिंसक प्रवृत्ती बळावत असलेल्या या काळात कुणीतरी विचार करण्याच आग्रह धरतात व त्याविषयी पदरमोड करून पुस्तकही लिहितात, हे आश्चर्यजनक गोष्ट ठरत आहे. कारण भोवतालचे वातावरण इतके कलुषित झालेले आहे की आपला समाज राजकीय, सामाजिक, धार्मिक, जातीय, प्रश्नाबद्दल सारासार विवेकी विचार करण्याची क्षमताच हरवून बसला आहे की काय अशी दाट शंका येते. सामाजिक उन्मादाच्या प्रसंगी सारासार विचार न करता वेळ मारून नेणे व आपली राजकीय आकांक्षांचे घोडे पुढे दामटणे हाच अजेंडा सत्ताधारी वा त्यांचे विरोधक राबवत आहेत असे अलीकडील घटनावरून स्पष्ट होते. धर्म व राजकारण यांचे बेमालूम मिश्रण होत असताना पुरोगामी हतबल होत आहेत, अशी स्थिती आता आहे. रूढी-परंपरांचे उदात्तीकरण करून मताचे ध्रृवीकरण होत आहे हे माहित असूनसुद्धा समाजाला योग्य मार्गावर आणणे दुरापास्त ठरत आहे. त्याचप्रमाणे आपल्या दैनंदिन व्यवहारातसुद्धा अनेक गोष्टी अशा आहेत की त्यांचाही विचार करणे अगत्याचे ठरत आहे. रूढी परंपरानाच (आपली महान) संस्कृती म्हणून कवटाळणारे अजूनही मध्ययुगात असल्यासारखे वावरत आहेत.

त्यामुळे "असाही विचार करायला काय हरकत आहे..." या पुस्तकाचे लेखक डॉ. नितिन शिंदे यांनी आपल्या रूढी परंपरेतील दोष दाखवत संस्कृतीच्या रक्षकांना व वाचकांना "सरसकट रूढी परंपरांना बळी पडू नका, वाचा आणि विचार करा" असा सल्ला देत आहेत. अधिक मासातील जावयाला देत असलेले अधिकवाण, राष्ट्रपातळीवर साजरा होत असलेले

कुंभमेळ्यासारखे सण-उत्सव, पत्रिकेत मंगळ आहे म्हणून ज्योतिषांची होत असलेली चंगळ, खोट्या वास्तुशास्त्राला बळी पडलेल्यांची दुर्दशा, धार्मिक उपवासांचे उदात्तीकरण, कन्यागत महापर्वामागील अतार्किक विचार, कालसर्पयोगाची दहशत, विज्ञानालाच वेठीस धरणारे देवकण, इत्यादी अनेक गोष्टीवर भाष्य केलेले डॉ नितिन शिंदे यांचे हे पुस्तक वाचताना आपल्या मनातील जळमट दूर होऊ लागतात व स्वच्छ दृष्टीने आपल्या धार्मिक व्यवहाराकडे बघण्यास भाग पाडतात.

पुस्तकाच्या सुरुवातीला "मानवाने जिज्ञासा आणि कुतूहल यांच्या माध्यमातून चिकित्सेला सुरुवात केली. निसर्गाचे नियम समजाऊन घेतले आणि निसर्गाला कवेत आणण्याचा प्रयत्न केला. रानटी आणि अप्रगत अवस्थेतील मानवाने आजचे जे आधुनिक प्राप्त केले आहे, ते केवळ चिकित्सेच्या जोरावर असं म्हटलं तर वावगं ठरू नये. मानवाने स्वःप्रयत्नाने प्राप्त केलेला अत्यंत उपयुक्त असा मानवी स्वभावाचा पैलू म्हणून चिकित्सेकडे पाहता येईल." अशी आपली भूमिका लेखक मांडत आहेत. कदाचित याच कुतूहलापायी आपल्या तथाकथित संस्कृतीतील रूढी-प्रथाविषयी विचार करत असताना त्यातील फोलपणा, अतार्किक विचार, शोषणास वाव, विज्ञानविरोधी तर्क या गोष्टी त्यांना तीव्रतेने जाणवले असतील म्हणून लेख लिहिले गेले असतील. या पुस्तकातील एकूण एक लेख कर्मकांडांची, रूढी-परंपरांची, गैरसमजुतींची, सत्याचा विपर्यास करणाऱ्यांची चिकित्सा करत मिथके काय आहेत, नेमके तथ्य काय आहे, त्यामागील विज्ञान काय आहे, हे समजाऊन सांगत आहेत.

आपल्या समाजातील अत्यंत आंधळेपणाने पाळत असलेल्या काही रूढी-परंपरांची चिकित्सा करत असताना लेखकाला त्यामागे एका प्रकारचा धार्मिक दहशतवाद दिसतो. अमुक अमुक विधी न केल्यास बरबाद होऊन जाऊ ही

भीतीच मानगुटीवर बसलेली असल्यामुळे त्या भीतीपायी कुठलाही विचार न करता मुकाट्याने धार्मिक दलालांच्यापुढे मान तुकवली जात असावे. भारतीय समाजावर असलेला धार्मिकतेचा प्रचंड पगडा त्यांना आर्थिकदृष्ट्या कंगाल करत आहे एवढेच नव्हे तर या गोष्टींचा गर्वही केला जात आहे याची खंत लेखकाला वाटते. लेखकाच्या मते अधिकवाण हा प्रकार सर्व कुटुंबाला कर्जबाजारी बनवणारा आहे. ज्याला जावयाबद्दल अतीव प्रेम वाटतं त्यानी खुशाल सोनं द्यावं आणि ज्याला घ्यावसं वाटतं त्यानी ते अवश्य घ्यावं. परंतु धार्मिकतेच्या दहशतीखाली कंगाल होऊ नये. असे लेखकाला मनोमन वाटते.

कुंभमेळ्यासंबंधीची आख्यायिका वाचत असताना कल्पनेची भरारी कुठपर्यंत भरकटत जाऊ शकते, हे लक्षात येते. थोडेसे तर्क वापरल्यास अशा गोष्टीतील फोलपणा लक्षात येतो. परंतु उत्सवी वातावरणाची कैफ चढलेली असताना विचार करण्यासही वेळ नसतो; कृती करण्यासही वेळ नसतो. कदाचित विचार करण्याची कुवतच नाही असे विषादपूर्वक म्हणावे लागेल.

इस्रो या भारतीय संस्थेने मंगळ ग्रहावर पाठवलेल्या मंगळयानाचा लेखाजोखा पाहिल्यानंतर पत्रिकेतील मंगळाचा प्रभाव एव्हाना ओसरून जायला हवा होता. परंतु तसे काही झाले नाही याची प्रचीती गावागावातील लाखोंनी कमवत असलेल्या ज्योतिषांच्या धंद्यावरून येऊ शकते. बाबा-बुवा, मांत्रिक-तांत्रिक, नवसाला पावणारा (लालबागचा) राजा, दैववाद, कर्मकांड इत्यादीमध्ये सदैव गुंतलेल्या व तर्कविचार हरवलेल्या या समाजाला निदान आपल्या पुढच्या पिढीला तरी वैज्ञानिक दृष्टिकोन देण्याची गरज आहे हेसुद्धा लक्षात येत नाही. धार्मिक व्यवहार हे आर्थिक फायदा करून घेण्यासाठी टपलेल्या समाजकंटकांचा कुटील डाव आहे, हे ध्यानीमनीही नसल्यासारखे समाजाची वर्तणूक असते. खरे पाहता याची चिकित्सा करण्यासाठी फार डोके लढवण्याचीसुद्धा गरज नाही. मंगळ हा ग्रह आहे, पृथ्वीसारखे येथेही सूर्याचा

प्रकाश मिळतो, ती प्रकाश किरणं तिथून परावर्तित होऊन पृथ्वीवर येतात, इत्यादी गोष्टी अगदी प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांनासुद्धा माहित असते. परंतु बुद्धी गहाण ठेवलेली असल्यास लग्न जुळवताना मुलगा वा मुलीच्या पत्रिकेत मंगळ तर नाही ना याची विचारपूस केली जात असते. मंगळ असल्यास ग्रहदोष दूर करण्यासाठी भटजी/पुरोहित/ज्योतिषी यांना पाचारण केली जाते. काहीतरी कर्मकांड करवून घेऊन (व भरपूर बिदागी देऊन) मनाचे समाधान करून घेतली जाते. हा सर्व प्रकार म्हणजे डोके गहाण ठेवण्याचाच प्रकार!

तथाकथित वास्तूतज्ञांनी तर सर्वच्या सर्व दिशा कोणाच्या तरी मालकीच्या करून टाकलेल्या आहेत. त्या मालकीमुळे वा कुठल्या तरी अज्ञाताच्या प्रभावामुळे मानवी व्यवहारावर दुष्परिणाम होण्याच्या शक्यतेची भीती दाखवून चांगल्या स्थितीत असलेल्या घराची पाडापाडी, हलवाहलवी, वा भरपूर खर्चिक असे काही तरी पारंपरिक कर्मकांड करायला भाग पाडून ग्राहकांना गंडवले जाते. कारण यांच्याकडे जाणाऱ्यात सुज्ञपणाचा अभाव असतो असे लेखकाला वाटते. या वास्तुतज्ञांच्या मते शौचालय नेहमी पश्चिमेकडेच असावे लागते. हे असे का अशी विचारण्याची तेथे सोय नाही. तथाकथित शिकलेला वर्गही अशा भूलथापांना सहजपणे बळी पडतो. खरे पाहता आपल्या घराची भरभराट होणे हे स्वतःचे मेंदू, मन, मनगट, आणि परिस्थिती यांच्यावर अवलंबून असते; वास्तुशास्त्र वा फेंगशुईवर नाही. परंतु विवेक आणि वैज्ञानिक दृष्टिकोन स्वीकारणे हेच मुळात पटत नसल्यामुळे हा धंदा बरकतीला आला आहे.

पुरुषप्रधान संस्कृतीतून आलेला कर्मकांड म्हणजे ऊठसूट महिलांना उपवास करण्यास भाग पाडणे असे लेखकाला वाटते. महिन्यातील दहा-बारा दिवसाच्या उपवासामुळे भारतातील ऐंशी टक्के महिला रक्तपांढरीने आजारी आहेत, असा लेखकाचा दावा आहे. महात्मा गांधी, बाबा आमटे, मेधा

पाटकर, बाबा आढाव सारखे नेते व सामाजिक कार्यकर्ते उपोषणाच्या माध्यमातून उपवास करत असले तरी या उपोषणामागे समाजहिताची कळवळ होती. सत्तेत असलेल्यांना अनुकूल निर्णय घेण्यास भाग पाडण्याचा उद्देश त्यामागे होता. त्यातून समाजाचे भले झाले व उपवास सार्थकी झाले. परंतु कर्मकांड म्हणून केलेल्या उपवासामुळे ना समाजाचे भले होणार वा ना व्यक्तीचे, हे लक्षात ठेवणे गरजेचे आहे.

कन्यागत महापर्व हे अजून एक असेच मिथकावर आधारलेले व शोषणास भरपूर वाव असलेले कर्मकांड. या पर्वणीच्या काळात कृष्णा व गंगा या दोन नद्या एकत्र आल्यामुळे त्या काळी कृष्णेत स्नान केल्यास मोक्ष प्राप्ती होऊ शकते, गेल्या सात जन्मातील पापं धुवून निघतात, या आख्यायिकेवर धार्मिकांची नितांत श्रद्धा असते. त्यामुळे दर बारा वर्षानी येणाऱ्या या पर्वणीच्या एक वर्षाच्या कालखंडात कृष्णाकाठच्या सर्वच्या सर्व गावात भक्तगण स्नानादी कर्मकांड करण्यास गर्दी करतात. व गावकरी मोठ्या प्रमाणात पैसे कमावतात. हे एक फार मोठे रॅकेट असून यात शासनही आजकाल सहभागी होत आहे. भौगोलिक दृष्ट्या हजारेक किलोमीटर्स दूर असलेल्या नद्यांचे संगम कसा काय होऊ शकेल या अत्यंत प्राथमिक स्वरूपाच्या प्रश्नाला त्यांच्याकडे उत्तर नसते. त्यामुळे वस्तुस्थितीपासून कोसो मैल दूर असलेल्या या श्रद्धेची उचित चिकित्सा करणे गरजेचे आहे असे कुठल्याही भाविकाला वाटत नाही. मुळात धर्म आणि विज्ञान (व काही अंशी कॉमन सेन्स) यांचा नेहमीच संघर्ष होत आलेला आहे. विज्ञान व विवेक ही सत्य आणि वस्तुस्थितीवर आधारित असलेली विचार प्रणाली असते. परंतु स्वार्थीवृत्तीच्या काही प्रवृत्ती विज्ञानाचा बेमालूम उपयोग करून समाजाला धार्मिक क्षेत्रात गुंतवण्यात मग्न असतात. त्यामुळे सारासार विचार करणे, चिकित्सकपणे विचार करणे, विवेकाची कास धरणे इष्ट ठरत आहे.

कालसर्पयोग ही अशीच एक भन्नाट कल्पना कुणाच्या तरी सुपीक डोक्यातून निघून आपल्या समाजाची प्रगती कुंठित करत आहे. अडचणीच्या वेळी धसका घ्यायला लावणाऱ्या या योगाला बहुतेकजण बळी पडतात. काही धर्मस्थळातील पुरोहित, व्यापारी व वाहनव्यावसायिक यांनी संगनमत करून आपल्या स्वार्थहितासाठी हा बागुलबुवा उभा केला आहे. या (वाईट) योगाच्या निवारणार्थ सांगितलेल्या नागबळीच्या विधिसाठी हजारो रुपये खर्च केला जात आहे. गंमत म्हणजे या विधीत सहभागी होण्यासाठी अडचणीत सापडलेली व्यक्ती प्रत्यक्ष हवीच असे काही नाही. त्याच्याकडील एखाद्या कापडासारखी निर्जीव वस्तु वा कुटुंबातील एखादी दुसरी व्यक्तीसुद्धा चालू शकते. एखाद्या पेशंटला डॉक्टरकडे घेऊन न जाता त्याचे फक्त कपडे घेऊन रोगनिदान व उपचार करण्यास सांगितल्यासारखे हा प्रकार वाटतो. आम्ही मानसिक आधार देतो म्हणून या प्रकाराचे समर्थन करणारे नक्कीच बेरकी आहेत. आयुष्यातील दुःख दूर करणारी ही यंत्रणा उभी करून दिनदहाडे लूटमार करणाऱ्यांना गजाआड करण्याइतकी बुद्धी वा धैर्य आपल्या समाजात नाही याचे सखेदाश्चर्य वाटते.

असाच काहीसा प्रकार बाळाचे नाव ठेवण्यापूर्वी आद्याक्षराची विचारपूस करण्यासाठी पंचागं व पंचागाचा अर्थ सांगणारे गुरूजी याकडे निर्देश करता येईल. नावरस नावाचं आद्याक्षर सांगण्यासाठी आणि फुकटचंबू खानदानाच्या सोईसाठी कुठल्याही पंचागात अवकहडाचक्र नावाचे कोष्टक असून त्यावरून बाळाचे नाव ठेवणे शक्य होऊ शकते. परंतु प्रत्येक गोष्टीचे इव्हेंट करण्याच्या दुष्ट प्रवृत्तीमुळे असल्या साध्या उपायांवर भरवसा कोण ठेवणार?

अशा प्रकारचे अनेक कर्मकांडांची चिकित्सा करत असतानाच लेखक तुळसीच्या मिथकामागील सांस्कृतिक संदर्भ, हिग्स बोसानच्या कणांना देवकण असे नामकरण करून परमेश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्याचा आटापिटा,

जगबुडीची अफवा उठवून माध्यमांनी घातलेला घोळ इत्यादी बद्दलही लेखक चिकित्सक विचार मांडत आहेत. या गोष्टी मुळातूनच वाचायला हवीत.

परंपरा आणि संस्कृती यांचे गौरवीकरण आणि उदात्तीकरण होत असलेल्या या काळात बुद्धीमत्तेच्या निकषावर चिकित्सा करणे जरूरीचे ठरेल. विवेक आणि वैज्ञानिक दृष्टिकोन यांची वाढ कशी होत राहील याकडे लक्ष केंद्रित करणे आवश्यक ठरेल. आयत्या उत्पन्नाच्या भन्नाट कल्पना निर्मिती करून तथाकथित उच्चशिक्षित आणि अशिक्षितांना कंगाल करण्यापेक्षा निकोप समाजाची निर्मिती कशी करता येईल याकडे लक्ष वेधण्यासाठी "असाही विचार करायला काय हरकत आहे..." हे पुस्तक नक्कीच आपल्याला मदत करू शकेल!

**असाही विचार करायला काय हरकत आहे...**

लेः डॉ. नितिन शिंदे,

नाग-नालंदा प्रकाशन, इस्लामपुर

मूल्य 110 रु, पृ.सं. 128



# रात्र उजळवणारा कृत्रिम "चंद्र"

रात्रीच्या वेळी निरभ्र आकाशाकडे आपण काही वेळ पहात राहिल्यास एखादा दुसरा उल्का आकाशातून जमिनीकडे झेप घेताना दिसल्याशिवाय राहणार नाही. आकाशातील तारेच तुटून पडतात की काय वा आकाशात कुणी तरी दिवाळीची आतिषबाजी करत आहेत की काय असे लहानपणी आपल्याला वाटायचे. परंतु आजकल शहरातील आकाशच नव्हे तर खेड्यातील आकाशसुद्धा तेवढे निरभ्र नसतात. त्यामुळे उल्कापाताच्या वा पिठूर चांदण्यात फिरण्याच्या आनंदाला आताची पिढी पूर्णपणे मुकत आहे. नैसर्गिक सौंदर्यापेक्षा कृत्रिम सौंदर्याकडे ओढ असलेल्या आजच्या जगात सर्व काही स्क्रीनवर कॅप्चर करण्यातच धन्यता मानणाऱ्यासाठीच आकाशातील चंद्राला एक सोबती आणण्याचा घाट आजकाल घातला जात आहे. चीनचे तंत्रज्ञ अवकाशातच एक कृत्रिम सृष्टीच्या निर्मितीचे स्वप्न पहात आहेत.दीड कोटी लोकसंख्या असलेल्या चेंगडू शहरावरील अवकाशात प्रायोगिक स्वरूपात एक कृत्रिम चंद्र स्थिर करण्याचा प्रयत्न चीनी तंत्रज्ञ करत आहेत. आपण नेहमी पहात असलेल्या चंद्रासारखा तो दिसेल. परंतु तो नेहमीच्या पौर्णिमेच्या चंद्रापेक्षा आठ पट जास्त प्रकाशमान असेल. त्यामुळे त्या शहराला रस्त्यावरील दिव्याची गरज भासणार नाही, असे चेंगडू एरोस्पेस या संशोधन संस्थेचा दावा आहे. त्यामुळे जगभरातील खगोल शास्त्रज्ञांना आश्चर्याचा धक्क बसत आहे.

गंमत वा जाहिरात किंवा प्रतिष्ठेसाठी म्हणून अवकाशात काहीना काही तरी उडवत ठेवण्याची एक फॅशन आजकाल प्रचलित आहे. काही महिन्यापूर्वी न्यूझिलँडच्या रॉकेट लॅबने ह्युमॅनिटी स्टार नावाचा आरशाचा चेंडू अवकाशात प्रक्षेपित केला होता. खरे पाहता तो चेंडूसारखा पूर्ण गोलाकारही नव्हता; सुमारे एक मीटर व्यास असलेल्या या चेंडूच्या पृष्ठ भागावर 76 त्रिकोनाकारातील

आरसे चिकटवलेले होते. दक्षिणोत्तर दिशेत भ्रमण करणाऱ्या ताऱ्यासारखा हा चेंडू दर 92 मिनिटाला पृथ्वीची प्रदक्षिणा पूर्णकरत होता. व रात्रीच्या वेळी दुर्बिणी विनासुद्धा कुणालाही तो दिसत होता. याच्या वीक्षणामुळे किती जणांना आनंद झाला हे माहीत नसले तरी खगोल-अभ्यासक मात्र आकाशदर्शनातील अडथळा म्हणत रागाने लालबुंद झालेले होते. दुर्बिणीतून आकाशदर्शन करणाऱ्या हौशी अभ्यासकांना मात्र अजून एक वस्तू निरीक्षणासाठी मिळाला होता. हा प्रकार म्हणजे उपद्रवी गंमत वा अवकाशात टाकलेला कचरा असेही अनेकांना वाटत होते. तरीही हा आकाशचेंडू सर्व टीका सहन करत व माध्यमात कुतूहल निर्माण करत तीन महिने टिकला. परंतु हा अगाध चेंडू अपेक्षित वेळेआधीच भ्रमणावस्थेतच जळून खाक झाला व त्याची राख अवकाशात कायमचीच विलीन झाली.

हा चेंडू तर तुलनेने फारच लहान; परंतु एका हौशी महाशयानी अवकाशातील भ्रमण कक्षेत एक खरीखुरी कारच ठेवलेली आहे. इलॉन मस्क या विक्षिप्त तंत्र-उद्योजकाची ही करामत आहे. विद्युत शक्तीवर धावणाऱ्या टेस्ला कार्सची निर्मिती करून जगातील वाहतूक यंत्रणेला कलाटणी देणाऱ्या टेस्ला कंपनीच्या या प्रमुखाने आख्खी कारच अवकाशातील भ्रमण कक्षेत ठेवलेली आहे. याचीच स्पेस-एक्स कंपनी उपग्रहांचे प्रक्षेपण, पुन्हा पुन्हा वापरात येऊ शकणाऱ्या रॉकेट्सची निर्मिती, पृथ्वीवर परत येऊ शकणाऱ्या सॅटेलाइट्सची निर्मिती इत्यादी साहसी उत्पादनासाठी प्रसिद्धीच्या झोतात आहे. फॉल्कन रॉकेटच्या सहाय्याने बाहुबली टाइप शक्तीशाली रोडस्टार कारचे अवकाशात प्रक्षेपण करण्यात मस्क यशस्वी झाला. आता ही कार पृथ्वीच्या भ्रमण कक्षेच्या बाहेर जाऊन सूर्याच्या भ्रमण कक्षेत प्रदक्षिणा घालत आहे. या लाल भडक रंगाच्या कारमध्ये स्टारमॅन नावाचा स्पेससूटधारी

बाहुली(ला!) ड्रायव्हरच्या आसनावर आहे. हा स्टारमॅन ताशी एक लाख किलोमीटर्स वेगाने ही कार चालवत आहे.

अंतरिक्ष युगातील या 61 वर्षात पूर्णाकारातील सुमारे 8000 वस्तू पृथ्वीच्या कक्षेच्या जवळपास भ्रमण करत ठेवण्यात आपण यशस्वी झालो आहोत. त्याचबरोबर कक्षेपर्यंत न पोचलेले त्रिशंकू अवस्थेतील उपग्रह, त्यांचे सुटेभाग, मोडतोड होऊन दूरवर पसरलेले हजारो वस्तूंची गर्दी अवकाशात कायंमचेच भ्रमणावस्थेत आहेत. एवढेच नव्हे तर आपल्या कलेवराची विल्हेवाट अवकाशाच्या भ्रमण कक्षेत स्थिर करून प्रदक्षिणा घालण्यासाठी नावनोंदणी करणाऱ्यांची संख्यासुद्धा कमी नाही. अवकाशात कचरा टाकू नये अशी विनवणी करण्याची वेळ आता आली आहे. परंतु ऐकतो कोण? इलॉन मस्कची कार या कुठल्यादी तक्रारींना दाद न देत कुणाच्याही हाती न लागणाऱ्या सूर्याच्या कक्षेत भ्रमण करत आहे.अमेरिका व रशियाच्या अवकाशाच्या मक्तेदारीच्या यादीत आपणही हातभार लावत आहोत.

चीनचा इलेक्ट्रॉनिक चंद्र निसर्गात दिसणाऱ्या चंद्राएवढासुद्धा नाही. एक प्रकाशमान ताऱ्यासारखा दिसणारा चंद्र चेंगडू शहराचा काही भागानाच देदिप्यमान करणार आहे. आरश्यावर पडणाऱ्या सौर उर्जेचा वापर करून प्रकाश किरणात परिवर्तन करण्याची यंत्रणा यात आहे. हा प्रयोग यशस्वी झाल्यास अशाच प्रकारचे आणखी दोन चंद्र 2020 सालापर्यंत अवकाशात प्रक्षेपित करण्याचा तंत्रज्ञांचा मानस आहे. त्यामुळे शहराचा काही भाग रात्रीच्या वेळी प्रकाशात न्हाऊन निघणार आहे. (हा चंद्र सुमारे 50 चौरस किलोमीटर् एवढे क्षेत्रफळ प्रकाशमान करू शकतो.) शहराला रात्री उजेड मिळाल्यामुळे रस्त्यावरील दिव्यासाठी लागणाऱ्या खर्चात मोठ्या प्रमाणात कपात होणार आहे. एका अंदाजानुसार ही बचत प्रती वर्षे सुमारे 120 कोटी युवान (173 मिलियन डॉलर्स) एवढी असेल. या इलेक्ट्रॉनिक चंद्रामध्ये दिवे

विझवण्याची सोय असल्यामुळे क्रीडांगणावर वा दुर्घटनेच्या ठिकाणी प्रखर प्रकाश सोडता येईल, अशी स्वप्न तंत्रज्ञ पहात आहेत. परंतु हा प्रकल्प अपयशी ठरणार आहे, असे या क्षेत्रातील तज्ञांचा कयास आहे. कारण रशियाच्या मिर स्पेस स्टेशनवर काही वर्षापूर्वी 20 मीटर्स व्यास असलेला एक आरसा पतंगासरखा टांगून ठेवला होता. फक्त 10 मिनिटेच प्रकाश देऊन हा आरसा कुठल्या कुठे नाहिसा झाला.

अवकाशात कुठलीही वस्तु स्थिर ठेवल्यासारखे दिसण्यासाठी पृथ्वीपासून सुमारे 37000 किलोमीटर्स उंचीवर जियोसेंट्रिक कक्षेत ठेवावे लागते. त्यापेक्षा जवळ असल्यास ते स्थिर दिसणार नाही. 400 किलोमीटर्स उंचीवरील रशियाचे मिर स्पेस स्टेशन स्वतःच्या जागेवरून हलत असते. या स्पेस स्टेशनला पुन्हा जागेवर आणण्यासाठी बूस्टर रॉकेट्सचा मारा करावा लागतो. चीनचा हा चंद्र चेंगडू शहराच्या अवकाशातून थोडा जरी सरकल्यास उद्दिष्ट सफल होणार नाही.

रात्रीच्या या कृत्रिम प्रकाशामुळे शहरालगतच्या अरण्य प्रदेशातील प्राणी-पक्षी यांचे जीवन उध्वस्त होऊ शकते. चीनच्या कृत्रिम चंद्राचा दावा असाच काहिसा असेल. कृत्रिम चंद्रासाठी पैसा खर्च करण्याऐवजी शहराभोवती असलेले वायू प्रदूषण नष्ट करत असल्यास शहरवासियांनी एरोस्पेस संस्थेचे आभार मानले असते.

अजून काही महिन्यानंतर स्पेस मिरर नावाची एक कलाकृतीसुद्धा अवकाशात दिसणार आहे. ट्रेव्हर पेग्लेन या अमेरिकन कलाकाराची ही कृती असून नेवाडा आर्ट म्यूजियमतर्फे 575 कि.मी. उंचीवर ते स्थिर करण्यात येत आहे. कारला अवकाशात पोचवणाऱ्या फॉल्कन रॉकेटच्या सहायाने एक बलून अवकाशात सोडले जात आहे. घड्याळातील काट्यासारखी असलेली ही वस्तु बलूनचा आकार घेत स्थिर झाल्यावर उघड्या डोळ्यांना दिसू लागेल.

कदाचित दिसला नाही तरी काही फरक पडणार नाही. कारण त्याला मोबाइल स्क्रीनवर बघण्यासाठी ऑर्बिटल रिफ्लेक्टर नावाचा अँप तयार आहे.

हातावरील फोड बघण्यासाठी आरसा कशाला या म्हणीला खोटे पाडत आकाशातील चंद्रालासुद्धा बघण्यासाठी मोबाइलच उपयोगी येऊ शकेल!



# आपली इच्छाशक्ती

## *आपली इच्छाशक्ती इतकी तकलादू का?*

तुम्ही पूर्ण विचार करून, जमल्यास चार चौघांचा सल्ला घेऊनच तुमचे वाढलेले वजन कमी करण्यासाठी वा सिगरेट ओढणे थांबवण्यासाठी किंवा टीव्हीच्या समोर बसून उगीचच्या उगीच रिमोटशी चाळे न करण्यासाठी काही (जालीम) उपाय शोधले असतील व त्याप्रमाणे वागण्यासाठी मनाची पूर्ण, जय्यत तयारीनिशी कारवाई करतही असाल. यासाठीचा तुमचा तो ओसंडून वाहणारा उत्साह, अभिनिवेश पाहिल्यास खरोखरच काही (नव्हे एक - दोन) दिवसातच त्या वाईट सवयीतून तुमची मुक्तता होईल असेच सगळ्याना वाटू लागेल. *परंतु काही दिवसातच ये रे माझ्या मागल्या!* शेवटी तुम्ही, स्वतःच आपणहून 'ती वेळ बरोबर नव्हती' वा 'आपली इच्छाशक्तीच तोकडी पडते' असे थातुर मातुर सांगून वेळ मारून नेत असता. खरे की नाही?

माझ्या मते यात काही तरी चुकत असावे. इच्छाशक्ती म्हणजे कुठली तरी सुप्त आंतरिक शक्ती, शरीराच्या कुठल्यातरी कोपऱ्यात दडून बसलेली, - आपण उठवले की ताडकन उठणारी व आपले ईप्सित पूर्ण करणारी असे काहीतरी आहे हे गृहीतकच मुळात गैरसमजूतीवर आधारलेले असावे. ही गैरसमजूत मूळ मुद्द्यापासून आपल्याला दूर नेत असल्यामुळे ती कदाचित पुढे मागे धोकादायकही ठरू शकेल. मुळात आपण जे काही करत असतो त्यात कार्यभाग पूर्ण करण्याच्या उद्दिष्टाबरोबरच काही प्रमाणात समाधान, आराम मिळवण्याच्या प्रयत्नातही आपण असतो. त्यामुळे वाईट सवयी घालवण्याच्या प्रयत्नात समाधान मिळत नसल्यास सगळा केर मुसळात. आपला लठ्ठपणा कमी व्हावा, आपले आरोग्य सुदृढ असावे, बाष्कळ वेळ न घालवता काही सर्जनशील काम करावे या इच्छेसाठी आपल्याला जडलेल्या वाईट सवयी दूर करण्याच्या प्रयत्नाच्या वेळीसुद्धा आपल्याला काही प्रमाणात समाधान मिळत

नसल्यास आपण ते प्रयत्न सोडून टाकतो. प्रयत्न न करण्यासाठी इच्छाशक्तीचे पिल्लू आपण हळूच सोडतो. आपल्या इच्छा - आकांक्षा व आपले परिश्रम काही वेळा एकमेकाविरुद्ध उभे असतात. काही गोष्टी ताबडतोब हव्या असतात व काही दीर्घ काळानंतर मिळाल्यातरी चालण्यासारख्या असतात. अशा प्रसंगी नेहमीच ताबडतोबीच्या प्रयत्नांची सरशी होत असते. दोन महिन्यानंतर येणाऱ्या परीक्षेसाठी आतापासून अभ्यास करायला हवे हे कितीही बरोबर असले तरी मित्र - मैत्रिणीबरोबर आज रात्री चित्रपट पाहण्यातली मजाच और असते.

व्यसनमुक्तीच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांना दोन प्रकारच्या व्यसनाधीन मानसिकतेशी सामना करावा लागतो. एक गट मागचा पुढचा वा अंतिम परिणामाचा विचार न करता भावनेच्या भरात उत्स्फूर्तपणे पेग रिचवणाऱ्यांचा असतो. पेग भरल्याशिवाय चैन पडत नाही. गटागटा पिऊन संपविल्याशिवाय समाधान होत नाही. दुसरा गट मात्र स्वत:ला फसवत बाटलीच्या बाटली रिकामा करत असतो. *आज अमक्याचा वाढदिवस, आज तमक्याचा शोक दिवस* असे काही तरी निमित्त शोधत, 'मी फक्त अपवादात्मक परिस्थितीतच पेगला हात लावतो', या तंद्रीत असतो. 'दारू काय? मी केव्हाही सोडू शकतो' हे पालूपद मात्र चालूच असते. त्याच्या दृष्टीने सर्व दिवस अपवादात्मकच असतात. आपण स्वत: फार हुशार आहोत या समजुतीमुळे आपण केव्हा व्यसनाच्या आहारी गेलो याचीच त्याला कल्पना नसते.

यावर एक उपाय सुचवावेसे वाटते. वाईट सवय मोडण्यासाठी कुणाच्या मनावर विसंबून न राहता बाह्य, कृत्रिम बंधन घातल्यास काही प्रमाणात सुधारणा घडू शकेल. कायद्याचा वचक, सवयींना पूरक अशा गोष्टी उपलब्ध नसणे, भावनिक आव्हान, इत्यादीमुळेसुद्धा वर्तणुकीत फरक पडण्याची शक्यता असते. ग्रीक पुराणात युलिसिसची मिथ्यकथा आहे. युलिसिस

युद्धसज्ज जहाजातून जात असताना त्याला जहाजाच्या डोलकाठीला बांधून ठेवण्याची सक्त ताकीद तो नाविकांना देत होता. व इतर सैनिकांना कानात बोळे घालण्याचा हुकुम तो देत होता. कारण समुद्र पार करताना समुद्रात वावरणाऱ्या सायरन भगिनी आपल्या सुमधुर आवाजात सैनिकांना हाक मारून समुद्रात उडी मारण्यास भाग पाडत असत. आवाज ऐकू न आल्यास किंवा उडी मारणे शक्य न झाल्यास जीव वाचण्याची शक्यता असल्यामुळे युलिसिसने असल्या विचित्र अटी घातलेल्या होत्या.

आपण कितीही निश्चयी असलो तरी बाहेरच्या गोष्टींना आकर्षित होऊन, नको त्या गोष्टींच्या मागे लागतो. त्यामुळे अशा घातक वस्तूपासून दूर राहिल्यास वा सवयीला पूरक वस्तू दुर्लभ असल्यास, किंवा त्या मिळवण्यासाठी भरपूर धोका, परिश्रम वा पैसा लागत असल्यास सामान्य कुवतीचा माणूस त्याचा नाद सोडू शकतो. म्हणूनच सुलभतेने मादक पदार्थ वा दारू मिळू नये म्हणून अशा पदार्थावर बंदी घालण्याचा आग्रह धरला जात असतो. आपला निश्चय ढळत असल्यामुळे असल्या बाह्य व कृत्रिम बंधनांची गरज भासते. कुठल्यातरी चांगल्या बंधनात स्वत:ला अडकून घेतल्यास वाईटापासून दूर होणे शक्य होते.

कमकुवत मानसिकता हे अविवेकीपणाचे लक्षण समजले जाते. कारण मनाने कमकुवत असलेले सारासार विचार न करता भावनेला बळी पडून उत्स्फूर्तपणे कृती करत असल्यामुळे स्वत:च्या पायावर दगड घालून घेत असतात. मुळात अशा प्रसंगी काहीतरी arguments करत मनाची समजूत घातली जात असते. काही तत्वज्ञांच्या मते कमकुवतपणा नव्हे तर मनाचा (चुकीचा) निश्चयी बाणा हा अविवेकीपणाकडे नेणारा ठरतो.

उदाहरणार्थ, रोज एक पाकीट सिगरेट अनेक वर्षे ओढणारा एके दिवशी सिगरेट सोडण्याचा निश्चय करतो. दिवस ठरवतो, वेळ ठरवतो. त्यानंतर समोर

असलेल्या सिगरेट कागदाची नळी करून त्यात तंबाखू भरून ओढू लागतो. वरवर पाहता त्यानी सिगरेट सोडली हे खरे वाटत असले तरी आताचा हा नवीन उपद्व्याप खरोखरच सिगरेट सोडण्याच्या दिशेने जाणारा ठरेल का? कारण येथे चारमिनार ओढावे का विल्स ओढावे का गोल्डफ्लेक ओढावे हा नसून तंबाखूच्या दुष्परिणामापासून लांब राहणे हा कळीचा मुद्दा असतो. ढोबळमानाने विचार केल्यास अजून एक सिगरेट ओढल्यामुळे आकाश कोसळणार नाही यात काही चुकीचे नाही. परंतु अजून एक का नको, दोन का नकोत, तीन का नकोत..... सिगरेटपासून खरोखरच मुक्ती हवी असल्यास ब्रँड बदलून नव्हे तर तंबाखूजन्य पदार्थांपासून मुक्त होणे गरजेचे ठरते. म्हणूनच अजून एक, अजून एक हे त्याच्या दृष्टीने अविवेकी ठरत नाही. त्यामुळे आजचा हा शेवटचा झुरका याला काही अर्थ नाही. हीच गोष्ट दारूचा शेवटचा पेग (वा हा एकच प्याला!) किंवा *हाच माझा शेवटचा केकचा तुकडा* किंवा *मी उद्यापासून जिमला जाणार* असे म्हणणाऱ्यासाठी लागू होईल.

येथे प्रश्न एक सिगरेट वा केकचा एक तुकडा याचा नसून आपण आपल्या आरोग्याची काळजी घेण्यासाठी काही उपाय करणार आहोत की नाही हा आहे. केकचा एक तुकडा खाल्ल्यामुळे तुमचे वजन दुप्पट होणार वा आजच जिमला गेल्यामुळे तुम्ही सडपातळ होणार असे काही नाही. परंतु काही कृती करण्यासाठी (वा न करण्यासाठी) आपल्याकडे काही ना काही कारणं हजर असतात व काही गोष्टी करण्यासाठी एकही योग्य कारण आपल्याला सापडत नाही. हा विरोधाभास असून त्याचा स्वीकार करण्याची तयारी हवी. म्हणूनच कुठलेही तर्क न वापरता कृती करणाऱ्यापेक्षा मर्यादित अर्थाने तर्काचा वापर करून आपल्या कृतीचे समर्थन करणाऱ्याबद्दल यानंतर जास्त सहानुभूती दाखवायला हवी.



# सरवन भवनाची फिल्मी ष्टोरी

गेल्या 10 – 15 वर्षात चेन्नईला भेट दिलेल्यांना कधी ना कधी तरी सरवन भवनाबद्दल ऐकून माहिती असेल. कदाचित तेथील खाद्य पदार्थांची चवही घेतली असेल. चेन्नईसाठी सरवन भवन चेन हॉटेल्समधील शाकाहारी खाद्यपदार्थ म्हणजे जणू मेजवानीच. भारत भर 33 शाखा व परदेशात 47 शाखा चालवणाऱ्या एवढ्या मोठ्या कारभारामागे 66 वर्षाच्या राजगोपाल या व्यक्तीची दूरदृष्टी, त्याचे श्रम व मिळालेल्या संधीचे सोने करण्याची जिद्द आहेत. चेन्नईच्या हॉटेल व्यवसायात याचा भार मोठा दबदबा आहे.



शाकाहारी हॉटेल व्यवसायाला त्यानी गौरव प्राप्त करून दिले असेच अनेकांचे मत आहे. सरवन भवनशी स्पर्धा करणाऱ्या मुरुगन इडलीच्या व्यवस्थापकाच्या मते राजगोपाल यानी या व्यवसायात क्रांती केली आहे.

नाडार या मागास जातीत जन्मास आलेला राजगोपाल यानी एके काळी चेन्नई येथे फक्त ब्राह्मणांचीच मक्तेदारी असलेल्या हॉटेल व्यवसायाची सूत्रे स्वतःच्या हातात घेतली व व्यवसायाला प्रतिष्ठा मिळवून दिली असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. आयटी इंडस्ट्रीत जम बसवत असलेल्या मध्यमवर्गाची पारंपरिक शाकाहारी खाद्य पदार्थांची मागणी पूर्ण करण्यात

राजगोपाल यशस्वी झाला आहे. चेन्नई शहरातच या हॉटेल्सच्या एकूण कामगारांची संख्या 800 आहे. आयटी सारख्या प्रगत उद्योगातील सोई सुविधा – ट्यूशन फी, घरभाडे, हॉस्पिटल्सचा खर्च, वाहन सुविधा, निवृत्तीवेतन इ.इ. – या चेन हॉटेल्सच्या कामगारांना दिल्या जातात. म्हणूनच हा कामगार वर्ग त्याच्याप्रती श्रद्धा बाळगून आहे. राजगोपाल यानी आपल्या जन्माच्या ठिकाणी एक प्रचंड देऊळ बांधले असून दर्शनासाठी हजारोंच्या संख्येनी तेथे भक्त येतात. त्याचप्रमाणे सरवन भवनातील खाद्यपदार्थासाठीसुद्धा मोठ्या प्रमाणात ग्राहक येत असतात.

या चेन हॉटेल्सच्या बिझिनेस मॉडेलला कुठल्याही प्रकारचा धोका नाही हे राजगोपालच्या अटकेनंतर सिद्ध झाले. सरवन भवनाचा जगभर विस्तार होत असताना राजगोपाल याला एका खुनाच्या आरोपाखाली अटक करण्यात आली होती. त्याच्यावर खटला भरला गेला व त्यात त्याला जन्मठेपेची शिक्षा झाली. परंतु हा केवळ 11 महिन्यानंतर जेलमधून बाहेर आला. काही दिवसातच त्याच्या चेन हॉटेलची एक शाखा हॉंगकॉंग येथे व दुसरी शाखा ऑस्ट्रेलियातील सिडनी येथे उघडली. या ठिकाणी पंचतारांकित हॉटेल उघडण्याचाही विचार त्याच्या डोक्यात घोळत होता.

सरवन भवनाची खासीयत इडली व मेदू वडा (वडाई) या ‘टिफिन’ पदार्थात आहे. सोनेरी रंगाचा खरपूस मसाला दोसा, पांढरे शुभ्र इडली (त्याभोवती रंगीत चटण्याची आरास), व डोव्हनटसदृश मेदू वडा यांना नुसते बघितले तरी तोंडात पाणी सुटेल. सकाळपासून रात्रीपर्यंत यांचे उत्पादन होत असते व चवीतही अजिबात फरक पडत नाही. या चेन हॉटेल्सच्या कांउटरवर 1997 साली (म्हणजे त्याच्या अटकेपूर्वी) प्रकाशित झालेले I Set My Heart on Victory या पुस्तकाची विक्रीसुद्धा होत असते. राजगोपाल यानी लिहिलेल्या

(वा लिहून घेतलेल्या!) त्याच्या आठवणी, कार्यशैली व स्वतःचा उदोउदो करून घेणाऱ्या घटनांची त्यात माहिती आहे.

राजगोपालची ही कथा 1947 सालापासून सुरु होते. तमिळनाडूच्या दक्षिणेकडील पुन्नयाडी या खेड्यात त्याचा जन्म झाला. हे गाव इतके छोटे आहे की तेथे एस टी बसेससुद्धा कधी थांबत नव्हत्या. मातीने सारवलेल्या घरात त्याचे कुटुंब राहत होते. सातवीत असताना त्यानी घर सोडले व हातात एक टॉवेल घेऊन एका सामान्य दर्जाच्या चहाच्या टपरीत टेबल पुसण्याचे काम तो करू लागला. जवळच असलेल्या वाहत्या नदीत आंघोळ व टपरीतील चहाच्या भट्टीसमोर झोप. परंतु त्याचा स्वतःवर भरपूर विश्वास होता. काही दिवसानी टपरीच्या मालकानी याला चहा करण्याचे गुपित सांगितले. फक्कड चहा बनवण्याचे तंत्र त्याला सापडले. मालक एकदम खूश!

काही दिवसातच हॉटेल पोऱ्याच्या कामाचा त्याला कंटाळा आला. कुणालाही काहीही न सांगता तो चेन्नईला (पूर्वीचे मद्रास शहर) पळून गेला.शहराच्या बाहेरच्या केके नगर या भागात त्यानी किराणामालाचे एक छोटेसे दुकान उघडले. त्या काळी त्या भागात एकही खानावळ नसल्यामुळे जेवणासाठी त्याला टी नगरपर्यंत पायपीट करावे लागत असे. 1979 च्या सुमारास शेजाऱ्याशी गप्पा मारत असताना केके नगरमध्येच एक हॉटेल उघडण्याची कल्पना त्याला सुचली.

शंभर वर्षापूर्वी मद्रास येथे एकही खानावळ नव्हती. पारंपरिक पद्धतीने आयुष्य काढणाऱ्या येथील कर्मठ लोकांना बाहेरचे खाणे निषिद्ध होते. 1950च्या सुमारास कुठेतरी एखादे तुरळक हॉटेल तेथे दिसू लागले. व त्याही ब्राह्मणाकडून चालणाऱ्या व ब्राह्मणासारख्या उच्चवर्णीय प्रवाश्यासांठी होत्या. इतर जातींना तेथे मज्जाव होता. मोजकेच खाद्य पदार्थ बनविणाऱ्या अशा हॉटेल्मध्ये सोवळ्या ओवळयांचा बडेजाव होता. स्वयंपाकी, वाढपी, पाणी

देणारे, उष्टे काढणारे... सर्व ब्राह्मणच असायला हवेत अशी अलिखित अट होती. इतर जातीच्या ग्राहकांनी उष्टे केलेल्या कप-बश्या, प्लेट-वाट्या स्वच्छ धुऊन ठेवले तरी ब्राह्मण ग्राहक त्यांना शिवत नसे. ब्राह्मण वर्गाची नाराजी पत्करून हॉटेल चालवणे शक्य होत नसे. कारण अतिरिक्त पैसा याच वर्गाकडे होता व इतर जाती पोटा-पाण्यापुरते कमावत असत. त्यामुळे त्यांना हॉटेलची चैन परवडत नसे. नाडार जातीच्या या पोऱ्याला हॉटेल चालवण्यास देणारे तरी सोडा, खानावळीत जेवायला प्रवेश देणारेसुद्धा त्याकाळी नव्हते. काही ठिकाणी मात्र इतर जातीचे व इतर जातीसाठी हॉटेल्स दिसू लागले.

अगोदरच नुकसानीत चालत असलेल्या या इतर जातीच्या हॉटेल्समध्ये गुंतवणूक करणे राजगोपालला शक्य नव्हते. शेवटी 1981 साली केकेनगर येथे त्यानी एक छोटीशी चहाची टपरी उघडली. धंदा नीटसा चालत नव्हता. किराणामालाच्या विक्री खरेदीचाच अनुभव गाठीशी असल्यामुळे काही महिन्यात त्याच्यावरील कर्जाचा बोजा वाढू लागला. परंतु एका ज्योतिषाने *जवळ अग्नी असलेल्या धंद्यात बरकत होईल* असे वर्तवल्यामुळे अजून काही दिवस वाट बघण्याचे त्याने ठरवले. त्याच्या एका हितचिंतक सल्लागाराने *जास्तीत जास्त स्वस्त माल, टाकाऊ भाज्या, कामगारांना कमीत कमी पगार व स्वयंपाकासाठी रस्त्यावरील कुठल्याही उपाशी भटक्याला पकडून काम करून घेतल्यास नुकसान होणार नाही* हा कानमंत्र दिला. त्यानी लिहिलेल्या आठवणीत सल्लागाराचा हा सल्ला त्याला आवडला नाही असे नमूद केले आहे. सल्लागाराचे न ऐकता चांगले पदार्थ, चांगल्या दर्जाचा भाजीपाला, कामगारांना इतर हॉटेलपेक्षा जास्त पगार यावर त्यानी भर दिला. याचे परिणाम म्हणजे काही दिवसातच महिन्याला 10 हजार रुपयाचा तोटा होत आहे हे त्याच्या लक्षात आले. कारण त्याकाळी खाद्य पदार्थांच्या किंमती

रुपया-दीड रुपया एवढ्याच होत्या व 10 हजार ही कर्जाची रक्कम फारच मोठी होती.

परंतु पुढील काही महिन्यात याच्या हॉटेलातील खाद्य पदार्थ रुचकर व स्वस्त आहेत याची मौखिक जाहिरात होऊ लागली. बघता बघता ग्राहकांच्या संख्येत मोठ्या प्रमाणात वाढ झाली. कर्ज फिटले. फायदा होऊ लागला. इतर ठिकाणी शाखा उघडण्याचा विचार घोळू लागला. कामगारांनी साथ दिली. प्रोत्साहन मिळाले. धोका पत्करून शाखा उघडली. विश्वासू नोकर मिळाले. कामगारांच्या पगारात वाढ, मोफत रोगोपचार, कामगारंच्या मुलींच्या लग्नासाठी विनव्याजी कर्ज इत्यादी सुविधा तो देऊ लागला. इतर व्यावसायिकांच्या तुलनेत हे कामगार आपल्या मालकावर खुश होते. राजगोपाल हा कामगारांच्या दृष्टीने 'आण्णाची' – मोठा भाऊच होता.

1990 च्या नंतर चेन्नईतील अनेक उपनगरामध्ये सरवन भवनाच्या पाट्या झळकू लागल्या. चेन्नईच्या नागरिकांना सरवन भवन म्हणचे जणू मॅक्डोनाल्डच वाटत आहे. खाण्याच्या जागेत भरपूर उजेड, खाद्यपदार्थांची उच्च व सातत्य असलेली गुणवत्ता, सगळयाच शाखामधल्या पदार्थांची एकाच प्रकारची चव, hot, healthy, hygienic हा मंत्र, पारदर्शक स्वयंपाकाची जागा, पिण्यासाठी फिल्टरचे पाणी, त्यामुळे ग्राहकांची प्रथम पसंती या चेन हॉटेल्सना आहे.

मॅक्डोनाल्डसारखे बाहेरून तयार केलेले खाद्यपदार्थ येथे आणल्या जात नाहीत. सर्व पदार्थ येथेच तयार होतात. इतर हॉटेल्सप्रमाणे रात्री उरलेले पदार्थ ठेवण्यासाठी येथे फ्रीझरसुद्धा नाही. फक्त भाजीपाल्यासाठी कूलरचा सोय आहे. दोश्या-इडलीचे पीठसुद्धा हॉटेलच्या जागेतच तयार केले जाते. हॉटेलचा स्टाफ राजगोपाल देत असलेल्या पगारावर खुश आहे. प्रत्येक व्वस्थापकाकडे मोबाइल, व बाइक असल्यामुळे हा वर्ग मालकाबद्दल

अत्यंत आत्मीयतेने बोलत असतो. बाइकच्या दुरुस्तीसाठी मेकॅनिकसुद्धा या कंपनीचाच पगारदार नोकर आहे. (एके काळी दाढी कटिंगचे पैसेसुद्धा भत्ता म्हणून वेटर्सना मिळत होते!)

2000 साली सरवन भवनाची एक शाखा दुबईमध्ये राजगोपालचा मुलगा शिवकुमार याच्या पुढाकाराने उघडली. चित्रपटाच्या फर्स्ट डे फर्स्ट शो सारखे




हॉटेलच्या उद्घाटनाच्या दिवशी गर्दी उसळली होती. बघता बघता पॅरीस, फ्रँकफुर्ट, लंडन, डल्लास, दोहा इत्यादी ठिकाणी सरवन भवनच्या शाखा उघडल्या व धंदाही चांगल्या प्रकारे चालू लागला. ज्या शहरात लक्षणीय प्रमाणात भारतीय आहेत त्याच शहरात शाखा उघडण्याचे धोरण कंपनी राबवते. सामान्यपणे प्रत्येक शहरात एकच शाखा असते. अपवाद फक्त मॅनहाटनचा, जेथे दोन शाखा आहेत. जे भारतीय होमसिक् आहेत त्यांच्यासाठी भारतीय चेफनी बनवलेले खास भारतीय शाकाहारी पदार्थ –

अगदी चेन्नईमध्ये बनवल्यासारखे – सरवन भवनामध्ये मिळत असल्यामुळे ग्राहकांची गर्दी होते. त्या देशातील स्थानिक नागरिकांना आग्रह करण्याची वा त्यांना आकर्षित करण्याची गरजच त्यामुळे भासत नाही.

***

2002 साली सिंगापूर व कॅलिफोर्निया येथे शाखा उघडताना राजगोपालवर प्रेयसीच्या खुनाचा खटला भरला गेला. जिच्याशी त्याला लग्न करावेसे वाटत होते तिलाच त्यानी मारून टाकले असा आरोप त्याच्यावर होता. त्याच सुमारास ओमान, कॅनडा, मलेशिया, येथे सरवन भवनाच्या शाखा उघडल्या. 2004 साली राजगोपालवरील खुनाच्या आरोपाच्या खटल्याचा निकाल लागला. स्थानिक न्यायालयाने त्याला 10 वर्षाची सक्षम कारावासाची शिक्षा सुनावली. याच कालखंडात या हॉटेलच्या 29 शाखा जगभर पसरल्या होत्या. राजगोपालला या झालेल्या शिक्षाबद्दल विचारल्यावर "मी कुणाच्याही मृत्युला जबाबदार नाही. दुसऱ्यानी केलेल्या कृत्यासाठी मला शिक्षा भोगावी लागत आहे. व मी ईश्वराची प्रार्थना करतो. खरे पाहता ईश्वरानीच मला तुरुंगात पाठवले तेही माझ्या भल्यासाठीच. कारण माझा मुलगा, शिवकुमारला या व्यवसायाचा अनुभव यावा हे ईश्वराच्या मनात होते."

आठ महिने शिक्षा भोगल्यानंतर सुप्रीम कोर्टाने प्रकृती अस्वास्थ्याच्या निमित्ताने शिक्षा भोगण्यास स्थगिती दिली. 2009 साली मद्रास हायकोर्टाने त्याचे अपील फेटाळले व खालच्या कोर्टाच्या निकालावर शिक्का मोर्तब केले. एवढेच नव्हे तर खुनाबरोबर कट कारस्थान रचल्याच्या आरोपावरून शिक्षेत वाढ केली. पुढील 3 महिन्यात जामीनावर सुटून तो जेलबाहेर पडला. कारण त्यानी झालेल्या शिक्षेच्या विरोधात सुप्रीम कोर्टात अपील केले. हे अपील सुनावणीस येण्यास किती कालावधी लागेल, किती वर्ष लागतील याचा कुठलाही अंदाज नसल्यामुळे शिक्षा न झाल्यासारखे त्याचे दैनंदिन

व्यवहार चालू झाले. सुप्रीम कोर्टाने त्याचा पासपोर्ट जप्त केल्यामुळे तो परदेशी जाऊ शकत नाही याचा अपवाद वगळता त्याच्या जीवनशैलीत कुठलाही फरक पडला नाही. खुनाच्या आरोपानंतरच्या 12 वर्षाच्या कालावधीत बाहेरच्या देशात कित्येक शाखा उघडलेले आहेत.

चेन्नई येथील स्थानिक वृत्तपत्रात मोठमोठ्या मथळयाखाली राजगोपालवरील खटल्याच्या बातम्या प्रसिद्ध होत होत्या. तिखट मीठ लावून बदनामकारक मजकूर छापला जात होता. निंदा नालस्ती केली जात होती. त्याच्या जागी इतर कुणी लेचा पेचा असता तर तो कधीच या प्रसंगातून सावरला नसता. *हा संपला त्याचा व्यवसाय संपला, सरवन भवन गाशा गुंडाळणार* अशी अटकळ बांधली जात होती. परंतु हॉटेल्समधील गर्दी काही कमी झाली नाही. त्याच्यावरील शिक्षेचा परिणाम त्याच्या धंद्यावर झाला नाही हे विशेष.

खेडेगावातील बेकार, भटक्या, अनाथ मुला-मुलींना/तरुण-तरुणींना हेरून तो त्याच्या कंपनीत भरती करतो व कामाचे प्रशिक्षण देतो. त्यांच्या खाण्या-पिण्याची व राहण्याची सोय करतो. त्यामुळे त्याच्या हॉटेल्सचे कामगार कायमच मालकाच्या उपकाराच्या ओझ्याखाली राहतात. मुळात राजगोपालला स्वतःच्या प्रसिद्धीची हौस नाही – फक्त हॉटेल्सचे नाव झळकत असणे त्याला पुरेसे वाटते. त्यामुळे हॉटेलात येणाऱ्या ग्राहकांना हॉटेल व हॉटेलचा मालक यात फरक करणे शक्य होते. *एखाद्या खुनी माणसाच्या हॉटेलमध्ये जाऊन त्याला श्रीमंत करत राहणे योग्य नाही* असे जरी एखाद्याने नाक मुरडले तरी *मी कुणाशी व्यवहार करतो याचे मला देणे घेणे नाही तो दारुडा आहे का, तो बायकोली मारहाण करतो का असले प्रश्न मी विचारणार नाही. जोपर्यंत त्याच्या हॉटेलमध्ये माझ्या चवीचे रुचकर पदार्थ मिळतील तोपर्यंत मी त्याच्या हॉटेलमध्ये जाईन.* अशी मानसिकता बहुतांश ग्राहकामध्ये

असते. कदाचित येथील कामगारांनासुद्धा मालकावरील आरोप वा त्याचे तुरुंगातील वास्तव्य याबद्दल काही वाटत नसावे. त्यांच्या दृष्टीने राजगोपाल हा प्रत्यक्ष परमेश्वरच. एकदा राजगोपाल तुरुंगात असताना उपनगरातील एका सरवन भवनात 10 -12 गुंड–मवाली शिरले व तेथील वेटर्सना उद्देशून मालकाबद्दल यद्वा तद्वा बडबडू लागले. अगदीच पाप्याचे पितर असलेल्या एका बारक्या वेटरला राग आला व एका जग् मध्ये असलेले पाणी त्यानी त्यांच्या म्होरक्याच्या अंगावर ओतत "अजून एक शब्द जरी मालकाच्या विरोधात उच्चारल्यास जग् मधील पाणी तुझ्या अंगावर नव्हे तर तोंडात ओतीन, हे लक्षात ठेव" अशी धमकी दिली. तोपर्यंत इतर सर्व वेटर्स त्या बारक्याभोवती कडे करून उभे राहिले.

कामगारांची कुठलीही तक्रार असली तरी ते राजगोपालपर्यंत पोचते. त्याच्या दरबारात योग्य फैसला होतो याची तक्रारदाराला खात्री असते. रात्रीचे 11 -12 वाजेपर्यंत राजगोपालचे ऑफिस उघडे असते. काही वेटर्स खोटे बोलतात, भांडखोर असतात हेही त्याला माहित असते. परंतु त्यांना त्यांच्या भाषेत चार सब्द सुनावल्यानंतर त्याला उदार मनाने क्षमा केली जाते. चुका होतातच हे त्याच्या मागचे कारण असावे.

***

राजगोपालच्या गुन्ह्याची केस मद्रास हायकोर्टात दाखल झाली होती. 30000 शब्दांच्या निकाल पत्रात कोर्टाने *कुठल्याही साक्षीदाराला फोटोग्राफिक मेमरी नसते, त्यामुळे काही वर्षापूर्वी घटनांचे तंतोतंत शब्दचित्रण करणे अशक्यातली गोष्ट ठरेल व्हिडिओटेपप्रमाणे मागे पुढे करून घटनाक्रम दाखवता येत नाही* अशा प्रकारचे ताशेरे ओढून राजगोपालला अनुकूल होईल अशी शब्दरचना करून जीवज्योतीच्या खून खटल्याचा निकाल लावला.

राजगोपालला एका ज्योतिषाच्या भाकिताप्रमाणे त्याच्याच हॉटेलमधील मॅनेजरच्या मुलीशी लग्न करायचे होते. जर लग्न झाले असते तर हे त्याचे तिसरे लग्न ठरले असते. यापूर्वी त्याचे लग्न 1972 मध्ये झाले होते व त्या पत्नीपासून त्याला दोन मुलं होती. दुसरे लग्न 1994 मध्ये झाले होते.

जीवज्योतीला राजगोपालसारख्या म्हाताऱ्याशी लग्न करायचे नव्हते. शांतकुमार नावाच्या तिच्या भावाच्या मित्राच्या प्रेमात ती पडली होती व त्यांच्यात आणाभाकाही झाल्या होत्या. 1999 साली जीवज्योती शांतकुमारबरोबर घरातून पळून गेली. परंतु राजगोपाल सूडाने पेटला होता. तिला त्याने एक ट्रॅव्हल एजन्सी खोलून दिली होती. तिला भरपूर दागिने, कपडे-लत्ते, रोख पैसा भेट म्हणून दिले होते. जीवज्योतीसुद्धा ती भेट स्वीकारत होती. मात्र ती कधीच राजगोपालची इच्छा पूर्ण करत नव्हती वा करणारही नव्हती. 28 सप्टेंबर 2001 च्या रात्री राजगोपाल जीवज्योती व शांतकुमार राहत असलेल्या घरी गेला. शांतकुमारला "दोन दिवसात जीवज्यातीशी असलेले संबंध तोड. नाहीतर तुला जिवेनिशी मारून टाकीन" अशी धमकी दिली. जीवज्योतीला उद्देशून "माझी दुसरी बायको तुझ्यासारखीच लग्नाला नकार देत होती, पिरी पिरी करत होती. परंतु आता ती एखाद्या महाराणीसारखे जीवन जगत आहे." असे म्हणत होता.

त्याच्या धमकीला घाबरून ते दोघेही रातोरात पळून जायचे ठरवत होते. परंतु राजगोपालनी पाळलेले पाच गुंड व त्यांचा म्होरक्या डेनियल त्यांच्यावर पाळत ठेवून होते. या सर्वांनी मिळून त्या दोघांना एका अंबॅसडर कारमध्ये कोंबून केकेनगर येथील सरवन भवनाच्या वखारीत आणले. तेथे राजगोपाल हजर होता. कोर्टाच्या नोंदीप्रमाणे राजगोपालने शांतकुमारला भरपूर चोपले. जीवज्योती मध्ये पडून शांतकुमारच्या जीवाची भीक मागत होती. राजगोपालने गुंडांना बोलवून शेजारच्या खोलीत मारहाण करण्यास सांगितले. जीवज्योती

रात्रभर रडत होती. दुसऱ्या दिवशी डेनियलने तिची क्षमा मागितली व पोलीसाकडे जाण्यास सांगितले. नंतर या जोडप्याला एका गुप्त ठिकाणी कोंडून ठेवले. राजगोपालच्या माणसांची दिवस-रात्र पाळत असूनसुद्धा आक्टोबर 12 ला दोघेही तेथून पळून गेले व पोलीस कमिशनरच्या ऑफिसमध्ये रीतसर तक्रार नोंदविली. पुढील 6 दिवसानंतर राजगोपालच्या गुंडानी पुन्हा एकदा त्याना पळवून नेऊन दोन वेगवेगळ्या ठिकाणी कोंडून ठेवले. जीवज्योतीला राजगोपाल बसलेल्या मर्सीडीस गाडीत ढकलून दिले. राजगोपालने अत्यंत अभिमानाने तिने केलेल्या पोलीस तक्रारीची कागदं तिच्यासमोर फाडले.

हे सर्व कसे काय घडू शकते याचा सुगावा कधीच लागला नाही. भारतातील न्यायव्यवस्था इतक्या खालच्या पातळीवर जाईल याची कल्पनाच कुणी करू शकणार नाही.

जीवज्योतीला शांताकुमारचे पुढे काय झाले याचा पत्ता नव्हता. अचानक एके दिवशी त्याचा फोन आला. त्याला मारून खलास करण्यासाठी राजगोपाल यानी 5 लाखाची सुपारी डेनियलला दिली होती. परंतु डेनियलने त्याला न मारता मुंबईला पळून जाण्यास मदत केली असे त्यानी तिला कळवले. शांतकुमारला परत येण्याची तिने विनंती केली. *आपण दोघेही राजगोपालच्या पाया पडू, क्षमा मागू व आपल्यावर सूड न उगवण्यासाठी विनंती करू* असे तिने सांगितले म्हणे. कोर्टाने मात्र या दोघामधील अतूट नात्याची नोंद घेतली होती.

हे दोघे, जीवज्योतीचे आई वडील व भाऊ राजगोपालला भेटले. त्यानी त्यांना शेजारच्या खोलीत बसायला सांगितले. डेनियलला बोलवून "शांतकुमारचे काय झाले?" अशी विचारणा केली. डेनियलने "आम्ही त्याला रेल्वे रुळावर बांधून ठेवले होते व रेल्वे त्याच्या अंगावरून गेल्यानंतर त्याचे कपडे जाळून टाकले" असे सांगितले. शेजारच्या खोलीतील शांतकुमारला

बोलावून "हे त्याचे भूत आहे का?" असे तो ओरडला. डेनियलने राजगोपालचा विश्वासघात केल्याबद्दल जीवज्योतीच्या कुटुंबियानी त्याची माफी मागितली. राजगोपालची माणसं या सर्वांचे भूत उतरवण्यासाठी एका कारमधून लांबच्या गावी नेल्याची नोंद सुनावणीच्या वेळी केली.

31 आक्टोबरला शांतकुमार याचे प्रेत कोडायकनालच्या जंगलात सापडले. गळा दाबल्यामुळे मृत्यु झाल्याची नोंद पोस्टमार्टेम रिपोर्टमध्ये होती. तेथेच कुठे तरी खुनाचे हत्यार – एक लुंगी - सापडली.

डेनियलला खुनाच्या आरोपाखाली पकडण्यात आले. राजगोपालची जामीनावर सुटका झाली. जीवज्योती कुठे आहे, काय करते याचा अजूनही शोध लागत नाही.

***

राजगोपालच्या पुन्नायडी गावाचे नाव आता पुण्याई नगर झाले आहे. राजगोपाल अत्यंत अभिमानाने त्या गावचा विकास मीच केला असे सांगत असतो. नियमितपणे आता तेथे एस टी बसेस थांबतात. जनसंख्येत फार मोठी वाढ झालेली नसली तरी गावात मोठ्या प्रमाणात पैसा खेळत आहे. चार एकर जागेत सरवन भवन हॉटेल बरोबरच लाखो रुपये खर्चून तेथे एक देऊळ बांधलेले आहे. 90 घर असलेल्या या गावात सरवन भवनमध्येच 140 कामगार आहेत. यावरून देवदर्शनास येणाऱ्या भक्तांचा नक्कीच अंदाज येईल. राजगोपालच्या जुन्या राहत्या घरात भिंती भरून देव देवतांचे फोटो लटकवलेले आहेत. घराचा काही भाग वेटर्सना राहण्यासाठी दिलेला आहे.

राजगोपाल जेलमध्ये असताना जेलमधील जेवण सुधारण्याचा प्रयत्न करत होता म्हणे. परंतु त्याला त्याच्या आवडीचे जेवण मिळण्यासाठी महिना लाख रुपये लाच द्यावी लागत होती.

राजगोपालचा मुलगा, शिवकुमारला इंजिनियर व्हायचे होते. परंतु बापाच्या आग्रहामुळे त्याला हॉटेल व्यवसायात पडावे लागले. आता तोच सर्वे सर्वा आहे. त्याचा लहान भाऊ, सरवन, परदेशातील व्यवहार सांभाळतो. शिवकुमारचे इंजिनियरिंगचे वेड कमी झालेले नाही. त्यामुळे त्याच्या चेन हॉटेल्समध्ये ऑटोमेशन, संगणकीकरण होत आहे.

एका अल्पशा चुकीमुळे राजगोपालचे डागाळलेले चारित्र्य सरवन भवनाच्या स्वरूपातून पुसून जाण्याची शक्यता आहे असे त्याच्या मुलां – बाळांना वाटत आहे.

आज या चेन हॉटेल्सची किंमत 5200 कोटी रुपयापर्यंत पोचली आहे. म्हणूनच या आठवड्यात या चेन हॉटेल्सच्या ठिकाणी इनकम टॅक्स डिपार्टमेंटची धाड पडली, अशी बातमी आहे.



# डिझायनर्स बेबी'चे (दु:)स्वप्न



## जियांक्वीची जनुकीय बदलाची किमया

त्या चिनी वैज्ञानिकाचे नाव आहे जियांक्वी. वय सुमारे 35 वर्षे. 2 महिन्यापूर्वी (मार्च 2019) वैज्ञानिक जगाला त्यानी फार मोठा धक्का दिला. एका गर्भिणीच्या भ्रूणमधील जनुक बदलून त्यानी केलेल्या प्रयोगामुळे चक्क जुळी मुलं जन्माला आल्या. या जनुक बदलाच्या यशस्वी प्रयोगाची घोषणा त्यानी केल्यानंतर वैज्ञानिक अवाक झाले. त्यानी घोषित केलेली किमया कदाचित फार मोठी नसेलही. परंतु मानवी पेशीतील जनुक बदल न करण्याचा आंतरराष्ट्रीय करार त्यानी धुडकावली म्हणून वैज्ञानिक जग कावरे बावरे झाले.

‘डिझायनर्स बेबी’ची ही प्रत्यक्षातली चाहूल असे वैज्ञानिकांना वाटल्यामुळे या संकटातून बाहेर कसे पडता येईल याचा विचार करू लागले.

चीनच्या सदर्न सायन्स विद्यापीठाच्या हे जियांक्वीने ह़ॉंगकॉंग येथील एका वैज्ञानिक परिषदेत स्वतः केलेल्या प्रयोगाबद्दलची सविस्तर माहिती दिली. माहिती कळल्या कळल्या विद्यापीठाचे कुलगुरू तातडीने विमानाने परिषदेच्या स्थळी पोचलेसुद्धा! हे जियांक्वीला अटक करून एका अज्ञात स्थळी रवानगी करण्यात आली. चीनचे आरोग्य खाते, विज्ञान खाते इ.इ. सकट सर्वांनी हे जियांक्वीचे हे कृत्य अक्षम्य आहे असे जाहीर केले. त्याच्या भोवती पोलीस पहारा वाढवण्यात आला. कदाचित त्याला फाशीची शिक्षा होण्याची शक्यता वर्तवली जात आहे.

वैज्ञानिकाच्या प्रयोगाबद्धल एवढी तीव्र तिखट प्रतिक्रिया अलीकडच्या काळात कधीच उमटली नसेल. हे जियांक्वीने नेमके काय केले म्हणून जगभर त्याबद्दल एवढे उलट-सुलट बोलले जात आहे? एड्सग्रस्त पुरुषापासून एक महिला गर्भवती झाल्यामुळे जन्माला येणारे मूल निरोगी रहावे म्हणून हे जियांक्वीने भ्रूणमधील जनुकामध्ये काही बदल करून गर्भांकुराला वाढू दिले. अगदी अनपेक्षितरित्या त्या महिलेला जुळी मुलं झाली व रक्त तपासणीत त्या मुलीमध्ये एड्सचे कुठलेही जीवाणू नसल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याचा जनुक बदलाचा प्रयोग यशस्वी झाला होता. या मुली एड्समुक्त जीवन जगू शकतात याची खात्री झाल्यानंतर डिझायनर्स बेबीचे स्वप्न प्रत्यक्षात आले म्हणून त्यानी आपण एका नवीन जीवसृष्टीला जन्म दिलेल्या आपल्या प्रयोगाची जाहीर वाच्यता केली.

**मानवी जनुकीय बदलाचा धसका**

खरे पाहता एका जिवाला आनुवंशिक रोगापासून मुक्त करणे हा अपराध होऊ शकतो का? इतर वैज्ञानिकांनी एवढे आकाश पातळ करण्याची खरोखरच

गरज होती का? पिकामधील जनुक बदलातून नवीन तळीला जन्म देणाऱ्यांचे कौतुक करत असताना मानवी जनुक बदलाची एवढी धास्ती का घेतली जात आहे? मांसाहारासाठी पाळलेल्या प्राण्यांच्या जनुकात बदल करून पैदास करण्यात काहीही गैर नाही असे असताना जनुक बदलातून जन्माला येणाऱ्या अपत्याची मानवी प्राण्याने अपेक्षा केल्यास त्यात काय चूक आहे? असे अनेक प्रश्न यासंबंधी विचारता येतील.

मानवी गर्भाच्या जनुकांवर संशोधन करून त्यात सुधारणा केल्यास गर्भाची वाढ आणि गर्भाची रचना यातील अनेक दोष टाळता येऊ शकतात. अपंगत्व, मूकबधीरपणा, रक्तदोष इत्यादी जन्मजात समस्यांवर सध्या उपलब्ध असणाऱ्या अत्याधुनिक वैद्यक शास्त्रातही खात्रीचे उपाय नाहीत. पण जनुकीय अभ्यासातून हे उपाय शोधण्याच्या दृष्टीने दिशा मिळू शकते, असे संशोधकांचा दावा आहे. काही वर्षापूर्वी शोधलेल्या क्रिस्पर तंत्रज्ञानामुळे मानवी जनुकात हवे तसे बदल करणे सहजपणे शक्य होत आहे. त्यामुळे गेल्या 4-5 वर्षामध्ये या तंत्रज्ञानाला अतिशय महत्व प्राप्त झाले आहे.

खरे पाहता उत्क्रांतीच्या प्रदीर्घ वाटचालीतून झालेले सजीव सृष्टीतील बदल नैसर्गिक असून त्याबद्दल मानवी प्राणी निसर्गाचा अत्यंत ऋणी आहे. परंतु एका अर्थी जनुकीय परिवर्तनाचे तंत्रज्ञान म्हणजे प्रति ब्रह्मसृष्टी असेच या क्षेत्रातील कित्येक वैज्ञानिकांना वाटत आहे. जगाच्या प्रारंभापासूनच्या आतापर्यंतच्या विज्ञान इतिहासात मुद्दामहून केलेल्या जनुक बदलातून सजीव निर्मितीचे एकही उदाहरण सापडत नाही. सजीव प्राण्यांच्या प्रत्येक पेशीत ए, सी, जी, टी या अक्षराने ओळखल्या जाणाऱ्या प्रथिनांच्या क्रमवारी व संयोजनातून करोडो जनुक निर्माण होत असतात. मानवी प्राण्याच्या पेशीतील जनुकांच्या संघटित संरचनेत बदल केल्यास आनुवंशिक आजारांना रोखण्यापासून मानवी चेहरापट्टी व अंगभूत गुणापर्यंत आपण ठरवलेल्या

आराखड्यानुसार अपत्याला जन्माला घालता येते, असा दावा केला जात आहे. यालाच जिनोम एडिटिंग असे म्हटले जाते. या तंत्रज्ञानाचा वापर करून मानवी सृष्टीत क्रांतीकारी बदल करता येईल असा दावा केला जातो. पीक वाढीसाठी जनुकीय बदलाचे (जीएम) तंत्रज्ञान वापरून गेली कित्येक वर्षे मोठमोठे कार्पोरेट्स आर्थिक फायदा करून घेत असलेली उदाहरणं आपल्या समोर आहेत. या तंत्रज्ञानाच्या वापरातून टोमॅटोची चव बदलली जात आहे. पपईचा ओबडधोबड गोलाकार बदलून पॅकेजिंगला सुलभ व्हावे म्हणून त्याला चौकोनाचा आकार देण्याचे प्रयत्न चालू आहेत. डुक्कर, शेळी, कोंबडी यांच्या शरीरात जनुकीय बदल करून जास्तीत जास्त पैदास करणे शक्य होत आहे. एवढेच नव्हे तर या प्राण्यांचे अवयवांचे मानवी शरीरात अवयवारोपण करणारे प्रयोग केले जात आहेत. मलेरियाचे विषाणू मानवी शरीरात वाढू नये यासाठी जनुकीय बदलाची शक्यता चाचपडली जात आहे. अशा प्रकारे डीएनएमध्ये प्रभावशाली पद्धतीने काही बदल करून एका नव्या सृष्टीच्या निर्मितीचे स्वप्न मानवी प्राणी पहात आहे.

**सुपर ह्युमनचे स्वप्न**

परंतु मानवी क्लोनिंग किंवा जनुकीय फेरबदल यावर नैतिकतेच्या कारणामुळे जगभरातून विरोध होत आलेला आहे. अमेरिकेत मानवी जनुकांमध्ये असे परिवर्तन करण्यास मनाई आहे. डीएनएमधील बदल भावी पिढ्यांपर्यंत प्रभाव सोडत असतात व अन्य जनुकांचे नुकसान होण्याचाही धोका असतो. अशा प्रकारचे प्रयोग करणे हे अत्यंत असुरक्षित असून त्यामुळेच अनेकांनी चीनमधून आलेल्या या वृत्ताची निंदा केली आहे. त्यामुळे हे जियांक्वीच्या दाव्यावरही टीका करण्यात येत आहे. प्रगत देशांनी स्वतःवर घालून घेतलेले कायदे –नियम तितकेसे कडक नसते तर कार्पोरेट्स व संशोधक संस्था संगनमताने एव्हाना मानवी जनुक प्रक्रियेत हस्तक्षेप करून निसर्गाचा

समतोल बिघडवून टाकले असते. गंमत म्हणजे नियम – कायदे करून त्याची अंमलबजावणी करेपर्यंतच्या कालावधीतच जास्त वेगाने नवीन जीव जन्माला घालण्याचे प्रयोग केले जात आहेत. मानवी जेनोमच्या बाबतीत प्रयत्नांची पराकाष्ठा केली जात आहे. कारण सुपर ह्युमन बीइंगला आता अत्यंत प्रचंड प्रमाणात मागणी आहे. काहींना ऑलिंपिकमध्ये जिंकणारे अपत्य हवे असते. काहींना हॉलिवुडच्या हीरो/हिरॉइनला लाजविणारे मूल हवे असते. काहींना आइन्स्टाइनपेक्षा जास्त बुद्धीमान होणारे अपत्य हवे असते. काहींना सैन्यात शौर्य गाजवणारे मूल हवे असते. काही कार्पोरेट्सना तर बिनडोक रोबो टाइप, कधीही संपावर न जाणारे कुशल कामगारांची पिढी हवे असते. अशा प्रकारे अख्ख्या मानव जातीलाच मागणी तसा पुरवठाच्या चक्रात अडकवू पाहणाऱ्या या तंत्रज्ञानाकडे साशंक नजरेने पाहिले जात आहे.

लगाम नसलेल्या व चहूफेर उधळलेल्या घोड्या प्रमाणे हे जैविक तंत्रज्ञान भविष्यकाळात काय काय जन्माला घालेल याचा अंदाज येईनासे झाले आहे. आतापर्यंत कुठले जनुक बदलल्यास काय होईल याचा सैद्धांतिकरित्या अंदाज करण्यात यश मिळाले आहे. परंतु प्रत्यक्ष प्रयोग केल्यास काय दुष्परिणाम होणार आहेत याबद्दल कुणीही बोलायला तयार नाहीत. जर जनुकीय तंत्रज्ञानाचा सर्रासपणे वापर केल्यास भोवतालच्या निसर्गावर काय परिणाम होतील याची किंचितशी कल्पना या क्षेत्रात अभ्यास केलेल्या तज्ञांनासुद्धा नाही. मानवाचे गुणसूत्र व त्याची विवेकबुद्धी यांच्यातील परस्पर संबंध व त्यातून झालेले मानवी विकास याबद्दलचा अभ्यास अजूनही प्राथमिक अवस्थेत आहे. प्राण्याच्या गुणसूत्रात बदल करत असताना भलतेच काही झाल्यास त्या प्राणीला नष्ट करता येईल. परंतु मानवावरील प्रयोग हाताबाहेर गेल्यास त्याला मारून टाकणे अनैतिक ठरू शकेल. त्यामुळेच मानवी जनुकांना धक्का देणारे क्रिस्परसारखे तंत्रज्ञान वापरून जनुकीय प्रयोग करू नये

असे वैज्ञानिक समूहाने आपणहून ठरवले आहे. परंतु हा निर्धार मोडीत काढणारे महत्वाकांक्षी वैज्ञानिक व त्याना साथ देणाऱ्या संस्था (व राष्ट्रे!) असल्यामुळे वैज्ञानिकांचे जग अस्वस्थ होत आहे.

चीनच्या वैज्ञानिकाच्या कृतीचा जगभरातील सर्व वैज्ञानिकानी धिक्कार केला आहे. एक निंदनीय कृती म्हणून त्याचे खंडन केले जात आहे. तरीसुद्धा काही जण After all he did it असे समर्थन करत, सृष्टीकर्त्याचे काम त्यानी केले म्हणून कौतुकही करत आहेत. तरीसुद्धा एखाद्या हीरोसारखे त्याचा मानसन्मान न करता त्याला कैदेत ठेवले हेही नसे थोडके! जपान, अमेरिका, युरोपसारखे देश चीनवर राजकीय वा आर्थिक निर्बंध घालतील या भीतीने कदाचित चीनने हे जियांक्वीला जेलमध्ये रवाना केली असेल. आतापर्यंत थोडे फार नियंत्रण आहे म्हणून उघडपणे या डिझायनर्स बेबीला जन्म घालणाऱ्या तंत्रज्ञानाचे समर्थन केले जात नाही. परंतु गुप्तपणे कुठे काय चालले आहे हे कळण्यास काही मार्ग नाही.

**मानवी शरीरातील जनुकीय बदल**

बीबीसी या वृत्त संस्थेने या विषयी काही गोष्टींची नोंद केली आहे. मानवी डीएनएमध्ये बदल करण्याच्या मुद्यावर वैज्ञानिकांमध्ये वाद आहेत. त्याला क्रिस्पर असं म्हंटलं जातं. कर्करोगासारख्या आजारावर मात करण्यासाठी लोकांच्या डीएनएमध्ये बदल करणे असा त्याचा अर्थ आहे. अद्भुत कल्पना वाटत आहे ना? पण, या तंत्रज्ञानाचा गैरवापर झाला तर? अत्युच्च बौद्धिक क्षमता किंवा विशिष्ट प्रकारचे शारीरिक गुणधर्म असणाऱ्या बाळांना जन्म देण्याची प्रवृत्ती बळावली तर काय होईल याचा आपण विचार केला आहे का?

या बाबीकडे सध्या आव्हान म्हणून पाहिलं जात नाही. पण, भविष्यात हा प्रश्न आपल्याला भेडसावू शकतो. त्यासाठी आपल्याला तयार राहावं लागलं.

यासाठीच वेगवेगळ्या प्रयोगशाळा, विद्यापीठ आणि संशोधन संस्थांवर नीतीशास्त्राच्या अभ्यासकांची नियुक्ती करणं अनिवार्य राहील. जर संशोधक नीतीमत्तेच्या कक्षेबाहेर जाऊन काही निर्णय घेत असतील तर हे नीतीशास्त्र तज्ज्ञ त्यांना मार्गदर्शन करू शकतील. जेव्हा नवीन तंत्रज्ञान आपलं दार ठोठावत असतं. तेव्हा आपण नीतीमत्तेच्या प्रश्नांना बगल देऊन चालणार नाही. या प्रश्नांवर विचार करण्याची सर्वाधिक गरज याच काळात आहे.

एक माणूस म्हणून आपलं अस्तित्व काय आहे याचा सर्वांगानं विचार करण्याची ही वेळ आहे. आपल्या कोणत्या गुणांचं संवर्धन करणं आपल्याला आवश्यक वाटतं याचं आपण चिंतन करणे गरजेचं आहे असं व्हिक्टोरिया विद्यापीठातील नीतीशास्त्राचे प्राध्यापक निकोलस अगार म्हणतात.

**महासंकटाची चाहूल**

नरसंहार करणारे युद्ध व भीषण दुष्काळासारखे नैसर्गिक संकट यावर मात करून फिनिक्स पक्ष्याप्रमाणे उभारी घेणाऱ्या या मानव जातीला पुढील काळात हवामानातील बदल, जैविक तंत्रज्ञान व रोबोटिक तंत्रज्ञान अशा तीन महासंकटाना सामोरे जावे लागणार आहे. या संकटातून मानवजातीला सुटका करून घ्यायचे आहे. या महासंकटाना कुठल्याही राष्ट्रांच्या सीमा रोखू शकत नाहीत. वायू प्रदूषण, जल प्रदूषण रोखण्यासाठीचे उपाय तोकडे पडत आहेत. निसर्गाला ओरबडून आपली चैन करून घेणाऱ्या मानवी समाजाला हवामानातील बदल रोखण्यास अजूनही यश आलेले नाही. जैविक तंत्रज्ञान, माहिती तंत्रज्ञान, रोबोटिक टेक्नॉलाजी, कृत्रिम बुद्धिमत्ता या मानव वंशाला कुठे नेऊन ठेवतील याचा नेम नाही. हे तंत्रज्ञान विकसित होत असताना कुठलाही देश त्याचे नियंत्रण करू शकणार नाही. बायोटेक्, माहिती तंत्रज्ञानाच्या कंपन्या नफेखोरीसाठी काहीही करायला तयार आहेत. या सर्व कंपन्या एकमेकाशी स्पर्धा करत असून आपण मागे राहू नये म्हणून जीवघेण्या

तंत्रज्ञानाच्या शोधात त्या आहेत. याच बरोबर काही अती उत्साही राजकीय नेते या येणाऱ्या संकटांकडे डोळेझाक करत कंपन्यांना काहीही करण्यास पूर्ण मुभा देत आहेत. क्रिस्परसारखे तंत्रज्ञान डिझायनर्स बेबीसाठी कंपन्या वापरत असल्यास पुढचे पुढे, आता कशाला काळजी म्हणत निष्क्रीय राहणे पसंत करतील. आणि वैज्ञानिक मागचे पुढचे विचार न करता प्रयोगावर प्रयोग करत राहतील. त्यामुळेच या सर्व गोष्टींचा सारासार विचार करून पृथ्वीच्या सर्वनाशाला कारणीभूत ठरणाऱ्या तंत्रज्ञानावर नियंत्रण ठेवणारे समाज आता आपल्याला हवा आहे..



# कागद अभियांत्रिकी



संशोधकांच्या जगात ‘कागद अभियांत्रिकी’ वा ‘पेपर इंजिनियरिंग’ हा शब्दप्रयोग प्रत्यक्ष कार्यक्षेत्रात उतरून समस्यावर उत्तरं न शोधता कागदी घोडे नाचविणाऱ्या कचेरीतील बाबूसारखे फक्त कागदावर रेघोट्या मारून काहीतरी केल्यासारखे दाखवणे यासाठी केला जातो. परंतु कागदाच्या घड्या घालून त्यातून वेगवेगळे आकारमान व वस्तूच्या प्रतिकृती करणाऱ्या कारागिरीच्या ओरिगामी या छंदालासुद्धा पेपर इंजिनिअरिंग असे म्हणता येईल. त्या कागदी घड्यांच्यामागे विज्ञान व गणित असून त्याचे गांभीर्याने अभ्यास करणारे संशोधक जगभर विखुरलेले आहेत हे वाचून आश्चर्य वाटेल.

मनाला येईल तसे कागदाच्या घड्या घातल्यानंतर एखादी वस्तूसदृश आकृती तयार होऊ शकते; त्याचे डिझाईन करता येऊ शकते; हे एका प्रकारे डिफरन्शियल जॉमेट्री (Differential Geometry) व इलॅस्टिक मॉड्युली (Elastic moduli )असून त्यातून काय आकाराला येईल याचा

नीटसा अंदाज करता येत नाही. परंतु हे अभ्यासक्षेत्र दिवसे न दिवस वाढत आहे.

जगात जेव्हापासून वस्तूंची निर्मिती झाली तेव्हापासून घड्या घालण्याचा प्रकारही जन्माला आला असावा. कपडे व कागदांच्या घड्या शेकडो वर्षापासून घातल्या जात आहेत. विसाव्या शतकात या परंपरागत विद्येला व्यवस्थितपणा आणण्याचे प्रयत्न केले गेले. व त्यातून ओरिगामी या छंदाचा विकास झाला. ओरिगामी हा शब्दच मुळी जपानी भाषेतील *ओरी* म्हणजे घड्या घालणे व *कामी* म्हणजे कागद यावरून आला आहे. पूर्वीच्या काळी जपानमध्ये ओरिगामीला *टॅटोगामी* म्हणून ओळखले जात होते.



किंडरगार्टन या 4-5 वर्षे वयाच्या पाल्यांना हसत खेळत शिकवण्याची संकल्पना मांडणाऱ्या फ्रेड्रिक फ्रोबेल (1782-1852) कागदाच्या घड्यापासून भूमितीतील आकार समजावून सांगण्याचे प्रयोग करत होता. या फ्रोबियन पद्धतीचा वापर करणाऱ्यांची संख्या हळू हळू वाढू लागली. जगप्रसिद्ध

वास्तुविशारद फ्रँक लॉयडची आई गंमत म्हणून कागदांच्या घड्या घालून भूमितीचे आकृती करण्यात निष्णात होती म्हणे. अनेक शिक्षणतज्ञ याविषयी उत्सुकता दाखवू लागले. 1893च्या सुमारास भारतातील टी सुंदर राव या ब्रिटिश सेवेतील अधिकाऱ्यांचे Geometric Exercises in Paper Folding हे पुस्तक प्रकाशित झाले. युक्लिडच्या कालखंडापासून कंपास व फूटपट्टी वापरून भूमिती शिकवण्याच्या पारंपरिक पद्धतीला टी. सुंदर राव पर्याय शोधत होते. कागदाच्या घड्या घालून 3 ते 15 समान भुजा असलेले आकृत्या काढता येतात हे त्यांनी दाखवून दिले.

भूमितीच्या आकृत्याबरोबर बीजगणितातील समीकरणं सोडविण्यासाठीसुद्धा पेपर फोल्ड्स वापरता येते हेही हळू हळू लक्षात येऊ लागले. कागदाच्या मध्यरेषेवरील एखाद्या बिंदूला कागदाच्या कडा स्पर्ष करत घड्या घालत गेल्यास $y=x^2$ या पॅराबोलाची (parabola ) वक्ररेषा मिळू शकेल. नवीन शिकण्यात मजा असते व भूमितीसाठी युक्लिडच्या पद्धतीव्यतिरिक्त काही असू शकते हेच या पेपर फोल्डिंगने दाखवून दिले. 1936मध्ये मार्गरिटा बेलोक (1879-1976) या



गणितज्ञ महिलेने कागदाच्या घड्या घालून $y=x^3$ या cubic functionला उत्तर शोधून काढली. कागदाच्या घड्या घालून घनमूळ काढता येते हे तिने सप्रमाण सिद्ध करून दाखविले. एखाद्या घनाकृतीच्या दुप्पट घनाकृतीची बाजू किती लांबीची असू शकेल हे युक्लिडच्या पद्धतीप्रमाणे कंपास व फूटपट्टी वापरून काढता येणार नाही. परंतु कागदाच्या घड्या घालून लांबी काढता येते हे मार्गारिटा बेलोकने दाखवून दिले. कागदाच्या घड्या म्हणजे पेन्सिलचा वापर व करता मारलेल्या रेषा याच्यापेक्षा काहीतरी जास्त आहे हेच यावरून दिसून येते.

पेपर फोल्डिंगच्या संदर्भात याहीपुढे जात काही गणितज्ञांनी अनेक संकल्पना मांडल्या. कदाचित प्रत्यक्षपणे हातात कागद घेवून त्यांनी घड्या घातले नसतील. परंतु बौद्धिक प्रयोग म्हणून ते कागदाच्या घड्यांचा वापर मनातल्या मनात करत असावेत. रोजच्या पारंपरिक बीजगणितापेक्षा differential algebraवर त्यांचा भर होता. ते करत असताना कागदाच्या सपाट आकारापेक्षा वक्र आकाराची कल्पना ते करत असावेत. आइन्स्टाइनच्या सापेक्षता सिद्धांतात वापरल्या गेलेल्या काल-अवकाश याच्यासाठीसुद्धा या गणितीय पद्धतीचा वापर केला आहे.

काही वैज्ञानिक पेपर फोल्डिंगच्या संदर्भात शास्त्रीय संकल्पना मांडत असतानाच ओरिगामीच्या कलाविश्वातसुद्धा फार मोठे बदल घडत होते. 1958मध्ये लिलियन ओप्पेनहेमर हिने ओरिगामी USA या केंद्राची स्थापना केली. पूर्वेकडील व पश्चिमेकडील ओरिगामी कुशलतेला हे केंद्र उत्तेजन देऊ लागले. वैयक्तिकरित्या मदतीचा हात देण्यात पुढाकार घेऊ लागले. या कलाक्षेत्रात बुद्धीबळातील खेळाप्रमाणे मास्टर्स तयार करण्यात या केंद्राचा फार मोठा वाटा आहे. मरीन बायालॉजिस्ट मायकेल लाफोस्से व विद्युत अभियंता जॉन मॉंट्रोल या केंद्रातर्फे तयार झाले. ओप्पेनहेमरचा मार्टिन

क्रुस्कल या गणितज्ञ मुलाने नंतरच्या काळात कृष्ण विवरातील काळ-अवकाशासंबंधीच्या अभ्यासासाठी पेपर फोल्डिंग्सची मदत घेवू लागला.

1989मध्ये काही उत्साही ओरिगामी अभ्यासकांनी ओरिगामीचा विज्ञान व अभियांत्रिकी क्षेत्रात कशा प्रकारे उपयोग होऊ शकतो याबद्दल चर्चा करण्यासाठी चर्चासत्राचे आयोजन करण्यात पुढाकार घेतला. लेसर भौतिकीत संशोधन करणाऱ्या रॉबर्ट लँगच्या मते इटलीतील फेरारा येथील चर्चासत्रामुळे जगभरातील ओरिगामीचे गंभीरपणाने अभ्यास करणारे एकत्र आले व या विषयातील संशोधनाला मोठ्या प्रमाणात उत्तेजन मिळू लागले. अलीकडील ऑक्सफोर्ड येथील ओरिगामी अधिवेशनात जमलेल्या प्रतिनिधींनी डॉ. लँगचा एखाद्या रॉकस्टार सेलिब्रिटीसारखे सन्मान केला. कारण प्रयोग शाळेतील वैज्ञानिकाचे कोट उतरवून पूर्ण वेळ ओरिगामीवर ते संशोधन करत आहेत. लँगच्या डोक्यात ओरिगामीचा शिक्षण व कला क्षेत्रातील वापरासंबंधी काही भन्नाट कल्पना आहेत. त्याविषयी ते ओरिगामीवरील लेखन/पुस्तकातून सातत्याने व्यक्त करत असतात. फेरारा व ऑक्सफर्डमधील त्यांची उपस्थिती हौशी ओरिगामीप्रेमींना प्रेरणादायी ठरत आहे.



एक सपाट व कापाकापी न केलेल्या चौकोनी वा आयताकार कागदाच्या घड्यापासून केलेल्या वैशिष्ट्यपूर्ण आकारांचा गणिताशी संबंध जोडत अभ्यास करणाऱ्या डॉ. लँगची हतोटी वाखाणण्यासारखी आहे. कागदाच्या घड्या घालून

काल्पनिक वाटणाऱ्या व/वा अस्तित्वात असलेल्या प्रतिकृती बनविणारी संगणक प्रणालीच त्यांनी विकसित केली आहे. बहुशिंगी हरीण असो की एकमेकाची शिकार करणारा नाकतोड्या असो किंवा पुराणकथेतील एखादा चित्र-विचित्र प्राणी-पक्षी-वृक्ष असो, कागदाच्या घड्या घालून त्रिमितीतील हुबेहूब प्रतिकृती पाहत असताना बघणारे भान विसरतात. एक साध्या कागदाला शंभरेक उलट-सुलट घड्या घालत असे काही तरी बाहेर पडू शकते हे कल्पनेच्या पलीकडे आहे. आणि तेही संगणक प्रणालीतील क्लिष्ट गणिताच्या आधारे! अवकाशाचा इतका सुंदर उपयोग आश्चर्यचकित करणारा आहे!

ओरिगामीच्या माध्यमातून विज्ञानातील समस्यांना उत्तरं शोधण्याचा प्रयत्न टोकियो विद्यापीठातील अवकाश विज्ञान क्षेत्रात संशोधन करत असलेले कोरिओ मिऊरा व मासामारी साकामाकी या प्राध्यापकांनी केला आहे. 1995 मध्ये उपग्रहाच्या उघडझाप करणाऱ्या सौर फलकासाठी ओरिगामीचा त्यांनी वापर केला. मोठ्या आकाराच्या नकाशांच्या व आरेखनांच्या सतत वापर करणाऱ्यांना पारंपरिकपणे केलेल्या काटकोनाच्या आकारातील घड्या किती किचकट आहेत याची नक्कीच कल्पना असेल. कारण वारंवार वापर केल्यामुळे या घड्या नकाशा/आरेखन फाडून तुकडे करून टाकतात. हीच पद्धत सौर फलकासाठी वापरल्यास उपग्रहाचे आयुष्य कमी झाले असते. परंतु या शास्त्रज्ञांनी काटकोन आकारात घड्या न घालता थोडासा कोन बदलून आयताकारात पॅनेल्सची रचना केली. एकमेकाविरुद्ध असलेले कोपरे दुमटून बाहेर ओढल्यास पॅनेल्सची उघडझाप नीट होऊ शकते व घड्या पॅनेल्स फाडत नाहीत, हे त्यांच्या लक्षात आले. ओरिगामी जगात एकाद्याच्या नावाने घडीचे नामकरण करणे हे त्या व्यक्तीचे मोठेपण दर्शविणारे

ठरते. कोरियो मिऊराच्या ओरिगामीसाठीच्या योगदानाच्या सन्मानार्थ मिऊरा ओरी हे नाव एका विशिष्ट प्रकारच्या घड्यासाठी देण्यात आले आहे.



केंब्रिज विद्यापीठात संरचनात्मक गतीशास्त्राचे प्राध्यापक सायमन गेस्ट यांच्या मते ओरिगामी आणि विज्ञान यांच्यात एक अतूट नाते आहे. पहिल्यांदा डॉ. लँग यांचे फोल्डिंग्सची करामत बघितल्यावर शंभरेक प्रकारे वेगवेगळ्या दिशेत हालचाल करण्यातील सुसंबद्धता त्यांना आकर्षित केली. व अशाप्रकारच्या गतीशीलतेला ओरिगामी उपयोगी पडू शकेल याची खात्री पटली. ओरिगामीच्या घड्यामधून नैसर्गिकरित्या अशा प्रकारे चलनवलन शक्य आहे, हे त्यांच्या लक्षात आले.

मिऊरा फोल्डपासून प्रेरणा घेत अनेक वैज्ञानिकांनी व अभियंत्यांनी ओरिगामीबद्दलच्या मुद्रित व इलेक्ट्रॉनिक साहित्यात भर घालत आहेत. 2012साली अमेरिकेतील नॅशनल फौंडेशनने केवळ आवड म्हणून विकसित होत असलेल्या या छंदाला कायदेशीर व संस्थात्मक स्वरूप देण्यासाठी Origami Design for Integration of Self Assembly Systems for

Engineering Innovation (ODISSI) या नावाचा प्रकल्प हाती घेतला. ओरिगामीचा वापर करून संशोधन करत असलेल्या संशोधकांना ही संस्था निधी देवू लागली. यासाठी ओरिगामीचे छंद जपणाऱ्याबरोबर कार्य करण्याची अट घातली. कित्येक इंजिनियर्स याचा फायदा घेत संशोधन करू लागले. कदाचित त्याचीच फलश्रुती म्हणजे ऑक्सफर्ड येथील अधिवेशन!

परंतु अजूनही ओरिगामी म्हणजे कागदाच्या घड्या घालत पशु, पक्षी, विमान, जहाजं, फळं, फुलं, व इतर अनेक प्रकारचे प्रदर्शनीय वस्तू असे समीकरण झाले आहे. ओरिगामीच्या प्रदर्शनात अशाच प्रकारच्या वस्तूंची सजावट करून जनसामान्यांना आकर्षित केले जाते. विज्ञान-तंत्रज्ञानाशी संबंध प्रस्थापित करू पाहणाऱ्या या छंदाला अजूनही विज्ञानाच्या क्षेत्रात मान्यता मिळाली नाही. तरीसुद्धा भविष्य काळात कृत्रिम बुद्धिमत्ता, रोबो व नॅनो तंत्रज्ञानात ओरिगामीचा मोठ्या प्रमाणात वापर होईल असे ओरिगामी प्रेमींना वाटत आहे. सुटे-सुटे घटक घेऊन त्यांची जोडणी करत वस्तु निर्मितीची पारंपरिक पद्धत नॅनो तंत्रज्ञानात निरुपयोगी ठरेल. म्हणून नॅनो तंत्रज्ञानासाठी घड्यांच्या सहाय्याने वस्तुनिर्मिती करण्याकडे कल वाढेल.



ओरिगामी तंत्राचा वापर वैद्यकीय तंत्रज्ञान व अवकाश तंत्रज्ञानातसुद्धा होऊ शकेल असे भविष्य वर्तविले जात आहे. हृदयविकाराच्या उपचारातील रक्तवाहिन्यातील अडथळा दूर करणाऱ्या स्टेंटसाठी, डोळयातील रेटिनाच्या रोपणासाठी ओरिगामी तंत्राचा वापर शक्य आहे असा कयास वर्तविला जात आहे. शरीरातील अंतर्भागासाठी बरोबरच बाह्य उपचारासाठीसुद्धा ओरिगामीचा वापर कसा करता येईल याचा अंदाज घेतला जात आहे. लहान बाळांना डायपर्स योग्य रीतीने घट्ट व जास्त परिणामकारक ठरतील असे ओरिगामीचे फोल्ड्सचे डिझाइन्स डॉ. होवेल व त्यांचा गट विकसित करत आहेत.

प्रयोगशाळेतील साधनातही ओरिगामी फोल्ड्सचा वापर होत आहे. पेशींच्या व कार्बन अणूंच्या संशोधनासाठी ओरिगामी फोल्ड्स उपयोगात आणल्या जात आहेत. कार्बनच्या अणूचे आकार हवामानातील बदलानुसार बदलत असतात. या self assembling systemला उपयोगी पडणारे योग्य साधन ओरिगामी फोल्ड्समधून तयार करणे शक्य होईल.

ओरिगामीचा छंद म्हणून जपणारेसुद्धा मोठ्या प्रमाणात भर घालत आहेत. कागदाच्या गुंतागुंतीच्या घड्या घालत गंमतीशीर वस्तू तयार करत आहेत. विमान, कार्स, क्षेपणास्त्र, उपग्रह इत्यादींचे कागदी प्रतिकृती तयार होत आहेत. 3 मीटर उंचीचे फायबर ग्लास वापरून तयार केलेल्या कमानीचे घडी घालून वाहतूक करणे ओरिगामीमुळे शक्य होत आहे. रेल्वेच्या डब्यातील खुर्च्यांची ओरिगामी टाइप घड्या घालून जागेची व ऊर्जेची बचत केली जात आहे. कार्सचे डिझायनर्ससुद्धा ओरिगामी फोल्ड्सचा अभ्यास करत आहेत.

या सर्व गोष्टीसाठी गणितीय सिद्धांतांचा शोध अभ्यासक घेत आहेत. त्यामुळे गणिताच्या अभ्यासात भर पडत आहे. MITच्या संगणक तज्ञाने सरळ रेषेतील अष्टकोनाची बाजू असलेले चित्र वा शहराचे तिमिर चित्र

(silhouette) असो, आकृतीला फक्त एक छेद दिल्यास त्या आकृत्या तयार होऊ शकतात अशी मांडणी केली आहे. शोभेसाठीचे क्रिसमस झाडसुद्धा कागदाच्या घड्यांना एका सरळ रेषेतील छेदातून करता येते असा दावा त्यांनी केला आहे.

घड्या घालण्यासाठी कागदाऐवजी दुसऱ्या एखाद्या धातू/अधातूंचा पातळ पत्रा वापरल्यास नेमके काय होईल, हासुद्धा संशोधनाचा विषय होऊ शकेल. कागदासारखा लवचिकपणा त्यात नसेलही. परंतु करून बघायला काय हरकत आहे?



# अविभाज्य संख्याः न संपणारा शोध




फेडेक्स या अमेरिकन कंपनीमध्ये जॉन पेस फायनान्स मॅनेजर म्हणून काम करत होता. परंतु जमा-खर्चाच्या आकडेवारी व एक्सेल शीट्समधील रकानेच्या रकाने भरण्यापेक्षा आतापर्यंत ज्ञात असलेल्या अविभाज्य संख्येपेक्षा अजून एक यापेक्षा मोठी अविभाज्य संख्या शोधण्यामध्ये त्याला जास्त रुची होती. गेली 14 वर्ष तो अशा संख्याच्या मागे अक्षरशः जिवाचे रान करत होता. आतापर्यंत माहित असलेल्या अविभाज्य संख्येतील अंकापेक्षा आणखी जास्त अंक असलेली अविभाज्य संख्या त्याला शोधायचे होते. 26 डिसेंबर 2017 रोजी त्याचे हे उद्दिष्ट पूर्ण झाले. त्यानी शोधलेल्या अविभाज्य संख्येत हजार-

दोन हजार नव्हे तर तब्बल 2 कोटी 30 लाख अंक होते. ही संख्या प्रिंट करण्याचे ठरविल्यास व यातील आकडे दोन फाँट साइझमध्ये घेतले तरी एखादे मोठे पुस्तकच होईल.

सामान्यपणे धन पूर्णांकांना 'स्वाभाविक संख्या' म्हणतात. ज्या संख्येला 1 व ती स्वतः, यांखेरीज दुसऱ्या कोणत्याही संख्येने भाग जात नाही, तिला 'अविभाज्य संख्या' म्हणतात. उदा.,1 ते 20 पर्यंतच्या संख्येत 2, 3, 5, 7, 11, 13, 17, 19 यांना अविभाज्य संख्या आणि 1 वगळता बाकीच्या 4, 6, 8, 9, 10, 12,14, 15, 16,18, 20 संख्यांना 'संयुक्त संख्या' म्हणतात. अविभाज्य संख्यांचे गुणक (वा अवयव) 1 व तीच संख्या असते. उदा 5 चे गुणक 1 व 5, 11 चे गुणक 1 व 11, 19 चे गुणक 1 व 19 इ. इ. परंतु 4 ही संख्या 2 X 2 याप्रमाणेही मांडता येईल. 8 ही संख्या 2 X 2 X2 वा 9 ही संख्या 3 X 3, 10 ही संख्या 2 X 5 ..... या प्रमाणे मांडता येते. यावरून अविभाज्य नसलेल्या संख्यांचे गुणक नेहमीच अविभाज्य संख्या असतात असे म्हणता येईल.

इ.स.पू 300 च्या सुमारास युक्लिड या गणितीने एलिमेंट्स या 13 ग्रंथांच्या खंडामध्येसुद्धा अविभाज्य संख्यांचा उल्लेख केला आहे. ‘एकाहून मोठी प्रत्येक संख्या अविभाज्य संख्यांच्या गुणाकाराच्या स्वरूपात लिहिता येते’, या अंकगणितातील मूलभूत विधानाची सिद्धताही युक्लिडने दिली आहे. अविभाज्य संख्यांना अंत नाही, या विधानाच्या पुष्ट्यर्थ त्यानी केलेली सिद्धता हे तर्कशास्त्राच्या भाषेत लिहिलेले सुंदर काव्यच असल्याचे अनेक गणितज्ञांचे मत आहे. गणितावरील ही पुस्तकं आधुनिक विज्ञान व तर्कशास्त्र यांच्यापेक्षा श्रेष्ठ ठरतात. तेवीसशेहून अधिक वर्षे आपण या सिद्धता मूळ रूपात शिकत आहोत, यातच युक्लिडच्या सिद्धांतांचे माहात्म्य दिसून येते.

अविभाज्य संख्यांची निर्मिती करण्यासाठी अनेक हौशी व व्यावसायिक गणितज्ञ प्रयत्न करत होते/आहेत. अविभाज्य संख्या शोधण्यासाठी $2^n - 1$ हे

सूत्र गेली कित्येक वर्षे गणितज्ञ वापरतात. यात n ही एक स्वाभाविक संख्या आहे. गणितामध्ये मेर्सेने अविभाज्य संख्येचा फार ठिकाणी वापरला जातो. मरिन मेर्सेने या फ्रेंच गणितज्ञाने 17व्या शतकात अविभाज्य संख्यांचा अभ्यास करताना $Mn = 2^n - 1$ या सूत्राचा शोध लावला. (यात n ही एक स्वाभाविक संख्या आहे). सूत्रातून मिळालेल्या अविभाज्य संख्यांना मेर्सेने प्राइम असे म्हटले जाते. सुलभीकरणासाठी nच्या ऐवजी p व $2^p$ च्या ऐवजी 2p या संज्ञा वापरल्या जात आहेत. Mn = 2p − 1 या सूत्रात p साठी एखादी संख्या निर्दिष्ट करत सर्वात मोठ्या अविभाज्य संख्यांचा शोध घेतला जातो. या सूत्राप्रमाणे इतर काही महत्वाची सूत्रे खालील प्रमाणे आहेतः



1 विल्सनच्या सिद्धांतावर आधारलेले सूत्र (1770)
2 डायफोंटिनचे सूत्र (1976)
3 मिल्सचे सूत्र (1947)
4 राइटचे सूत्र (1938)
5. अविभाज्य संख्यांचे फल सूत्र
6 प्लौफचे सूत्र (2019)
याच्याही व्यतिरिक्त बहुपदी व आवर्तनाचा वापर करूनही अविभाज्य संख्याची निर्मिती करता येऊ शकते.

आपण या सूत्रांच्या फार खोलात न शिरता मोठ-मोठ्या अविभाज्य संख्याच्या निर्मितीसाठी गेल्या 30-40 वर्षात फार मोठा वेग आला आहे. तरीसुद्धा "निर्विवादपणे हीच सर्वात मोठी अविभाज्य संख्या व यानंतर अजून एकही अविभाज्य संख्या असणार नाही" असे युक्लिडच्या विधानाला आव्हान देऊ शकणारी सिद्धता गणितज्ञांच्या आवाक्यात आली नाही हेही तितकेच खरे.

एखाद्याने दावा केलेली संख्या खरोखरच अविभाज्य आहे की नाही याची पडताळणी करण्यासाठी काही चाचण्या व अल्गॉरिदम्स आहेत. एखादी विषम संख्या अविभाज्य संख्या आहे की नाही हे शोधण्यासाठी trial division, (या चाचणीत संख्येचे गुणक शोधून संख्येची अविभाज्यता ठरविली जाते.) Miller–Rabin primality test, (हे अल्गॉरिदम फेर्माच्या सिद्धांतावरून घेतलेले आहे.) AKS primality test, Lehmer primality test इत्यादी प्रकारच्या चाचण्यांचा वापर केला जातो.AKS primality test चाचणीचे जनक कानपुरच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नालॉजी येथील मनिंद्र अग्रवाल, नीरज कायल व नितिन सक्सेना हे संगणक वैज्ञानिक असून त्यांच्या या चाचणीला 2002 मध्ये मान्यता मिळाली. या पूर्वी 1919 मध्ये भारतीय

गणितज्ञ रामानुजन यानीसुद्धा अविभाज्य संख्यासंबंधी काही गृहितकांचा उल्लेख केला होता. त्याच्या या प्रयत्नाला गणिती जगतात रामानुजन प्राइम म्हणून ओळखले जाते. एखादी संख्या अविभाज्य आहे की नाही हे या संस्थळावर शोधता येईल.. उदाः, मोबाइल क्रमांक, आधार क्रमांक, पॅन क्रमांक, डेबिट/क्रेडिट क्रमांक, जन्म तारीखासारख्या महत्वाच्या तारिखा इत्यादी संख्यामधून फेरफार केलेली (व 9 आकड्यापेक्षा कमी असलेली) विषम संख्या, अविभाज्य संख्या आहे की नाही याचा शोध घेण्याचा एक मजेदार खेळ खेळता येईल.

गणितीजगतात मेर्सेन प्राइमचा शोध घेणे हा एक छंद आहे. आजतागायत सापडलेल्या अविभाज्य संख्येपेक्षा अजून एका मोठ्या अविभाज्य संख्याचा शोध लावण्यासाठी हौशी अभ्यासक व गणितातील तज्ञमंडळी उत्सुक आहेत. एके काळी अशा अविभाज्य संख्येच्या शोधासाठी कागद-पेन्सिल वापरून आकडेमोड याला पर्याय नव्हता. संवाद सुविधाही बेताच्या होत्या. त्यामुळे एखाद्याने त्याच्या दृष्टिकोनातून मोठी अविभाज्य संख्या शोधली तरीही गणितीजगतात सर्वापर्यंत पोचण्यासाठी बराच काळ जात असे. यासाठी 20व्या शतकात संगणकांचा वापर करण्यात आला. परंतु त्या काळातील संगणकांतील प्रोसेसर व मेमरी यांच्या मर्यादित क्षमतेमुळे यासंबंधात फार मोठे यश मिळू शकले नाही. एकविसाव्या शतकात मात्र प्रगत संगणक तंत्रज्ञानामुळे याविषयी फार मोठी प्रगती झालेली आहे.

1996मध्ये जॉर्ज वोल्टमन या संगणक तज्ञाने जगातील सर्वात मोठ्या अविभाज्य संख्यांच्या शोधाला उत्तेजन देण्यासाठी Great Internet Mersenne Prime Search ( GIMPS ) या कंपनीची स्थापना केली. अविभाज्य संख्यांच्या संबंधीच्या प्रकल्पांना सर्व प्रकारे मदत करणारी कदाचित ही एकमेव संस्था असेल. जॉर्ज वोल्टमन यानी अविभाज्य

संख्यासंबंधी Prime95 व MPrime असे संगणक प्रणाली लिहिलेली आहेत. स्कॉट कुरोस्की या संगणक तज्ञाच्या the PrimeNet व Internet server या प्रणालीच्या मदतीने जॉर्ज वोल्टमन यानी लहान-मोठ्या वेग-वेगळ्या प्रकारच्या संगणकांतील नंबर क्रंचिंगसाठी संगणक प्रणाली लिहून अविभाज्य संख्यांच्या संशोधकांना एक प्रगत सुविधा उपलब्ध करून दिली आहे.

खरे पाहता आजतागायत सापडलेल्या मोठ्या अविभाज्य संख्येपेक्षा अजून एका मोठ्या अविभाज्य संख्येचा शोध म्हणजे एका प्रकारे गवताच्या मोठ्या राशीत सुई शोधल्यासारखे आहे. तरीसुद्धा जागतिक दाखला स्थापित करण्यासाठी, गणिताच्या इतिहासात आपले नाव नमूद होण्यासाठी व इतर अन्य कारणाबरोबर संशोधनाचा थरार अनुभवण्यासाठी हजारो जण या संस्थेचे सदस्यत्व घेत आहेत. गणित जगतात एक नवीन इतिहास घडविण्याची या संशोधकांची महत्वाकांक्षा आहे. या संस्थेच्या अधिकृत सदस्यांना संस्थेच्या संगणक प्रणालींना विनामूल्य वापरण्यास अनुमती आहे. या संशोधनाच्या थराराबरोबरच ही संस्था आजतागायत माहित असलेल्या अविभाज्य संख्येपेक्षा अजून एक यापेक्षा मोठी अविभाज्य संख्या शोधणाऱ्यांना 3000 डॉलर्सचे बक्षीसही देत आहे. इलेक्ट्रॉनिक फ्रंटियर फौंडेशन या अजून एका संस्थेने 10 कोटी (100 मिलियन) अंक असलेल्या मेर्सेन अविभाज्य संख्याच्या संशोधकाला 150000 डॉलर्सचे बक्षीस देणार आहे.

युक्लिडच्या काळापासून आतापर्यंत शोध लावलेल्या मोठ - मोठ्या अविभाज्य संख्यांचा या तक्त्यात उल्लेख आहे. जॉन पेसने 26 डिसेंबर 2017 रोजी लावलेल्या शोधाचा क्रमांक 50वा आहे. या तक्त्यातील सर्व संख्यांची किमान एकदा तरी त्यांच्या विभाज्यतेची खात्री करून घेतलेली आहे. जाहीर

केलेल्या या मोठ-मोठ्या अविभाज्य संख्यांच्या अधेमधे अजूनही एखादे अविभाज्य संख्या असण्याची शक्यता नाकारता येत नाही.

7 डिसेंबर 2018 रोजी पॅट्रिक लारोश यानी 51व्या क्रमांकावरील आजमितीपर्यंत लावलेली सर्वात मोठी अविभाज्य संख्या आहे. त्यातील Mn (= 2p – 1) या सूत्राप्रमाणे p चे मूल्य 82589933 आहे. या अविभाज्य संख्येत 24,862,048 अंक आहेत. या संख्येची टेक्स्ट फाइल 25 Mb एवढी भरू शकेल. (सामान्यपणे पुस्तकाची टेक्स्ट फाइल 1-2 Mb असते.) एका ओळीत 75 आकडे व एका पानात 50 ओळी असे या संख्येतील अंक प्रिंट केल्यास 6629 पानं लागतील. पानाच्या एकाच बाजूला संगणकाच्या प्रिंटरवर प्रिंट केल्यास 14 रीम पेपर लागतील.

2016 साली शोधलेल्या मोठ्या अविभाज्य संख्यांच्या संबंधातील हा व्हिडीओ याविषयी भरपूर काही सांगत आहे.

आपणही या प्रकल्पात भाग घेऊ शकता. आणि आपण शोधलेल्या अविभाज्य संख्येत 10 कोटी (100 मिलियन) अंक असल्यास इलेक्ट्रॉनिक फ्रंटियर फौंडेशन संस्थेच्या 150000 डॉलर्सच्या बक्षीसावर दावाही करू शकता!



# पुस्तकांचे जादुई जग

निसर्गाने मानव जातीला भरभरून दिले आहे, याची प्रचीती आपल्याला नेहमीच येत असते. निसर्गदत्त देणगी म्हणवून घेणाऱ्या चमत्कारसदृश प्राण्यांच्या, कृमी-कीटकांच्या, फुला-फळांच्या, डोंगर-दऱ्यांच्या, समुद्र-नद्यांच्या जगात माणूस, क्षणभर का होईना, आपले सर्व दुःख, चिंता, वेदना, गरीबी, अन्याय सर्व विसरू शकतो. निसर्गातील वैविध्यता, विपुलता व ताजेपणा अनुभवत असताना माणूस थक्क होतो. हे सगळे कसे शक्य झाले याबद्दल आश्चर्य व्यक्त करत त्यासमोर नतमस्तक होतो.

निसर्गाकडून मिळालेल्या या भेटवस्तूंचे भान ठेवत असतानाच मानवाने स्वतःच्या कर्तृत्वशक्तीने उभे केलेले अजून एक जग असून त्यात हरवून न जाणारा अक्षरओळख असलेला माणूस विरळा. ते म्हणजे पुस्तकांचे जादुई जग. हेर्मन हेस यांच्या मते पुस्तकाचे जग पूर्णपणे मानवनिर्मित आहे. लिखित शब्द वा पुस्तकं नसते तर इतिहास वा मानवता या संकल्पना अस्तित्वातच आल्या नसत्या. एखाद्या घरातील एका खोलीतील बंदिस्त अवकाशात स्वतःला कोंडून घेत मानवी चैतन्याच्या इतिहासाचा शोध घ्यायचे ठरविल्यास त्याला पुस्तकाच्या ढिगात रममाण झाल्याशिवाय ते शक्य होणार नाही.

काफ्काला पुस्तक म्हणजे गोठलेल्या बर्फाला कापणारी कुऱ्हाड वाटते. कार्ल सॅगनला मानवी जादुई शक्तीचा प्रत्यक्ष पुरावा तर जेम्स बाल्डविनला मानवी नियतीला बदलू शकणारे वाहन असे वाटते. हेर्मन हेसला तर संपूर्ण ग्रंथव्यवहार, लेखकाने निवडलेले शब्द व त्याचे लेखन हे सर्व जादुई चमत्काराचाच प्रकार वाटतो. ते केवळ चमत्कार नव्हे तर त्याला पवित्रतेची काठ आहे. फक्त हीच लेखन कला त्यांना पवित्र ऋषी-मुनींच्या पङ्तीत बसवू शकते.

त्यामुळे निखिलेश चित्रे यांचे ‘आडवाटेची पुस्तकं’ म्हणजे लेखकानी मांडलेल्या पुस्तकशोधाचा, पुस्तक निर्मितीचा, भाषांतरांचा, पुस्तक-लेखक यांच्या संबंधीच्या हकीकती-आख्यायिकांचा विस्तीर्णपट असून हा सुखद प्रवास कधीच संपू नये असे वाटू लागते. हे पुस्तकाचे जग किती विस्तीर्ण व अवाक करणारी आहे याची कल्पना आल्यावर आपण थक्क होतो. गणेश विसपुते या कवीनी या पुस्तकाबद्दलच्या उल्लेखात म्हटल्याप्रमाणे य़ा आडवाटांवरून प्रवासाचा जो विस्तीर्ण पट मांडला आहे, तो प्राचीन भारतीय साहित्यापासून जागतिक साहित्यातल्या श्रेष्ठ साहित्यकृतीपर्यंत समकालीन साहित्याचा रोचक तपशील देत हा वाचनप्रवास रम्य करतो, दृष्टी विस्तारतो आणि जाणीवांच्या मितींची व्याप्ती वाढवतो.

या पुस्तकाचे लेखक आडवाटेवरची श्रेष्ठ दर्ज्याची पुस्तकं शोधत शोधत आपल्यासारख्या वाचकांना अपरिचित असलेल्या स्पेन, झेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, बल्गेरिया, जर्मनी, फ्रान्स, पोर्तुगाल, सर्बिया, ब्राझिल, पोलंड, इटली, इस्राइल, अर्जेंटाइना इत्यादी देशातील अत्युत्तम साहित्याचा परिचय करून देतात. त्यांना आवडलेल्या लेखकांची यादी थक्क करून जाते. या यादीत सर्बियन लेखक मिलोराद पाविच, पॉल व्हलेरी, दानिलो किश, झोरान झिक्वोविच, स्पॅनिश लेखक एंत्रिके मातास, सेर्गिओ पितोल, आर्तुरो पेरेझ रिवेर्ते, रोबेर्तो बोलानो, अन्तोनिओ मुन्योझ मोलिना, लुइस गोयतीसोलो, फ्रेंच लेखक जॅक प्रेवेर, मार्सेल बेनाबू, मेक्सिकन लेखक इग्नाशियो पॅदिल्ला, जर्मन लेखक कार्लोस मारिआ डॉमिगेझ, मायकेल क्र्यूगर, पोर्तुगीज लेखक फर्नांदो पेस्सोआ, रशियन लेखक आन्द्रे कुर्कोव्ह, पास्तरनाक, स्वेताएव्हा, सिगिझमुंड शिशानोवस्की, आन्द्रे बिटोव्ह, व्हिक्टर पेलेविन, झेक लेखक मिरोस्लाव होलुब, इटालियन लेखक जिऑर्जिओ प्रेसबर्गर, अन्तोनियो ताबुकी, कार्लो एमिलिओ गाद्दा, जपानी लेखक हारुकी मुराकामी, रोमन लेखक इओन

मानोलेस्कु, पोलिश लेखक गुस्ताव्ह हर्लिंग, बल्गेरियन लेखक गेऑर्गी रुपचेव्ह, इस्रायली लेखक अहरॉन मेग्गेद, युगोस्लाव्ह लेखक डेव्हिड अल्बाहारी, रुमानियन लेखक दुमित्रु सेपेनियग, ब्राझिलियन लेखक शिको बुआर्क, मोअकिर स्किलयार, हंगेरियन लेखक लास्लो क्रास्नोहर्काई, इशत्वान ओकेन्य, चिलियन लेखक कार्लोस लाबे इत्यादी लेखक आहेत.

काही अपवाद वगळता या यादीतील लेखकांचे मासलेवाइक साहित्यकृतींचा परिचय करून देताना आपल्याला ही पुस्तकं वाचायला मिळाले नाहीत याबद्दल हळहळ वाटू लागते. डिक्शनरी ऑफ खजार्स, लास्ट लव्ह इन कॉन्स्टांटिनोपल, शॅडो विदाऊट अ नेम, एनसायक्लोपिडिया ऑफ द डेड, सीन्स फ्रॉम द लाइफ ऑफ अ बेस्ट सेलिंग ऑथर, मॅन इन द टॉवर, बुक ऑफ डिस्क्वाएट, लेटर्सःसमर 1926, मस्यू तेस्ते, टीथ अँड स्पाइज, बुडापेस्ट, अ वाइल्ड शीप चेज, रेक्वियम, 2666, स्किड, व्हाय आय हॅव नॉट रिटन एनी बुक्स, द टेल दॅट किल्ड एमिली नॉर, द लिटल् फिंगर ऑफ बुद्ध, द पिजन पोस्ट, काफ्का अँड लेपर्ड्स, द ब्लाइंड आउल, वन् मिनट स्टोरीज, ... अशा अनेक पुस्तकांचे परिचय लेखक करून देत आहेत. या पुस्तकातील काही महत्वाच्या नोंदी वाचत असताना पूर्ण पुस्तक वाचावेसे वाटू लागते.

या संपूर्ण आडवाटेच्या जागतिक ग्रंथव्यवहारात प्राकृत भाषेतील पुष्पदंत यांचे जसहर चरिउ, श्रीधरदासकृत सदुक्तिकरणामृत आणि हिंदीतील मनोहर शाम जोशी यांचे कुरु-कुरु स्वाहा या भारतीय ग्रंथांचा समावेश आहे. कदाचित आधुनिकोत्तर साहित्याच्या मोजपट्टीतून मोजल्यास भारतीय अशी एवढीच ग्रंथसंपदा असू शकेल, हेही नसे थोडके!

‘आडवाटेची पुस्तकं’ यातील सर्वच्या सर्व चाळीस लेख ‘आपले वाङ्मयवृत्त’ आणि ‘लोकसत्ता’ या नियतकालिकेत या पूर्वी प्रसिद्ध झालेले आहेत. तरीसुद्धा तुकड्या-तुकड्याने या प्रकारचे लेख वाचण्यापेक्षा सलग

वाचण्यातली मजा और असते. पुस्तकाच्या मनोगतात लेखकानी त्यांच्यात पुस्तकाची आवड कशी निर्माण झाली, अशा प्रकारची पुस्तकं त्यांना कुठे कुठे व कसे मिळत गेली, आधुनिकोत्तरवाद देत असलेली दृष्टी इत्यादीबद्दल विस्तृतपणे सांगितले आहे. लेखकाच्या मते आजच्या मूल्यहीन, चंगळवादी आणि खंडित जगण्याला व्यक्त करू पाहणारी आधिनिकोत्तरवाद ही महत्वाची दृष्टी आहे. ती परिपूर्ण नसली तरी तिच्यामुळे लेखन आणि वाचन प्रक्रियेत ताजेपणा आला हे नाकारून चालणार नाही, लेखक-वाचक संबंधात अनेक नव्या मिती जोडल्या गेल्या. याच परिप्रेक्ष्यातून हे लेख वाचत गेल्यास लेखकाचे म्हणणे पटू लागते.

लेखात लेखकांनी उल्लेख केलेली पुस्तकं कदाचित मूळ स्वरूपात न वाचता अनुवादित स्वरूपातूनच वाचले असण्याची शक्यता जास्त आहे. आणि यातील बहुतेक पुस्तकं लेखकांच्या कल्पनाशक्ती व सर्जकतेला वाव देणाऱ्या कादंबरी या लेखन प्रकाराचे आहेत. लेखकांनी एके ठिकाणी उल्लेख केल्याप्रमाणे कादंबरीत भाषा हे केवळ साधन नसून साध्य आहे. ती अनुवादित रूपात वाचणं चांगल नाही. कारण आपण नेमके काय गमावतोय हे वाचकाला कधीच कळणार नाही. तो अनुवादकाचं बोट धरून पुढे जात असतो. त्यामुळे वाचताना किमान ठेच लागू नये अशी त्याची अपेक्षा असते. कदाचित या जागतिक कीर्तीच्या लेखकांना चांगला अनुवादक मिळाल्यामुळे पुस्तकांचा दर्जा घसरला नसावा.

लेखकानी आपल्या मनोगतात उल्लेख केल्याप्रमाणे मी का वाचतो? या प्रश्नाचे उत्तर ‘आनंदासाठी’ असं देता येईल. पण वाचताना आणि वाचून झाल्यावर वाचकांच्या आत अनेक सूक्ष्म बदल घडत असतात. पुस्तक वाचणं हा एक सांस्कृतिक संवाद तर असतोच. पण त्याचबरोबर तो जैविक, भौगोलिक आणि राजकीय संवादही असतो. हा संवाद लेखक आणि वाचक

दोघांच्याही क्षमतेवर अवलंबून असतो. पुस्तकं केवळ आनंदच देतात असे नाही, वेळप्रसंगी भक्कम आधारही देतात. जगण्याच्या गुंतागुंतीवर एखादा समाजशास्त्रज्ञ किंवा मानसोपचारतज्ञ ज्या नेमकेपणानं बोट ठेवतो त्याच, किंबहुना जास्तच नेमकेपणानं काफ्का किंवा तुकाराम आपल्या साहित्यातून ही जटिलता व्यक्त करत असतात. श्रेष्ठ लेखक आपल्या लेखनातून कोणतही ढोबळ विधान करत नाही. तो वाचकाला मोकळं सोडतो. स्वतःहून भिन्न असलेल्या माणसांच्या सहवासात राहण्याची त्यांना समजून घेण्याची अद्भुत क्षमता साहित्यातून वाचकाला मिळत असते. ही भिन्नता जेवढी अधिक, तेवढं वाचकाच्या समजूतदारपणाचं आणि आकलनाचं क्षितिज रुंदावत जातं. आणि हे क्षितिज आणखी जास्त विस्तारण्यासाठी जागतिक श्रेष्ठ साहित्यिक नक्कीच हातभार लावत असतात.

या पुस्तकातील एकूण एक लेख चांगल्या चित्रपटांच्या ट्रेलर्सची आठवण करून देतात व संपूर्ण चित्रपट बघायचे राहून गेले अशी चुटपुट मनाला लावतात. पुस्तक म्हणजे रद्दी म्हणून विकणारी वस्तू नव्हे किंवा केवळ आपल्या कल्पनांना वाट करून देणारे वाहकही नव्हे. त्या आपल्या भावनांना प्रतिसाद देणाऱ्या चिरंतन आठवणी आहेत. निखिलेश चित्रे यांनी त्यांच्या या दोनशे पानी पुस्तकातून चिरंतन जागतिक साहित्य काय असू शकते याची कल्पना दिली आहे. त्यासाठी वाचक नेहमीच त्यांचे ऋणी राहतील.

**आडवाटेची पुस्तकं**
*निखिलेश चित्रे*
लोकवाङ्मय गृह, मुंबई
मूल्यः 350 रु, पृ. सं 201



# हॅमर कल्चर

बाविसाव्या शतकातील बाप-लेकीत घडलेला हा संवाद.

"पपा, पपा, तुम्ही सतत माझ्यापासून तो हातोडा का लपवून ठेवता?"

"त्याच्यामागे एक फार मोठी गोष्ट आहे."

"पपा सांगा की ती गोष्ट मला"

"विसाव्या शतकात घडलेली ही गोष्ट आहे. त्याकाळी एक ‘प्रगत’ समाज होता. अचानक एके दिवशी एकमेकांच्या डोक्यावर हातोडा मारण्याची लाट उठली. काही महिन्यातच ही क्रेझ सर्वांच्या अंगवळणी पडू लागली. लोकांना दुसरे काही सुचेनासे झाले. जो उठतो तो हाण दुसऱ्याच्या डोक्यावर हातोडा. हळू हळू हा समाज बदलला. सर्व काही हातोडामय झाले.

मागणी तसा पुरवठा या तत्त्वाप्रमाणे काही चाणाक्ष उद्योजकं, लोकांची आवड ओळखून वेगवेगळया प्रकारचे हातोडे बाजारात आणू लागले. घडीचे, क्षणात उघडणारे, उघड-झाप, लांब, आखूड, नक्षीदार, बॅटरीवर चालणारे, रबराचे, प्लॅस्टिकचे, सोन्याचे, जोराने मार बसणारे, मार न बसणारे, पाळण्यातल्या व रांगणाऱ्या बाळासाठी, मुलींसाठी, बायकांसाठी, म्हाताऱ्यांसाठी, सुशिक्षितांसाठी, अशिक्षितांसाठी, तरुणांसाठी, तरुणींसाठी कोमल, असे विविध प्रकारचे, विविध प्रसंगासाठी, विविध वयोगटांसाठी, विविध मानसिकतेसाठी हातोडयांचे उत्पादन, वितरण व विक्री व्यवस्था रूढ झाली.

हातोडे बनवण्यासाठी लागणाऱ्या लोखंड, लाकूड, रबर, प्लॅस्टिक इत्यादी कच्च्यामालांचा पुरवठा करणाऱ्यात चढाओढ लागली. काही भूवैज्ञानिक व धातुशास्त्रज्ञ नवीन प्रकारच्या धातूसाठी संशोधन करू लागले. हातोडयांचे वर्गीकरण व प्रमाणीकरण करण्यात आले. इतर अनेक वैज्ञानिक हातोडा

मारण्याच्या व मारून घेण्याच्या सिध्दांतावर मूलभूत संशोधन करू लागले. हातोडा कसा मारावा, कुठे मारावा, का मारावा, केव्हा मारावा याचे विश्लेषण करून एक सर्व मान्य आचारसंहिता बनवण्यात आली. अशा प्रकारच्या शोधनिबंधांची मागणी वाढली. प्रयोगशाळेत संशोधन होऊ लागले. लोकांच्या ज्ञानात भर पडू लागली. या ज्ञानाचा प्रसार व्हावा म्हणून हा विषय शाळेत शिकवू लागले. हातोडयासंबंधीचे टयूशन क्लासेस धंदा करू लागल्या. पाठयपुस्तकात याबद्दलची माहिती देण्यात आली. हातोडा-मारच्या परिणामांची गणीतीय समीकरणात मांडणी करण्यात आली. सूक्ष्मात सूक्ष्म व महाकाय हातोडयांच्या इष्ट परिणामासंबंधी चर्चा, शिबिरं, कार्यशाळा, संमेलनं भरविण्यात येवू लागल्या. संपूर्ण शिक्षण व संशोधन पध्दती हातोडयास केंद्रबिंदू समजून विकसित करण्यात आल्या.

याच सुमारास हातोडयापासून रक्षण करून घेण्यासाठी वेगवेगळया प्रकारचे हेल्मेट्स पण बाजारात येऊ लागले. संरक्षक कवचांची मोठया प्रमाणात विक्री होऊ लागली. हेल्मेट्सचा आकार, वजन, बनवण्याची प्रक्रिया त्याचे प्रमाणीकरण इत्यादीवर संशोधन होऊ लागले. हेल्मेट्सची विक्री जोरदार होवू लागली. काही जण हातोडा मार संबंधीचे क्रीडा आयोजन करू लागले. खुल्या मैदानात, बंदिस्त हॉलमध्ये मुलं-मुली , तरुण-तरुणी, सराव करू लागले. फुटबॉल-क्रिकेट स्पर्धेप्रमाणे एक तास, एक दिवस, पाच दिवसाचे हातोडा-मारचे सामने होऊ लागले. प्रेक्षकांचा फारच चांगला प्रतिसाद मिळू लागला. हातोडा-मार यासंबंधी कथा-कादंबऱ्या, कविता-चारोळया-गझल, वैचारिक-वैज्ञानिक लेखन, शब्दकोश, ज्ञानकोश, अशा साहित्याला प्रचंड मागणी होती. हातोडयाची चित्रकला, शिल्पकला विकसित झाली. हातोडयाचा सार्वजनिक उत्सव साजरा होऊ लागला. हातोडयांचे सवलतीच्या दरातील विक्री व प्रदर्शन भरविण्यात येऊ लागले. त्याच पैशातून ते हातोडयांची खरेदी करू

लागले. व ही संस्कृती चांगलीच मूळ धरली.

हातोडा-मार संस्कृतीचे काही उपदुष्परिणाम पण जाणवू लागले. हातोडयाचा मार बसल्यामुळे काही जणांना दुखापत झाली. त्यांच्यावर उपचार करणारे स्पेशालिटी हॉस्पिटल्स निघाले. उपचार करणाऱ्या विशेषज्ञांची फौज उभारली. रुग्ण डोकेदुखी, पाठदुखी, डोळयांची आग आग होणे, आपस्मार, रक्तस्राव, मेंदूज्वर, ताण तणाव इत्यादींच्या तक्रारीवर इलाज करून घेऊ लागले. काहींच्या मेंदूवर परिणाम झाल्यामुळे, ते बरळू लागले. हातोडा-मार उपचारासाठी वेगवेगळया उपचार पध्दती रूढ झाल्या. काहींना पाला पाचोळा, काहींना ऊद भस्म, व इतर काहींना साबुदाण्याच्या गोळया घेतल्यामुळे बरे वाटू लागले. आपल्याकडेच जास्त रुग्ण यावेत यासाठी त्यांच्या आपापसात चढाओढ सुरु झाली. परंतु रुग्ण निमूटपणे उपचार घेत होते. पूर्ण बरे झाल्यानंतर हातात हातोडा घेवून मारत होते किंवा मारून घेत होते.

हातोडयाच्या विरोधात बोलायची हिंमत कुणातही नव्हती. बहुतांश लोकांना हातोडा मार संस्कृतीमुळे भरपूर त्रास होत आहे हे जाणवत होते. परंतु मूठभर लोकांच्या हातोडा-मार संस्कृतीच्या उदात्तीकरणाच्या जाहिरातबाजीमुळे, खरोखरच यात काहीतरी तथ्य असावे म्हणून सहन करत होते. हातोडा-मार संस्कृतीतून भरपूर काही मिळणार आहे यासाठी आपण दिलेली ही छोटी किंमत म्हणून त्रास सहन करत होते. नेमके काय मिळणार आहे याची कुणालाच कल्पना नव्हती. याविषयी विचार करणेच लोकांनी सोडून दिले. शेजारचा करतोय ना मग आपण पण करावे हीच वृत्ती जोपासली जात होती. समाजाच्या परिघाबाहेर असलेले काही सुज्ञ हताशपणे हे सर्व बघत होते. अधोगतीला चाललेल्या समाजाला सावध करावे या हेतूने हातोडा संस्कृती विरुद्ध ते आवाज उठवू लागले. परंतु गुंडागर्दी करून दडपशाही करून त्यांचा आवाज दडपला. त्यातील काही सुज्ञ चिवटपणाने ही हातोडा-संस्कृती

समाजघातक व बेकायदेशीर आहे म्हणून आंदोलन करू लागले. समाजातील इतर त्यांना वेडे म्हणून हिणवू लागले. आमच्या मुलाबाळावर या वेडयांच्या वक्तव्याचा वाईट परिणाम होईल म्हणून त्यांना जेलमध्ये ठेवावे किंवा तडीपार करावे ही मागणी जोर धरू लागली. व्यापारी व उत्पादक धंदा कमी होईल या भीतीने विरोध करु लागले. या मूठभर हातोडा-विरोधकाविरुध्द वैद्यकीय तज्ञ, संशोधक, वैज्ञानिक, शिक्षणतज्ञ आरडा ओरडा करू लागले. हातोडा-मार अर्थव्यवस्थेला धक्का लावणाऱ्यांचा निषेध होऊ लागला. स्त्रियांना नोकऱ्या मिळणार नाहीत, राजकीय पुढऱ्यांना मतं मिळणार नाहीत, म्हणून हातोडा-मार विरोधकांची हकालपट्टी करावी या मागणीला जोरदार पाठिंबा मिळू लागला. लोकमतापुढे मान झुकवून विरोधक गप्प झाले. हातोडा-मार संस्कृती रक्षकांची सरशी झाली. आता तर हातोडा-मार संस्कृती शिवाय दुसरे कुठलेच विचार सुचेनासे झाले. यामुळे हळू हळू हा समाज विनाशाकडे जावू लागला व एके दिवशी पूर्ण अस्तंगत झाला.

उरलेल्या विरोधकांनी कुठे तरी लांब जावून एक नवा समाज निर्माण केला. व आपण त्या नव्या समाजाचे वंशज आहोत. हा समाज मात्र विचारपूर्वकपणे हातोडा मार संस्कृतीच्या अवशेषापासून दूर राहिला. हातोडयावर बंदी घालण्यात आली. म्हणून मी तुला हातोडयांना हात लावू देत नाही."

मुलगी सुज्ञ होती. विचार करणारी होती. तिच्या पपाने तिला एक रूपक कथा सांगितल्याचे तिच्या चटकन लक्षात आले. या रूपककथेत हातोडयाऐवजी ईश्वर, धर्म, योग, ध्यान, राष्ट्रवाद, भाषिक अस्मिता, राम मंदिर, इत्यादी प्रकारची कुठलिही चित्र-विचित्र कल्पना वापरली तरी रूपककथेतील हा समाज रसातळाला जाणार, याबद्दल तिला अजिबात संशय नव्हता. विसाव्या शतकाचा इतिहास वाचत असताना हा समाज अशा अनेक प्रकारच्या क्रेझी कल्पनांचा बळी झालेला होता हे तिच्या लक्षात होते. त्यामुळे अशा प्रकारच्या

हातोडयापासून चार हात दूर राहणे हेच शहाणपणाचे लक्षण ठरेल याची तिला खात्री पटली.
सुज्ञास सांगणे न लगे!



# कॉमन सेन्स’च्या दुःखद निधनाच्या निमित्ताने..

‘आज आपण एका वेगळ्या दुखवट्याच्या निमित्ताने येथे जमलेलो आहोत.

आज आपल्यातील व आपल्या बरोबर अनेक वर्षे साथ दिलेल्या ‘कॉमन सेन्स’ या अगदी जवळच्या मित्राच्या अकाली मृत्युमुळे झालेले दुःख जाहीरपणे व्यक्त करण्यासाठी आलो आहोत. तो किती वयाचा होता याची आपल्याला कल्पना नाही. कारण त्याचा जन्म दाखला सरकारी फायलीतून केव्हाच गायब झाला आहे.

त्यानी वेळोवेळी आपल्याला दिलेल्या सूचना व सल्ला यांच्यामुळे तो कायमचाच आपल्या स्मरणात राहील. कारण त्याच्या सूचना व सल्ले फारच बहुमूल्य व अफलातल्या असत. कठिण प्रसंगातून निभावून जाण्यासाठी त्याच्या सूचना फार उपयोगी पडत होत्या.

- पावसात न भिजता कसे घरी परत यायचे
- गर्दीत वाट काढत बस वा लोकल कसे पकडायचे
- मित्र-मैत्रिणींना वेळ प्रसंगी कसे कटवायचे
- इतरांचा मामा कसा करायचा

यासारख्या गोष्टी आपण त्याच्याकडूनच शिकल्या.

- आपलं जगणं वाटत तितकं सोप नाही,
- चूक झाली असल्यास माफी मागून ती चूक सुधारा,
- कदाचित माझीच चूक असेल, माफ करा,
- फार ताणण्यात काही अर्थ नाही,

- खोटं कधीना कधी तरी उघडे पडणार,
- अती तेथे माती,
- मूर्खासमोर अक्कल चालत नाही,

असं तो काहीबाही बरळत असायचा.

एक साधा सरळ मार्गाने जाणारा तो होता. गरजेपेक्षा जास्त त्याच्याजवळ काहीही नव्हते. तो नेहमीच आपल्याला काटकसरीने राहण्याचा सल्ला देत असे. कुणावर भरोसा ठेवावे व कुणावर ठेऊ नये याची त्याला चांगल्यापैकी जाण होती. केव्हा ताठरपणा दाखवावा, केव्हा माघार घ्यावी, हे त्याला कळत होते. जगात कसे वागावे, इतराशी व्यवहार कसा करावा याची त्याला चांगलीच समज होती. तो कधीही भावनावश होऊन कुठलीही कृती करत नव्हता. कठिण प्रसंगीसुद्धा तो हसत-खेळत त्यातून बाहेर पडत होता.

आयुष्यभर त्यानी काही मूल्ये जपली होती. व इतरांनीही ती मूल्ये जपावी असे त्याला वाटत होते. खरे बोलावे, चोरी करू नये, निसर्गावर प्रेम करावे, थोरा-मोठ्यांचा आदर करावा, शक्य असेल तेथे व शक्य होईल तेवढे दुसऱ्यांच्या मदतीला धावून जावे, असे तो नेहमीच सांगत असे. खाण्या-पिण्यात संयम असावे, नको तेथे तोंड खुपसू नये, बोलण्यातून कुणालाही दुखवू नये, असेही काही तरी तो सांगत होता.

परंतु गेली 4-5 वर्षे तो आजारी होता. त्याच्या जगण्यावर नको तितके दडपण आल्यामुळे तो आजारी पडला. एका शिक्षकाने विद्यार्थिनीच्या शाबासकीची कौतुक करत पाठ थोपटली. त्या विद्यार्थिनीने इतका गहजब मांडला की त्या शिक्षकावर खटला भरला गेला, त्याला नोकरीवरून काढून टाकण्यात आले. हे सगळे कॉमन सेन्सला सहन करण्याच्या पलीकडचे होते. एका मुलाने माउथ वाश वापरतो म्हणून त्याच शाळेने काढून टाकले होते

म्हणे. विद्यार्थ्याला खरचटले तरी आयोडिन लावण्यासाठीसुद्धा पालकांची परवानगी घ्यायची म्हणे.

त्याला नेहमीच आपल्यावर कुणीतरी पाळत ठेवत आहे असे वाटू लागले. कुणाच्या बद्दल काही बोलायची, लिहायची चोरी. सगळे वसकन ओरडत अंगावर धावून यायचे. शाळेत काय काय चाळे चालतात, शिक्षणाचा काय खेळ खंडोबा चालला आहे ते बघून त्याला जीव द्यावेसे वाटत होते. शेतकऱ्यांसाठी काही तरी करा, हकनाक जीव देत आहेत असे म्हटल्यावर मोठ-मोठे आकडे अंगावर फेकून त्याचे तोंड बंद करायचे. एकदा तर गायीला हात लावला म्हणून त्याला रक्तबंबाळ करून तुरुंगात डांबून ठेवले. राजकीय नेत्यांना उर्मटपणाने वागू नका, तुम्ही जनतेचे प्रतिनिधी आहात, तुम्हाला लोकांनी निवडून दिले आहे असे सांगायचा प्रयत्न केल्यामुळे देशद्रोही म्हणून हिणवायचे. कष्ट करून जमवलेली त्याची पुंजी एका रात्रीत (कुणाच्या तरी आततायी निर्णयामुळे) कवडीमोल झाली. शहाणी-सुरती माणसं ज्या प्रकारे मत प्रदर्शन करत होते, लांगूल चालन करत होते ते बघून त्याला वीट आला. लहान मुला-मुलींना, तरुण-तरुणींना त्यांनी कितीही सांगितले तरी ते ऐकायला तयार नव्हते.

नियती, दैव, नशीब, पूर्वजन्म, पाप-पुण्य यात काही तथ्य नाही हे कॉमन सेन्सने हजार वेळा सांगितले तरीही लोक – त्यातल्या त्यात सुशिक्षित म्हणवून घेणारे – बाबा-बुवांच्या नादी लागत होते याचे त्याला फार वाईट वाटायचे. स्त्रियांच्यावर, दलितावर होत असलेल्या अमानुष वागणुकीच्या बातम्या वाचताना त्याला फार कष्ट होत असे. आताची सामाजिक व राजकीय परिस्थिती इतकी विपरीत झाली होती की त्याला जीव नको नकोसे वाटू लागले. घरात घुसून दरोडा घालत असताना चोराने भरपूर मारपीट केली.

तरीसुद्धा याच्या विरुद्धच त्या चोराने पोलीस स्टेशनमध्ये मारहाण केली म्हणून तक्रार नोंदवली व पोलीससुद्धा त्या दरोडेखोराचीच साथ देत होते.

अगदी शेवटच्या दिवशी तर एका महिलेने मोबाइलवर बोलत बोलत गाडी चालवत असताना त्याला धडक दिली. याला लागलेले असतानासुद्धा तिने चार चौघाना जमवून स्वतःच आरडाओरडा करत तडजोडीची रकम मागू लागली. बघ्यापैकी कुणीही त्याला साथ दिली नाही. या प्रकरणानंतर त्याला आता जिवंत राहावेसे वाटेनासे झाले.

- मला माझे हक्क माहित आहेत,
- मला आताच्या आता पाहिजे,
- दुसरेच कुणी तरी दोषी आहेत,
- मलाच बळीचा बकरा बनवत आहेत,
- काहीही न करण्यासाठी मला (भरपूर) मोबदला हवा,

असे घोशा लावणारे त्याच्या मित्रांचा व नातलगांचा त्याला वीट आला होता.

बहुतेक जणांना हा मेला हे माहितीच नाही. तुम्हाला जर तो आठवत असल्यास त्याच्या निधनाची बातमी इतरांना कळवावी ही माझी कळकळीची विनंती. तुम्हालाही त्याचे अस्तित्व कधी जाणवले नसल्यास तुम्हीसुद्धा, काहीही न करणाऱ्या झुंडीच्या मागे राहून, अशी एखादी व्यक्ती होती हे विसरून जा.



# एमू पालनाचा फसलेला प्रयोग

आजकाल ‘स्टार्टअप’ची हवा आहे. प्रत्येक स्टार्टअपवाल्याला वाटत असते की आपली आयडियाच भन्नाट आहे; आपले उत्पादन नक्कीच हिट होईल; पैशाचा धो धो पाऊस पडेल; ग्राहकांची गर्दी होईल; आपण बघता बघता अंबानी टाइप आलिशान बंगल्यात राहायाला जाऊ; ऐषारामात राहू. इ.इ. परंतु हवेत तरंगायला लावणारे हे शेख महंमदी विचार काही काळातच आपल्याला जमिनीवर उतरवतील व बघता बघता आपली गुंतवणूक व गुंतवणुकीनंतरच्या स्वप्नांना चक्काचूर करतील याची कल्पनासुद्धा आपल्याला करता येणार नाही. अशाच एका गुंतवणुकीचा आपण मागोवा घेणार आहोत. व त्यातून काही शिकण्यासारखे असल्यास शिकणार आहोत.

काही वर्षापूर्वी भारताच्या ग्रामीण भागाला ऑस्ट्रेलियाच्या एमू या महाकाय, अगडबंब पक्ष्याने अक्षरशः वेड लावले होते. कुणाच्या तरी सुपीक डोक्यातून आलेल्या या कल्पनेला पैसेवाल्या शेतकऱ्यांनी डोक्यावर घेतले. कोंबडी पाळतो त्याच प्रमाणे एमू पाळायचे; त्यात काय अवघड आहे, अशीच समजूत या व्यवसायात पैसे गुंतवलेल्यांची होती. मुळात यात नवीन काही नव्हते. अशाच प्रकारे एमूपालनाच्या फंदात पडलेल्या अमेरिकेतील टेक्सास प्रांतातील कृषी उद्योजकांनी हात पोळून घेतले होते. परंतु पुढच्याला ठेच मागचा शहाणा या म्हणीतील तथ्यांशाकडे काना डोळा करत आपणच फक्त शहाणे इतर सर्व मूर्ख अशी समजूत करून घेतल्यामुळे आपले उद्योजक नव्या उत्साहाने एमूच्या या बेभरवश्याच्या उद्योगावर पैसे गुंतवले व अक्षरशः काही महिन्यात कफल्लकही झाले.

एमू हा मूळचा ऑस्ट्रेलियातील राष्ट्रीय पक्षी म्हणून मिरवणारा पक्षी. पक्षी-जगतातील शहामृगानंतरचा नंबर दोनचा महाकाय पक्षी. ऑस्ट्रेलियातील मूळ आदिवासीपासून आतापर्यंतच्या नागर संस्कृतीला प्रेरणा देणारा. ऑस्ट्रेलियाचे

सैनिकी समवस्त्र, पोस्ट तिकीट व तेथील 50 सेंटच्या नाण्यावर विराजमान झालेल्या या पक्षीच्या संदर्भात हजारो लोककथा व आख्यायिका आहेत व पिढ्यान पिढ्या त्यांचे पारायण होत असते. एवढेच नव्हे तर एमूच्या विरोधात 1932मध्ये युद्धही पुकारले होते. कारण या पक्ष्यांचा थवा शेतकऱ्यांच्या पिकाचा नाश करतो. परंतु या युद्धातही एमूच विजयी ठरले.

19व्या शतकात या पक्षीला जागतिक प्रसिद्धी मिळाली. जगभरातील प्राणी संग्रहालयात एमू दिसू लागले. बालकांपासून प्रौढ प्रेक्षकापर्यंत सर्वांचाच हा कुतूहलाचा विषय होता. काही काळ तर एमूच्या मांसाला डेलिकसीचा दर्जा मिळाला. याच्या मांसाची चव घेणाऱ्यांच्या संख्येत प्रचंड वाढ झाली. अमेरिकेतील उत्साही उद्योजकांना या व्यवसायात प्रचंड नफा दिसू लागला. याच निमित्ताने अमेरिकेतील टेक्सास प्रांतात 1986च्या सुमारास एमूंच्या जोड्यांचा प्रवेश झाला. या सुमारास हजारेक डॉलर्सला मिळणाऱ्या जोडीचा 1993मध्ये 28000 डॉलर्स पर्यंत भाव वधारला. एमूच्या व्यावसायिकांनी स्वतंत्र संघटना उभी केली. सदस्यांची संख्या वाढू लागली. 1988 ते 1994पर्यंतच्या काळात सदस्यांची संख्या 27 पट वाढली. 5500 सदस्य टेक्सासमधले होते.

एमूचा टेक्सासमधला प्रवेश त्याच्या चवदार मांसासाठी झाला. बीफचे रेड मीट आरोग्याला हानिकारक असते हे कळल्यानंतर टेक्सासमधील नवश्रीमंत पर्यायाच्या शोधात होते. 1980च्या सुमारास त्यांच्या जिभेचे चोचले पुरविण्यासाठी अनेक प्रयोग करण्यात आले. त्यात एमूचे मांस उत्कृष्ट ठरले. एमूच्या मांसात कोलेस्टोरॉल कमी, लोह जास्त व चवीलाही उत्कृष्ट हे कळल्यावर हॉटेल व्यावसायिकांची याच्या मांसासाठीची मागणी वाढली. एमूच्या व्यापारात मोठी गुंतवणूक करण्यासाठी नवश्रीमंत पुढे सरसावले. परंतु

हा फुगा कधी फुटेल याचा अंदाज आला नाही. धोका काही सांगून सवरून येत नसतो. कुठून कधी येईल याची कल्पना येत नाही.

यापूर्वीसुद्धा जास्त कमवण्याच्या हव्यासापायी देशोधडीला लागलेल्या व्यावसायिकांची संख्याही कमी नव्हती. हे लोण औद्योगिक क्रांतीनंतर मोठ्या प्रमाणात पसरली. या क्रांतीनंतर रोज नवीन नवीन कल्पनांची भर पडत होती. व अशा भन्नाट कल्पनांच्या मागे गुंतवणूक करण्यास तयार असलेले भरपूर होते. 17 व्या शतकात ट्यूलिपच्या शेतीने गुंतवणूकदारांना कफल्लक बनविले. 18व्या व 19व्या शतकात रेल्वे बाँड्सनी धुमाकूळ घातला. 20व्या शतकात स्टॉक मार्केट व काही महिन्यात पैसे दुप्पट करून देऊ या आश्वासनांच्या पाँझी स्कीम्सनी गुंतवणूकदाराना लुबाडले. व 21व्या शतकात बिटकॉइन हे काम करत आहे. या सर्व व्यवहारामागे प्रामाणिक प्रयत्नापेक्षा जास्त कमाईचा हव्यासच कारणीभूत होता. येथेही मेंढरांच्या मानसिकतेचाच प्रत्यय येतो. पुढचा खड्यात पडला की त्याच्या मागोमाग दुसराही तयार!

समाज माध्यमाचा नुकताच प्रवेश झाला होता. त्याचा खुबीने उपयोग करून येमूच्या उद्योगात गुंतवणूक करण्यास आकर्षित करण्यात आले. मौखिक जाहिराती व स्थानिक पेपरमधील जाहिरातवजा बातम्यांनी एमू पालनातून मिळणाऱ्या भरमसाठ उत्पन्नाची हमी दिली. एमू पालनातून मिळणाऱ्या नफ्याच्या अंदाजांचे उदात्तीकरण केल्यामुळे गुंतवणूक करणाऱ्यांच्यातील लोभी वृत्ती जागी झाली. एमू म्हणजे जणू काही कामधेनूच; जिवंत असताना नारळाच्या आकाराचे 10-15 अंडी देणारा, नियमितपणे पिल्लाना जन्म देणारा, भरपूर आयुष्य असलेला, व मेल्यानंतर चवदार मांस देणारा, त्यांच्या पिसातून व कातडीपासून फॅशनेबल वस्तू बनवता येणारा हा पक्षी होता. व त्याच्या अंड्यापासून चार जणाचे पोट सहज भरण्याइतके ऑम्लेट/बर्गर्स बनविता येईल व त्यासाठी ग्राहकांची रीघ लागेल यावर

उद्योजकांचा विश्वास होता. एमूच्या अंड्याचा आकार 13 सेंमी x 9 सेंमी एवढा मोठा व वजन अर्धा किलोच्या आसपास असल्यामुळे ग्राहकांना त्याची भुरळ पडली नसेल तरच नवल. फक्त त्या अंड्याची किमत कोंबडीच्या अंड्यापेक्षा 50-60 पट असणार याचा अंदाज जाहिरात वाचताना लक्षात आला नाही. जाहिरातीतील भरमसाठ आकडेवारीवर सर्वजण डोळे मिटून विश्वास ठेवत होते. एकाचे दोन, दोनाचे चार, चाराचे सोळा याप्रमाणे फुगा फुगतच गेला. व धोक्याच्या इशाऱ्याकडे एकजात सर्वांनी दुर्लक्ष केले.

एमूच्या या वैचित्र्यपूर्ण व्यवहाराला त्याकाळच्या प्रशासनानीही थोड्या फार प्रमाणात हातभार लावला. 1992ते 1995च्या कालखंडात कृषी खाते एमू पालनासाठी 4 लाख डॉलर्स कर्ज देत होती. एमू पालनाच्या उत्पन्नावरील करात सवलत जाहीर झाली. टेक्सास प्रांतातील कायद्याप्रमाणे जगभरातील कुठल्याही प्राण्याची आयात करण्यास मुभा होती; मग एमू असो की वाघ-सिंह असो. त्या प्राण्यांचे काय करायचे; पाळायचे की मारून खायचे हे ज्यानी त्यानी ठरवावे. त्यामुळे एमूच्या आयातीला कुठलेही निर्बंध नव्हते. याचा पुरेपूर फायदा मधल्या दलालानी घेतला.

खरे पाहता येमूचा पाळीव पक्षी म्हणून काय काय करावे याबाबत एमूपालनातील उद्योजक पूर्णपणे अनभिज्ञ होते. एमूंना चरण्यासाठी, हालचालीसाठी गायी-गुरांच्या एवढी मोठी नसली तरी मोठी मोकळी जमीन लागते, हेही त्याना माहित नव्हते. त्याच्या खाण्या-पिण्याच्या सवयींची कल्पना नव्हती. त्यांच्या भटकण्याच्या वेळा, समागमाच्या सवयी, काल, वेळ इत्यादी तपशील व अमेरिकेतील हवामानाला त्या मानवतील की नाही, याचा प्राथमिक अभ्यासही कदाचित त्यांनी केला नसेल. एमूच्या जोड्या विकत घेतलेले शहरी उद्योजक ग्रामीण भागात स्थलांतरित झालेले. त्यांना कोंबडी

पाळल्यासारखे एमू पाळता येईल असे वाटत होते. त्यातले काही जण एमूच्या अंड्यांना किचनमध्ये बल्बच्या उष्णतेवर उबवण्याचे प्रयत्न करत होते!

मुळात एमू हा अत्यंत निरुपद्रवी प्राणी. टेक्सासच्या राकट शेतकऱ्यांची हाताळणी निमूटपणे सहन करणारा. मात्र त्या पक्ष्यांचे काही वैशिष्ट्यही होते. वरकरणी शांत दिसणारी एमूंची जोडी समागमऋतूत रौद्ररूप धारण करते. त्या काळात मादी एमू जोर जोराने किंचाळत मोठ्या आवाजात ओरडत असते व नर एमू हुंकाराने प्रतिसाद देत असतो. इतर प्राणी-पक्षीमध्ये न दिसणारा स्त्रीसत्ताक पद्धतीतील स्त्रीश्रेष्ठत्व एमू वंशात आढळतो. येथे नर एमू आपल्याला आवडेल त्या मादीचा शोध घेऊन समागम करत नाही; तर मादी आपल्याला आवडेल त्या नराशी समागम करते. यासाठी कित्येक वेळा माद्यामध्ये भांडणंही होतात. नर एमूला समागमासाठी निवडीचे स्वातंत्र्य नाही. समागमनांतर मादी दर एक दोन दिवसाच्या अंतरावर 10 -15 अंडी घालून नर एमूच्या ताब्यात देते व चरण्यासाठी चक्क निघून जाते. नर एमू अंडी उबवण्यापासून पिल्लं मोठी होईपर्यंत त्यांच्या पालन पोषणाची एक पालकत्वाची जबाबदारी पुढच्या समागमाच्या ऋतुपर्यंत घेतो व नंतर कुठली मादी एमू आपल्याला निवडते याची प्रतीक्षा करत वेळ घालवतो. अनेक वेळा स्वतः 8-10 दिवस उपाशी राहून पिल्लांना तो भरवू शकतो.

एमूच्या या सर्व वैशिष्ट्यपूर्ण गुणधर्मामुळे ज्यांना एमू पालनातून बक्कळ कमाई करायची होती त्यांच्या पदरी निराशा आली. महत्वाते म्हणजे या महाकाय पक्ष्यांना आवरायचे कसे, हेच त्यांना कळेनासे झाले. पूर्ण वाढलेल्या एमू पक्ष्याची उंची सामान्य माणसापेक्षा जास्त – सहा ते साडे सहा फूट – असते व वजनही 50-55 किलोच्या आसपास. जरी त्यांना उडता येत नसले तरी ताशी 50 किमी वेगाने ते पळू शकतात. त्यांच्या अंड्याच्या व पिल्लांच्या

आसपास गेल्यास जोराने लाथाही मारू शकतात व आलेल्यांना रक्त बंबाळ करू शकतात.

एमूंना वाढविणे हे सुद्धा काही सोपे नव्हते. उद्योजकांनी लाखोंनी पैसे ओतले होते. व त्यांना योग्य परतावा हवा होता. परंतु देखभालीचा खर्च वाढतच होता. कोंबड्यांसारखे बंदिस्त अशा 1-2 गुंठे जागेत त्याना ठेवणे अशक्य होते. एमूसाठीची जागा एकरात मोजावी लागत होती. त्यांच्या खाण्यापिण्यासाठी प्रचंड प्रमाणात खर्च येत होता. एवढेच नव्हे तर हा सर्व व्यवहार आतबट्ट्यातला ठरत होता. कित्येक ठिकाणी फसवा फसवी झाली. एमूंची आयात करून देतो म्हणणारे मधले दलाल पैसे घेऊन बेपत्ता झाले. पोलीसांकडे तक्रार नोंदवूनही काही उपयोग झाला नाही. एवढे सर्व करूनही एमूच्या अंड्यांना व मांसाला मागणीही नव्हती. ग्राहकांनी याकडे चक्क पाठ फिरवली. एमूच्या मांसात कोलेस्टोरॉल प्रमाण कमी असूनही स्वस्त असलेल्या बीफलाच जास्त उठाव होता. उद्योजकांना काय करावे हाच प्रश्न पडला. सहकारी तत्वावर ठिकठिकाणी विक्री केंद्रं उभारण्यात आले. परंतु मोठ्या प्रमाणातील विक्रीचे स्वप्न स्वप्नच राहिले. वास्तव फारच वेगळे होते. ग्राहकांना रोजच्या खाण्यात एमूचे मांस न परवडण्यासारखे होते.

मागणी कमी होत गेली व पुरवठा वाढतच गेला. खरे पाहता एमूची एक जोडी 5-15 अंडी घालत होती व अंडी घालण्याचा हा काळ सुमारे 16 वर्षे होता. वर्षाला 10-12 अंडे पुनरुत्पादनासाठी वेगळे ठेवत गेल्यास त्यातून पुढील 5 वर्षात 133 जोड्या जन्माला येऊ शकतात. व दहा वर्षात ही संख्या 36000 पर्यंत जाऊ शकते. परंतु जसजशी एमूंची संख्या वाढायला लगली तसतशी अमेरिकनांची रेड मीटवरील वासनाही उडाली.

1998नंतर एमूची किंमत शून्याच्या जवळ पास आली. ही बला आपल्याला नको म्हणत शेतकरी कुंपण उघडून एमूंना बाहेर हाकलून देऊ

लागले. एमू पळून गेल्यास ज्याना हवे ते त्यांना पाळू शकतात, हा हिशोब त्यामागे होता. 2-4 डालर्सलासुद्धा एमूना विकत घेण्यास ग्राहक नव्हते. भरकटत गेलेला यमूचा थवा हा रहदारी पोलीसांची डोकेदुखी झाली. रात्री - अपरात्री गाड्यांची पर्वा न करता एमू हमरस्ता ओलांडत होते. पोलीसांनी पकडले तरी त्यांना ठेवायचे कुठे वा त्यांचे काय करायचे हेच पोलीसांना कळेनासे झाले. कारण या महाकाय पक्ष्यांसाठी कोंडवाडेच त्यांच्याकडे नव्हते. एमूचे आयुष्य थोडे थोडके नव्हे, तर 30 वर्षे असते. काही शेतकरी त्यांना उपाशी ठेऊन मारू लागले. काहींनी बेसबॉलच्या बॅटने मारून त्यांचा जीव घेतला. टेक्सास प्रांतात प्राणी – पक्षी म्हणजे त्यांच्या दृष्टीने स्वतःच्या मालकीची मालमत्ता होती. त्याचे काय करायचे याचे संपूर्ण स्वातंत्र्य टेक्सासवासियांना होते. त्यात सरकारची लुडबुड चालत नव्हती. एमूचा हा कटु अनुभव पदरी बाळगून पुढची पिढी शहाणी झाली. 2013 नंतर हा एमू पालनाचा खेळ कायमचा संपला.

परंतु अमेरिकेची भ्रष्ट नक्कल करण्यात धन्यता मानणाऱ्या भारतीय उद्योजकांनी अमेरिकेत पूर्णपणे फसलेल्या या उद्योगाला पुनरुज्जीवित करण्याचा चंग बांधला. 2013मध्ये मध्यप्रदेश, उत्तर प्रदेश, तमिळनाडू, आंध्र प्रदेश व काही प्रमाणात महाराष्ट्रातही एमू पालनाचे वेड लागले. या वेड्यांच्या हव्यासात ऑस्ट्रेलियातून एमू पक्ष्यांना आयात करणाऱ्यांनी अमाप पैसे कमविले. कृषी उद्योजक त्यांच्या भूलथापांना बळी पडले. एमूंच्या विक्रीसाठी काही बोगस कंपन्या निघाल्या. जाहिरातीच्या जोरावर लोभी शेतकऱ्यांना आता अडीच लाख रुपयाची ठेव भरून एमूची जोडी घेऊन जा व वर्षानंतर जोडी परत आणून दिल्यास ठेव परत व वर्षभरातील त्यातून मिळणाऱ्या उत्पन्नावर शेतकऱ्यांचा पूर्ण हक्क अशी लालूच दाखवून एमू पालनाच्या धंद्यात त्यांना ओढण्यात आले. वर्षभरात ही एमूची जोडी किती अंडे देईल,

त्यातून किती कमाई होईल, किती पिल्लं होतील, ती पिल्लं वाढल्यानंतर किती उत्पन्न मिळेल, एमू मेली तर त्यातून काय काय मिळेल, किती फायदा होईल याचे आकडे शेतकऱ्यांच्या अंगावर फेकून या कंपन्या गबर झाल्या. एकेक अंड्याची किंमत हजार रुपये ठेवले तरी नवीन उदयास आलेले धाबे, रिसॉर्ट्स व पंचतारांकित हॉटेल्स सहज विकत घेतील या आश्वसनावर विसंबून शेतकऱ्यांनी बँकेतून कर्ज काढून एमूच्या जोड्या घेऊन आले. वर्षभर कसेबसे खस्ता खात एमूची जोडी जिवंत ठेवण्यात काही शेतकरी यशस्वी झाले. व हे शेतकरी वर्षानंतर एमूची जोडी घेऊन पैसे परत मागायला जाईपर्यंत कंपनी गाशा गुंडाळून गायब. बँक मात्र जप्तीची नोटीस घेऊन दारात हजर. वर्षभरात हा भ्रमाचा भोपळा फुटला. हाती काही लागले नाही. बँक तगादा लावून हप्ते वसूल करू लागली. स्वतःची शेतजमीन विकून कर्ज फेडण्याची पाळी शेतकऱ्यावर आली. बँकेतील अधिकारी, बोगस कंपन्या व दलाल या सर्वांनी मिळून संगनमताने शेतकऱ्यांना नागविले. मोठ्या परताव्याच्या लोभापायी शेतकरी देशोधडीला लागले. एमू मात्र कुठल्यातरी जंगलातील हिंस्र पशूंचे शिकार झाले.

अशी आहे ही एमू पक्ष्याची (रड)कथा. यातून काय शिकता येईल हे वेगळे सांगण्याची गरज नाही.



# भांडवलशाही हीच एक मोठी समस्या

पृथ्वीच्या अस्तित्वाच्या मुळावरच घाव घालणारी भांडवलशाही – मग ती कार्पोरेट भांडवलशाही असो की ग्राहक (consumer) भांडवलशाही की, क्रोनी कॅपिटॅलिझम, वा social, liberal , market economy इत्यादीपैकी कुठलीही असो,- हीच एक फार मोठी समस्या आहे. भांडवलशाहीला जोडलेल्या या विशेषणांना दोष न देता मूळ नामपदाला आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करणे त्यामुळे सयुक्तिक ठरू शकेल. भांडवलशाहीतील पाठभेदांकडे बोट न दाखवता मूळ व्यवस्थाच आपल्या पृथ्वीला गिळंकृत करण्याच्या मार्गावर आहे याबद्दल अजिबात शंका नाही. आपल्याकडे या व्यवस्थेला दुसरा पर्यायच नाही किंवा इतर पर्यायांचा विचारच करायचे नाही असे म्हणत गप्प बसणे हेसुद्धा आत्मवंचनाच ठरू शकेल.

खरे पाहता आता साठ-सत्तरीच्या वयोगटात असलेल्या पिढीने आपल्या तारुण्यात या पृथ्वीला भांडवलशाही व्यवस्थेस जुंपवून फळे चाखल्यामुळे आता या व्यवस्थेला नाव ठेवण्याचा अधिकारही ही पिढी गमावून बसली आहे. कारण ही पिढी भांडवलशाहीवर पोसलेली पिढी होती व त्या पिढीने मागचे पुढचे विचार न करता नैसर्गिक स्रोत उध्वस्त करत, निसर्गाला ओरबडत या पृथ्वीला विनाशाच्या उंबरठ्यावर आणून ठेवली आहे. आताच्या विनाशाचे मूळ भांडवली व्यवस्थेने जन्माला घातलेल्या चंगळवादातच सापडत असल्यामुळे आताच्या पिढीला पुन्हा एकदा हा प्रश्न ऐरणीवर आणावेसे वाटत असल्यास त्यात काही वावगे नाही. ‘आधुनिक हवामानशास्त्राचे पितामह’ डॉ. जेम्स हॅन्सेन यांची नात सोफी किव्हलीहॅन हिने खेळण्या-बागडण्याच्या वयात कर्ब उत्सर्जन आणि तापमानवाढ यांचा जीवसृष्टीवर होत असलेला परिणाम या आजोबानी सुरु केलेल्या संघर्षात उडी घेतली. तिने आणि केल्सी कॅस्कॅडिया रोज ज्युलियाना या 16 वर्षांच्या मुलीने

8 ते 11 वयोगटातील मित्र-मैत्रिणींना साथीला घेऊन 'हवामान बदलाच्या' मुद्द्यावर त्यांच्याच अमेरिकी सरकारला न्यायालयात खेचले! पालकांच्या पिढीला अजिबात सुचली नाही अशी धडाडी बालकांनी दाखवली. TIME साप्ताहिकाच्या मुखपृष्ठावर झळकलेली, स्वीडनमधील नवव्या इयत्तेतील मुलगी ग्रेटा थनबर्ग ही हवामानबदलाच्या बातम्या ऐकून वयाच्या आठव्या वर्षी तिने तेथील सरकारच्या विरोधात संघर्ष करू लागली. ऑस्ट्रेलियापासून अमेरिकेपर्यंत 120 राष्ट्रांतील 15 लाख विद्यार्थ्यांनी 'हवामानबदल रोखण्यासाठी राजकीय नेत्यांनी कृती करावी' हे बजावण्यासाठी शाळा बंद पाडल्या. दिल्लीत 700, तर हैदराबादेत 400 मुले 'श्वास स्वच्छ हवा' म्हणत होते. मुंबई, भावनगर, उदयपूर येथील मुलेदेखील पर्यावरणरक्षणाच्या मागणीसाठी सरसावली होती. जगभरातील मुले निराशा, संताप व भीती व्यक्त करीत होती. या पहिल्या जागतिक हवामान आंदोलनाने जग हादरून गेले आणि बालकांच्या उत्साहाला उधाण आले. जगातील समस्त प्रसारमाध्यमांनी या पर्यावरण योद्धय़ांचे भरभरून कौतुक केले. 'द गार्डियन'ने यास 'ऐतिहासिक सविनय कायदेभंग चळवळ' संबोधले.

भांडवलशाही अपयशी होत आहे असे (पश्चातबुद्धीने) 21व्या शतकात म्हणणे म्हणजे 19व्या शतकातील काही जाणकारांनी परमेश्वराचा मृत्यु झाला आहे असे म्हटल्यासारखे वाटेल. 19व्या शतकात परमेश्वराच्या अस्तित्वाविषयी थोडा जरी संशय व्यक्त केला तरी तुम्हाला पाखंडी ठरवून समाजातून हद्दपार केले जात होते. तशीच अवस्था भांडवलशाहीविरुद्ध एक चकार शब्द उच्चारणाऱ्यांची होईल की काय असे वाटत आहे. कारण आज जगभरातील सर्व देश अगदी मुकाट्याने भांडवलशाहीचा – त्यातल्या त्यात मुक्त बाजारपेठ व्यवस्थेचा – स्वीकार केला आहे. चीन, रशिया सारखे एके काळी साम्यवादी असलेले राष्ट्रे आता उघड उघड भांडवलशाहीचा अंगीकार

करत आहेत व त्यात त्यांना अजिबात कमीपणा वाटत नाही. त्यामुळे मानवी वंशाच्या अस्तित्वासाठी भांडवली व्यवस्थेला पर्याय नाही असेच वाटत आले आहे. परंतु जगभरातील मूठभर लोकांच्या हट्टापायी बहुतांश लोकांचे आबाळ होत आहे हे स्पष्टपणे दिसत असूनसुद्धा भांडवलशाहीचे गोडवे गायले जात आहेत. परंतु निसर्गाचा ऱ्हास होत आहे, हवामान बदलामुळे निसर्गचक्र बदलत आहे, नैसर्गिक संसाधनं नष्ट होत आहेत, याकडे डोळेझाक करणे शक्य नाही. त्यामुळे पृथ्वीला वेठीस धरण्याला भांडवलशाहीच कारणीभूत होत आहे असे म्हणावे लागत आहे. भांडवलशाही अपयशी होत आहे हेच खरे असेल तर एक नवीन संपूर्णपणे वेगळी असलेल्या व्यवस्थेचा विचार करण्याची आता अत्यंत गरजेचे आहे.

भांडवलशाहीचे यशापयश त्याच्यातील दोन अंगभूत घटकात दडलेले आहे. त्यातील पहिला घटक म्हणजे ते देत असलेले शाश्वत वाढीचे आश्वासन. भांडवल वृद्धीसाठी जास्तीत जास्त नफेखोरी करायचे व त्यातून आर्थिक वाढ करत रहायचे हा भांडवलशाहीचा मूळ पाया आहे. वाढ नसल्यास भांडवलशाही कोसळून पडेल. त्यामुळे या अखंड वाढीची भूक, मर्यादित प्रमाणात नैसर्गिक स्रोत असलेल्या पृथ्वीला (व/वा अवकाशाला) पर्यावरणीय संकटात ढकलून देत आहे. भांडवलशाहीच्या दृष्टीने ही पृथ्वी म्हणजे कच्चा/पक्का व्यापारी माल पुरवणारे जणू एक अक्षयपात्रच आहे.

अलीकडील भांडवली व्यवस्थेचे पुरस्कर्ते नैसर्गिक स्रोतांच्या मर्यादा लक्षात घेत जणू या पृथ्वीवर उपकार केल्यासारखे वस्तूंच्याऐवजी सेवाक्षेत्रातून आर्थिक वाढ करण्याची हमी देत आहेत. परंतु विसाव्या शतकात काही प्रमाणात केवळ सेवाक्षेत्रातून आर्थिक वाढ झाली असली तरी एकविसाव्या शतकातील सेवाक्षेत्रही मुबलक प्रमाणात नैसर्गिक स्रोतांची तोडफोड करत वाढीमुळे काही धोका नाही असा आभास निर्माण करत आहे. 20व्या

शतकाच्या अखेरच्या काही दशकात आर्थिक वाढीचे प्रमाण व नैसर्गिक संसाधनांच्या वापराचे प्रमाण जवळ जवळ सारखे होते. परंतु 21 व्या शतकात नैसर्गिक स्रोतांचा अती वापर होत असल्यामुळे पर्यावरणाचे संतुलन पूर्णपणे बिघडलेले आहे. नैसर्गिक स्रोतांना हात न लावता त्यांचे संरक्षण व/वा संवर्धन करत आर्थिक वाढ होऊ शकते हे मृगजळच ठरत आहे. भांडवली व्यवस्थेचे स्वप्नसदृश हरित वाढ (Green Growth) हे भ्रमच राहिले आहे.

अजून एक घटक म्हणजे निसर्गाला गृहित धरण्याची भांडवलशाहीची वृत्ती. शाश्वत वाढीला आसुसलेली भांडवली व्यवस्था प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे निसर्गाला नेहमीच कस्पटासमान मानत आले आहे. निसर्गाला ही व्यवस्था दोन झोनमध्ये विभागून टाकली आहे. वाटेल तसे व/वा वाटेल तितके कच्चा/पक्का माल ओरबडण्यासाठी एक झोन आणि व्यापारी वस्तुनिर्मितीतून साठलेल्या/बाहेर पडलेल्या कचऱ्याची विल्हेवाट करत राहण्यासाठी दुसरा झोन. आणि हे दोन्ही झोन एकमेकात केव्हा सरमिसळ होतात याची कल्पनासुद्धा सामान्यांना येत नाही. ही भांडवली व्यवस्था अशा प्रकारच्या बाह्य परिघाशिवाय तग धरू शकत नाही. यासाठी कुठलीही किंमत स्वतःहून देण्याची तयारी या व्यवस्थेत नसते.

भांडवलशाही व्यवस्थेस अपेक्षित असलेली आर्थिक सूज आख्या पृथ्वीचा बळी घेत आहे. पृथ्वीच्या खोल पोटात शिरून त्याचा विध्वंस करत आहे. पृष्ठभागावरील अरण्य, पशू-पक्षी, पाण्याचे स्रोत, नद्या-नाले, समुद्र व समुद्राच्या तळापर्यंत असलेले जीव व वनस्पतींचा नाश करत आहे. ही भांडवलशाही पुनर्भरणाचा अजिबात विचार न करता व्यवस्था राबवत आहे. फारच आरडा-ओरडा केल्यास काही तरी जुजबी उपाय करून ओरडणाऱ्यांचे तोंड बंद करत आहे.

आपल्यातील बहुसंख्यांना ही प्रळयसदृश स्थितीचा अंदाजच आला नाही. कुठल्याही युद्ध, आर्थिक मंदी, दुष्काळ, वा घातक साथीचे रोग यांच्यापेक्षाही आताची स्थिती फारच वाईट आहे. या पूर्वीचे अनेक समाज अशा चारी प्रकारच्या संकटातून कसेबसे बाहेर पडून पुन्हा एकदा समाजाची उभारणी करत आले आहेत. परंतु आता आपल्या पायाखालील माती, विपुल प्रमाणात असलेले जीवावरण, रहिवासयोग्य हवामान यांनाच व्यवस्था गिळंकृत करू पाहत आहे. आपल्या जीवनाधारांनाच ही व्यवस्था नष्ट करू पाहत आहे.

पैशाने नैसर्गिक संसाधनासकट सर्व काही विकत घेता येते व तसे करणे हा माणसाचा मूळ हक्क आहे ही समज दृढ करण्यात भांडवलशाही यशस्वी झाली आहे. या समजुतीमुळे पुनरुत्पादन करता येणे अशक्य अशा नैसर्गिक संपत्तीच्या मालकी हक्कासाठी चढाओढ व त्यातून इतरांचे हक्क संकुचित करण्यासाठी प्रचंड प्रमाणात दबाव आणला जात आहे. व प्रसंगी यासाठी हिंसेचाही अवलंबन केला जात आहे. या (गैर) समजुतीमुळे आर्थिक वाढीसाठी उघडपणे अवकाश व काळ यांची लूटमार करत इतरांच्या जिवंत राहण्याच्या हक्कावरच गदा आणला जात आहे. कदाचित यामुळेच आर्थिक सत्तेचे राजकीय सत्तेत रूपांतरित होत असून मानवी जीवनास अत्यावश्यक असणाऱ्या संसाधनावर या सत्ता नियंत्रण ठेवत असून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरित्या, मानवी जीवन व्यवहारात व सामाजिक सलोख्यात ढवळाढवळ करत आहेत. भांडवलशाहीला सहानुभूती दर्शविणारे नेहमीच संपत्ती निर्माण करणे ही चांगली भांडवलशाही आणि संपत्ती हिसकावणे (ओरबडणे) ही वाईट भांडवलशाही असे भांडवलशाहीचे भलावण करत असतात. परंतु पर्यावरणीय दृष्टिकोनातून बघितल्यास संपत्तीची निर्मिती ही नेहमीच संपत्तीच्या ओरबडण्यातूनच होत असते. आणि ही आर्थिक वाढ

आताच्या सजीवसृष्टीच्या व यानंतरच्या पिढ्यांच्या नैसर्गिक संसाधनांचा बेसुमार वापरातून होत असते, हे सोईस्करपणे विसरले जात असते.

अशा प्रकारे भांडवलशाहीचे दोष दाखविल्यास भांडवलशाहीमुळेच लाखो-करोडो लोकांची गरीबी नष्ट झाली व तुम्ही आता पुन्हा एकदा जगाला दारिद्र्याच्या खाईत लोटत आहात हे पालुपद आळविले जाते. भांडवली व्यवस्थेतील आर्थिक वाढ काही लोकांच्या आयुष्यातील दारिद्र्य दूर करण्यात यशस्वी झाली हे खरे असले तरी त्याच वेळी अनेकांची संपत्ती ओरबडून घेत, त्यांची जमीन, श्रम व संसाधन हिसकावून घेत इतरांचे भले करण्यात आले हेही विसरता येत नाही. श्रीमंत देशातील संपत्ती सक्तीच्या गुलामगिरीच्या जोरातून व वसाहती देशातील संपत्तीची लुटालूट करून आली आहे, हेही तितकेच खरे. कोळसा खाणी व तेल या जीवाश्म इंधनाप्रमाणे भांडवलशाहीमुळे फायदा झाला हे नाकारता येत नाही. ज्या प्रमाणे या प्रदूषणात भर टाकणाऱ्या ऊर्जा श्रोतांना पर्याय शोधण्याचा प्रयत्न चालू आहे तसेच भांडवलशाहीपेक्षा वेगळी व मानववंशाला तगून ठेऊ शकणारी व त्याचे कमीत कमी नुकसान करणारी पर्यायी व्यवस्थेची आता अत्यंत गरज आहे.

आता आपल्याला मागे फिरता येणार नाही. भांडवलशाहीला पर्याय म्हणून सरंजामशाही (राजेशाही) वा रशियाने राबवलेल्या साम्यवादाची चेष्टा करणारी एकाधिकारशाही (state dictatorship) यांचा विचार करता येणार नाही. रशियाचा साम्यवाद एका अर्थी भांडवलशाहीचे अदृश्य स्वरूपच होते. या दोन्ही पर्यायांचासुद्धा फक्त आर्थिक वाढीवरच भर होता. या वाढीचे उद्दिष्ट गाठण्यासाठी कुठल्याही प्रकारची टोकाची भूमिका घेण्यास त्या सदैव तयार होते. उद्दिष्टपूर्तीसाठी कुठल्याही थराला जाण्याची त्यांची तयारी होती. त्यासाठी सामान्य जनतेला वेठीस धरून अमानुष वागणूक देण्यातही त्यांना काही गैर वाटत नव्हते. त्यांना स्वतःच्या कर्तृमकतृत्वावर भलताच

आत्मविश्वास होता. व त्यासाठी वाटेल ती किंमत मोजण्याची त्यांची तयारी होती.

भांडवलशाही व्यवस्थेला पर्याय शोधताना केवळ आर्थिक वृद्धीतूनच माणूस सुखी होईल या फाजिल आत्मविश्वासाच्या अवस्थेतून बाहेर पडायला हवे. अनेक विचारवंतानी भविष्यातील धोका ओळखून काही पर्याय सुचविलेले आहेत. मानवाच्या शाश्वत विकासासाठी आर्थिक वाढीचे निकष गैरलागू आहे, असे बहुतेक तज्ञांचे मत आहे. प्रत्येक पिढीला नैसर्गिक संपत्तीचा उपभोग घेण्याचे समान हक्क आहेत याची जाणीव ठेवूनच ध्येय-धोरणं ठरवावेत अशी अपेक्षा व्यक्त केली जात आहे. मानवी समाजाचा पाया पर्यावरण संतुलनावर रचल्यास आपले बहुतेक प्रश्न सुटू शकतील असे अनेक विचारवंतांना वाटत आहे. आपल्याला आता या विचारवंतांच्या सूचनांच्या आधारे एक सर्वसमावेशक पर्याय शोधायचे आहे. आपल्याला यानंतर फक्त आर्थिक वाढीचाच विचार करून चालणार नाही. आर्थिक, पर्यावरणीय, राजकीय, सांस्कृतिक, सामाजिक, व व्यावहारिक अशा विविध क्षेत्रातील विचारवंताना एकत्र आणून एका नवीन व्यवस्थेत समाज निर्मिती करायचे आहे. व ही व्यवस्था निसर्गाला धक्का न पोचवता आपल्या सर्व गरजा भागवू शकेल.यावर भर देणे गरजेचे ठरणार आहे.

भांडवलशाहीवर विसंबून आपले जीवन मृत्युच्या खाईत लोटायचे की माणसासकट निसर्ग जिवंत राहण्यासाठी भांडवलशाहीला पूर्ण विराम द्यायचे यापैकी एकाची निवड करणे हे आपल्यासमोरील ज्वलंत प्रश्न आहे.



# प्रिन्सिपिया मॅथेमॅटिका (1687)

***-आयझॅक न्यूटन***

**जग बदलू शकलेले विचारवंत व त्यांची पुस्तकं!**

*जगरहाटीला अत्यंत वेगळे वळण देणारे अनेक तत्वज्ञ, वैज्ञानिक, तंत्रज्ञ व द्रष्टे उद्योजक जगभर होऊन गेलेले आहेत. त्यांनी शब्दबद्ध केलेले ग्रंथ आजही काही प्रमाणात मार्गदर्शक ठरत आहेत. परिस्थितीचा रेटा व कालमान स्थिती-गतीमुळे प्रत्येक समाजगटाचे प्रश्न व अग्रक्रम बदलत असले तरी थोड्या-फार प्रमाणात या तत्वज्ञांनी आखून दिलेल्या मार्गावरूनच जग पुढे जात असते. काळाच्या पडद्याआड गेलेल्या, अखंड जगाला समावून घेतलेल्या व जग बदलू पाहणाऱ्या अशा काही विचारवंतांनी लिहिलेल्या पुस्तकांच्या माहितीबद्दलचे काही लेख.*

न्यूटनचे प्रिन्सिपिया मॅथेमॅटिका हे पुस्तक मुळात लॅटिन भाषेत लिहिलेले आहे. 1642च्या क्रिसमस सणाच्या दिवशी इंग्लंडमधील एका खेडयात जन्मलेला न्यूटन जन्माआधीच पोरका झाला होता. काहीसा एकलकोंडा व अशक्त प्रकृतीचा न्यूटन काहीना काही विचार करत असे. त्याचा मेंदू हीच त्याची प्रयोगशाळा. केंब्रिजमध्ये शिकत असताना अल्केमीने त्याला झपाटले. याच वेडापायी नैसर्गिक सत्याचा शोध घेणे हेच त्याचे जीवन साध्य झाले. प्लेगच्या साथीत केंब्रिज विश्वविद्यालय काही काळ बंद पडल्यामुळे न्यूटनला पुढील दोन वर्षे आपल्या खेडयात जावून रहावे लागले. त्याच काळात स्वत:च्या प्रतिभाशक्तीने त्यानी नैसर्गिक सत्याचा पाठपुरावा केला. प्रकाशाचे स्वरूप काय असू शकेल, झाडावरील फळं जमीनीवर का पडतात, आकाशातील ग्रह-ताऱ्यांचे भ्रमण कशामुळे होते, इत्यादी नैसर्गिक घटनामागील सत्य जाणून घेण्यासाठी तो सतत विचार करत असे. त्याच

विचारामंथनाचे फलित म्हणजे त्यानी शोधलेले गुरुत्वाकर्षणासंबंधीचे व गतीसंबंधीचे ते प्रसिध्द नियम.

जग आहे तशी कल्पना करत त्या कल्पनांना गणितीय भाषेमध्ये मांडण्याचा त्यानी प्रयत्न केला. तार्किक मांडणी व आवश्यक पुराव्यांची जोड त्यांना दिली. नैसर्गिक घडामोडींचा विचार करताना काही गृहितकांची कल्पना करावी लागते. गृहितकांची सत्यासत्यता तपासावी लागते. अपवादांचा मागोवा घ्यावा लागतो. त्यातून सूत्रबध्दता आकार घेऊ लागते. त्यातून नियमांची मांडणी करता येते. न्यूटनचे पुस्तक वाचत असताना या सर्व गोष्टींचा आपल्याला प्रत्यय येतो. हे पुस्तक लिहून काढण्यासाठी वीस वर्षाहून जास्त काळ त्याला लागला. पुराव्यासकट मांडणी हे प्रथमच घडत होते. न्यूटनने शोधलेले नियम भूचर व खगोलीय, जड व हलके अशा कुठल्याही प्रकारचे वस्तू असू देत, या सर्वांना लागू होतात.

या पुस्तकाने जग कसे काय बदलले? ज्ञानाच्या संदर्भातील यापूर्वीच्या कोत्या विचारांना या पुस्तकाने जबरदस्त धक्का दिला. बुध्दीचा वापर करून तर्कनिष्ठ मांडणी करत जगाकडे पाहण्याची नवीन दृष्टी या पुस्तकामुळे मिळाली. सृष्टीतील क्रिया-प्रक्रिया यांचे वर्णन गणितीय समीकरणांच्या आधारे अचूकपणे करता येते, हे या पुस्तकाने दाखवून दिले. वैज्ञानिक पध्दत म्हणजे नेमके काय याची स्पष्ट कल्पना य पुस्तकाने दिली. या पुस्तकामुळेच प्रत्येक सिध्दांत, नियम वा तत्त्व यांना वैज्ञानिक कसोटीला उतरल्यानंतरच त्यांचा स्वीकार करावा हा संकेत रूढ झाला. जगात घडत असलेल्या नैसर्गिक घटनांच्यामागे कुठलिही दैवीशक्ती नसून नैसर्गिक नियमानुसार त्या घडत असतात व त्यांचा अंदाज घेणे शक्य आहे हे सप्रमाण न्यूटननी दाखवून दिले. अवकाशातील ग्रहांचा भ्रमण काळ, त्यांचे स्थान-मान शोधण्यासाठी न्यूटनचे नियम उपयोगी पडू लागले. फलजोतिषाचे दावे खोटे पडले. न्यूटन हा स्वत:

आस्तिक होता. परंतु त्याच्या सत्यान्वेषणात ईश्वराचा मागमूसही नव्हता. या जगातल्या घडामोडी नैसर्गिक नियमानुसार घडत असून त्यासाठी ईश्वराच्या कुबडींची गरज नाही, हेच या पुस्तकाने दाखवून दिले. हे सुंदर जग देवाची सृष्टी आहे, स्वर्ग-नरक अशा गोष्टी विश्वात आहेत, ग्रहांच्या भ्रमणांचे नियंत्रण जगन्नियंता करतो, पापाचा घडा पूर्ण भरल्यानंतर धूमकेतूना ईश्वर पाठवतो, इत्यादी भाकड कल्पनांना न्यूटनच्या या पुस्तकाने बाद ठरविले.

न्यूटनच्या गतिनियमांच्या अभ्यासातून रॉकेट व अवकाश तंत्रज्ञानाचा विकास झाला. माणूस चंद्रावर पाऊल ठेऊन परत आला. न्यूटनच्या प्रकाशकिरणांच्या सिध्दांताने अनेक वैज्ञानिकांना अतीनील व अवरक्त किरण, छायाचित्र तंत्रज्ञान, प्रकाश व्यतीकरण, प्रकाश विवर्तन, अणूंची रचना, रेडिओ लहरी, ग्रहांची रचना, डॉप्लर परिणाम, रडार तंत्रज्ञान, महाकाय टेलिस्कोप, इत्यादी अनेक विषयावर संशोधन करण्यास प्रोत्साहन मिळाले. काचतंतू तंत्रज्ञानाची प्रगती झाली. आइन्स्टाइनचा सापेक्ष सिध्दांत हा न्यूटनच्या सिध्दांताचा पुढील टप्पा आहे. अशाप्रकारे याच पुस्तकाने औद्योगिक क्रांतीची मुहूर्तमेढ रोवली. घरं, इमारती, रस्ते, पूल, धरणं इत्यादींच्या बांधकाम तंत्रज्ञानात गुरुत्वाकर्षणाचे नियम, बळ, शक्ती, वेग, प्रवेग, घर्षण इत्यादी संकल्पनांचा वापर होत गेल्यामुळे त्यांच्या रचनेतील गुणवत्ता, आयुष्य, यांचा नीटसा अंदाज येऊ लागला



# ऑन दि ओरिजिन ऑफ स्पीसीज(1859)

**- चार्लस् डार्विन (1809-1882)**

ईश्वरानेच जगाची निर्मिती केली या विधानावर विश्वास ठेवणाऱ्यांची संख्या अजूनही कमी झालेली नाही, उलट ती अजून वाढतच आहे. प्रत्येक धर्मग्रंथात कुठल्याना कुठल्या स्वरूपात हे विधान किंवा या विधानाला पुष्टी देणारे काहीतरी असतेच. त्यामुळे या विधानाविरुध्द तोंड उघडणाऱ्याला जगातील घातक माणूस म्हणून हिणवले जाते. असेच हिणवून घेतलेल्यापैकी चार्लस् डार्विन याचा प्रथम क्रमांक लागेल. धर्मनिष्ठांच्या मते ओरिजिन ऑफ स्पीसीज हे पुस्तक लिहून डार्विनने फार मोठा अपराध केला आहे. या पुस्तकाने तिच्यातील मूलभूत मांडणीतून कॅथॉलिक ख्रिश्चन धर्माला जबरदस्त धक्का दिला. या पुस्तकात बॅक्टिरिया, जीवाणू, क्रिमी-कीटकांपासून सस्तनी प्राणी, माकड, चिंपांझी व मानव जात यांची उत्पत्ती कशी झाली असेल याचा संपूर्ण आढावाच घेतल्यामुळे बायबलसारख्या धर्मग्रंथांचे पितळ उघडे पडले, त्यातील जगाच्या उत्पत्तीच्या संदर्भातील सर्व विधानं खोठी ठरली.

चार्लस् डार्विनचे वडील रॉबर्ट डार्विन एक यशस्वी डॉक्टर व आजोबा, इरॅस्मस डार्विन विज्ञान विषयात रुची घेणारे श्रीमंत गृहस्थ होते. त्या काळातील ब्रिटिश समाजातील खुशालचेंडू तरुणाप्रमाणे चार्लस् डार्विनही मौज-मजा, खाणे-पिणे यात वेळ घालवणारा व यांचा कंटाळा आल्यानंतर अभ्यासाकडे वळणारा तरुण होता. वैद्यकीय शिक्षणाचा कंटाळा आला म्हणून वयाच्या बाविसाव्या वर्षी धार्मिक शिक्षणाची पदवी त्यानी घेतली. तो धर्मगुरू व्हावा अशी त्याच्या वडिलांची इच्छा होती. दुसरे काही करण्यास रुची नव्हती म्हणून 1831मध्ये बिनपगारी निसर्ग निरीक्षक म्हणून बीगल् या जहाजातून जगाच्या सफरीवर तो निघाला. चर्चची जवाबदारी टाळण्यासाठी काहीतरी निमित्त शोधतो म्हणून वडिलांना त्याचा राग आला. परंतु चार्लसच्या काकानी त्याला

मदत केली. पाच वर्षाचा हा समुद्रप्रवास अजिबात सुखकर नव्हता. प्रवासात वरचेवर तो आजारी पडत असे. परंतु बोट किनाऱ्यावर आल्यानंतर त्याचे आजारपण पळून जात होते. समुद्रकाठावरील नमूने गोळा करण्याचा छंद त्याला जडला. फुलं, शिंपले, बीटल्स, सरडे, इत्यादींच्या अनेक नमून्यांनी त्याची पिशवी भरू लागली. जहाज गालापागोस या बेटाजवळ नांगर टाकल्यानंतर त्याला आपल्या छंदासाठी भरपूर वेळ मिळाला. एकवीस लहान-मोठया बेटांचा समूह असलेल्या गालापागोस येथे 607 प्रकारचे वनस्पती, 484 प्रकारचे समुद्रमासे, 29 प्रकारचे भूपक्षी, 19 प्रकारचे समुद्रपक्षी, अशी वैविध्यपूर्ण निसर्ग संपत्ती होती. डार्विन या सर्व नमून्यांची तपशीलवार नोंदी ठेऊ लागला. इंग्लंडला परतल्यांतर सफरीच्या काळातील निरीक्षणाचा अहवाल तयार करून 1839मध्ये जर्नल ऑफ रिसर्चेस या संशोधन पत्रिकेला पाठवून दिला. गोळा केलेल्या माहितीचा अन्वयार्थ लावण्यात त्यानी पुढची बरीच वर्ष घालवली. त्यातून निघत असलेल्या निष्कर्षाबद्दल तो स्वत:च आश्चर्यचकित झाला. नमुन्यासंबंधींच्या सर्व नोंदी, निरीक्षण, व निष्कर्ष याबद्दल तो लिहू लागला. व ओरिजिन ऑफ स्पीसीज हे पुस्तक हळू हळू आकार घेऊ लागले. पुस्तक प्रसिध्द होण्यास 20 वर्ष लागली. 155000 शब्दांचा हा शोधनिबंध जग बदलून टाकणारा ठरला. 1859 साली प्रकाशित झालेल्या या पुस्तकाच्या 1250 प्रती हातोहात संपल्या.

नैसर्गिक निवडीच्या प्रक्रियेने सजीवांची उत्क्रांती होत गेली हे या पुस्तकातील मुख्य प्रतिपादन होते. यासाठी डार्विनने तीन निरीक्षणांचा आधार घेतला. सजीव प्राणी स्वत:चे वंश टिकवण्यासाठी गरजेपेक्षा जास्त पिलांना जन्म देतात परंतु त्यातील फारच कमी सजीव जिवंत राहून वंशसातत्याला हातभार लावू शकतात. कॉड माशांच्या लाखो अंडयामधून बाहेर पडलेले सर्व मासे शेवटपर्यंत जिवंत राहिल्यास जगातील सर्व महासागरावर व भूमीवर हेच

मासे दिसले असते. परंतु निसर्ग तसे होऊ देत नाही. दुसऱ्या निरीक्षणाप्रमाणे सर्व सजीव आरश्यातील प्रतिबिंबासारखे एकसारखे नसतात. मनुष्यप्राणीचेच उदाहरण घेतल्यास प्रत्येकाच्या बोटाचे ठसेसुध्दा अत्यंत वेगळे आहेत हे लक्षात येईल. ही विविधता आनुवंशिकतेतून आलेली असली तरी प्राणी स्वत:चे क्लोन तयार करत नाहीत. अजून एका निरीक्षणाप्रमाणे गुणसूत्रांच्याद्वारे आपापल्या जातीची विशिष्टता व गुणविशेष वारसाकडे जात असल्या तरी गुणसूत्रांचा कुठेना कुठे तरी उत्परिवर्तन (म्युटेशन) किंवा गुणसूत्रांचा संयोग होऊन नवनवीन रचना होण्याची शक्यता निर्माण होते. त्यातून अगदीच वेगळा व अगोदरच्या रचनेचा मागमूसही नसणारा सजीव निर्माण होतो. या तिन्ही निरीक्षणांची गोळाबेरीज करून प्राणी जगतात वंशसातत्याची सहजप्रवृत्ती असते; नैसर्गिक परिस्थितीतील बदलांना तोंड देऊन जे जगू शकतात, त्यानाच वंशसातत्य टिकवता येत; अशा बदलांना तोंड देऊन वंश चालवू शकणारे हेच खरे जगण्यायोग्य सजीव, या निष्कर्षाप्रत डार्विन पोचला.

पुस्तक प्रसिध्द झाल्या झाल्या इंग्लंडमध्ये भूकंपसदृश्य स्थिती झाली. त्याकाळापर्यंत मनुष्यप्राणी हा एकमेव विशिष्ट प्राणी असून त्याच्यामागे दैवी शक्ती आहे असा भ्रम होता. ज्याप्रकारे न्यूटनच्या सिध्दांतामुळे विश्वातील ग्रह-तारे इत्यादी निर्जीव वस्तुसंबंधीच्या कल्पनांना धक्का बसला त्याचप्रकारे डार्विनच्या उत्क्रांतीच्या सिध्दांतामुळे मानवीजीवनाविषयीच्या अफाट कल्पनांना धक्का बसला. उत्क्रांतीचा हा सिध्दांत केवळ जीवशास्त्रापुरतेच मर्यादित नसून धार्मिक मूल्ये, मानवी मूल्ये, नैतिक मूल्ये, संस्कृती, इतिहास, राजकारण, तत्त्वज्ञान, धर्मविचार इत्यादी अनेक विषयावर दूरगामी परिणाम करणारा ठरला. या पुस्तकामुळे आत्म्याचे अमरत्व आणि माणसाचे ईश्वरसदृश स्वरूप या रम्य कल्पना बाद ठरल्या. परमात्मा, आत्मा, ईश्वर, ईश्वरीन्याय, दैवीप्रकोप, पुनर्जन्म, पाप-पुण्य इत्यादी संकल्पना निरर्थक वाटू लागल्या.

आध्यात्मिक कल्पना नामशेष होऊ लागल्या. ऐहिक वास्तव हेच अंतिम सत्य याची जाण डार्विनने करून दिली. अशा पाखंडी विचारांने जो धक्का दिला त्यामुळे दैववादाचे चिरे ढासळू लागले.

माणसाचे वेगळेपण त्याच्या मेंदूमुळे आहे याची कल्पना त्याकाळी होती. मानवी मेंदू ही निसर्गलीला नसून दैवी चमत्कार आहे, असे कित्येक भल्या भल्याना वाटत होते. ईश्वराने माणसाची निर्मिती केली नाही, हे निश्चित झाल्यावर मानवी मेंदू हाही नैसर्गिकरीत्याच निर्माण झाला आहे, असे म्हणावे लागेल. मानवी भावना व मेंदू यांचा जवळचा संबंध आहे हेही मान्य झाल्यामुळे मनोविकार व मेंदू यांचा परस्पर संबंध आहे हे मान्य करावे लागले. यातून मानसशास्त्रीय विश्लेषण आणि मानवी वर्तणुकीचा अभ्यास यांना दिशा मिळाली.

डार्विनवादाच्या अभ्यासाने अनेक नवीन शास्त्रशाखांना जन्म दिला. आनुवंशिक शास्त्र, जनुकशास्त्र ह्या उत्क्रांतीवादाचेच अपत्य आहेत. जनुकांची नेमकी रचना कशी आहे याचा शोध क्रीक व वॅट्सन यांनी घेतला. माणसाच्या शरीरातील एकूण एक जनुकांची रचना कशी आहे याचा शोध घेणारा मानवी जनुक महाप्रकल्पाची प्रेरणा उत्क्रांतीवादातच सापडेल. माणसा-माणसामधील विषमता दूर करण्यासाठी प्रयत्न करणारे कार्ल मार्क्स, विल्बरफोर्स इत्यादींना याच पुस्तकामधून प्रेरणा मिळाली. गुणसूत्रांच्या अभ्यासातून प्रजोत्पादन शास्त्रात भर पडू लागली. निसर्गाची मूलभूत नियामकता स्पष्ट करणाऱ्या जेम्स लव्हलॉकचा गिया सिध्दांताचे मूळ डार्विनवादातच सापडेल.

डार्विनच्या उत्क्रांतीच्या सिध्दांताला त्याच्या हयातीतच भरपूर विरोध झाला. माकडाचा सिध्दांत (मंकीज थेअरी) म्हणून त्याची खिल्ली उडवली. अनेक तज्ञांना हा सिध्दांत म्हणजे समाजातील विषमतेला खत-पाणी घालणारे वाटले. 'बळी तो कान पिळी'ला तात्त्वि मुलामा चढवला जात आहे असा

आरोप केला. हिट्लरच्या काळात डार्विनवादाचे विकृतीकरण करून सुप्रजननशास्त्राचे (युजेनिक्स) प्रयोग करण्यात आले. वंशश्रेष्ठत्त्व व वर्णविद्वेषांच्या समर्थनासाठी डर्विनवादाचा दुरुपयोग करण्यात आला. शाळेमध्ये उत्क्रांतीवाद शिकवू नये, यासाठी अमेरिकेमध्ये जनमत तयार होऊ पाहत आहे. परंतु गेली 150 वर्षे या सिध्दांताच्या पुष्ट्यर्थ भरपूर पुरावे सापडले आहेत. जीवाष्मांच्या अभ्यासातून, जनुकशास्त्राच्या प्रयोगातून डार्विनचा उत्क्रांतीवाद ताऊन सुलाखून निघाला आहे.



# एक्स्परिमेंटल रिसर्च इन इलेक्ट्रिसिटी

**(तीन खंडात 1839, 1844, 1855)**

**- मायकेल फॅरडे (1791-1867)**

तीन खंडात लिहिलेल्या या पुस्तकाचा लेखक मायकेल फॅरडे हा प्रायोगिक वैज्ञानिक होता. अत्यंत गरीब व धर्मनिष्ठ कुटुंबातून आलेला हा वैज्ञानिक वयाच्या अकराव्या वर्षीच पुस्तकबांधणीच्या दुकानात काम करून अर्थार्जन करू लागला. कामाच्या फावल्यावेळी बांधणीसाठी आलेल्या पुस्तकांचे वाचन करू लागला. वाचनाची गोडी लागली. ज्ञानात भर पडू लागली. त्याच सुमारास त्या काळातील प्रसिध्द वैज्ञानिक हँफ्री डेव्हीचे भाषण ऐकण्याची संधी त्याला मिळाली. भाषण ऐकून भारावलेला फॅरडे भाषणाचा वृत्तांत लिहून डेव्हीकडे पाठवला. लिहिण्याची शैली व भाषणावरील प्रतिक्रिया वाचून आश्चर्यचकित झालेल्या डेव्हीने स्वत:च्या प्रयोगशाळेत सहायक म्हणून त्याची नेमणूक केली. या संधीचे सोने करून जग बदलून टाकणाऱ्या विद्युत-चुंबकीय सिध्दांताच्या संशोधनावर आयुष्यभर त्यानी प्रयत्न केले. प्रत्येक प्रयोगाचा तपशील व त्यातील बारकाव्यांचे निरीक्षण करून ते लिहून ठेवण्याच्या त्याच्या सवयीतून या विषयावरील तीन पुस्तकांची निर्मिती झाली. या पुस्तकाने यानंतरच्या वैज्ञानिकांच्या व तंत्रज्ञांच्या पिढीला संशोधन करण्यास उद्युक्त केले.

फॅरडेला विद्युतशक्तीबद्दल अत्यंत उत्सुकता होती. फॅरडेनी जेव्हा संशोधनास सुरुवात केली त्याकाळी चुंबकाप्रमाणे वीजसुध्दा एक मायावी शक्ती आहे, असे वाटत असे. वीज हे दैवी चमत्कार असून त्यातून अनेक गोष्टी साध्य होतात यावर अनेकांचा विश्वास होता. विजेच्या वापरातून सर्व प्रकारचे रोग बरे होतात असाही समज होता. मृताला जिवंत करण्याइतके सामर्थ्य विजेत आहे असे अनेकांना वाटत होते. विजेचा सौम्य धक्का देत राहिल्यास

माणूस निरोगी राहतो यावर दृढविश्वास होता. नाटयदृष्यामध्ये ठिणगी उत्पन्न करून प्रेक्षकांना आश्चर्यचकित करण्यासाठी विजेचा चमत्कार केला जात असे.

उष्णता, रासायनिक विघटन, ठिणगी, शरीराला धक्का हे सर्व विजेचे परिणाम होते, हे फॅरडेच्या लक्षात आले. वेगवेगळया स्रोतांचा वापर करून विजेतील या सर्व परिणामांचा शोध तो घेऊ लागला. बॅटरीतील वीज ठिणगी उत्पन्न करू शकते. मात्र ईल माशामधील वीज तसे काही करू शकत नाही. ईल माशाजवळ चुंबकाचा काटा नेल्यास त्याची दिशा बदलते. यावरून विविध स्रोतामधील वीज सारखीच असून त्याचे दृष्य परिणाम विजेच्या वेगवेगळया स्थितीचे द्योतक आहेत. परंतु त्याचे सर्वात महत्त्वाचे संशोधन म्हणजे चुंबक व वीज या दोन्हीमध्ये असलेला परस्पर अन्योन्य संबंध. विद्युतप्रवाहामुळे चुंबकशक्ती निर्माण करता येते हे त्यानी सिध्द केले. त्याचप्रमाणे चुंबकशक्ती वीज निर्माण करते हेही त्यानी जगाला दाखवून दिले. त्यानी शोधून काढलेल्या सिध्दांत व तंत्रज्ञानावरून विद्युत जनित्रांची रचना केली व जगाला थक्क करणाऱ्या ऊर्जास्रोताचा शोध लागला. आजसुध्दा त्यानी आखून ठेवलेल्या जनित्र रचनेप्रमाणेच वीजनिर्मिती होत आहे. कोळसा, वाफ, वाहते पाणी, वारा, वा अणुइंधन इत्यादींचा वीजनिर्मितीसाठी वापर होत असला तरी जनित्राच्या ढाचेत फारसा बदल झाला नाही. नंतरच्या काळात एडिसन, मार्कोनी, फेरांटी इत्यादी उद्योजकांनी विजेचा वापर करून बल्ब, कुकर्स, क्लीनर्स, हीटर्स, वातानुकूल यंत्रणा, इ.इ. सोई-सुविधांचा शोध लावला व त्यांना बाजारपेठेत आणून प्रचंड प्रमाणात संपत्ती मिळवली. फॅरडे मात्र स्वत:चे ज्ञान विकाऊ नाही; ती मानवी कल्याणासाठी आहे, या विश्वासावर जगत असल्यामुळे शेवटपर्यंत कफल्लकच राहिला.

डार्विनप्रमाणे फॅरडे यानीसुध्दा सोप्या व बोली भाषेतून व काही सोप्या आकृतीमधून आपल्या प्रयोगांचे तपशील दिले आहेत. गणीतीय

समीकरणाच्या जंजाळाची त्याला गरज भासली नाही. तीन खंडात प्रसिध्द झालेल्या त्याच्या पुस्तकात 16041 प्रयोगांचे अहवाल आहेत. फॅरडेनी सातत्याने सुमारे पन्नास वर्षे संशोधनात घालवले. आपल्या प्रयोगाविषयी भाषण देणे हेसुध्दा त्याला अत्यंत गरजेचे वाटत होते. नाट्यमय प्रसंग उभे करून जनसामान्यांना वैज्ञानिक विषय समजून देण्यात त्याला रुची होती.

फॅरडेच्या प्रायोगिक निष्कर्षांचे विश्लेषण करून त्यांना गणीतीय सिध्दांत स्वरूपात जेम्स क्लार्क मॅक्सवेल या शास्त्रज्ञाने चपखलपणे बसविली. फॅरडेच्या हयातीतच मॅक्सवेलने आपला शोधनिबंध केंब्रिज विद्यापीठात सादर केला. फॅरडेच्या प्रयोगांना तज्ञांची मान्यता मिळू लागली. विद्युतचुंबकीय विकिरणातून निघणाऱ्या किरणामध्येच गामा किरण, क्ष किरण, रेडिओ लहरी, अतिनील ते अवरक्त किरण इत्यादी सर्वांचा समावेश आहे, यावर मॅक्सवेलचा भर होता.

फॅरडेच्या सिध्दांताने अनेक वैज्ञानिक संशोधनास उत्तेजन दिले. किरचॉफचा तारमंडल नियम, जूल्सचा विद्युत-उष्णता नियम, विलियम क्रूक्सचे कॅथोड किरण, मॅक्सवेलचे प्रकाश किरणांचा वेग मोजण्यावरील संशोधन, ट्रान्सिस्टरांचा शोध इत्यादींना हाच सिध्दांत आधारभूत ठरला. वीज उत्पादन व वीज वितरण यासंबंधीचे अनेक प्रयोग करण्यात आले व त्यांच्या साधनसामग्रीत भर पडत गेली. ग्राहम बेलचे टेलिफोन व मार्कोनीची तारयंत्रणा फॅरडेच्या प्रयोगांचेच फलित आहेत.

फॅरडेच्या विद्युत उत्पादनाच्या अभूतपूर्व संशोधनामुळेच आजच्या आधुनिक युगाचे सर्व व्यवहार चालतात, हे विसरणे शक्य नाही. हजारो घरगुती सोई-सुविधा, प्रकाशमान करणारे दिवे, संगणक व संगणकांचे जाळे, जीव वाचवू शकणारी वैद्यकीय यंत्रणा, उत्पादनांचे आधुनिक तंत्रज्ञान, रासायनिक प्रक्रिया, अवजड उद्योग, माहिती तंत्रज्ञान, विजेवर चालणाऱ्या गाडया,

मॅगलेव्ह ट्रेन्स, इत्यादी सर्वांसाठी वीज ही प्राथमिक गरज आहे. ऊर्जेचा हा स्रोत काही काळ नसला तरी आधुनिक जनजीवन ठप्प होऊ शकते. ऊर्जेची न संपणारी भूक वातावरणातील प्रदूषणाला आमंत्रण देत असले तरी फॅरडेनी केलेले संशोधन जग कधीच विसरू शकणार नाही.



# ऑन दि अबॉलिशन ऑफ स्लेव्ह ट्रेड (1789)

**-विलियम विल्बरफोर्स (1759-1833)**

इतिहासकारांच्या मते जगाला कलाटणी दिलेल्या काही मोजक्या स्थित्यंतरामध्ये ब्रिटनमधील गुलामांच्या व्यापारपध्दतीचे उन्मूलन याला सर्वात वरचा क्रमांक द्यायला हवा. शेकडो वर्षे राजरोसपणे चालत असलेल्या गुलामगिरीच्या या अमानुष पध्दतीच्या विरोधात 16व्या -17व्या शतकात काही जणानी आवाज उठवला, आंदोलनं केली, काही तुरळक हिंसक घटना घडल्या. परंतु अथेन्स - स्पार्टा या नागरी राज्यातील परंपरेची साक्ष देणाऱ्या व एके काळी असाध्य वाटणाऱ्या या प्रथेचे उन्मूलन साध्य करून दाखवलेल्या तरुणाचे नाव आहे विलियम विल्बरफोर्स. वयाच्या एकविसाव्या वर्षी तो ब्रिटिश पार्लिमेंटचा सदस्य झाला. पार्लिमेंटमध्ये 12 मे 1789 रोजी गुलामगिरीच्या व्यापारपध्दतीच्या उन्मूलनाविषयी त्याने विधेयक मांडले. या विधेयकाचे कायद्यात रूपांतरित होण्यासाठी तब्बल अठरा वर्षे त्यानी लढा दिला व त्याच्या अथक परिश्रमाला शेवटी यश मिळाले.

मुळात हे पुस्तक विलियम विल्बरफोर्सने पार्लिमेंटमध्ये 12 मे रोजी केलेल्या भाषणाचा लिखित वृत्तांत आहे. पार्लिमेंटमध्ये केलेल्या भाषणांचा दप्तरी नोंद करण्याची पध्दत अजून रूढ झाली नव्हती. परंतु विल्बरफोर्सच्या भाषणाला वृत्तपत्रामधून भरपूर प्रसिध्दी मिळाली. बहुतेक वृत्तपत्रांनी त्याचे संपूर्ण भाषण मुद्रित केले. त्याचेच नंतर पुस्तक म्हणून प्रकाशित करण्यात आले. विल्बरफोर्सच्या घणाघाती टीकेमध्ये गुलामगिरी हे मानववंशाला कळंक आहे या मुद्यावर भर होता. आपल्यापेक्षा इतर देश-प्रदेशातील माणसं रंगाने, उंचीने, आकाराने वेगळी आहेत म्हणून ती माणसंच नाहीत अशी समजूत व पैशाचा हाव यामधून गुलामगिरीचा व्यवहार क्रि.श.पूर्व काळापासून बिनदिक्कत चालत होता. 18व्या शतकात या पध्दतीने उच्चांक गाठला.

पश्चिम आफ्रिकेतील सुमारे एक कोटी लोकांना पकडून त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेत व अनन्वित छळ करून अमेरिकेत गुलाम म्हणून त्यांची विक्री केली जात होती. या व्यवहारात ब्रिटन, स्पेन, पोर्तुगाल, फ्रान्स इत्यादी अनेक युरोपियन देश सामील झाले होते. गुलामांच्या व्यापाराचे सुसूत्रिकरण करून या अमानुषतेला तात्त्विक मुलामा देत राजरोसपणे हा व्यवहार चालला होता. ब्रिटन जरी शेवटी शेवटी आलेला असला तरी, एका अंदाजानुसार लंडन शहरातील एक चतुर्थांश लोकांचा चरितार्थ गुलामांच्या व्यापार व्यवहाराशी निगडित होता. आजकालच्या माहिती तंत्रज्ञानाच्या आर्थिक व्यवहारात ज्या प्रमाणात पैशाची उलाढाल होते त्या प्रमाणात गुलामांच्या व्यापारात उलाढाल होत असे. ब्रिटनमधील लिव्हरपूल, ब्रिस्टॉल ही शहरं अशा व्यापारातून श्रीमंत झाली. या काळया व्यवहारातील पैशातूनच अनेक युरोपियन शहरात भव्य दिव्य चर्च, इमारती, राजवाडे, किल्ले बांधले. ब्रिटिश पार्लिमेंटमध्ये अशा पैशातून गबर झालेल्या खासदारांचा वरचष्मा होता. विल्बरफोर्सला अशा सत्ताधार्यांशी लढा द्यावा लागला.

गुलामांच्या व्यापाराची एक त्रिकोनी व्यवस्था होती. ब्रिस्टॉल व इतर बंदरामधून जीवनावश्यक जिनसांनी भरलेले जहाजं आफ्रिकेला जात होत्या. जिनसांच्या विक्रीच्या पैशातून आफ्रिकेतील गुलामांची खरेदी होत होती. जहाज अमेरिका व वेस्ट इंडीजला जाऊन गुलामांची विक्री करत होती. तिथून परत येताना गुलामांच्या विक्रीच्या पैशातून साखर, कॉफी, रम-व्हिस्की, तंबाखू इत्यादी चैनींच्या वस्तूंची खरेदी करत जहाजं मायदेशी परत येत होत्या. हा सर्व व्यापार कायदेशीर व सनदशीर मार्गाने होत असल्यामुळे समुद्र लुटारूपासून जहाजांचे संरक्षण करण्याची जवाबदारी ब्रिटिश नौसेनेवर सोपवली होती. रॉयल नेव्हीचा सक्त पहारा असल्यामुळे समुद्रीलुटारू या बोटींना काहीही करू

शकत नव्हते. व गुलामसुध्दा जहाजामधून बाहेर उडी मारून जाऊ शकत नव्हते. अशा प्रकारे हा व्यवहार वर्षानुवर्षे चालत होता.

1788च्या सुमारास घडलेल्या एका घटनेने विल्बरफोर्सला गुलामगिरी-विरुध्द लढण्यास प्रेरणा मिळाली. झोंग या जहाजावरील कप्तानाने जहाजातील गुलाम विक्रीयोग्य नाहीत म्हणून बहुतांश गुलामांना समुद्राच्या पाण्यात अमानुषपणे फेकून दिले. जहाज बुडून विमा कंपनीचे नुकसान होवू नये म्हणून हे गैरकृत्य केले अशी खोटी साक्ष पोलीस तपासणीत दिली. कप्तान सहीसलामत सुटला. त्या निमित्ताने गुलामगिरी उन्मूलन समितीची स्थापना झाली होती. परंतु कणखर नेत्रृत्वाच्या अभावी चळवळ थंड पडली होती. विल्बरफोर्सच्या पुढाकारामुळे परिस्थिती बदलू लागली. विल्बरफोर्स कुठल्याही अंगाने नेता वाटत नव्हता. परंतु भाषण कलेच्या जोरावर त्यानी गुलामगिरीच्या विरोधात आवाज उठवला. गावोगावी जाऊन भाषणं देऊ लागला. समाजात गुलामगिरीच्या विरोधात जनमत तयार होऊ लागले. ब्रिटनचे प्रधान मंत्री विलियम पिट हा विल्बरफोर्सचा जवळचा मित्र असूनही पार्लिमेंटमधील बहुतेक सदस्यांच्या विरोधामुळे हे विधेयक टक्के टोणपे खात तसेच पडून होते. "मी फक्त सदस्यांना विनंती करू शकतो, त्यानी आपली सदसद्विवेक बुध्दी तपासून पहावी. मी गुलामगिरीच्या व्यवहाराबद्दल कुणालाही दोष देत नाही. परंतु मला याची लाज वाटते. आपण सर्व अपराधी आहोत. दोष कुणावर तरी ढकलून आपण निरपराधी होणार नाही." अशा प्रकारच्या भाषणामधून त्यानी ब्रिटिश सुसंसंकृततेलाच आव्हान दिले. "संवेदनशील जिवंत माणसांना त्यांच्या मुलाबाळापासून तोडून त्यांची खरेदी विक्रीची वस्तू समजणाऱ्या समाजाला सुसंसंकृत म्हणवून घेण्याचा अधिकार नाही. आफ्रिकेतील मूठभर टोळीप्रमुखांच्या लोभापायी, त्यांच्या ऐषारामापायी

संगनमत करून त्या देशातील गोरगरीबांना हद्दपार केले जात आहे," असे त्यानी पटवून दिले.

विल्बरफोर्सच्या विरोधात आवाज उठवणाऱ्यांची संख्या पण कमी नव्हती. *हा व्यापार थांबल्यास ब्रिटनची अर्थव्यवस्था कोसळेल, व्यापारावर अवलंबून असलेल्यांची उपासमार होईल, आफ्रिकेतील गरीब उपाशी मरतील*, असा नेहमीचा युक्तिवाद केला जात होता. *आफ्रिकेतील लोकांना आम्ही जीवदान देत आहोत, समृध्द जीवन जगण्याची संधी देत आहोत, गुलामांची आम्ही चोख व्यवस्था ठेवतो, जहाजाच्या प्रवासात ते गाणे गुणगुणतात,* इ.इ. विधानं गुलामगिरीच्या समर्थनार्थ विरोधक करत होते. परंतु विल्बरफोर्सने गुलामांची पिळवणूक कशी होते, बेड्या बांधून कशा प्रकारे अत्यंत कष्टप्रद कामं त्यांच्याकडून करून घेतल्या जातात, जहाज प्रवासातील निकृष्ट आहार, झोपण्याची अव्यवस्था, पोराबाळांची होत असलेली ताटातूट इत्यादीविषयी भाषणामधून, निवेदनामधून तो समजावून सांगत असे. त्या काळच्या वृत्तपत्रांनी त्याला चांगलीच साथ दिली.

पार्लिमेंटच्या प्रत्येक अधिवेशनात काहीतरी क्षुल्लक कारणास्तव विधेयक पुढे पुढे ढकलले जात होते. तरीसुध्दा विल्बरफोर्स नाउमेद झाला नाही. अशा प्रकारे तब्बल अठरा वर्षानंतर 1807 साली गुलामांच्या व्यापाराविरुध्दचा कायदा पास झाला. शासनाने व्यापारासंबंधीच्या सर्व सोई-सवलती काढून घेतल्या. गुलामांच्या चोरट्या व्यापारावर सक्त नजर ठेवण्यात आली. सर्व जगभर याचे प्रतिसाद उमटले. अमेरिका (1808), स्पेन (1811), स्विडन (1813), नेदरलँड्स (1814), फ्रान्स (1817), पोर्तुगाल (1819), मेक्सिको (1829), ब्रिटिश वसाहती देश (1838), इत्यादींनी गुलामांच्या व्यापाराविरुध्द कायदे पास केले. गुलामांच्या व्यापारावर बंदी घातली. 1865मध्ये अमेरिकेने, 1886मध्ये क्यूबाने, 1888 मध्ये ब्राझिलने गुलामगिरी पध्दतीला आपापल्या

देशातून हद्दपार केले. संयुक्त राष्ट्रसंघाच्या मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यामध्ये जागतिक गुलामगिरी संबंधीच्या कलमांचा समावेश केला गेला.

गुलामगिरीवरच पोसलेल्या अमेरिकेला याचा फार मोठा फटका बसला. दक्षिणेतील अमेरिकन राज्यातील मळ्यामध्ये, द्राक्ष, ऊस, तंबाखू इत्यादींच्या उत्पादनासाठी आफ्रिकेतून विकत आणलेल्या गुलामांना राबवून घेत नफा कमावला जात होता. गुलामांच्यातील स्वाभिमानाची पध्दतशीर कत्तल केल्यामुळे (व त्याला चर्चची पण साथ असल्यामुळे) गुलामी हेच सुख व मालकांना सुखी ठेवणे हेच जीवनाचे अंतिम उद्दिष्ट ही मानसिकता बळावलेली होती. 1851मध्ये हॅरियट बीचर स्टोव्ह या लेखिकेने लिहिलेल्या *अंकल टॉम्स कॅबिन* या कादंबरीत गुलामांच्या परिस्थितीचे विदारक वर्णन वाचताना मन हेलावून जाते. 1865मध्ये अमरिकेच्या यादवी युध्दानंतरच गुलामी पध्दतीला पूर्ण विराम मिळाला. तरीसुध्दा मार्टिन लुथर किंग व त्यांच्या अनुयायांना आपल्या हक्कासाठी विसाव्या शतकात लढा द्यावा लागला.

अशा प्रकारे मानवी इतिहासातील एक अंधारयुग, मानवतेला काळिमा फासणारी पध्दत विल्बरफोर्सच्या प्रयत्नामुळे, त्याच्या पुस्तकामुळे अस्तंगत झाल्या. माणसांची बेकायदा तस्करी, वेठबिगारी इत्यादीविषयी जागरूक राहणारी विल्बरफोर्स इन्स्टिटयूट ही संस्था अजूनही काम करत असून विल्बरफोर्सची आठवण ताजी ठेवत आहे.



# ए विंडिकेशन ऑफ दि राइट्स ऑफ वुमन (1792)

**-मेरी वोलस्टोनक्रॅफ्ट (1759-1797)**

स्त्रीमुक्ती चळवळीची आद्य प्रणेती म्हणून 'ए विंडिकेशन ऑफ दि राइट्स ऑफ वुमन' या पुस्तकाची लेखिका मेरी वोलस्टोनक्रॅफ्टविषयी म्हणता येईल. हे पुस्तक स्त्रीमुक्तीविषयीचा शोधनिबंधच ठरेल. तिच्या या पुस्तकात स्त्रीने बुध्दीचा वापर केल्यास तिच्या सर्व समस्यांना उत्तर मिळेल, असे प्रतिपादन केले आहे. स्त्रीने स्वत:ची अबला, फुलासारखी कोमल, भित्री, भावनावश, आधार शोधणारी, या प्रतिमा कोशातून बाहेर पडून शरीराने व मनाने कणखर व्हायला हवे. स्त्री मुक्त व्हायला हवी. प्रत्येक ठिकाणी, प्रत्येक वेळी स्त्रियांची कुचंबणा होत असते. पुरुष तिच्या अज्ञानाचा गैरफायदा घेण्यासाठी टपलेला असतो. बालपणापासूनच सौंदर्य, नट्टापट्टा, इत्यादीवरच भर देत आल्यामुळे स्वत:च्या शरीराकडे पुरुषी नजरेनेच ती पाहत असते. ही सवय मोडली पाहिजे. स्त्री एका सोन्याच्या पिंजऱ्यात अडकून पडलेली आहे. तिने या तुरुंगातून बाहेर पडायला हवे. सूडाने पेटल्यासारखे पुरुषी व्यवस्था स्त्रियांवर अन्याय, अत्याचार करत आली आहे. तिचा प्रतिकार करायला हवा.

लेखिकेच्या या पुस्तकात स्त्रियांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या मानलेल्या प्रेम, वासना, विवाह, लैंगिक संबंध, मालमत्ता इत्यादी गोष्टींचा ऊहापोह केला आहे. स्त्रीने धरसोडवृत्ती सोडून स्वतंत्र होण्यासाठी प्रयत्न करावे असा तिचा आग्रह होता. अजूनही तिने केलेल्या विधानांबद्दल चर्चा चालू आहे. मुस्लिम देशातील स्त्रियांच्या स्थितीवर लेखिकेची त्या काळी केलेली सर्व विधानं आजही तंतोतंत लागू होतात. गेल्या पन्नास वर्षातील स्त्रीमुक्तीबद्दलचा

आढावा घेतल्यास मेरी वोलस्टोनक्रॅफ्टचे लेखन, तिचे आयुष्य, तिचे अनुभव तिने उभा केलेला लढा स्त्रीमुक्ती चळवळीला आदर्शवत वाटू लागतील.

1759साली जन्मलेल्या मेरीचे बालपण फार कठिण परिस्थितीतून गेले होते. बापाचा रागीट स्वभाव व त्याचे तिच्या आईशी होत असलेले रोजचे भांडण व मारझोड यामुळे अनेक वेळा मेरीला घराबाहेर थंडीत कुडकुडत झोपावे लागत असे. गंमत म्हणजे तिच्या आईला त्या मारझोडीचे काहीही वाटत नसे. बळीच्या पशूसारखे ती सर्व सहन करी. त्याकाळातील जनरीतीप्रमाणे मेरीचे शिक्षणसुध्दा अर्धवटच झाले होते. भरतकाम, शिवणकाम शिकण्यातच तिचे बालपण संपले. मुळातच ती एक मध्यमवर्गातली स्त्री होती. म्हणूनच तिच्या पुस्तकाचा सर्व रोख पूर्णपणे मध्यमवर्गाकडेच होता. वाचनातील गोडी व भाषणं ऐकण्याच्या छंदामुळे तिच्या ज्ञानात भर पडत होती.

आपण आर्थिकरित्या स्वावलंबी व्हावे हे तिचे स्वप्न होते. परंतु स्त्रियांना नोकरीचे दरवाजे बंद होते. फार फार तर एखाद्या श्रीमंत बाईची पगारी सहचरी म्हणून काम मिळण्याची शक्यता होती. मेरी एके ठिकाणी सहचरीची नोकरी पत्करून फावल्या वेळात ती लिहू लागली. 1787 मध्ये थॉट्स ऑन दि एज्युकेशन ऑफ डॉटर्स हे तिचे पुस्तक प्रसिध्द झाले. पुस्तकाला हवा तसा प्रतिसाद मिळाला नाही. याच काळात एड्मंड बर्क व रिचर्ड प्राइस या उदारमतवाद्यांच्या संपर्कात आल्यामुळे ती स्वत:च्या व स्त्रियांच्या संबधी विचार करू लागली. फ्रेंच व्रंतीमुळे स्वातंत्र्य व समता परवलीचे शब्द झाले होते. उदारमतवाद्यांना जग बदलण्याची आकांक्षा होती. थॉमस पेन व रूसो या तत्त्वज्ञांचे लेखन वाचताना ती भारावून जात होती.

वैयक्तिक आयुष्यात तिला फार कष्ट भोगावे लागले. गिल्बर्ट इमले या भामटयाचा तिच्या तारुण्यात प्रवेश झाला. त्याच्यामुळे तिला भरपूर मनस्ताप

सोसावा लागला. विवाहबाह्य संबंधातून तिला एक मुलगी झाली. घरातील बिघडलेल्या वातावरणाला कंटाळून तिने दोनदा आत्महत्येचा प्रयत्नही केला. नंतरच्या काळात थॉमस पेनच्या उदारमतवादी संघटनेतील विलियम गोल्डविन या तरुणाबरोबर तिने लग्न केले. परंतु 1797 साली बाळंतपणातील काही गुंतागुंतीमुळे वयाच्या 38व्या वर्षी तिचा मृत्यु झाला. तिच्या मते पती म्हणजे स्त्रियांच्या आयुष्यातील घरातल्या इतर वस्तूंप्रमाणे गरजेची वस्तू असून मनापासून तो आवडत असला तरी कायम हातापायाखाली लुडबुड करत राहणाऱ्या त्याच्या अस्तित्त्वाची गरज नाही.

तिने लिहिलेल्या पुस्तकातील एकूण आशय वाचताना वोलस्टोनक्रॅफ्ट ही स्त्रीमुक्ती चळवळीची जननी असे वाटू लागते. त्यात स्त्री एक स्वतंत्र विचाराची व्यक्ती म्हणून बघितलेले लक्षात येते. स्त्रियांच्या हक्कांची जाणीव तिने करून दिली आहे. पुरुषाने आखून ठेवलेल्या निकषानुसार स्त्रीकडे न बघता स्त्रीच्या स्वभावप्रकृतीनुसार तिच्याकडे बघावे असा तिचा आग्रह होता. तिने लिंगभेद, लैंगिकता इत्यादी विषयांना स्पर्ष केले असले तरी तुलनेने तिचे विचार अपरिपक्व वाटतात. स्त्रियांना मालमत्तेचा अधिकार व संपत्तीत वाटा असावा यावर तिने भर दिले होते. स्त्री केवळ सौंदर्याची बाहुली वा श!यासोबतीण होण्याचे प्रयत्न न करता स्वत:च्या व्यक्तिमत्त्व विकासाकडे जास्त लक्ष द्यावे असे तिला वाटत होते. परंतु अजूनही स्त्रियांच्या मानसिकतेत मेरीला अपेक्षित असा बदल झालेला नाही. अलिकडेच घेतलेल्या एका सर्वेक्षणानुसार 35 टक्के ब्रिटिश मुलींना आपण मॉडेल किंवा नर्तिका व्हावेसे वाटते!

प्रत्येक मनुष्यप्राण्याचे काही नैसर्गिक हक्क आहेत व या हक्कांना नकार देणे विवेकाशी प्रतारणा ठरेल. वासनेच्या आहारी गेलेली माणसं विवेकशील राहू शकणार नाही. शिक्षणातूनच स्त्रियांना राजकीय भान येईल. स्त्रियांसकट सर्व मानवजात समंजस व नीतिमान होऊ शकेल. पती-पत्नींच्यातील प्रेमाचे

अधिष्ठान तिला मान्य असले तरी प्रेमाचा जीवनातील सहभाग अत्यंत अल्प प्रमाणात असावा असे तिला वाटत होते. प्रेमापेक्षा पती-पत्नीमध्ये मित्रत्वाचे संबंध असावे यावर तिचा भर होता. पती जेव्हा प्रियकराच्या भूमिकेतून बाहेर पडतो तेव्हाच पत्नीला प्रेयसीच्या भूमिकेतून बाहेर पडता येते. त्यानंतर पतीला रिझवण्यासाठी विशेष काही करण्याची गरज पत्नीला भासणार नाही. पतीने मित्रत्वाचा हात पुढे केल्यास तिलासुध्दा पती म्हणून त्याच्यावर पूर्णपणे विसंबून राहण्याची आवश्यकता वाटणार नाही. प्रेम, कोमलता, सौंदर्य, या गोष्टी स्त्रीला कठपुतळी बनवण्यासाठी योजिलेल्या संज्ञा आहेत. विवेक लैंगिकतेवर मात करू शकते.

औद्योगिक प्रगतीमुळे स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळणार, कंटाळवाण्या घरकामातून वेळ मिळणार याबद्दल तिची खात्री होती. स्त्रियांना पुरुषांच्या जगात मुक्त वावर मिळेल याची ती कल्पना करू शकत होती. फक्त नंतरच्या काळातील कुटुंब, समाज व इतर संघ-संस्था कशा असतील याचा ती अंदाज करू शकली नाही. स्त्रिया कदाचित प्रथम प्रयत्नात यशस्वी झाल्या नाही तरी पुन्हा त्यांना संधी द्यायला हवी असे तिला वाटत होते. स्त्रियांचा विकास झाल्यास समंजसपणे घरात वावरणाऱ्या मुली, प्रेम करणाऱ्या बहिणी, विश्वासार्ह पत्नी, सुसंस्कृत आई व चांगले नागरिक अशा रीतीने स्त्री ओळखली जाईल, यावर तिचा विश्वास होता.

तिच्या या पुस्तकाच्या प्रसिध्दीनंतरच्या शंभर वर्षाच्या कालखंडात स्त्रीमुक्तीच्या संदर्भात काही अपवाद वगळता विशेष काही घडले नाही. परंतु 19व्या शतकाच्या शेवटी शेवटी स्त्रीमुक्तीचे वारे वाहू लागले. चळवळ जोर धरू लागली. मतदानाच्या हक्कासाठी 1890 ते 1918 पर्यंत अमेरिका व युरोपमध्ये स्त्रियांनी चळवळ उभी केली. चळवळीतल्या कार्यकर्तींना मेरी वोलस्टोनक्रॅफ्ट एक आदर्शवत स्त्री वाटू लागली. 1923मध्ये अमेरिकेत व

1928 मध्ये ब्रिटन येथे मतदानाचा समान हक्काचा कायदा पास झाला. ऑक्सफर्ड-केंब्रिज विद्यापीठातून स्त्रिया पदवीधर होऊ लागल्या. 1929मध्ये ब्रिटिश पार्लिमेंटने स्त्रियांसाठी दरवाजे उघडले. 1960मध्ये स्त्रीमुक्तीची दुसरी लाट आली. स्त्रियांनी आर्थिक स्वातंत्र्यासाठी जगभर आंदोलनं केली. त्यानंतर अनेक स्त्रियांना राजकीय, सामाजिक व प्रशासकीय पदं मिळू लागल्या. मागरिट थॅचर, इंदिरा गांधी, सिरिमाओ बंदारनायके इत्यादी स्त्रियांनी आपापल्या देशांची धुरा यशस्वीपणे संभाळली. मेरी क्युरी, इरिना क्युरी, रोसालिंड फ्रँकलिन सारख्या स्त्रिया वैज्ञानिक संशोधन क्षेत्रात चमकल्या. व हा स्त्रीमुक्तीचा लढा अजूनही कुठे ना कुठे तरी चालू आहे. स्त्रियांना समान वागणूक ही मागणी अजूनही जोर धरत आहे.



# मॅग्नाकार्टा (1215)

ब्रिटिश राज्यघटनेचा हा दस्तावेज मुळात तेराव्या शतकातील राजकीय उलथापालथ व अराजकतेतून बाहेर पडण्यासाठी लिहिलेला तहनामा होता. हा दस्तावेज करून घेण्यामागे राजकीय स्वार्थ असला तरी या स्वार्थाचे उदात्तीकरण करण्याच्या हेतूने शासन व समाज, स्वातंत्र्य व हक्क, कायदा व न्याय, इत्यादींचा पण त्यात समावेश केल्यामुळे व्यक्ती, समाज, राज्यकर्ते, राजेशाही, प्रशासन, न्यायव्यवस्था, इत्यादी सर्व घटकांना मॅग्नाकार्टा मार्गदर्शी ठरला आहे. आठशे वर्षापूर्वी लिहिलेला मॅग्नाकार्टा केवळ ब्रिटनचाच नव्हे तर अमेरिका, कॅनडा, भारत, ऑस्ट्रेलिया, एशिया व आफ्रिका खंडातील लोकशाही राष्ट्रांच्या राज्यघटनांचा संदर्भग्रंथ व मूळ आधार म्हणून ओळखला जातो. ब्रिटनमधील राजघराण्यांना मॅग्नाकार्टामध्ये उल्लेख केलेल्या मर्यादेतच राज्यकारभार करण्यास भाग पाडले आहे. माणसाला माणूस म्हणून स्वाभिमानी आयुष्य जगण्यासाठी, जुलमी प्रशासनाच्या अनिर्बंध सत्तेला वेसण घालण्यासाठी ही लिखित कृती स्फूर्तिदायी ठरलेली आहे.

जगभरातील स्वातंत्र्यप्रेमींना लढण्यासाठी बळ देणारा हा दस्तावेज मुळात इंग्लंडचा सर्वात दुर्बळ राजा म्हणून ओळखलेला किंग जॉन आणि त्याचे सरदार, जहागिरदार, सामंत व पाद्री-बिशप यांच्यातील भांडण मिटवण्यासाठी लिहिलेले करारपत्र आहे. इंग्लंडमधील चर्चसुध्दा राजेशाहीच्या मनमानीला कंटाळलेले होते. राजे व चर्च यांच्यामधील कुरघोडीमुळे प्रजेचे हाल होत होते. किंग जॉन आणि त्याच्या सरदारामधील भांडण विकोपाला गेले. राजा या सरदार-जहागिरदारांनाच भरपूर त्रास देत होता. त्यामुळे भडकलेले सर्व सरदार राजाशी युध्द करण्याच्या तयारीला लागले. दुर्बल राजानी आपली कुवत ओळखून माघार गेतली. सरदारांनी आपले स्वातंत्र्य अबाधित रहावे म्हणून काही करारांचा मसुदा तयार केला. व राजाला त्या मसुद्यास संमती देण्यास

भाग पाडले. 1215 मध्ये लिहिलेल्या लॅटिन भाषेतील या करारपत्राचे 1225 मध्ये इंग्रजीत भाषांतर करून सरदार जहागिरदारांना वाटण्यात आले. कारण अनेक सरदारांना लॅटिन भाषा येत नव्हती.

या करारपत्रातील कलमामध्ये राजाच्या जहागिरदारांच्या हक्कासंबधी त्यांच्या वारसासंबंधी काही अटी घातलेल्या आहेत. विधवाविवाह, राजघराण्यातील स्त्रियांचे हक्क, वारसा हक्क, मालमत्तेतील वाटणी, शहरा-शहरातील मालमत्ता, बंदरातील जहाजांचे नियंत्रण, व्यापार करण्याचे स्वतंत्र्य, न्याययंत्रणा, विवाद मिटवण्यासाठी न्यायाधीशांच्या नेमणुकीसंबंधीचे नियम, प्रतयेक व्यक्तीला जिवंत राहण्याचा, स्वातंत्र्याचा व संपत्ती मिळवण्याचा हक्क, वजनकाटा-मोजमाप विषयीचे नियम, तुरुंगातील वागणूक, अटकेची कारणे समजून घेण्याचा हक्क, असे अनेक विषय त्यात शब्दबध्द केले आहेत. यातील प्रत्येक कलमाचा कायद्यासाठी संदर्भ म्हणून आजही वापरात येऊ शकते. गायीच्या वासराच्या त्वचेवर ओक झाडाच्या डिंकापासून तयार केलेली शाई वापरून बोरूने लिहिलेल्या या मूळ करारपत्राचे आता केवळ चार प्रती शिल्लक आहेत. दोन प्रती लंडन लायब्ररीत, प्रत्येकी एक प्रत लिंकन व सॅलिस्बरी चर्चमध्ये सुरक्षित आहेत. लिहिताना प्रत्येक दहा ओळीनंतर बोरू बदलावे लागत होते.

किंग जॉन याने सही केल्यानंतरसुध्दा करारपत्राची अंमलबजावणी करण्यासाठी मागे पुढे पाहात होता. त्याला युध्दाची धमकी दिली. परतु याच वेळी त्याचा आजार बळावल्यामुळे त्याचा मृत्यू झाला. त्याच्या नऊ वर्षे वयाच्या वारसदाराने संमती दिल्यामुळे पुढचे युध्द टाळले. यानंतरचे राजे थोडीशी जरी कुरघोडी केली तरी नागरिक मॅग्नाकार्टाचा हवाला देत त्यांना नियंत्रणाखाली ठेऊ लागले. 1863मध्ये कायदा सुधारणा विधेयक पास करताना मॅग्नाकार्टामधील कलमांचाच आधार घेतला होता. त्यामुळे ब्रिटिश

राजेशाहीला व प्रशासनाला प्रजेवर जुलुम करणे शक्य झाले नाही. याच कायद्यांच्या आधारे भारतासारख्या वसाहती देशांनासुध्दा ब्रिटिश अंमलदारावर अंकुश ठेवता आले. प्रसंगी त्यांना न्यायालयासमोर खेचण्यातसुध्दा मागे पुढे पाहिले नाही.

सतराव्या शतकात अमेरिकेतील वसाहतीचा प्रन तीव्र झाल्यानंतर मॅग्नाकार्टा पुन्हा एकदा चर्चेचा विषय झाला. त्यामुळे अमेरिकेच्या संविधानातील अनेक कायदे मॅग्नाकार्टातील कलमानुसार बेतलेल्या आहेत. उदाहरणार्थ, कायद्याच्या योग्य प्रक्रियेशिवाय कुठल्याही नागरिकाला जिवंत राहण्यापासून, स्वातंत्र्यापासून, मालमत्तेच्या हक्कापासून वंचित ठेवता येत नाही. न्यायालयाच्या संमतीविना कुठल्याही स्वतंत्र व्यक्तीला तुरुंगात डांबून ठेवता येत नाही. त्याचे स्वातंत्र्याचे हक्क व मालमत्ता हिसकावून घेता येत नाही.

गेली आठशे वर्षे मॅग्नाकार्टा प्रत्येक उदारमतवादी, विचारवंत व विवेकी माणसाच्या मनात घर करून बसलेले आहे. व्यक्तीस्वातंत्र्य अबाधित ठेवण्यासाठी मॅग्नाकार्टाचाच आधार घेतला जातो. प्रत्येक लोकशाही समाजातील नागरिकाना सन्मानाने जीवन जगण्यासाठी मॅग्नाकार्टा स्फूर्ती देत आली आहे. सुसंस्कृत समाजरचनेसाठी मॅग्नाकार्टाने आखून ठेवलेले नियम अत्यंत स्पृहणीय आहेत. दुसऱ्या महायुध्दानंतर पुनरुज्जीवित झालेल्या संयुक्त राष्ट्र संघटनेने मानवी हक्कासंबंधी जाहीरनामा प्रसृत केला. त्यातही 1215 साली लिहिलेल्या मॅग्नाकार्टामधील - कुठल्याही व्यक्तीला मनमानीपणाने अटक, स्थानबध्द, किंवा हद्दपार करता येणार नाही - याच नियमाचा उल्लेख आहे.

लिखित शब्द इतिहासाला कलाटणी देऊ शकतात हेच मॅग्नाकार्टाने सिध्द केले आहे



# वेल्थ ऑफ नेशन्स (1776)

**-ॲडम स्मिथ (1723-1790)**

'ॲन इन्क्वायरी इंटु दी नेचर अँड कॉजेस ऑफ दी वेल्थ ऑफ नेशन्स' एवढे लांबलचक शीर्षक असलेले हे पुस्तक ॲडम स्मिथ या अर्थशास्त्रज्ञाने लिहिलेले आहे. सामान्यपणे हे पुस्तक वेल्थ ऑफ नेशन्स या छोटया शीर्षकानेच ओळखले जाते. अमेरिकन क्रांतीच्या वर्षी प्रकाशित झालेल्या या पुस्तकाला क्रांतीपेक्षाही जास्त प्रसिध्दी मिळाली. जगातील बहुतेक राष्ट्रामधील आर्थिक गतिशीलता या स्कॉटिश अर्थशास्त्रज्ञाने लिहिलेल्या वेल्थ ऑफ नेशन्स या पुस्तकामुळेच आलेली आहे. ॲलन ग्रीनस्पॅनसारखे अनेक अर्थतज्ञ आजही ॲडम स्मिथच्या बिनतोड मांडणीची कौतुक करतात.

वयाच्या 28व्या वर्षी ग्लॅस्गो विद्यापीठात तर्कशास्त्र व नैतिक तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक म्हणून रुजू झाल्यानंतर ॲडम स्मिथ यानी अर्थशास्त्राचा अभ्यास चालू केला. आर्थिक व्यवहारांना शास्त्रीय चौकटीत बसवता येते हे प्रथमच जगाला कळले. तोपर्यंत राजकीय अर्थव्यवहाराला शास्त्र म्हणून मान्यता नव्हती. तार्किकरित्या विश्लेषण करून जागतिक आर्थिक घडामोडीमधील सूत्रबध्दता शोधून व्यक्ती, समाज व राष्ट्र यांच्यातील परस्पर संबंध, त्यांचे नैतिक व्यवहार, इतर क्षेत्रांवर त्याचे होणारे परिणाम इत्यादी सर्व गोष्टींचा विचार करून एक स्थूल कल्पना त्यानी मांडली. माणूस हा केवळ अन्न, वस्त्र, निवारा यासाठी जगणारा प्राणी नसून नैतिक व सामाजिक जवाबदारींची जाण असणारा एक स्वतंत्र सजीव आहे, यावर त्याचा भर होता. म्हणूनच विज्ञानाने माणसाचा विचार करताना त्याच्या जैविक व मानसिक जडणघडणीबरोबरच मानवी स्थिती-गती, भोवतालची परिस्थिती, त्याचे सामाजिक व्यवहार, इत्यादींचा पण सहानुभूतीपूर्वक विचार करावा असा त्याचा आग्रह होता.

त्याकाळी या पुस्तकाचे जगभर अभूतपूर्व स्वागत झाले. औद्योगिक क्रांतीला जे अधिष्ठान हवे होते तेच ॲडम स्मिथने या पुस्तकामधून दिले. ब्रिटनची विस्कटलेली आर्थिक घडी नीट बसवण्यात या पुस्तकाचा फार मोठा वाटा होता. फ्रान्सच्या राज्यक्रांतीची बीजं या पुस्तकात सापडतील. या पुस्तकाच्या अभ्यासकाने नंतरच्या शतकातील जागतिकीकरण व उदारीकरण यांची मुहुर्तमेढ रोवली. रोनाल्ड रीगन, मार्गारेट थॅचर या विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील राज्यकर्ते आपल्या आर्थिक मनमानीसाठी ॲडम स्मिथची साक्ष काढत होते.

या पुस्तकातील मांडणीवर टीका करण्यासाठी भरपूर वाव आहे. ॲडम स्मिथने तळागाळातील गोरगरीबांचा कधी काळी विचार केला होता का? सामान्य लोकांविषयी कळवळा दाखवण्याचे आग्रही प्रतिपादन त्याच्या पुस्तकात सापडते का? माणसांच्या वैयक्तिक स्वार्थामधूनच परोपकारी प्रवृत्ती वाढते या धारणेवरच त्याच्या सिध्दांताचा डोलारा उभा आहे, व या धारणेला नंतरच्या अनेकांनी आव्हान दिले आहे. परंतु स्मिथच्या मते, प्रत्येकाला स्वतंत्रपणे जगण्याची मुभा दिल्यास, त्याच्या जीवन व्यवहारात कुठलीही बंधनं नसल्यास त्याचे जीवन समृध्द होते व राष्ट्राच्या संपत्तीत आपोआपच भर पडत जाते व त्यातच सर्वांचे कल्याण आहे. आता पर्यंतच्या वेगवेगळया आर्थिकव्यवहारांचा अभ्यास केल्यास भांडवली व्यवस्था हीच सर्वात श्रेष्ठ व्यवस्था असून या व्यवस्थेत सुधारणेला भरपूर वाव आहे, यावर त्याचा दृढ विश्वास होता.

या पुस्तकामुळे त्या काळच्या समाजात बदलाचे वारे वाहू लागले. नशिबाला कोसत जगणाऱ्या सामान्य माणसाला आपणही काही करू शकतो, आपली स्थिती बदलू शकतो, प्रयत्न केल्यास जीवनाचा स्तर बदलणे शक्य आहे, या विचारामुळे समाजात नव चैतन्य प्राप्त झाले. बापाचा धंदा मुलाने,

मुलाचा धंदा त्याच्या मुलाने असे पिढयान पिढया चालत आलेल्या उद्योग व्यवसायाच्या साखळीत या पुस्तकातील संदेशामुळे खंड पडू लागला. याच कालखंडात तंत्रज्ञानात भर पडू लागल्यामुळे ॲडम स्मिथच्या विधांनाना पुष्टी मिळाली. मिळालेली संधी व स्वत:तील कौशल्यांच्या जोरावर आपणही कुठल्या कुठे पोचू शकतो, हा आत्मविश्वास वाढू लागला. ॲडम स्मिथच्या मार्गदर्शी तत्त्वामुळे जग बदलता येते, परिस्थिती बदलता येते यावर सर्व जगाचा विश्वास बसू लागला.

प्रत्येकात स्वयंविकासाची आंतरिक ओढ असते. हीच दृष्टी विसाव्या शतकात विकसित झाली, हे लक्षात येईल. स्वयंविकासाचा दहशतवाद, वसाहतवाद, निर्वंशीकरण, खच्चीकरण इत्यादीशी संबंध जोडता येत नाही. तरीसुध्दा स्मिथची जीवनदृष्टी बाजारीकरणाकडे वाटचाल करणारी होती. चांभार, लोहार, कुंभार, सुतार इत्यादी बलुतेदार इतरांचे भले करण्यासाठी व्यवसाय करत नसून त्यांच्यामधील स्वंयंहिताचा स्वार्थच त्यांना प्रेरणा देत असते. आपण त्यांच्यामधील माणुसकी शोधत बसण्याऐवजी त्याच्या स्वयंहिताला साद घालायला हवे. आपल्या गरजांच्यापेक्षा त्यांच्या फायद्याच्या गोष्टी करायला हव्यात. हा त्याचा सांगण्याचा मूळ हेतू होता. कदाचित यामधून खाजगीकरणाची इमारत चढली असेल. परंतु खाजगीकरणाने घातलेल्या गोंधळाकडे पाहिल्यानंतर सामान्य माणसाचे हाल बघवत नाहीत, हेही तितकेच खरे. परंतु स्मिथच्या दृष्टीपथामध्ये सामान्य माणसाला, गरीबाला, दुर्बलाला, स्थान होते तरी कुठे?

स्मिथची घणाघाती टीका ब्रिटिशांनी अनेक शतके पोसलेल्या व्यापारी भांडवलवादावर होती. या सिध्दांतानुसार व्यापारवाढीतूनच संपत्ती निर्माण होते व त्यातून देशाचा फायदा होतो. अशा व्यापारवाढीला उत्तेजन देण्यासाठी, संरक्षण देण्यासाठी, सवलती, अनुकूल कायदे-कानून असावेत यावर ब्रिटिशांचा कटाक्ष होता. स्मिथच्या मते अशी बंदिस्त व संरक्षित व्यवस्था बिनकामाची असते. ईस्ट इंडिया कंपनी अशाच व्यापार व्यवस्थेचे अपत्य होते. भांडवली व्यवस्थेला अशा

प्रकारची संरक्षित भूमिका धोकादायक ठरू शकेल. राष्ट्राची संपत्ती सोन्या-नाण्यातून किंवा नफा-नुकसानीतून न मोजता त्या राष्ट्रातील लोकांच्या राहणीमानावरून, त्यांच्या जीवनशैलीवरुन मोजावे, यावर स्मिथचा कटाक्ष होता. ही व्यापारी व्यवस्था विक्रेत्याचा लाभ व ग्राहकाचे नुकसान यावर भर देते. परंतु निखळ भांडवली व्यवस्थेत विक्रेता व ग्राहक या दोघांनाही आर्थिक व्यवहारामधून संपूर्ण समाधान मिळू शकते. वस्तु योग्य भावात मिळाल्याचा आनंद ग्राहकाला व वस्तू विकून नफा कमावल्याचे समाधान विक्रेत्याला व उत्पादकाला. स्मिथची ही मांडणी भुरळ पाडणारी होती. याच तत्त्वाचे विकृत परिणाम रेनॉल्ड रीगन व मार्गारेट थॅचर यांच्या राजकीय कारकिर्दीत बघावयास मिळाले.

तरीसुध्दा वेल्थ ऑफ नेशन्स या पुस्तकाचा मोठेपणा नाकारण्यात अर्थ नाही. औद्योगिक क्रांती, तंत्रज्ञानातील झेप याच कालखंडात घडत होत्या. हीच नेमकी वेळ साधल्यामुळे या पुस्तकाचा फार गवगवा झाला. त्या काळातील अभ्यासू नेत्यांनी हे पुस्तक वाचून आपली ध्येयधोरणं राबवली. त्यामुळे युरोपियन समाजाला अत्यंत वेगळे वळण लागले. युरोपातील आर्थिक विकासाने उच्चांक गाठला. फ्रेंच राज्यक्रांतीतील अध्वर्यूंनासुध्दा हेच पुस्तक मार्गदर्शी ठरले. अमेरिकेतील भांडवलशाहीला या पुस्तकामुळे तात्त्विक अधिष्ठान मिळाले. वैयक्तिक सुखाच्या मागे लागलेला हा समाज त्यासाठी कुठल्याही थराला जाण्याच्या तयारीत होता. शोषणाला धरबंद राहिला नाही. शेतकऱ्यांच्या शेतीमालांना योग्य भाव व संरक्षण देणारे कॉर्न कायदे कालबाह्य ठरले.

स्मिथने मांडलेल्या अनेक तत्त्वांपैकी भांडवलशाहीचे उदात्तीकरण एवढेच तत्त्व सोईस्करपणे अनेक राष्ट्रांनी उचलून धरली. स्मिथने शिक्षणाच्या खाजगीकरणाला विरोध दर्शविला होता, हे विसरले. कुठल्याही प्रकारचे आक्रमण, बंधन, बळजबरी, यांना त्याचा विरोध होता. सामान्यावरील कराचे ओझे कमी करावे, असा त्याचा आग्रह होता. प्रशासनात न्याय वागणुकीची तो अपेक्षा करत होता. नैसर्गिकरित्या आर्थिक वाढ व्हावी, यावर त्याचा भर होता. पिळवणूक, जुलमी व जबरदस्ती

करणाऱ्या प्रशासनाला त्याचा सक्त विरोध होता. परंतु युरोपीय भांडवलदारांनी या पुस्तकाचा आधार घेऊन भरपूर धुमाकूळ घातला, हे आपण विसरू शकत नाही.

स्मिथच्या मते खाजगीकरण व बाजारीकरण यांच्यात सुसूत्रता आणण्यासाठी अदृष्य हात सतत कार्य करत असते. त्यामुळे वेगळया नियंत्रकाची गरज नाही. परंतु वरचेवर ठिकठिकाणी आर्थिक अरिष्ट कोसळताना हा अदृष्य हात कुठे गायब होतो याचे स्पष्टीकरण ॲडम स्मिथ किंवा त्याचे समर्थक देवू शकले नाहीत. एकीकडे मार्क्सचे समाजवादी आर्थिक तत्त्वज्ञान व दुसरीकडे स्मिथचे भांडवलशाही आर्थिक तत्त्वज्ञान याच संभ्रमातून जगाचा प्रवास चालला आहे. तरीसुध्दा वेल्थ ऑफ नेशन्समधील तत्त्वज्ञानाचे आकर्षण संपलेले दिसत नाही.



# पेटंट स्पेसिफिकेशन फॉर आर्कराइटस् स्पिन्निंग (1769)

***- रिचर्ड आर्कराइट (1733-1792)***

खरे पाहता उद्योजकाच्या पेटंट हक्कासाठी, यंत्राचा तपशील लिहिलेल्या तीन पानी अहवालाला पुस्तक म्हणावे की नाही याबद्दल अनेकांच्या मनात शंकेची पाल चुकचुकली असेल. परंतु चार ओळीची (चारोळया!) कविता असू शकते व चारशे ओळींची पण कविता असू शकते. कवितेला ओळींचे बंधन नाही. त्याच प्रमाणे पुस्तकांना पानांच्या संख्येचे बंधन नसावे.

औद्योगिक क्रांतीच्या कालखंडात ‘उद्योजक’ या पिढीचा खऱ्या अर्थाने उदय झाला. उद्योजक विज्ञान व तंत्रज्ञान यांचा योग्य वापर करून समाजाच्या गरजा भागवण्यासाठी प्रयत्नशील असतात. समाजाला सोई-सुविधा उपलब्ध करून देण्याच्या प्रयत्नात असतात. उद्योजकांच्या पिढीने एकेकाळच्या श्रीमंत जमीनदारांना, वतनदारांना, व्यापारामध्ये भरपूर नफा कमवून गबर झालेल्या भांडवलदारांना उघड उघड आव्हान दिले. समाज ढवळून टाकला. श्रीमंत म्हणजे भरपूर जमीन-जुमला असलेले, शेकडो शेतमजूरांना रात्रं-दिवस राबवून घेत त्यांच्या श्रमातून ऐषारामी जीवन जगणारे, अशी व्याख्या रूढ होती. उद्योजकांनी ही व्याख्या पुसून टाकली.

शेतीभोवती फिरत असलेल्या समाज व्यवस्थेत हजारो वर्षे काहीही बदल झाला नव्हता. परंतु उद्योजकांच्या नवीन पिढीने जमिनीचा एक तुकडाही नसतानासुध्दा केवळ बुध्दी, सर्जनशीलता, दूरदृष्टी व समाजोपयोगी नवीन कल्पनांच्या जोरावर सामाजिक क्रांती घडवून आणली. रिचर्ड आर्कराइटच्या यांत्रिक सूतकताई प्रक्रियेमुळे इतर उद्योजकांना प्रोत्साहन मिळू लागले. नवीन दिशा मिळाली. एका नवीन उद्योगव्यवस्थेची सुरुवात अशा पेटंटमुळे झाली. व

हे लोण पुढील 60-70 वर्षे जगभर पसरले. ही औद्योगिक क्रांती अमेरिका, फ्रान्स, वा रशियातील क्रांतीपेक्षा जास्त परिणामकारक ठरली. जगाचा चेहरा मोहरा बदलला.

मुळात पेटंट हक्कासाठी संशोधकच सामान्यपणे प्रयत्न करत असतात. परंतु रिचर्ड आर्कराइट कुठल्याही अंगाने संशोधक नव्हता. जेम्स वॅट किंवा मायकेल फॅरडे प्रमाणे त्यानी कुठलेही संशोधन केले नव्हते. परंतु तो एक कल्पक उद्योजक होता. आपल्या उत्पादनाला बाजारपेठेत कितपत प्रतिसाद मिळू शकेल याची त्याला जाण होती. आवती भोवती होत असलेल्या बदलांवर व संशोधनांवर त्याची नजर रोखलेली होती. त्यानी संशोधनाचे महत्त्व ओळखले. त्याच्यासारख्या उद्योजकांनी संशोधनाचा वापर करून घेत ब्रिटनमध्ये उद्योगांचे जाळे उभारले व हजारो मजूरांना काम दिले. कामाच्या मोबदल्यातून मिळालेल्या वेतनातून, एके काळी शेतावर राबराबून शेवटपर्यंत गरीबीतच जीवन जगणाऱ्या मजूरांच्या परिस्थितीत सुधारणा झाली. जीवनमान उंचावला. जेथे शक्य आहे तेथील कामाच्या यांत्रिकीकरणांच्या अशा प्रकारच्या हक्कपत्रामुळे उत्पादनाला वेग आला. मोठया प्रमाणात बाजाराच्या मागणीप्रमाणे उत्पादन वाढविणे शक्य झाले. त्यानी त्याकाळी घालून दिलेल्या मार्गदर्शी तत्त्वाप्रमाणे आजचे उद्योग व्यवस्थापन कमी-जास्तपणे अजूनही कार्यरत आहे.

आर्कराइटचे शिक्षण जेमतेम झाले होते. तो तसा अशिक्षितच. त्याकाळी शिक्षण महाग असल्यामुळे घरातच त्याच्या बहिणींने त्याला शिकविले. त्याचे वडील शिंप्याचा व्यवसाय करत. वयाच्या तेराव्या वर्षापासून एका न्हाव्याच्या दुकानात त्याला उमेदवारी करावी लागली. नंतर त्याने केसांच्या कृत्रिम टोपांचा व्यवसाय सुरु केला. गावोगावी हिंडून कापलेले केस गोळा करून तो टोप बनवून घ्यायचा व विकायचा. याच फिरतीच्या काळात, खेडे ओस पडत

आहेत हे त्याच्या लक्षात येऊ लागले. उद्योग व्यवसायामुळे शहरवस्ती वाढत होती. उत्पादनासाठी वापरात असलेले मशिन्स बघून तो आश्चर्यचकित होत होता. मशिन्सनी आर्कराइटला भुरळ घातली.

अशाच एका फिरतीच्या वेळी त्याची गाठ एका हौशी संशोधकाशी पडली. त्या काळी अनेक होतकरूंना नवीन मशिन्स बनवण्याचा छंद जडला होता. त्यातून आपले भाग्य उजळेल या आशेवर रांत्रदिवस ते खपत होते. सुती कापडांच्या कारखान्यांनी ही सुरुवात करून दिली. सुती कपडयांच्या मिल्सनेच औद्योगिक क्रांतीची सुरुवात केली. शेतातील कापूस स्वच्छ करणे, बिया वेगळे करणे, सूत कातणे, विणणे, रंग भरणे, कापड तलम करणे इत्यादी अनेक प्रकार वस्त्रोद्योगांशी निगडित होत्या. सुती कापडांना फार मोठी बाजारपेठ उपलब्ध होती. छोटे छोटे मशिन्सचा वापर करून घरगुती पातळीवरच उत्पादनाचा वेग वाढविण्याचा प्रयत्न केला जात होता. संशोधकांच्या डोक्यात अनेक कल्पना होत्या. परंतु मशिन्स बनवून त्याची चाचणी घेण्यासाठी पैसे नसत. या हौशी संशोधकाला आर्कराइटने मदत करण्याचे ठरवले. सूत कताईसाठी एका नवीन प्रकारच्या चौकटीचा शोध त्यानी लावला होता. मशिनमध्ये अनेक सुधारणा करत त्याची यशस्वीपणे चाचणी करण्यात आली. संशोधकाला धंद्यात भागिदारी दिली. त्याच्याजवळील दूरदर्शीपणामुळे त्याच्या या उपक्रमाला बरकत आली. विज्ञानामुळे जग बदलू शकते या न्यूटनच्या विधानाचा प्रत्यंतर वस्त्रोद्योगातील यांत्रिकीकरणातून येवू लागला. यापूर्वी हाताने सूतकताई केली जात होती. आर्कराइटच्या या सर्जनशील उपक्रमामुळे 5000 लोकांना रोजगार मिळू लागला. पेटंट हक्कासाठी विनंती अर्ज करताना आर्कराइटने त्याचे मशिन कापूस-लोकरपासून सूतकताई करू शकते. त्यातून उत्पादनात वाढ होऊ शकते व कित्येक गरीबांना मजूरी मिळते असा उल्लेख केला होता.

उत्पादनाच्या यांत्रिकीकरणामुळे अशिक्षित, अर्धशिक्षित, कामगारसुध्दा मोठया प्रमाणात उत्पादन करू शकतात हे सिध्द झाले. आर्कराइटच्या कारखान्यातच 8-10

वर्षाच्या बालकामगारांची मोठया प्रमाणात भरती होती. 12 ते 14 तास ते काम करत होते. मशिनसाठी वाफेची, पवनचक्कीची, वा पाणचक्कीची ऊर्जासुध्दा चालू शकत होती. त्यामुळे ज्याप्रकारची ऊर्जा उपलब्ध असेल त्याप्रमाणे मशिनमध्ये थोडे फार बदल करून उत्पादन करणे शक्य झाले. आजसुध्दा मशिनच्या लवचिकपणाविषयी उत्पादक जास्त जागरूक असतात.

आर्कराइटला या व्यवसायात प्रचंड प्रमाणात पैसा मिळू लागला. एका प्रकारे आधुनिक कारखानदारी व्यवस्थेची ही सुरुवात होती. समाजाला याचा पुरेपूर फायदा झाला. आर्कराइटची प्रेरणा घेऊन अनेक उद्योजक वेगवेगळया क्षेत्रामध्ये यांत्रिकीकरणावर भर देऊ लागले. ही औद्योगिक परंपरा अमेरिका, भारत, युरोप, रशिया, जपान, व आता चीनमध्येसुध्दा पसरली आहे. अमेरिकेतील क्रांतीनंतरच्या काळात आर्कराइटच्या यांत्रिकीकरणाची कल्पना अमेरिकेत पोचली. व या संधीचा त्यानी भरपूर फायदा करून घेतला. सर्व देशभर उद्योगाचे जाळे पसरले व अमेरिका श्रीमंत झाली.

वीतभर जमिनीची मालकी नसताना, पिढीजात घरदार, वतन वा इतर कुठलीही मालमत्ता नसताना, किंवा उच्च शिक्षणाचा गंधही नसतानासुध्दा केवळ कल्पकतेच्या जोरावर माणसं श्रीमंत होऊ शकतात, ऐषारामी जीवन जगू शकतात, मोठ मोठया आलिशान घरात राहू शकतात, हेच या औद्योगिक क्रांतीने जगाला दाखवून दिले. भांडवली व्यवस्थेला अत्युच्च शिखरावर पोचवण्याचे काम आर्कराइटसारख्या अनेक उद्योजकांनी केला व अजूनही करत आहेत.

उद्योग व्यवस्थेतील उतावळेपणामुळे, झटपट श्रीमंतीच्या हव्यासामुळे शोषणाला भरपर वावही उद्योजकांना मिळाला. कारखानदारीत अनेक दोष आहेत, हे आपण नाकारू शकत नाही. गोरगरीबांचे शोषण होते; आर्थिक विषमता वाढते; मूठभर लोक इतरांच्या जीवावर ऐषाराम करतात; बालकामगारांची संख्या वाढतच आहे; कामाच्या तासांना बंधन नाहीत इ.इ. हे सर्व खरे असले तरी उद्योगव्यवस्थेचे लोण अजूनपर्यंत थांबवता आले नाही, शहरीकरणाचा वेग थांबवता आला नाही, स्त्री कामगार - बालकामगार यांची पिळवणूक थांबवता आली नाही, हेही तितकेच खरे.

आर्कराइटने शोधलेल्या यंत्रामुळे वस्त्रोद्योगाला भरभराटी आली हे आपण नाकारू शकत नाही. युरोप, अमेरिका, भारत व आता चीन या देशांने वस्त्रोद्योगाला ऊर्जितावस्थेला पोचवले. याचे सर्व श्रेय आर्कराइटला ध्यायला हवे.



# दास कॅपिटल (3 खंडात: 1867,1885,1894)

**-कार्ल मार्क्स (1818-1883)**

या त्रिखंडात्मक ग्रंथांचा लेखक कार्ल मार्क्स व या ग्रंथांचे शीर्षक समानार्थी शब्द म्हणून आजकालचे अभ्यासक वापरत असतात. इतके ते एकमेकात समावून गेलेल्या आहेत. ही पुस्तकं मार्क्सच्या दीर्घकाळ केलेल्या अभ्यासाचे फलित आहेत. आयुष्यातील ऐन उमेदीची पंचवीस वर्ष त्यानी अर्थशास्त्राच्या व्यासंगात घालवली. राजकीय आर्थिक व्यवहाराला विज्ञानाच्या चौकटीत बसवून एखाद्या वैज्ञानिक संशोधकाप्रमाणे त्यानी त्याचा अभ्यास केला. राजकीय अर्थशास्त्र म्हणजे समाजाचे शरीरशास्त्र, असे त्याचे ठाम मत होते. त्या शास्त्राचा सखोल अभ्यास करून त्या अभ्यासाचा पूर्ण आशय त्यानी या तीन ग्रंथात मांडला. यातील पहिला खंड 1867 साली मार्क्सच्या हयातीतच प्रसिध्द झाला. इतर दोन्हींची हस्तलिखित तयार होती. त्याच्या मृत्युपश्चात (1883) फ्रेडरिक एंगल्स या त्याच्या जिवलग मित्राने उरलेले दोन्ही ग्रंथ संपादित करून प्रसिध्द केले.

5 मे 1818 रोजी जन्मलेल्या कार्ल मार्क्सला मोठा झाल्यावर वडिलाप्रमाणे वकील होणे अपेक्षित होते. परंतु त्याने वकिलीचे शिक्षण न घेता तत्त्वज्ञान व इतिहास या विषयांचा अभ्यास करू लागला. संपूर्ण आयुष्य मानवजातीच्या खऱ्या - खुऱ्या सुखासाठी झटण्यात घालवले; अथक परिश्रम केले; अनेक हाल अपेष्टा सोसल्या; व प्रचंड ग्रंथ निर्मिती केली. माणसाला सुख आणि स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या समाजाची स्थापना कोणत्या परिस्थितीत करता येईल, याचे विश्लेषण केले; मार्गदर्शन केले. भांडवलशाही समाजात उत्पादनांची साधनं प्रचंड प्रमाणात निर्माण झाली आहेत; विज्ञानाची आश्चर्यकारक प्रगती झाली आहे; आणि इतिहासाच्या या टप्प्यावर माणसाच्या

खऱ्या - खुऱ्या स्वातंत्र्याची शक्यता निर्माण झाली आहे; असे त्यानी शास्त्रीय विश्लेषणातून दाखवून दिले आहे.

मार्क्स याच्यापुढे प्रश्न होता तो स्वत:ला हरवून बसलेल्या, स्वत:च्या शक्तीची व शक्यताची विस्मृती झालेल्या, स्वत:चीच निर्मिती ज्याला परकी वाटू लागते अशा समाजव्यवस्थेत दुरवस्थेला पोचलेल्या माणसांच्या मुक्तीचा. माणसाचे दु:ख, त्याचे दैन्य हे इथल्या समाजव्यवस्थेशी निगडित आहेत, माणसानेच निर्मित केलेल्या समाजरचनेत त्याची पाळमुळं आहेत, हे मार्क्सला दाखवायच होतं. माणसात परात्म भाव निर्माण करणाऱ्या प्रक्रियेचे ज्ञान झाले की तोच माणूस मग स्वत:चा इतिहास घडवेल तेवढी क्षमता त्याच्याजवळ आहे हे मार्क्सला मांडायच होत. मार्क्सच्या सर्व लेखन साहित्यावर ॲडम स्मिथ, डेव्हिड रिकार्डो, मिल, हेगेल इत्यादी विचारवंतांचा प्रभाव जाणवतो. भांडवलवादाचे विश्लेषण करत असताना अरिस्टॉटल व इतर ग्रीक तत्त्वज्ञांचा संदर्भ त्यानी घेतला होता. विद्यापीठातील त्यानी लिहिलेला शोधनिबंध क्रि. श.पू. तिसऱ्या शतकातील डेमाक्रिटस व एपिक्युरस या ग्रीक तत्त्वज्ञांशी संबंधित होता.

मार्क्सच्या मते भांडवलशाहीची गतिमानता कामगारांच्या शोषणावर व त्यांच्या खच्चीकरणाभोवती फिरत असते. श्रमशक्ती ही क्रयवस्तू बनून तिची खरेदी-विक्री करणे हे भांडवलशाहीचे खास वैशिष्टय आहे. भांडवली व्यवस्थेत उत्पादन साधनं व श्रमशक्ती या क्रयवस्तू असतात. उत्पादकाकडे साधनं व भांडवल या दोन्ही असल्यामुळे श्रमशक्तीवर अतिरिक्त मूल्य लावून नफा कमावतो. परंतु या प्रकारच्या व्यवस्थेत समाज कसा रसातळाला जावू शकतो यावर त्यानी लक्ष केंद्रित केले होते. त्याचे ग्रंथ नीतीचे प्रवचन देत नाहीत. वा केवळ सिध्दांत सांगून वाचकांना वाऱ्यावर सोडून देत नाहीत. समाजव्यवस्था बदलण्यासाठी काय कार्यक्रम हवेत याची चर्चा त्यात केलेली आहे. भांडवली

व्यवस्थेतील गतीमानतेचे विश्लेषण करून त्याची भविष्यातील अवस्था काय असू शकेल हे शोधण्याचा तो प्रयत्न होता. भांडवलवृध्दी, आर्थिक गतीशीलता, स्पर्धा, बँकिंग प्रणाली, कर्ज, भाग भांडवल, नफ्याच्या दरातील उतरंड, मालकी हक्क, इत्यादी अनेक आर्थिक विषयावर त्यानी आपल्या पुस्तकात भाष्य केले आहे.

मार्क्सने आपल्या दास कॅपिटल या ग्रंथात वर्गीय लढयापेक्षा रचनात्मक अंतर्विरोधावर जास्त लक्ष केंद्रित केले आहे. हा लढा श्रम व भांडवल यांच्यामधला नसून श्रमिकवर्ग व मालकांच्यामधला आहे. त्यामुळे ‘कॅपिटल’ हा ग्रंथ क्रांतीची मांडणी करत नसून क्रांतीक्षमता असलेल्या परिस्थितीचे विश्लेषण करते. यात प्राचीन समाजवाद, जमीनदारी, सामंतशाही, भांडवलशाही व भविष्यातील समाज यावर विस्तृतपणे चर्चा केलेली आढळते. भांडवलशाही व्यवस्था अस्तित्वात कशी येते; तिचा विकास कसा होतो; आणि त्या विकासप्रक्रियेतच भांडवलशाहीनंतर येणाऱ्या नव्या व्यवस्थेला जन्म देणारे घटक कसे निर्माण होतात, हे त्यानी विशद केले आहे. भविष्याचे चित्र रंगवताना वर्गभेद, व वर्गविरोध यानी युक्त असलेला जुना भांडवलशाही समाज नाहिसा होऊन त्याऐवजी एकमेकाच्या सहकार्याने राहणारा शोषणमुक्त समाज अस्तित्त्वात येईल, या नव्या समाजात प्रत्येक व्यक्तीचा मुक्त विकास होणे हीच पहिली अट असेल , यावर त्याचा भर होता.

परंतु या अवस्थेपर्यंत अजूनही समाज पोचलेला नाही. एकाप्रकारे मार्क्सचा हा अपेक्षाभंगच आहे. भांडवली व्यवस्थेत तंत्रज्ञान व उत्पादन साधनेतील जलद विकासामुळे अनेक अनपेक्षित बदल होत गेले. परंतु तळागाळातल्यांच्या परिस्थितीत फार फरक जाणवला नाही. अजूनही जग भांडवली व्यवस्था की समाजवादी व्यवस्था याच संभ्रमावस्थेतून मार्ग काढण्याच्या प्रयत्नात आहे. भांडवली व्यवस्थेत सातत्याने आर्थिक अरिष्ट येत

राहतात. फक्त त्याचे बाह्स्वरूप बदललेले असते. अशा स्थितीत समाजाला नेमके काय करावे हेच कळेनासे होते. परंतु फिनिक्स पक्षीप्रमाणे भांडवलशाही पुन्हा डोके वर काढते. शोषणाचे रंग बदलतात. काही वेळा साम्यवादी क्रांतीच्या भीतीने प्रशासनांना शांतता व सुव्यवस्था यांचे निमित्त करुन समाजावर लादलेल्या पोलीस स्टेटची कल्पना सोडून द्यावी लागते. जनतेची प्रगती व सुरक्षितता या कल्याणकारी राज्याच्या कल्पना स्वीकाराव्या लागतात. थातुर मातुर उपाय योजून असंतोष दडपला जातो. काम करू इच्छिणाऱ्या प्रत्येकाला काम मिळण्याची ग्वाही, केलेल्या कामाच्या मोबदल्यात प्राथमिक गरजा पूर्ण होण्याची ग्वाही, बालपणात विकासाची ग्वाही, वृध्दत्वात समाधानाची ग्वाही, अशा समाजाची निर्मिती करण्याचे लालूच दाखवत भांडवलवाद सर्वांना झुलवत ठेवत असते. त्यामुळे मार्क्सला अपेक्षित असलेली क्रांती होऊ शकली नाही. याचबरोबर भांडवलशाही व त्यानंतर येणारा साम्यवाद यामधील संक्रमण काळात समाज व्यवस्था कशी असेल, संक्रमणकाळाची कालावधी किती असेल, भांडवलशाही खिळखिळी झाल्यानंतर जे पक्ष सत्तेवर येतील त्यानी कोणत्या प्रकारची समाज रचना करावी, राजकीय, सामाजिक, आर्थिक संघ-संस्था, संघटना कशा असाव्यात इत्यादीसंबंधीचा उल्लेख मार्क्स करत नाही. व शेवटपर्यंत त्या अनुत्तरित राहिल्या आहेत.

तरीसुध्दा हे ग्रंथ रशियासारख्या अत्यंत बलाढय देशात क्रांती घडवण्यासाठी स्फूर्तीदायी ठरल्या. साम्यवादी राजवटीने अनेक स्थित्यंतर पाहिली. काही आघातामुळे रशियातील साम्यवादी व्यवस्था शेवटपर्यंत रुजू शकली नाही हे खरे असले तरी त्याचा दोष मार्क्स किंवा दास कॅपिटलच्या माथी मारणे योग्य ठरणार नाही. बाजारविरहित अर्थव्यवस्था असू शकते, संपूर्ण मालमत्तेचे स्वामित्व सरकारकडे सोपूनही अर्थव्यवस्था सुरळित चालू शकते,

समाजवादाला लोकशाही प्रणालीची गरज नसते, ही तिन्ही गृहितके प्रत्यक्षाच्या कसोटीवर चुकीच्या ठरल्या. अंमलबजावणीतील चुकीमुळे सिध्दांतच हद्दपार झाला. म्हणूनच जग बदलण्याची क्षमता या पुस्तकात होती असे म्हणण्यास भरपूर वाव आहे



# वाट इज लाइफ? (1943)

## -एर्विन स्क्रोडिंजर (1887-1961)

विसाव्या शतकाचा पूर्वार्ध पूर्णपणे भौतिकशास्त्राला वाहिलेले होते. सापेक्षता सिध्दांत, अणु विभाजन, क्वांटम मेकॅनिक्स या संकल्पनांनी वैज्ञानिक-जगाला मुग्ध करून टाकले होते. मूलभूत विज्ञानसंशोधकांना अणूंच्या रहस्यभेदात स्वारस्य होते. नियंत्रित अणु विभाजनातून ऊर्जेचा अव्याहत श्रोत मिळण्याची शक्यता होती. त्यामुळे जगभरातील वैज्ञानिकांमध्ये अणूंचे रहस्यभेद करण्यात पहिल्यांदा कोण यशस्वी होतो याची जणू काही स्पर्धा लागली होती. मॅनहटन या अणु बॉंब प्रकल्पाने अणू-परमाणूंच्या शोधात असलेल्या वैज्ञानिकांना आपापले सिध्दांत, गृहितकं, व प्रमेयांचे अंतिम परिणाम काय होणार हे प्रत्यक्ष सिध्द करण्याची संधी दिली. परंतु अणुबॉंबच्या स्फोटाने, त्यात झालेल्या मानवी संहाराने वैज्ञानिकांचे जग हादरले. भौतिकशास्त्र व रसायनशास्त्रांने अनेक तंत्रज्ञानांना जन्म दिला. विमान, अत्याधुनिक अजश्रकाय जहाजं, रेडिओ, टीव्ही, स्वंयचलित वाहनं, फोटोग्राफी, सिनेमा, अवकाश तंत्रज्ञान, रडार यंत्रणा, क्ष किरणांपासून वैद्यकीय निदान, लेसर, संगणक, इ.इ. सोई-सुविधा विसाव्या शतकानेच दिलेल्या आहेत व या यादीत आणखी भर पडतच आहे. परंतु काही महत्वाकांक्षी वैज्ञानिक व राजकीय नेते आधुनिक तंत्रज्ञानाला सैनिकांच्या छावणीत बांधून ठेवण्यात यशस्वी होऊ लागले. दोन्ही जागतिक महायुध्दात उपलब्ध तंत्रज्ञानांचा वापर करून लाखो लोक मारले गेले. विज्ञानाची ही काळी बाजू लक्षात येईपर्यंत वेळ निघून गेली होती. विज्ञान हे फक्त मानवी मृत्युसाठीच आहे का? असा प्रश्न पडला. अशा विचार मंथनातून बाहेर पडलेल्या मोजक्या वैज्ञानिकामध्ये एर्विन स्क्रोडिंजर हे नाव लक्षात राहते. या वैज्ञानिकाने जीवशास्त्रावर लक्ष केंद्रित केले व यानंतरचा काळ जीवशास्त्राचा आहे हे वैज्ञानिकांच्या मनावर ठासवले.

'वाट इज लाइफ?' हे पुस्तक नोबेल पारितोषक विजेता स्क्रोडिंजर यानी 1943 साली डब्लिन येथे निवडक 400 प्रेक्षकासमोर दिलेल्या भाषणांची मुद्रित आवृत्ती आहे. याच पुस्तकाने पुढील काळातील वैज्ञानिकांच्या संशोधनाची दिशा बदलली. जगापुढे 'आ' वासून उभ्या असलेल्या आहार, आरोग्य, इत्यादी समस्यांना उत्तर शोधणे शक्य झाले व जगाचा ढाचा बदलू लागला व अजूनही बदलत आहे. खरे पाहता जीवन हे अध्यात्म, धर्म वा तत्त्वज्ञान यांच्या अखत्यारीतला चर्चा विषय. हजारो वर्षे धर्माने या संबंधीचे अत्यंत चुकीच्या कल्पना मांडून लोकांची फसवणूक केली आहे. आत्मा, परमात्मा, चेतना, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, पुनर्जन्म, कर्म सिध्दांत इत्यादी शब्दांची पेरणी करून धर्मनिष्ठांना संमोहित केले. परंतु जीवन म्हणजे नेमके काय? या प्रश्नाचे ऐहिक अंगाने विचार करू लागल्यास मानवी जीवन समृध्द होऊ शकते असा विचारच यापूर्वी कधी कुणी केला नव्हता.

स्क्रोडिंजरने आपल्या भाषणात जीवन म्हणजे काय यासंबंधीचे विचार मांडले. जीव शास्त्र हे भौतिकशास्त्र व रसायनशास्त्रापेक्षा वेगळे का समजले जाते? हा त्याच्या समोरचा प्रश्न होता. एकीकडे किडा-मुंगी, प्राणी-पक्षी व इतर सजीव प्राणी व दुसरीकडे अणु-रेणु, चुंबक, वीज, तापमान, अशी विभागणी का? सजीवांचा विचारसुध्दा भौतिकीचे नियम व रासायनिक क्रिया - प्रक्रिया या संकल्पनेतून का करू नये? निर्जीव वस्तूंसाठी अवकाश व काळ या संकल्पना लागू करून त्यांचे रहस्य उलगडता येते. तशाच प्रकारे सजीवांनासुध्दा अवकाश व काळ या संकल्पना लागू करून त्याचा रहस्यभेद करता येईल का? स्क्रोडिंजरने आपल्या भाषणात सजीव प्राण्यांचा विचारसुध्दा अणु-रेणु, अवकाश-काळ, भौतिकी नियम, रासायनिक प्रक्रिया या संकल्पनेतून करायला हवे असे सुचविले. त्याच्या मते या जगातील सर्व निर्जीव व सजीव भौतिकीच्या नियमाने बांधलेले आहेत. जिवंत असणे म्हणजे शरीरातील

रेणूंच्यावर काही रासायनिक-भौतिक क्रिया - प्रक्रिया घडत राहणे. यालाच चयापचय असे म्हटले जाते - खाणे, पिणे, श्वास घेणे, पुनरुत्पादन करणे इ.इ. जिवंत राहण्याच्या या क्रियेला भौतिकीतील एंट्रॉपीचे नियम पण लागू करता येतील. फक्त ती नकारात्मक एंट्रॉपी असेल. कारण एंट्रॉपीच्या नियमाप्रमाणे निर्जीव वस्तूंची वाटचाल नेहमीच सुव्यवस्थेतून अव्यवस्थेकडे जात असते. परंतु अशा एंट्रॉपीला टाळण्याकडे सजीवांचा कल असतो. सजीवामध्ये एक सुसंबध्दता असते. व ही सुसंबध्दता कायम राखण्यासाठी आयुष्यभर प्रयत्न केले जात असतात. परंतु मृत्युसमयी ही सुसंबध्दता पूर्णपणे ढासळते. मृत्युच शरीराला एंट्रॉपीकडे खेचते. आयुष्यभर जनुक, गुणसूत्र, प्रथिने इ.इ. सुसंबध्दता कायम ठेवण्याच्या प्रयत्नात असतात. व त्यांची आनुवंशिकता प्राणीवंशातील सातत्य टिकवतात.

या पुस्तकामुळे संशोधकांना रेण्वीय जीवशास्त्र हा एक नवा विषय संशोधनासाठी मिळाला. यापूर्वीही या विषयावर त्रोटकपणे काही संशोधन झाले होते. परंतु विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात या विषयावर फार मोठया प्रमाणात संशोधन होऊ लागले. सजीवामध्ये जनुकांचा सहभाग कसा असतो? आनुवंशिकता म्हणजे नेमके काय? जनुकांना आपण नेमके काय करावे हा संदेश कसा व कुठून मिळतो? अशा व इतर अनेक प्रश्नांना संशोधक उत्तरं शोधू लागले. या संशोधनामुळे जीव तंत्रज्ञानात भर पडू लागली. जिवाणू, विषाणू, किडा - मुंगी, क्रिमी कीटकं, वनस्पती इत्यादी सजीवांचा अभ्यास होऊ लागला. वनस्पतींचा अभ्यास करताना संकरित बियांचा शोध लागला. या संशोधनामुळे जास्तीतजास्त आहारोत्पादन करणे शक्य झाले. शेती व्यवसायात हरित क्रांती झाली. सुधारित बी-बियाणे, खतं, कीटकनाशक फवारे, जमिनीची कस सुधारणे इत्यादीमुळे अन्नपदार्थांचे मुबलक उत्पन्न मिळू लागले.

केवळ अनुभवावर आधारित असलेल्या व अंधारात चाचपडत असलेल्या वैद्यकशास्त्राला रेण्वीय संशोधनामुळे एक नवी दिशा मिळाली. माणसांना भेडसावत असलेल्या अनेक असाध्य रोगांचे मूळ शोधण्यात संशोधक यशस्वी झाले. रोगोपचारपध्दतीत प्रगती झाली. वैद्यकीय तंत्रज्ञानातील अत्याधुनिक संशोधनामुळे नवीन वैद्यकीय यंत्रसामग्री बाजारात येऊ लागली. यामुळे डॉक्टर्सना अचूक रोगनिदान करणे शक्य होऊ लागले. नवनवीन औषधामुळे रोगोपचारपध्दतीत फार मोठा बदल झाला. लशीकरणामुळे काही रोगाणूपासून जगाला मुक्ती मिळाली. माणसांच्या सरासरी आयुष्यात लक्षणीय प्रमाणात वाढ होऊ लागली. कुपोषण, बालमृत्यु, मातामृत्यु यात लक्षणीय प्रमाणात घट झाली. जीव भौतिकी व जीव रसायनशास्त्रातील संशोधनातून जैव तंत्रज्ञान विकसित झाले व या क्षेत्रातील संशोधनाचा वेग अजूनही वाढतच आहे.

जनुकीय तंत्रज्ञानातील ही भरभराटी अनेक नवीन प्रश्नांना जन्म घालत आहे. जनुकं खरोखरच स्वार्थी आहेत का? अवयवारोपणासाठी क्लोनिग तंत्रज्ञानाला प्रोत्साहन द्यावे की नको? वैगुण्यरहित माणसांची पिढी तयार करणे शक्य होत असल्यास स्टेम सेल संशोधनावर बंदी का घातली जात आहे? माणसंच्या दीर्घायुष्यासाठी प्रयत्न करणाऱ्या संशोधनामुळे काही नवीन समस्या निर्माण होण्याची शक्यता आहे का? माणसामधील पेशी, पेशीमधील जनुकं इत्यादी भौतिक नियमानुसार कार्य करत असल्यास माणसाच्या स्वातंत्र्याला काही अर्थ असेल का? आयुष्यातील सर्व घटना पूर्वनिर्दिष्ट असल्यास माणसांच्या प्रयत्नांना काही अर्थ असेल का? अशा प्रश्नांची उत्तरं शोधली जात आहेत. व जग त्यानुसार बदलत आहे. म्हणूनच अजूनही हे पुस्तक जगाला मार्गदर्शी ठरत आहे.

****

## समारोप

पुस्तकामुळे जग बदलू शकते, हे कदाचित अनेकांना खुळचटपणाचे वाटू शकेल. लाखो वर्षांपूर्वी लघुग्रहांच्या माऱ्यापुढे डायनासॉरसारखे प्रचंडकाय प्राणी निर्वंश झाले व जगाचा चेहरामोहरा बदलला, हे आपण समजू शकतो. कारण त्यामुळे मनुष्यप्राण्यासकट इतर सस्तनी प्राण्यांना जिवंत राहाण्यासाठी अवकाश मिळाला. प्रचंड प्रमाणात हिमवर्षाव झाल्यामुळे जग बदलले असेल याची आपण कल्पना करू शकतो. जागतिक तापमानवाढीमुळे जगाचे व्यवहार बदलू शकतील याची आपल्याला समज आहे. अमेरिका, फ्रान्स, रशिया, क्यूबा, चीन इत्यादी देशातील रक्तक्रांतीमुळे जगरहाटीत बदल झाला याची आपल्याला जाणीव आहे. पहिल्या व दुसऱ्या जागतिक युध्दानंतर विश्वशांतीसाठी प्रयत्न होत आहेत व युध्द नको ही मानसिकता मूळ धरू पाहत आहे, याची पण आपल्याला जाण आहे. तंत्रज्ञानातील प्रगतीमुळे माणसांचे आयुष्य वाढले आहे, उपभोगवाद उच्चांक गाठत आहे, खेडी ओस पडत आहेत, शहरं बकाल होत आहेत, इत्यादी अनेक गोष्टींचे आकलन सोपे आहे. परंतु पुस्तकामुळे जगाचा चेहरामोहरा पालटला, किंवा पालटू शकतो, पुस्तकं जग बदलण्यासाठी कारणीभूत ठरू शकतात, पुस्तक उत्प्रेरकाची (कॅटलिस्टची) भूमिका बजावू शकतात, लिखित/मुद्रित शब्दांमध्ये एवढी ताकद असू शकते, याबद्दल अनेकांच्या मनात शंका असू शकतील.

जगाविषयीच्या जाणीवा रुंदावण्यासाठी पुस्तकं वाचकासमोर नेमक्या माहितीचा डोंगरच उभे करू शकतात, पुस्तकं आपल्या अभिरुचीची गुणवत्ता वाढवतात, आपल्यात सुधारणा घडवून आणू शकतात, आपल्याला संवेदनशील बनवू शकतात, विवेकी बनवू शकतात, प्रसंगी हसवतात, रडवतात, भावनावश करतात, मनोरंजन करतात, जगण्यासाठी बळ देतात, उत्कंठा वाढवतात, विचार करायला लावतात, वर्तणुकीत बदल घडवतात,

एकटेपणात मित्राची भूमिका वठवतात, मार्गदर्शी होतात, अडचणीतून मार्ग काढण्यासाठी मदत करू शकतात व (काही वेळा!) नीतीचे, उपदेशाचे डोस पण पाजतात. त्यामुळे वैयक्तिक पातळीवर पुस्तकांचे ऋण फेडणे अशक्यातली गोष्ट ठरेल. त्याच वेळी अजून थोडयाशा खोलात जावून विचार करू लागल्यास मानवतेला आकार देणारे, मानवी वंशाची पुनर्रचना करणारे, मानवी प्राण्याचे उन्नयन करणारे व मानवतेच्या श्रध्दा-सिध्दांतांचे कर्ते करवते पण पुस्तकच आहेत.

परंतु जग बदलू शकलेल्या निवडक पुस्तकांची सर्वसंमत यादी करणे फार जिकिरीचे ठरू शकेल. परिस्थितीचा रेटा व कालमान स्थिती-गतीमुळे प्रत्येक समाजगटाचे प्रश्न व अग्रक्रम बदलत जातात. एका समाजगटाला अत्यंत निकडीच्या वाटणाऱ्या समस्या व त्या समस्यांचे साधक बाधक विश्लेषण करणारी पुस्तकं दुसऱ्या गटाला तितके महत्वाचे वाटणार नाहीत. भाषा, भौगोलिक परिस्थिती, जोपासलेली संस्कृती, रूढी-परंपरा इत्यादीमुळे जग वैविध्यपूर्ण आहे व याच विविधतेमुळे अस्मितेचा प्रश्न मूळ धरू पाहत आहे. माणसा-माणसात भेद करणाऱ्या अनेक संकल्पना जगभर पसरलेल्या आहेत व अशा संकल्पनांशी टक्कर देणे तितके सोपे नाही. तरीसुध्दा जगभरातील अनेक दूरदर्शी तत्ववेत्त्यांनी वेळोवेळी समाजाला वेगळे वळण देण्याचे प्रयत्न केले आहेत व त्यासाठी त्यांनी खस्ता खाल्ल्या आहेत.

एकविसाव्या शतकाच्या उंबरठयावरून मागे वळून पाहताना अखंड जगाला समावून घेतलेल्या व जग बदलू पाहणाऱ्या अशा काही तत्त्वज्ञांनी लिहिलेल्या पुस्तकांच्याबद्दल माहिती देण्याचा हा प्रयत्न होता. कदाचित 'ऐसी'वरील चोखंदळ वाचकांना पुस्तकाबद्दलची माहिती आवडली असावी!!



# ‘झिप’ची अजब कहाणी

आपण पँट, जॅकेट वा बॅग इत्यादींना एक स्लायडर ओढून बंद करतो वा उघडतो, यात काही तरी विशेष आहे हे कधीच आपल्या लक्षात येत नाही. परंतु यातील स्लायडर व त्याखालील एकमेकात अडकणाऱ्या दातांची पट्टी - ज्याला झिप (वा झिपर) म्हणून ओळखले जाते - हा एका प्रकारे चमत्कार आहे असे म्हटल्यास ती नक्कीच अतिशयोक्ती ठरणार नाही. औद्योगिक क्रांतीच्या काळात जन्माला आलेले हे अपत्य तुलनेने फारच दुर्लक्षित राहिले. आयसी इंजिन, टर्बाइन, बल्ब इत्यादींना जेवढी प्रसिद्धी मिळाली त्याच्या सहस्रांशसुद्धा प्रसिद्धी झिपच्या वाटेला आली नाही. झिप दिननित्यात वेळोवेळी वापरातली उपभोग वस्तु असून आपल्या आयुष्यात तो इतका अंगवळणी पडला आहे की त्याचा विचार करायलाही आपल्याला फुरसत नसते. परंतु हा चमत्कार आपल्याला पदोपदी अनुभवायलो मिळतो; एवढेच नव्हे तर हा अनुभव सर्वव्यापी आहे.

**झिपचे मार्केटिंग**

2017च्या एका सर्वेक्षणानुसार झिप उद्योगाची उलाढाल 11200 कोटी डॉलर्स एवढी होती. ही उलाढाल गर्भनिरोधक साधनांच्या उद्योगापेक्षाही जास्त असेल. एका अंदाजाप्रमाणे 2024 पर्यंत ही उलाढाल 19800 कोटी डॉलर्सपर्यंत पोचू शकेल. खरे पाहता उलाढालीतील ही वाढ झिपमध्ये अभूतपूर्व सुधारणा होतील किंवा त्यात नाविन्यपूर्ण बदल होतील वा वस्त्रोद्योगात काही क्रांतीकारी बदल घडतील वा बॅग्स-बॅगेजच्या स्वरूपात वेगळे काही तरी होईल यावर अवलंबून नसेल. जगभरातील नवीन, स्वस्त व जास्त प्रमाणात गार्मेंट्स वापरण्यासाठीचा व पुढारलेल्या देशातील फॅशनचे अनुकरण करण्याकडे इतर देशात वाढत असलेला कल यामुळे ही वाढ होणार आहे. जरी झिपचा खप जगभरात मोठ्या प्रमाणात होत असला तरी याचे

उत्पादन मूठभर कंपन्यांच्या हातात आहे. सुमारे 40 टक्के वाटा जपानच्या YKK या कंपनीचा असून याच कंपनीचे 73 देशात उत्पादन केंद्रं आहेत. चीनमधील क्युयाटो योंग्जिया कौंटी या बटणची राजधानी म्हणून जगभरात नावाजलेल्या शहरात दर वर्षी 2 कोटी किलोमीटर लांब भरतील एवढे झिपचे उत्पादन होते. जागतिक लोकसंख्येपेक्षा कित्येक पटीने जास्त प्रमाणात झिपचे उत्पादन होत आहे. भारतातही दिल्लीजवळील गुरगांव येथील टेक्स ही झिप उत्पादनातील अग्रेसर कंपनी आहे.

**इतिहास**

झिप ही एक अलीकडील ग्राहकोपयोगी वस्तु असून त्याचा प्रसार मात्र कासवाच्या गतीने झाला आहे. खरे पाहता माणूस रानटी अवस्थेतून बाहेर पडत असताना ऊन-पाऊस, थंडी व वारा यापासून शरीराचे रक्षण करून घेण्यासाठी प्रयत्न करू लागला. झाडांची पानं, झाडांची पातळ साल वा प्राण्यांची कातडी यासाठी उपयोगात आली. शेतीचा व नंतर कापसाच्या शोध लागल्यानंतर कापसापासून तयार झालेले कापड गुंडाळून त्यानी शरीराचे रक्षण केले. बटण, भोक पाडण्यासाठी सुई या गोष्टी नसल्यामुळे कदाचित कापडाच्या दोन टोकांना गाठ मारून तो आपले शरीर झाकत असावा. नंतर केव्हा तरी माशांच्या हाडापासून बनविलेल्या सुईसदृश साधनापासून वा टोकदार काटा वापरून कपड्याला भोक पाडून त्यातून काही तरी ओवून कापड शरीरभर घट्ट पकडता येते हे त्याच्या लक्षात आले. बटण हा प्रकार केव्हातरी नंतर शोधला असावा. 5000 वर्षापूर्वीच्या मोहंजोदारो-हरप्पा संस्कृतीत बटणटाइप वस्तु होत्या असे इतिहासकारांचा कयास आहे. बटण असले तरी कपड्यांना भोक पाडण्यासाठी सुईचा शोध नंतरच्या काळात लागला असावा. सुईसाठी लागणारे लोखंड चीनमधून जगभर पसरले. त्यानंतर मात्र बटण-काजे हा प्रकार रूढ झाला असावा. ग्रीक-रोमन काळात पायघोळ कपडे अंगावर गुंडाळलेले व

खांद्यापाशी ब्रूचसारखे दिसणारे काटेसदृश्य वस्तु पाहायला मिळतात. त्यांचे बहुतेक कपडे जमिनीवरसुद्धा पदर लोंबकळत जाण्याइतपत लांब होते. कदाचित कपड्याच्या लांबीवरून त्यांची श्रीमंती ओळखली जात असावी.

मध्ययुगीन कालखंडात यासंबंधात भरपूर प्रगती झाली. त्याकाळातील अनेक चर्चमधील पुतळयांच्या कपड्यावर ब्रूचसारखे बटण व ते लावण्यासाठी भोक बघायला मिळतात. त्यापूर्वी लेसटाइप पट्टीने अंगावरील कपडे घट्टपणे बांधता येतात हे लक्षात आले असावे. 14व्या शतकात लूप व हूक यांचा शोध लागला असावा. कदाचित हाच झिपचा पूर्वज असावा. या लूप व हूकमुळे कपड्याला एकमेकावर न ठेवता घट्ट बांधता येते हे लक्षात आले असावे. परंतु हा प्रकार हाताळण्यास अवघड वाटला असावा. श्रीमंतांच्याकडे या कामासाठी नोकर ठेवलेले असावेत. महिलांच्या छातीवरील अंतर्वस्त्रासाठी लूप-हुकची पद्धत अजूनही टिकून आहे. प्रसिद्ध साहित्यिक मार्क ट्वेनने यासंबंधात 1871साली पेटंटही घेतल्याची नोंद आहे.

याच काळात अमेरिकन औद्योगिक प्रतिभेने झिपचा शोध लावला. एका इतिहासकाराच्या मते त्या काळातील इतर शोधांच्या तुलनेत झिप अगदीच विसंगत वाटत होता. थॉमस एडिसनच्या बल्बचा शोध सर्वत्र प्रकाश उधळून टाकणारा होता. अत्यंत स्वस्तही असल्यामुळे गरीब-श्रीमंतासकट सर्वानी त्याला उचलून धरले. अलेक्झांडर ग्राहम बेलच्या टेलिफोनने अशक्य असेच वाटलेल्या दूर संभाषणाला शक्य करून दाखविले. दीर्घकाळपर्यंत याची उपयुक्तता टिकेल की नाही याबद्दल त्याकाळी शंका होती. बघता बघता याची लोकप्रियता वाढतच गेली. परंतु झिपच्या संदर्भात एवढी घाई करण्याची गरज त्या काळच्या समाजाला वाटला नाही. जे काही – बटण, हूक, लेस, बक्कल इ.इ. – होते ते टाकाऊ आहे असेही वाटले नाही. त्यामुळे झिपमध्ये विशेष काही तरी आहे हे त्याकाळीही वाटले नाही (व कदाचित आजसुद्धा!)

## झिपचा शोध

1851च्या सुमारास एलियास होवे या संशोधकानी Automatic, Continuous Clothing Closure या साधनाचे पेटंट घेतले. त्याच्या पेटंटमध्ये स्लाइड फासनरच्या सहाय्याने धागा ओढून ठेवण्याची कल्पना होती. परंतु त्याच्या उत्पादन-विक्रीसाठी त्यानी विशेष प्रयत्न केले नाही. 40 वर्षानंतर 1891मध्ये व्हिटकोंब जुड्सन याला स्लाइडरची ही कल्पना फार आवडली. अफाट कल्पना लढवणारा चिकॅगो येथील हा एक संशोधक होता. त्यानी काँप्रेस्ड हवा वापरुन स्ट्रीटकार्स चालवण्याचे प्रयोग केले. त्याचवेळी पायातील बुटाच्या लेसला पर्याय म्हणून हुक्स व त्याना अडकवण्यासाठी स्लायडरची रचना केली. 1893च्या सुमारास त्यांनी यासंबंधात भरपूर प्रयोग केले. परंतु ही वस्तु प्रत्यक्षात आणण्यात तो यशस्वी होऊ शकला नाही. तरीसुद्धा त्यानी युनिव्हर्सल फासनर्स या नावाने एक कंपनी काढली. त्यानंतर वैफल्यग्रस्त अवस्थेत त्याला ही कंपनी विकावी लागली. स्विडनहून अमेरिकेत स्थलांतरित झालेल्या गिडियन सँडबॅक या इंजिनियरने त्या कंपनीचा ताबा घेतला. प्यायच्या सूपच्या चमच्यांच्या आकारावरून काही कल्पना लढवत त्या एकमेकात विणतील अशी रचना त्यानी केली. कंपनीचे नाव बदलून आटोमॅटिक हूक अँड आय कंपनी या नावाने आजच्या झिप डिझाइनच्या जवळपास असलेले डिझाइन त्यानी विकसित केले. हुकच्या ऐवजी दातासारख्या आकाराच्या व एकमेकात गुंतणाऱ्या त्याच्या या डिझाइनमध्ये धातूचा वापर करून त्याला एक स्लायडरची जोड दिली व स्लायडर वर खाली होत असताना उघड वा बंद होण्याची सोय त्यात त्यानी केली. अशाच प्रकारचे एक डिझाइन स्वित्झर्लँडमधील कॅथरिना कुन्ह मूस या महिलेने विकसित केला होता. परंतु त्याचे उत्पादन होऊ शकले नाही.

सँडबॅक याच्या झिपच्या सुधारित डिझाइनला अजिबात मागणी नव्हती. त्याचा वापर फक्त पैशाचा बटवा किंवा तंबाखूची पिशवी यांच्यापुरतेच सीमित होती. अंगावरच्या कपड्यांसाठी बटणऐवजी झिपचा वापर होऊ शकेल याची पुसटशी कल्पना त्या काळी नव्हती. पहिल्या महायुद्धाने मात्र झिपला उभारी दिली. 1918च्या सुमारास अमेरिकन नौदलातील वैमानिकांच्या हवाबंद जॅकेटसाठी झिपचा वापर करण्यात आला. याच सुमारास सँडबॅक यानी झिपच्या युरोपमधील उत्पादनाचे हक्क मार्टिन ओथ्मर विंटरहाल्टर या जर्मन उद्योजकाला विकले. त्यानी यात फासळी व खाच वापरून काही सुधारणा केल्या. 1923मध्ये गुडरिच या टायर उत्पादन करणाऱ्या कंपनीने पावसाळ्यात वापरता येणाऱ्या रबरी बुटासाठी झिपचा वापर केला. 'झिपर' असे तिचे नामकरण करण्यात आले. हूकलेस फासनर ऐवजी फूटवेअर झिपर या नावाने झिपची नवी ओळख झाली. अंगावरील जॅकेटसाठीसुद्धा झिपचा वापर होऊ लागला. अमेरिकेत झिपला झिपर असेच सर्रासपणे म्हटले जाते. परंतु हे साधन सामान्यांना न परवडण्यासारखे होते. त्यामुळे त्याच्या डिझाइनमध्ये फारशी प्रगती झाली नाही. कदाचित अमेरिकेतील तयार कपड्यांचा बाजार कंजूस असे समजलेल्या ज्यूंच्या हाती होता; म्हणून झिपच्या धंद्यात म्हणावी तितकी वाढ झाली नाही, असे कारण पुढे केले जाते. परंतु ते तितके पटण्यायोग्य वाटत नाही. मुळात 1-2 डॉलर्सला मिळणाऱ्या तयार कपड्यासाठी 30-35 सेंटचे झिप परवडणारे नव्हते. कारण त्या काळी बटण-काजेसाठी फक्त 2-3 सेंट्स खर्च येत होता.

**सुप्त आकर्षण**

यात फक्त पैशाचा प्रश्न नव्हता. झिपचे वापरायला सुलभ व उघड-बंद करण्यातील तरलता हेच त्याला मारक ठरल्या. 1930च्या सुमारास वापरत असलेल्या महिलांच्या कपड्यात झिपमुळे कामुकता वाढते म्हणून नाक

मुरडणाऱ्यांच्या संख्येत वाढ झाली. झिप हे कामोद्रेक उद्दीपन करणारे साधन म्हणून हिणवण्यात आले. प्रख्यात साहित्यिक अल्डस हेक्सलेसहित त्याकाळच्या लेखकांनीसुद्धा यात पुढाकार घेतल्याची उदाहरणं सापडतील. हक्सलेच्या ब्रेव्ह न्यू वर्ल्ड या त्याच्या अत्यंत गाजलेल्या पुस्तकातील झिप्पिकॅमिनिक्स व झिप्पिजामास ही पात्रं एकाच वेळी आधुनिकही वाटत होती व रानटीही वाटत होती. कारण लेखकाच्या मते झिपर हे सरपटणाऱ्या मगरीचा वंशज वाटत होता. झिपच्या संदर्भात आधुनिकता, प्रचंड उत्पादन योग्य, सहजपणे नक्कल करता न येणारी असे असले तरी निरर्थक सेक्सी असे त्याबद्दल उद्गार काढले जात होते. तरीसुद्धा त्या काळच्या अनेकांना ती हवीहवीशीसुद्धा वाटत होती. फॅशन डिझायनर्स आपल्या उत्पादनात झिपचा वापर करू लागले. वॅलिस सिंम्प्सन या सातव्या एड्वर्ड राजाच्या पत्नीला झिप लावलेल्या परिधान वस्त्रांचे विलक्षण आकर्षण होते. स्वतःच्या नवऱ्याच्या पँटला झिप लावण्यास तिने भाग पाडले. तिच्या मते ती एक 'प्रदर्शनीय' वस्तु होती. यथा राजा तथा प्रजा या उक्तीप्रमाणे त्या काळचे अभिजन राजाचे अनुकरण करण्यात पुढाकार घेत होते. प्रिन्स्टन विश्वविद्यालयातील 85 टक्के विद्यार्थ्यांच्या कपड्यात बटणऐवजी झिपचा वापर केला होता, असे 1940च्या सुमारास घेतलेल्या एका सर्वेक्षणात आढळते. परंतु 60 वर्षांच्या पुढील वयस्कर मात्र बटण-काज असलेल्या कपड्यांनाच शरण गेले होते!

**सेक्सी झिप**

दुसऱ्या जागतिक महायुद्धानंतर झिपला चांगले दिवस आले. झिप वापरणाऱ्यांमध्ये आपण कुणी तरी क्रांतीकारक, शूर, वीर असा काहीसा आव होता. मार्लन ब्रॅंडो सारखे नटांच्या वा पंक या पंथांच्या युवकांच्या कपड्यांत झिपला असाधारण महत्व दिले जात होते. कारण त्यांना झिपमुळे पुरुषी श्रेष्ठत्व मिरवता येते असे वाटत असावे. शरीरावरील घट्ट कपड्यामुळे व्यक्तिमत्व उठून

दिसते, स्त्रिया आकर्षित होतात, हा समज त्यामागे असावा. जास्त जाडीची टीप झिपसाठी वापरल्यामुळे अंगावरील कपडे घट्ट आवळल्यासारखे बसत होते व त्यामुळे पीळदार शरीर (स्त्री)मन वेधून घेणारा ठरेल हा हिशोब त्यामागे असावा. त्याकाळापर्यंत स्त्रिया वापरत असलेल्या तंबू टाइप कॉर्सेटचा जमाना संपत आला होता. गिल्डा (1946) या चित्रपटात रिटा हेवर्थ ही नायिका 'मला झिपर बंद करता येत नाही.' असे जेव्हा नायकाला म्हणते तेव्हा 'यातून तुला काही तरी (वेगळे) सुचवायचे आहे का?' असे प्रश्नार्थक उद्गार काढतो. कदाचित झिपरचा वापर एकेकट्यानी करायचे नसून आपापसात दोघानी मिळून करायचे असे त्यातून सुचविले जात असावे. बघता बघता झिपची जागा शरीराच्या पुढच्या भागातून मागच्या पार्श्वभागाजवळ गेली. झिप वर खाली करण्यातील मजा और आहे असे त्या काळच्या जोडप्यांना वाटले असावे. झिप उघडे करण्याला वेगळा 'अर्थ' प्राप्त झाला. जेम्स बाँडच्या, रॉजर मूर हिरो असलेल्या, लिव्ह अँड लेट डाय (1973) या चित्रपटात जेम्स बाँड नायिकेच्या पाठिमागे जाऊन तिच्या कपड्याचे झिप उघडलेले तिला कळलेसुद्धा नाही. कारण झिप उघडण्यासाठी हाताचा स्पर्श न करता लांबूनच लोहचुंबकानी झिप उघडण्याची किमया त्यानी केली होती! एरिका जोंगच्या फीअर ऑफ फ्लाइंग या पुस्तकात तर झिपलेस सेक्सचे वर्णन आहे. झिपच्या कामोत्तेजकता कंबरेच्या खाली पायांना घट्ट चिकटून बसणाऱ्या जीन्स पँट्समध्ये प्रकर्षाने जाणवतो. पुरुषीपणाचे उघड उघड प्रदर्शन करण्यात जीन्सचे कपडे आघाडीवर होते, असे म्हणता येईल. रबर वा PVCपासून बनविलेल्या घट्ट कपड्यापेक्षा त्याला लावलेले झिपच जास्त आकर्षक वाटणारा होता.

**अव्यक्त भीती**

गुप्तांगाजवळ झिप असणे हाच मुळात धोकादायक आहे असे अनेकांना त्याकाळी वाटत होते. स्लायडर वर खाली करत असताना त्यात गुप्तांग

अडकून बसल्यास काय काय होऊ शकेल याची भीती अनेकांच्या मनात होती. रोनाल्ड रीगन चित्रपटात काम करत असताना झिप असलेले कपडे टाळत असे. अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष झाल्यानंतर सार्वजनिक ठिकाणी झिप दगा दिल्यास किती नाचक्की होईल याची त्याला सारखी भीती वाटत होती.

**सुधारणा**

झिपचा वापर जगभर होत असल्यामुळे त्यात काही भव्य, दिव्य अशा सुधारणा झाल्या आहेत का? या प्रश्नाला नाही असेच म्हणावे लागेल. धातूच्या ऐवजी नायलॉन वा प्लॅस्टिकपासून झिपरचे दात व/वा स्लायडर बनविण्यात आले, यालाच फार फार तर सुधारणा म्हणता येईल. काही ठिकाणी वेटोळ्या आकारातील झिप वापरलेले असतील. काही ठिकाणी त्यातील लवचिकतेत वाढही झाली असेल. परंतु मूळ डिझाइनपेक्षा विशेष नाविन्य असलेलेल झिप कुठेही दिसत नाही. खरे पाहता झिपच्या दातांच्या रचनेतच त्याच्या क्षमतेचे रहस्य दडले आहे. त्यांच्यातील अचूकतेची खात्री व कमी खर्चात, मूळच्या डिझाइनमध्ये बदल न करता मोठ्या प्रमाणात उत्पादन करण्याचे तंत्रज्ञान शोधण्याला प्रगती म्हणता येईल. सर्व दातांची रचना एकपंक्तीत आणणे वा एखादा दात मध्येच तुटू नये याची काळजी घेणे हे मोठ्या प्रमाणात उत्पादन करणाऱ्यांना आव्हानात्मक असू शकेल. अचूक गुणवत्ता नसल्यास फक्त झिपच नव्हे तर संपूर्ण कपडे फेकून द्यावे लागतील याची जाण ठेऊनच नियोजन करावे लागेल.

जपानमधील YKK ही झिप उत्पादनातील एक अग्रेसर कंपनी असून या कंपनीने झिपच्या सुधारणाच्या संदर्भात काही पाऊले उचलली आहेत. झिप किमान 10000 वेळा तरी वर-खाली करता यावी यासाठी त्याच्या गुणवत्तेत वाढ केली आहे. टडाओ योशिडा या उद्योजकानी 1934मध्ये या कंपनीची स्थापना केली. दुसऱ्या मदायुद्धात त्याच्या कंपनीच्या ठिकाणी बांबहल्ला

झाल्यामुळे युद्धानंतर पुन्हा एकदा सुरुवातीपासून कंपनी उभी करावी लागली. त्याच्या उत्पादनातील गुणवत्ता व विश्वासार्हता यामुळे युद्धोत्तर काळात ही कंपनी भरभराटीला आली. जगभर YKKच्या झिपला मागणी येऊ लागली. 1960च्या सुमारास कंपनीने अमेरिकेत उत्पादनाला सुरुवात केली. वस्त्रोद्योग अमेरिकेबाहेर जाऊ लागल्यामुळे YKKचे झिपसुद्धा त्या उद्योगाच्या मागे मागे जाऊ लागली. 73 देशात या कंपनीचे उत्पादन केंद्रं आहेत. जास्तीत जास्त उत्पादन चीनमध्ये होत आहे.

ही कंपनी जलनिरोधक, उष्णतानिरोधक, अंधारात चमकणाऱ्या झिपचे उत्पादन करू लागली. झिपमध्ये नाविन्यता आणण्यासाठी व सुधारणेसाठी मोठ्या प्रमाणात संशोधनावर खर्च करू लागली. परंतु मूळ डिझाइनपेक्षा उत्पादन निर्मितीच्या तंत्रज्ञानात जास्त सुधारणा होत आहे. खरे पाहता मूळ डिझाइनमध्ये बदल करण्यासारखे काहीही शिल्लक नाही. फक्त स्मार्ट फोनद्वारे बटण दाबून वा रिमोटद्वारे झिप वर खाली करण्याचेच आता बाकी राहिले आहे. फक्त तसे काही करत असल्यास हॅकर्सच्या करामतीला तोंड द्यावे लागेल.

जर झिपच्या डिझाइन वा कार्य प्रणालीत बदल होत नसल्यास त्याच्या वापरात काही बदल करता येईल का याचाही विचार केला जात आहे. उदाः टोकियोतील काही शल्यविषारदांनी शस्त्रक्रियेनंतर स्टिचेसऐवजी झिप वापरता येईल का याचा विचार करत आहेत. काही शस्त्रक्रियेत पुन्ह-पुन्हा स्टिचेस काढावे लागतात. त्यात फार मोठा धोकाही आहे. अशा वेळी झिप वापरता येईल का याचा अंदाज घेतला जात आहे. तंबूला कापडी दरवाजा लावून दरवाजा उघडण्यासाठी वा बंद करण्यासाठी झिपरचा काही प्रमाणात उपयोग केला जात आहे. गंमत म्हणजे झिपच्या वेगळ्या प्रकारच्या उपयोगासाठी वस्त्रोद्योगापेक्षा अनपेक्षितपणे वेगळ्याच क्षेत्रातून मागणी येऊ शकेल यावर

कंपनीचा विश्वास आहे. स्मार्ट फोनची कल्पना फोन कंपन्याऐवजी ॲपलसारख्या संगणक क्षेत्रातून आली हे लक्षात घेण्यासारखे आहे. कदाचित वस्त्रोद्योगाशी वा बॅग-बॅगेजेस, तंबू तयार करणाऱ्याशी संबंध नसलेल्या क्षेत्रातून ही मागणी येऊ शकते.

त्या इतर क्षेत्राचे जाऊ दे, खुद्द वस्त्रोद्योगातही अजून झिपचा म्हणावा तितका प्रसार झाला नाही. उदाः टी-शर्ट वा जॅकेट वगळता इतर फॉर्मल शर्टसाठी अजूनही पारंपरिक बटण-काजेच जगभर वापरले जातात. तेथे झिप का पोचली नाही? याला उत्तर नाही. वापरणाऱ्याची मानसिकता, उत्पादनाची कार्यक्षमता, सुरक्षितता व प्रामुख्याने त्यासाठीची कल्पक जाहिरात या गोष्टी कुठल्याही उत्पादनाच्या वाढत्या मागणीसाठी आवश्यक असतात. या रसायनातूनच ते उत्पादन रूढ होऊ शकते.

**झिप तंत्रज्ञान**

खरे पाहता झिपच्या क्षेत्रात कुणीच प्रतिस्पर्धी नाही. वृक्षाच्या प्रेरणेतून प्रकाशात आलेला व्हेल्क्रो त्याचा प्रतिस्पर्धी होऊ शकत नाही. मुळात व्हेल्क्रोचा वापर लहान मुला-मुलींच्या व वृद्धांच्या वस्त्रांसाठी होतो. बुटासाटी होऊ शकतो. परंतु व्हेल्क्रोच्या काही मर्यादा आहेत. कच्च्या रस्त्यावर वा वाळवंटी प्रदेशात व्हेल्क्रो वापरल्यास त्यात माती/वाळूचे कण जाऊन व्हेल्क्रो निकामी होण्याची शक्यता आहे. शिवाय त्याच्या वापरात फॅशनेबल असे काहीही नाही. याउलट झिपमध्ये सौंदर्य आहे, निःशब्दता आहे, व वापरण्यात मजा आहे. या दृष्टीने पाहिल्यास झिपमध्ये सुधारणेला वाव नाही. व त्याला पर्यायही नाही.

विनाकारण सुधारणा, नाविन्यता, विकास, प्रगती यांना उत्पादन क्षेत्रात नको तितके महत्व दिले जाते. काही तरी नवीन, आकर्षक, खर्चिक, भन्नाट, गुंतागुंतीचे हे काही तंत्रज्ञान होऊ शकत नाही. बाजारात त्याची उपयुक्तता सिद्ध

व्हावी लागते. या कसोटीवर झिप हे काही तंत्रज्ञान क्षेत्रातील मैलाचा दगड होऊ शकत नाही. व फारच गरजेची वस्तू म्हणूनही त्याचा नावलौकिक नाही. आता झिपला मान्यता मिळाल्यामुळे त्याच्या सेक्स अपीलची चर्चा करण्याचीसुद्धा गरज भासणार नाही. किंवा त्यात क्रांतीकारक वा अत्याधुनिक असे काहीही नाही. जगातील कुठल्याही ज्वलंत समस्येला उत्तर म्हणूनही त्याकडे पाहिले जाणार नाही. फक्त ती एक चांगली सोय म्हणून त्याकडे पहावे लागेल. एका प्रकारे हजारो-लाखो मॅन-अवर्स खर्ची घालून, कुठलाही गाजावाजा न करता, उत्सव-समारंभ साजरे न करता नवीन परंतु गरजेची वस्तू म्हणून त्याकडे पाहिल्यास झिपचे महत्व नक्कीच लक्षात राहील.



# चकचकित जपान

जपानमधील एक शाळा. शेवटचा पिरियड संपत आला आहे. दिवसभराच्या 7-8 तासिकांच्यानंतर येणारी मरगळ प्रत्येक विद्यार्थ्याच्या चेहऱ्यावर दिसत आहे. 'इथून एकदा केव्हा बाहेर पडेन व बाहेर पडून मोकळा श्वास घेईन,' यासाठी सर्व उतावीळ झाले आहेत. सगळयांना घरी पळायचे वेध लागले आहेत. परंतु नेहमीप्रमाणे शिक्षिका उद्याच्या अभ्यासाविषयी सांगते व शेवटी "स्वच्छतेसाठी तयार व्हा", असे फर्मान सोडते. पहिल्या दोन रांगा वर्गाची, नंतरच्या दोन रांगा पायऱ्या व व्हरांडा, आणखी दोन रांगा शाळेचे आवार,.... व शेवटच्या दोन रांगा वॉशरूम-टॉयलेट्स असे त्या दिवसाच्या स्वच्छ करण्याच्या कामाची विभागणी करून देते. शेवटच्या ओळीतील काही मुलां-मुलींची नाराजीची कुरबूर अस्पष्टपणे ऐकू येते. परंतु सर्व जण झाडू-पोछा ठेवलेल्या खोलीकडे वळतात व अतीव उत्साहाने आपल्याला नेमून दिलेल्या जागा स्वच्छ करू लागतात. इतर वर्गातल्या मुलां-मुलीच्या बाबतीतही हेच घडत असते. एवढेच नव्हे तर जपानमधील सर्व शाळा कॉलेजमध्ये हेच दृश्य या वेळी बघायला मिळेल. खरे पाहता हे रोजचेच काम असल्यामुळे कुठलीही मुलं या कामाचा कंटाळा करत नाहीत की कामचुकारपणा करत नाहीत.

जपानला भेट देणाऱ्यांना जपानमधील चकचकीतपणा चटकन डोळयात भरतो. कुठेही कागदाचा तुकडा, मोडक्या-तुटक्या प्लॅस्टिकच्या बाटल्या वा पिशव्या दिसत नाहीत. रस्त्याच्या कडेला थोडासा अंधार आहे म्हणून काही तरी फेकले आहे, कुजत आहे असे दृश्य दिसणार नाही. रस्त्यावर झाड-लोट करणाऱ्यांची फौजही दिसत नाही. वा ठिकठिकाणी सीसिटीव्ही यंत्रणा 24x7 सर्वांवर पाळत ठेवते म्हणून घाबरून जपानीज स्वच्छता पाळत आहेत असेही वाटत नाही. इथली शहरं इतकी स्वच्छ कसे याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही.

जपानमधील सर्व जण कुठेही कचरा होऊ नये व/वा कचरा दिसू नये याची पुरेपूर काळजी घेतात हेच याचे सोपं उत्तर आहे. शाळेच्या 12 वर्षाच्या कालावधीत विद्यार्थ्यांना स्वच्छतेच्या तासिका तंतोतंत पाळाव्या लागतात. त्यात कुठलीही हयगय केलेली सहन केली जात नाही. घरीसुद्धा प्रत्येक पालक स्वच्छतेचे धडे देत मुला-मुलींना घडवत असतात. याबाबतीत कुणाचेही लाड केले जात नाहीत. घर व घराचा परिसर अस्वच्छ असणे किती धोकादायक आहे या गोष्टी कायमचेच अगदी लहानपणापासूनच प्रत्येकाच्या मनावर कोरलेले असतात. व त्या इतके सहजासहजी विसरता येत नाहीत. घाण केल्यास ते शेवटी आपल्यालाच निस्तरावे लागते याची जाण असल्यामुळे वेळीच काळजी घेतली जात असावी. “काही वेळा संडास साफ करण्याचा मला कंटाळा येतो. परंतु हासुद्धा आपल्या जीवनाचाच अविभाज्य भाग आहे, याची मला सतत जाणीव असते.” एक माजी विद्यार्थी सांगत होता. “आपले घरदार, आपले परिसर स्वच्छ ठेवणे ही आपली जबाबदारी आहे. कारण त्याचा वापर आपणच करत असतो.”

वर्गात प्रवेश करताना प्रत्येक विद्यार्थी आपल्या पायातील बूट काढून कपाटात ठेवतो व दुसरे ट्रेनर्स घालून वर्गात प्रवेश करतो. घरीसुद्धा बाहेर वापरलेले बूट बाहेरच ठेवल्या जातात व सॉक्स घालून घरात सर्व जण वावरतात. घरकाम करण्यासाठी येणाऱ्यांनासुद्धा हा नियम लागू पडतो. शालेय शिक्षण संपवून बाहेर पडल्यानंतरसुद्धा ही शिस्त आपोआपच पाळले जाते. जपानच्या या स्वच्छतेच्या अतिरेकाच्या गोष्टी व्हायरलसुद्धा झालेले आहेत. ७ मिनिटात आख्खी ट्रेन कशी स्वच्छ होते हा जगभरचा कौतुकाचा विषय झाला आहे. आणि हा ‘स्वच्छता अभियान’ बघण्यासाठी परदेशी प्रवासी मुद्दाम त्या स्टेशनला भेटी देतात. FIFA कपसाठीच्या 2014 सालच्या ब्राझिल येथील जागतिक फुटबॉल स्पर्धेच्या वेळी व रशियन स्पर्धेच्या वेळी जपानच्या

खेळाडूंनी स्पर्धेनंतर पूर्ण स्टेडियम साफ केलेले कुणीच विसरणार नाही. त्यांच्या ड्रेसिंगरूमची स्वच्छता वाखाणण्यासारखी होती. “आम्हाला कुणीही अस्वच्छ, घाणेरडे म्हटलेले आवडणार नाही. कुणीतरी आम्हाला आमच्या पालकांनी नीटपणे वाढवले नाही असे म्हटल्यास आमचा स्वाभिमान दुखावला जातो.” एका जपान्याची ही प्रतिक्रिया बरेच काही सांगून जाते.

जपानच्या सर्वात मोठ्या फ्यूजी रॉक संगीत महोत्सवाच्या ठिकाणीसुद्धा या स्वच्छतेची शिस्त काटेकोरपणे पाळलेले बघायला मिळते. धूम्रपान करणारे निर्दिष्ट ठिकाणी जाऊनच धूम्रपान करतील व संपूर्ण जग म्हणजे एक अॅशट्रे अशी समजूत करून घेऊन सिगरेटचे थोटके कुठेही न टाकता त्याची योग्य रीतीने विल्हेवाट लावतील. याची तुलना 1969च्या वुडस्टॉक महोत्सवाशी केल्यास किती फरक जाणवतो याची कल्पनासुद्धा करवत नाही. त्या महोत्सवातील कलावंताना आपण एका उकिरड्यावरील कचऱ्यासाठीच कला सादर करत नाही ना असे वाटले असेल.

स्वच्छतेचे हे वेड केवळ कुटुंब वा शाळापुरतीच नसून सर्व सार्वजनिक ठिकाणीसुद्धा राबवली जाते. ऑफिसमध्ये काम करणारे वा बाजार पेठेतील दुकानदार हे सर्व जेव्हा सकाळी सकाळी कामाच्या ठिकाणी आल्यानंतर आपापले ऑफिस/दुकानच नव्हे तर समोरील रस्तेसुद्धा साफ करतात. शाळा-कॉलेजमधे शिकत असलेल्या स्वयंसेवकांसाठी रस्त्यावरील कचरा गोळा करण्याची मोहीम सुट्टीच्या दिवशी राबवली जाते. तसे पाहता रस्त्यावर साफ करण्यासारखे काहीही नसतेच. कारण बहुतेक जण समोर दिसत असलेल्या कचऱ्याची विल्हेवाट लावण्याची पूर्ण दक्षता घेत असतात.

कागदी चलनी नोटा हाताळतानासुद्धा या स्वच्छतेचा प्रत्यय परदेशी यात्रिकांना येत असतो. जपानमधील नोटा इतक्या कोऱ्या करकरीत कसे याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. नव्या, कोऱ्या करकरीत, स्टार्च केलेल्या

कपड्यासारखे या नोटा भरपूर काळापर्यंत क्रिस्प राहतात. कारण दुकानं, हॉटेल्स व टॅक्सीतसुद्धा नोटा ठेवण्यासाठी ट्रेची सोय केलेली असते. व कमीत कमी हस्तस्पर्श होण्याची व कसे तरी नोटांची घडी करून खिशात न कोंबण्याची शिस्त पाळली जाते.

कदाचित हस्तस्पर्शातून रोगाणूंची लागण होईल अशीही भीती वाटण्याची शक्यता असावी. सर्दी-पडश्यानी त्रस्त असल्यास शक्यतो जनसंपर्क टाळण्याकडे यांचा कल असतो. आपल्यामुळे इतरांच्यात लागण होऊ नये, रोगराई पसरू नये याची काळजी घेतली जाते. आपल्यामुळे त्यांच्या कामात खोडा होईल, औषध-पाण्यावर खर्च होईल याचे भान ठेवले जात असल्यामुळे जपानीज स्पर्श टाळत असावेत.

जपानमध्ये स्वच्छतेविषयी एवढी जागरूकता कशी काय आली असेल?

खरे पाहता या देशातील स्वच्छतेबद्दलची जागरूकता नुकतीच जन्मला आलेली फॅड वा फॅशन नाही. 1600 साली विल ॲडम्स नावाचा इंग्रज प्रवासी पायी चालत चालत जपानच्या राजाच्या दरबारी पोचला. त्याच्या प्रवास वर्णनातसुद्धा त्या काळच्या तेथील स्वच्छतेबद्दल, संडास व गटार व्यवस्थेबद्दल उल्लेख सापडतात. त्यांनी जपानच्या सरंजामशाहीतील अभिजनांच्या स्टीमबाथ व त्या स्नानगृहातील सुगंधी दरवळाबद्दल लिहिताना त्या काळच्या इग्लंडमधील दयनीय अवस्थेशी व मलमूत्रानी तुंबलेल्या गटाराशी तुलना केली आहे. जपानीजंना नेहमीच युरोपियनांच्या वैयक्तिक अस्वच्छतेबद्दल एका प्रकारची घृणा वाटत आली आहे.

मुळात जपानच्या दमट व उष्ण हवामानात अन्न पदार्थ लवकर खराब होतात. त्यातून स्वच्छतेकडे दुर्लक्ष केल्यास अन्नपदार्थावर रोगाणूंची भरमसाठ वाढ झाल्यास ते खाण्यालायक रहाणार नाही व तसेच खाल्यास रोगांना व/वा मृत्युला आमंत्रण दिल्यासारखेच अशी एक अव्यक्त भीती मनात घर करून

असते. त्यामुळे व्यावहारिक शहाणपणाच त्यांना स्वच्छतेची काटेकोर बजावणीसाठी उद्युक्त करत असेल.

परंतु यापेक्षाही जास्त महत्वाचे म्हणजे सहाव्या शतमानात चीन व कोरियातून जपानमध्ये आलेल्या बौद्ध धर्माने व 12 व्या शतकात आलेल्या झेन पंथाने जपानमध्ये स्वच्छतेची मूहूर्तमेढ रोवली. झेन महायान बौद्ध पंथाचा एक उपपंथ आहे. मनन किंवा चिंतन हा झेनचा मूलभूत अर्थ असून विश्व व मानवी जीवन यांचे वास्तव स्वरूप जाणण्यासाठी विचार केंद्रित करण्याची ती एक पद्धत आहे. बुद्धत्वाच्या प्राप्तीवर झेनचा भर आहे. 1191मध्ये क्योतो शहरात एका ध्यान विहाराची स्थापना झाली. जपानचे जीवन, कला, साहित्य, आचरण, नीतीतत्वे या साऱ्यांवर झेनचा प्रभाव पडलेला आढळतो. याच पंथाने रोजच्या स्वैपाकाला व त्याला अनुसरून करत असलेल्या स्वच्छतेला धार्मिक व पवित्र अनुष्ठान प्राप्त करून दिले. ध्यानधारणे इतकेच स्वच्छतेला आध्यात्मिक स्थान मिळवून दिले.

झेन पंथात जेवण व जेवण करण्याच्या जागेभोवतीच्या स्वच्छतेला अत्युच्च आध्यात्मिक व धार्मिक कृती समजले जाते. कुठेही किंचितही घाण असू नये याबद्दलची दक्षता व त्याच्या स्वच्छतेला रोजच्या धार्मिक व्यवहारात फार महत्व दिले जाते. 1906च्या सुमारास प्रकाशित झालेल्या बुक ऑफ टी या कारुझो ओकाकुरा या कलावंताच्या पुस्तकात चहा पिणे ही एक धार्मिक विधी असून त्यासाठी त्याच्या संबंधातील सर्व गोष्टी – चहा, साखर, पाणी, चहा पिण्याची जागा, चहा पिणारे इ.इ. – स्वच्छ असणे अत्यंत गरजेचे आहे असा उल्लेख आहे. 1906मधील या उल्लेखाचे पालन आजही केले जाते. हॉटेलमध्ये चहा पिण्यासाठी गेल्यास टी मास्टरची किमोनो घातलेली मदतनीस गुडघे टेकून जमिनीवर एक धुळीचा कणही राहू नये याची काळजी घेत असलेले दृश्य हमखास बघायला मिळेल. चहापानाच्या विधीला झेनमध्ये एक

स्वतंत्र स्थान आहे. चहा अतिशय समारंभपूर्वक बनवला जातो आणि शिष्यांना दिला जा तो. प्रत्येक शिष्याला हा चहापानाचा विधी शिकावा लागतो. या चहापानाच्या विधीशिवाय इतर कुठलेही कर्मकांड झेन मध्ये नाही.

हे सर्व जर खरे असल्यास बौद्ध धर्म असलेल्या सर्व देशात एवढी स्वच्छता का नाही, हा प्रश्न विचारावासा वाटेल. याचे उत्तर झेन पंथ व बौद्ध धर्म या देशात येण्यापूर्वी असलेल्या शिंटो (ईश्वर प्राप्तीचा मार्ग) या धर्मात मिळेल. शिंटो हेच जपानची खरीखुरी ओळख करून देणारे चिन्ह आहे. इतर बौद्ध धर्मीय देशात स्वच्छता हे परमेश्वरानंतरच्या क्रमांक असते. परंतु शिंटो धर्मात स्वच्छता हेच परमेश्वर आहे. त्यामुळे नंतर अवतरलेला बौद्ध धर्म या पूर्वीच्या शिंटो धर्माला पूरकच ठरला असावा.

शिंटो धर्मामध्ये ‘पवित्र’ याच्या विरोधार्थी शब्द अस्वच्छता – जपानिज-मध्ये ‘केगारे’ – हा आहे. केगारे या संकल्पनेत मृत्यु – आजारपणा-पासून कुठलीही न आवडणारी गोष्ट असू शकते. त्यामुळे सातत्याने स्वच्छ करणे, करत राहणे हेच केगारेला दूर ठेऊ शकते अशी जपानीजची भावना आहे. रोगाणू पसरू नये म्हणून इतरांच्या बाबती काळजी करणे हा त्याचाच एक भाग आहे. व्यावहारिकरित्या यावरील उपाय म्हणून प्रथम आपल्या आळशीपणा-तून वा दुर्लक्षामुळे घाण तशीच ठेवणे हे योग्य ठरणार नाही, याची त्यांना जाणीव असल्यामुळे स्वच्छता पूर्णपणे त्यांच्या अंगवळणी पडलेली आहे. पूर्वीच्या काळी स्वतःला पवित्र ठेवण्यासाठी ध्यान विहारात दगडी बेसिनमध्ये हात-तोंड धुतल्यानंतरच प्रवेश करत होते. अजूनही एखादी नवी कार घेतल्यावर मंदिराच्या बौद्ध भिक्षूकडून चवरीसदृश ‘ओनुसा’ने कार पवित्र करून घेतली जाते. कारच्या आतून, इंजिनच्या ठिकाणी, बॉनेट या सर्व

ठिकाणी ओनुसा फिरवला जातो. जमीन वा घर खरेदीच्या वेळी हा ओनुसा कामी येतो.

आपण जर जपानमध्ये राहायला गेल्यास आपणसुद्धा कळत - न कळत स्वच्छतेची शिस्त पाळतो. जपानीजच्या जीवनपद्धतीला अंगीकारतो. नको तेथे नाक शिंकणे, थुंकणे या सवयी बंद होऊ लागतात. हँड सॅनिटायजर वापरत रोगाणू पसरणार नाही याची काळजी घेऊ लागतो. सुका व ओला कचरा वेगवेगळे करून निर्दिष्ट ठिकाणी निर्दिष्ट वेळी ठेऊ लागतो. बूच वेगळे केलेल्या पाण्याच्या प्लॅस्टिकच्या बाटल्या, काचेच्या बाटल्या, इलेक्ट्रॉनिक कचरा वेगवेगळ्या पेटीत ठेऊ लागतो. व आठवड्यातून एकदा- दोनदा येणाऱ्या रिसायक्लिंगच्या व्हॅनची वाट पाहतो.

जर हे सगळे जपानमध्ये करत असल्यास आपल्या देशात का करत नाही?



# (कायमच) तहानलेल्या अवस्थेत असलेली आताची पिढी

आपण आपल्या भोवताली थोडे लक्षपूर्वक पाहत असल्यास बाटलींची संगत जन्मल्यापासून मृत्युच्या दारापर्यंत आहे की काय असे वाटू लागते. बाळ जन्मल्यानंतरचे काही महिने (की दिवस!) वगळता स्तनपानाऐवजी दुधाची बाटली बाळाच्या तोंडात कोंबून आई कामाला जाते. नंतर वयाच्या दुसऱ्या-तिसऱ्या वर्षी आपलं हे बाळ पूर्व (वा पूर्व-पूर्व!) माँटेसरीला प्रवेश घेतल्यापासून चक्क कॉलेजला जाईपर्यंत या 'बाळा'च्या दप्तर वजा सॅकमध्ये, एक वेळ पुस्तकं, खाण्याचा डबा नसले तरी चालतील, परंतु पाण्याची बाटली हवीच. कॉलेज शिक्षणाच्या ऐन उमेदीच्या काळात पाण्याच्या बाटल्या-बरोबरच काही इतर 'बाटल्यां'ची भर पडत असावी. नंतरच्या 60-65 वयापर्यंत नोकरीच्या वा व्यवसायाच्या ठिकाणी तर सॅकमधील पाण्याच्या बरोबर टेबलावरसुद्धा पाण्याची बाटली हवीच. (व या पाण्याच्या बाटल्या-बरोबरच इतर प्रकारच्या 'बाटल्या'ही रिचवल्या जात असावेत.) नंतर दवाखान्यात मृत्युच्या जबड्याच्या आत जाताना सलाइनच्या वा रक्ताच्या बाटल्यामुळे आपल्याला जिवंत असल्याचा भास होत राहतो. अशा प्रकारे दूध, पाणी, दारू, सलाइनच्या बाटल्यांच्या संगतीतला जीवनाचा हा प्रवास आपल्या आयुष्याशी निगडित झालेला असतो. त्यातल्या त्यात पाण्याच्या बाटल्या मात्र दीर्घ काळ आपल्या सोबतीला असतात.

यापूर्वी पाण्याचे इतके चोचले पुरवले जात नव्हते. जेवण, नाष्टा यावेळी पीत असलेल्या पाण्याव्यतिरिक्त अधेमधे केव्हा तरी घरोघरी साठवून ठेवलेल्या माठ वा घागरीतील पाणी ग्लासमध्ये ओतून (उभ्या उभ्या!) गटागटा आवाज करत पिले जात होते. फार फार तर सहकुटुंब सहपरिवार प्रवासात जात

असताना फिरकीच्या तांब्यात पाणी घेतले जायचे. सार्वजनिक ठिकाणी मायबाप सरकार वा कुठल्या तरी दानशूर व्यक्तीच्या कृपेने प्यायच्या पाण्याची सोय होत असे. धर्मार्थ कार्य म्हणून उन्हाळयात ठिकठिकाणी माठांना साखळीने बांधलेल्या अल्युमिनम वा प्लॅस्टिकच्या ग्लासमधून अगदीच तहान लागलेली असल्यास कष्टकरी, गरीब मजूर पाणी पीत होते. रेल्वे प्लॅटफॉर्मवर गाडी आली रे आली की बाटल्या वा तांब्यांध्ये पाणी भरून घेण्यासाठी नळाच्या कोंडीपाशी गर्दी होत असे.

परंतु आता हे सगळे पूर्णपणे थांबलेले असून बाटलीबंद पाण्याला पर्याय नाही अशा स्थितीत आपण वावरत आहोत. कुठलाही समारंभ असो वा सार्वजनिक कार्यक्रम, पाण्याच्या बाटल्या ओळीने मांडलेल्या असतात. व्याख्यानाच्या स्टेजवरील टेबलावर पाण्याच्या बाटल्यांची आरास असते. ऑफीसमधील मीटींग्सची सुरुवातच सर्व जण आपापल्या समोरील पाण्याची बाटली उघडून एक घोट पाणी पिऊनच करत असतात. खरे पाहता येथे तहान लागली व घसा कोरडा आहे म्हणून पाणी पिले जात नसून एक फॅड म्हणून बाटली उघडली जात असावे.

तहान भागविण्यासाठी दिवसभरात पाणी किती प्यावे या संदर्भात पूर्वीच्या काळी “8x8” असा एक अलिखित नियम होता. सामान्यपणे एका ग्लासमध्ये 250 मिली लिटर या प्रमाणे रोज 8 ग्लास पाणी प्यावे हा हिशोब या नियमामागे असावा. म्हणजे इतर आहार पदार्थांच्या खाण्यातून पोटात जाणाऱ्या पाण्याव्यतिरिक्त रोज 2 लिटर पाणी पिल्यास आपले आरोग्य व्यवस्थित राहील असे त्याकाळी वाटत असावे. आणि या नियमाला तसा कोणताही शास्त्रीय आधार नव्हता. परंतु 1945च्या सुमारास अमेरिकेतील एका आहारविषयक अभ्यास करणाऱ्या संस्थेने एक कॅलरी आहारसेवनामागे एक मिलीलिटर पाणी पिणे आरोग्यास हितकारक असे सुचविले. यानुसार

स्त्रिया 2000 कॅलरी व पुरुष 2500 कॅलरी एवढे आहार रोज घेत असल्यास अनुक्रमे रोज 2 व 2.5 लीटर पाणी पिणे गरजेचे आहे. परंतु या पाण्याच्या प्रमाणात वरून घेतलेल्या पाण्याबरोबर फळं-भाज्यांमधील पाण्याचा अंशसुद्धा समाविष्ट केलेला होता. फळं व भाज्यामध्ये सुमारे 70 ते 95 टक्के पाण्याचा अंश असतो. नंतरच्या 1974च्या अभ्यासातसुद्धा रोज 6 ते 8 ग्लास पाणी पिणे शरीरास हितकारक आहे असा निष्कर्ष काढण्यात आला होता. व या पाण्याच्या प्रमाणात फळं, भाज्या एवढेच नव्हे तर शीत पेय व बीअर यांचाही हिशोब धरणे अपेक्षित होते.

पाणी हे सजीवांच्या शरीराला अत्यावश्यक घटक आहे याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही. काही सजीवांच्या शरीराच्या वजनात 90 टक्के पाण्याचेच वजन असू शकते. मानवी शरीरात 50 ते 60 टक्क्यापर्यंत द्रव पदार्थाचे वजन असते. मेंदू व हृदय 73 टक्के तर फक्त पुफ्फुस 83 टक्के द्रवयुक्त असते. ही टक्केवारी वय व लिंग यानुसार कमी जास्त होऊ शकते. सामान्यपणे तुलनेने स्त्रियामधील देहजलाचे प्रमाण पुरुषांपेक्षा कमी असते. प्रौढ स्त्रियांच्यातील देहजलाचे प्रमाण 45 ते 60 टक्के व प्रौढ पुरुषामधील हे प्रमाण 50-65 टक्के असणे अपेक्षित आहे. व्यायाम वा क्रीडा यातून कमावलेले शरीर असल्यास हे प्रमाण आणखी 5 टक्के जास्त असावे.

शरीरातील पाण्याच्या प्रमाणावरून शरीर आरोग्यदायक आहे की नाही हे ठरवले जाते. माणसाच्या शरीरातील सर्व क्रिया-प्रक्रिया सुरळितपणे चालण्यासाठी पाणी हे अत्यावश्यक घटक आहे. शरीराचे जलतोल राखणारा हा एक घटक आहे. बाहेरून घेत असलेले पाणी घाम, लघवी वा श्वासोच्छवासाद्वारे शरीरातून बाहेर पडणाऱ्या पाण्याची भरपाई करण्याइतपत हवी. जर हे समतोल योग्य असल्यास आपण तरतरीत आहोत याची जाणीव होते.

देहजल (body water) म्हणजे मानवी शरीरातील एकूण द्रव पदार्थ होय. देहजल आपल्या शरीरातील पेशींच्या निर्मितीसाठीचे एक अवश्यक घटक आहे. आपल्या शरीराचे योग्य तापमान राखणे, स्नायूंना मजबूत करणे व त्वचेची आर्द्रता इत्यादी क्रिया देहजलामुळे साध्य होतात. म्हणूनच देहजल व प्यायचे पाणी यांना जास्त महत्व आहे. देहजलाची टक्केवारी वाढवण्यासाठी अनेक उपाय आहेत. रोज दोन लिटर पाणी पिणे ही त्याची सुरुवात असू शकते. शक्य असल्यास एक ग्लास पाण्यापासून दिवसाची सुरुवात करणे नेहमीच हितकर ठरू शकेल. शरीरातील कचरासदृश गोष्टी व जंतुविष बाहेर काढण्यास हे उपयोगी ठरू शकेल. नियमितपणे कच्ची फळं व भाज्या खात असल्यास देहजल वाढू शकते. या फळांमध्ये व भाज्यात पाण्याचा अंश मोठ्या प्रमाणात असतो. सतत पाणी पिण्याला हा एक नामी पर्याय आहे. शरीरात साठलेले अतिरिक्त द्रव पदार्थ अगदी पातळ रंगाच्या लघवीद्वारे दिवसातून अनेक वेळा बाहेर पडत आहेत इतपतच प्यायचे पाणी व फळं-भाज्या घेतल्या जावेत

“8x8” च्या मानसिक दबावामुळे तहान लागली म्हणजे डीहायड्रेशनच्या (निर्जलीकरणाच्या) धोकादायक पातळीला पोचलो की काय असा समज करून घेतला जात असावा. परंतु तज्ञांच्या मते आपल्या शरीराला जितके पाणी हवे त्यापेक्षा जास्त पाणी शरीर साठवूच शकत नाही. व जेव्हा पाणी कमी पडते तेव्हा शरीर त्याची पूर्वसूचना नक्कीच देते. माणूस उत्क्रांत होत असताना हायड्रेशनसंबंधीची प्रभावी यंत्रणा विकसित झालेली आहे. शरीरातील पाणी थोडे तरी कमी झाल्यास त्याबद्दलची सूचना मेंदूला पोचते. मेंदू ताबडतोब तहान लागल्याची सूचना देऊन पाणी पिण्यास भाग पाडते. त्याचवेळी काही हार्मोन्सद्वारे मूत्राशयाला पाण्याचे नियंत्रण करण्याची सूचना पाठवली जाते. ही सक्षम यंत्रणा कित्येक हजारो वर्षे प्रभावीपणे कार्य करत आहे. त्यामुळे

सर्वसाधारण आरोग्य असलेल्यानी शरीराची ही हाक ऐकली तरी पुरेसे ठरते. तहान लागणे हे जरी निर्जलीकरणाचे लक्षण म्हणून पूर्णपणे योग्य नसले वा शंभर टक्के खात्रीलायक नसली तरी गेली हजारो वर्षे ही सूचना काम करत असल्यामुळे त्याला नाकारण्याची गरज नाही. एकही कॅलरी पाण्यात नसल्यामुळे पाणी हे आरोग्यासाठी सर्वात उत्तम पेय आहे. चहा-कॉफीसुद्धा आपल्या शरीरातील देहजल वृद्धींगत करू शकतात. त्याचप्रमाणे अल्कोहॉलिक पेयसुद्धा!

शरीराच्या आवश्यकतेपेक्षा जास्त पाणी पिल्यामुळे निर्जलीकरणाच्या धोक्यापासून दूर राहण्याच्या व्यतिरिक्त विशेष असे काही लाभ मिळत नाही. परंतु एका अभ्यासानुसार निर्जलीकरणाची अगदी सौम्य पातळीचा धोका टाळण्यासाठी जास्त पाणी पिणे हे चांगले ठरू शकते. कारण सौम्य निर्जलीकरण टाळल्यास आपला मेंदू व्यवस्थिपणे कार्य करू शकतो. पाणी आपले वजनही नियंत्रित करू शकतो असे एका अभ्यास-प्रयोगाचा निष्कर्ष आहे. प्रयोगाचे निकष पूर्ण करून सामील झालेल्यांचे दोन गटात विभागणी केली. प्रयोगात सहभागी झालेल्यांना तीन महिने पोषण मूल्य असलेले आहार देण्यात आले. मात्र त्यातील एका गटाला रोज जेवणाआधी अर्धातास अगोदर 500 मिलीलीटर पाणी पिण्यास सांगितले. प्रयोगाच्या शेवटी दोन्ही गटात सहभागी झालेल्यापैकी जेवणाअगोदर पाणी पिणाऱ्यांचे वजन तुलनेने कमी होते. प्रत्येकाला रोज 10000 पावलं चालण्यास सांगितले होते, पाणी पिणाऱ्यांना ते सहज शक्य झाले. परीक्षकांच्या मते 1-2 टक्के देहजल कमी असलेले सौम्य डीहायड्रेशन प्रत्येकात होत असतो, व हे सहजपणे लक्षात येत नाही. आणि इतका सौम्य डीहायड्रेशनसुद्धा आपल्या मनस्थितीत व ऊर्जेत बदल करू शकतो. यात सहभागी झालेल्या एका तज्ञाच्या मते आहारापूर्वी घेतलेले पाणी तितक्याच तीव्रतेने पोट रिकामे करू शकते. परंतु आहारातून

घेतलेले सूप, ज्युस मधून पोटात घेतलेले पाणी वजन कमी करण्यास निश्चितच मदत करते. पाणी आपल्या त्वचेची कांती राखण्यास मदत करते. परंतु हे कितपत शक्य आहे याबद्दल तज्ञांच्यात मतभेद आहेत.

रोज आठ ग्लास पाणी पिण्यामुळे शरीराला धोका नाही हे जरी खरे असले तरी आपल्या शरीराच्या सूचनेला दाद न देता जास्त प्रमाणात पाणी पीत राहिल्यास काही वेळा ते धोकादायक ठरू शकते. शरीरातील द्रवाचे प्रमाण जास्त झाल्यास रक्तातील सोडियम आणखी पातळ होण्याची शक्यता असते. त्यामुळे सोडियमची पातळी नीट राखण्यासाठी मेंदू व पुप्फुसांना सूज येऊ शकते. कित्येक क्रीडापटू आवश्यकतेपेक्षा जास्त पाणी पीत असतात. पाण्याच्या अतीसेवनामुळे काही क्रीडापडूंच्यावर मृत्युच्या प्रसंगाला सामोरे जाण्याची पाळी आली. दवाखान्यात शरीरातील पाण्याचा अंश कमी झाल्यामुळे तातडीच्या उपचारासाठी डॉक्टर्स व नर्सेसची धावपळ आपण बघितली असेल. परंतु मॅराथॉन सारख्या खेळात भाग घेतलेल्या क्रीडापटूंचे डीहायड्रेशनचा प्रकार वेगळा आहे.

तज्ञांच्या मते आपण आपल्या शरीराच्या सूचनांकडे दुर्लक्ष करत असल्यामुळे ही स्थिती येऊ शकते. व आपण डीहायड्रेशन टाळण्यासाठी आवश्यकतेपेक्षा जास्त पाणी पिण्याचा अट्टाहास धरतो. पाण्याच्या अती सेवनामुळे 2018च्या लंडन मॅराथॉनमध्ये भाग घेतलेल्या योहाना पॅकन्हॅमला आपल्याला काय झाले हेही आठवत नव्हते. तिला अती पाणी पिल्यामुळे हायपोनेट्रेमिया झाला होता. तिला हॉस्पिटलमध्ये अ‍ॅड्मिट करण्याची वेळ आली. ‘‘माझ्या मित्र-मैत्रिणींना मला डीहायड्रेशन होत असावे म्हणून मला भरपूर पाणी पाजत होते. मला फिट्स आले व माझी हृदयक्रिया बंद पडली. मला ताबडतोब उपचार करावे लागले. व पुढील दोन दिवस मी कोमात होते.’’ हा तिचा अनुभव बोलका आहे. कारण मॅराथॉनच्या वेळी भरपूर पाणी प्यावे

असे ठिकठिकाणी लावलेले पोस्टर्स व इतरांचा सल्ला त्यामुळे ती पाणी पीत गेली व अशी दुरवस्था स्वतःवर ओढवून घेतली. इलेक्ट्रोलाइटचे दोन-चार टॅब्लेट्सनी तिच्या शरीरातील सोडियम पातळी व्यवस्थित राहिली असती. परंतु हा इतका साधा उपाय तिला त्यावेळी सुचला नाही.

आपल्या शरीरातील पाणी कुठल्याही क्षणी कमी होऊ नये म्हणून बहुतेक जण जाईल तेथे कायमचे पाणी घेऊन जातात व शरीराला अवश्यकतेपेक्षा जास्त पाणी वरचेवर पीत राहतात. वाळवंटी प्रदेशाच्या अगदी मध्यावर पण असलो तरी आपल्या शरीरातून घामाच्या वाटे जास्तीत जास्त प्रती ताशी दोन लीटर पाणी आपल्या शरीराबाहेर जाऊ शकते. त्यामुळे शहरातल्या शहरात जास्तीत जास्त अर्धा-एक तास फिरत असताना तेवढा घामही येणार नाही व 500 मिलीलिटरची बाटली संपवण्याचा प्रश्नही उद्भवणार नाही. जर तसे असेल तर बाटली घेऊन फिरण्याची कधीच गरज भासणार नाही. त्यामुळे दिवसभरात दूध, चहा-कॉफी वा कमी साखर असलेले पेय व पाणी धरून 6 - 8 ग्लास द्रव पोटात गेल्यास आरोग्याला पुरेसे ठरेल.

एक मात्र खरे की वयाच्या 60 वर्षानंतर आपली तहान यंत्रणा तेवढीशी कार्यक्षम नसते. त्यामुळे या वयात तरुणांपेक्षा डीहायड्रेशनची शक्यता जास्त असते. म्हणूनच पाणी पिण्याच्या सवयीत काळजीपूर्वक बदल केल्यास आपल्या हिताचे ते ठरू शकेल. शरीराला लागणाऱ्या पाण्याचे प्रमाण वय, लिंग, वजन, हवामान, वातावरण व शारीरिक श्रम इत्यादीवर अवलंबून आहे. त्यामुळे सुलभीकरण करणाऱ्या 8x8च्या नियमाचे तंतोतंत पालन करत राहण्यापेक्षा भूक वा थकणे या क्रियांसाठी जसे शरीर पूर्व सूचना देत असते त्याच प्रमाणे तहानाच्या बाबतीतही सजग राहणे हे आरोग्याचे लक्षण ठरू शकेल. सर्वात महत्वाचे म्हणजे तहान लागण्याची वाट बघू नये. तरीसुद्धा येता-जाता, उठता-बसता, वेळी-अवेळी गरजेपेक्षा जास्त पाणी पीत राहिल्यास

अनेक वेळा वॉशरूमला जाण्या-येण्यासाठी जितक्या कॅलरी जाळता येतील तेवढाच लाभ आपल्या पदरी पडू शकेल



# बुलशिट जॉब्स

*('बुलशिट जॉब्स' या इंग्रजी मथळ्याऐवजी 'निरर्थक रोजगार' किंवा 'फालतू नोकऱ्या' वा 'निरर्थक नोकऱ्यांचा सुळसुळाट' हा मराठी मथळा या लेखाला दिला असता. परंतु 'बुलशिट जॉब्स' हे शीर्षकच चर्चेसाठी समर्पक ठरेल असे वाटले म्हणून हा द्रविडी प्राणायाम.)*

20व्या शतकाच्या प्रारंभीच्या काळातील वाशिंग मशीन्स, व्हॅक्यूम क्लीनर, मॉडेल टी ऑटोमोबाइल्स, रेफ्रिजरेटर, इलेक्ट्रिक टोस्टर, बँडेड्स, बुलडोझर, लाउडस्पीकर्स, रेडिओ, ज्युक बॉक्स, असेंब्ली लाइन उत्पादनतंत्र, ब्रेड स्लाइसर, इलेक्ट्रिक रेझर, टेलिग्राफ, ट्रेन्स, कचऱ्याचा निचरा, फ्रोजन् फूड, इत्यादीसारख्या लहान मोठ्या परंतु अभूतपूर्व वाटत असलेल्या सोई-सुविधा व त्यांच्या तंत्रज्ञानांचा आढावा घेत असताना त्या काळातील प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ, जॉन मेनार्ड कीन्स यानी 1930 साली, विसावे शतक संपायच्या आतच अमेरिका, इंग्लंडसारख्या प्रगत देशातील नागरिकांच्या हातांना काम करण्याची गरज भासणार नाही. त्यामुळे बहुतेक नागरिक फार फार तर आठवड्याला फक्त 15 तास काम करून इतर सर्व वेळ कला, साहित्य, छंद इत्यादी गोष्टी करत स्वतःचे जीवन समृद्ध करत जगतील, असे विधान केले होते. कदाचित त्याचा आशावाद अजिबात खोटा नसेल. त्या काळच्या तंत्रज्ञानातील घोडदौडीचा आढावा घेतल्यास समाजाच्या भौतिक गरजा व माफक मनोरंजनासाठी लागणाऱ्या सोई-सुविधा विसाव्या शतकाच्या अंतापर्यंत पूर्ण होऊन माणसाला फक्त स्वतःचे छंद जपण्यासाठी हालचाल करावे लागेल, असे वाटणे स्वाभाविक होते. आणि ते शक्यही झाले असते. परंतु तसे काही घडले नाही. त्याऐवजी प्रगत तंत्रज्ञान कामं कमी करण्याऐवजी फार मोठा पसारा उभा करत सर्वांना जिवंत राहण्यासाठी(च) काम करण्याच्या रहाटगाडग्याला जुंपून ठेवले आहे. व हा कामाचा रगाडा अजूनही वाढतच

असून त्याला अंत नाही असेच वाटत आहे. भांडवली अर्थव्यवस्थेत अशिक्षित/अर्धशिक्षित यांच्याकडून शारीरिक श्रम करवून घेवून त्यांच्या अतिरिक्त श्रममूल्यावर इतरांचे ऐषआरामी जीवन एक वेळ क्षम्य ठरले असते. परंतु आताच्या तंत्रज्ञानाची भूक सर्व थरातील श्रमिक व बुद्धीजीवींचा बहुतेक वेळ गिळंकृत करत असल्यामुळे आठवड्यातील 70-80 तास कामाला पर्याय नाही असेच वाटू लागले आहे. या कामांच्या वेळानंतर शिल्लक राहिलेल्या अगदी मोजक्या वेळात मन रमविण्याची मुभा हे तंत्रज्ञान देत आहे, हेही नसे थोडके! त्यामुळे आताची समाज व्यवस्था प्रत्येकाला कुठल्या ना कुठल्या तरी कामात गुंतवून तटस्थपणे विचार करण्यास फुरसत देत नाही. समाजाच्या या स्थितीसाठी केवळ तंत्रज्ञानाचाच वाटा आहे असे म्हणण्यात हशील नाही व फक्त तंत्रज्ञानाला दोष देणेही योग्य ठरणार नाही.

काही जणांचा अपवाद वगळता बहुतेकांना स्वतः करत असलेल्या कामाचा तिटकारा वाटतो. जॉब सॅटिस्फॅक्शनविषयी स्पष्ट बोलल्यामुळे परिस्थितीत फरक पडत नाही याचे भान असल्यामुळे स्वतःचे मन मारून (व स्वतःशी प्रतारणा करत) महिन्याच्या शेवटी मिळणाऱ्या (गलेलठ्ठ) पगाराकडे डोळे लावून दिलेले काम ते करत राहतात. आपण एक निरर्थक, फालतू काम करत असून त्यात सर्जनशील, रचनात्मक असे काही नाही याची जाण त्यांना असते. परंतु खरे बोलल्यास आपण गर्तेत जावू याची भीती वाटत असल्यामुळे ते तसेच कुढत कुढत दिवस ढकलत असतात. नोकरीचा पूर्ण काळ अशा प्रकारचे नकारात्मक विचार करत घालविल्यामुळे आपले आयुष्य वाया गेले हे शेवटी शेवटी कळू लागते. या नोकरीने (वा व्यवस्थेने) आपल्याला नामोहरम केले अशी भावना सतत टोचत असल्यामुळे स्वतःलासुद्धा ते सांगू शकत नाहीत.

**कीन्सचे हे दिवास्वप्न पूर्ण का होऊ शकले नाही?**

याचे उत्तर शोधत असताना कीन्सला विसाव्या शतकातील चंगळवाद व टोकाच्या बाजारीकरणाची कल्पना आली नसेल, हेही एक कारण असू शकेल. माणूस हा प्लेजर सीकींग प्राणी असल्यामुळे माणसासमोर

1.गरजा कमी ठेवत कमीत कमी काम करणे व उरलेला वेळ स्वतःचे विनाखर्चिक छंद जोपासण्यात घालवणे

किंवा

2. पोटापाण्यासाठी व नंतरच्या मौजमजेसाठी काम-धदां करत जास्तीत जास्त पैसे कमवणे व उरलेल्या छोट्या कालावधीत जास्तीत जास्त अफाट (व अतीखर्चिक) मौजमजा करणे

असे दोन पर्याय आहेत. त्यापैकी आपण दुसरा पर्याय निवडला आहे. नैतिक  व व्यावहारिकदृष्ट्या कदाचित ते योग्यही असेल. त्यामुळेच विसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत हजारो प्रकारच्या रोजगारांची भर पडली. गंमत म्हणजे यातील बहुतेक रोजगार प्रत्यक्ष उत्पादनाशी संबंधित नव्हत्या.  उत्पादक व उत्पादनाचा वापर करणारा ग्राहक यांच्यामध्ये रोजगाराची एक प्रचंड साखळी उभारून प्रत्यक्ष उत्पादकाला उपाशी ठेवत ग्राहकांकडून पुरेपूर किंमत वसूल केली जात आहे.

**हे नवीन रोजगार कुठले असू शकतील?**

एका सर्वेक्षणानुसार विसाव्या शतकात विकसित देशातील स्वयंचलित यंत्रे, तंत्रज्ञानातील नवीन नवीन कल्पना, प्लॅस्टिक, फायबर सारखे नवीन मटीरियल्स, संगणकीकरण इत्यादीमुळे औद्योगिक क्षेत्रातील व कीटकनाशक औषधं, जनुक सुधारित बियाणे, आधुनिक कृषी अवजार इत्यादीमुळे कृषी क्षेत्रातील रोजगारात लक्षणीय प्रमाणात घट झालेली आहे. व त्याच वेळी नवशिक्षित बुद्धीजीवींचीच मक्तेदारी असलेले व्यवस्थापन, संगणक (हार्डवेर व सॉफ्टवेर), मार्केटिंग, जाहिरात, प्रशिक्षण, आर्थिक व्यवस्था, कायदा,

करसंकलन, सेवा, मनोरंजन, वाहतूक व्यवस्था, माहिती तंत्रज्ञान, हेल्थकेर, माध्यमं, डिजिटल व्यवसाय, या प्रकारच्या क्षेत्रात कारकुनी ते सल्लागारापर्यंत मिडल मॅनेजमेंटच्या रोजगाराची एक लांबलचक साखळी तयार होत रोजगारात तिपटीने भर पडली आहे. त्यामुळे शारीरिक श्रमाधारित अन्न पदार्थांचे उत्पादन करणारे कृषीक्षेत्र व माणसांच्या  गरजा भागवणारे उद्योगक्षेत्र यापेक्षा इतर रोजगारांनाच नको तितके महत्व येऊ लागले. युरोप व अमेरिकासारख्या अती प्रगत राष्ट्रं नव्हे तर चीन, भारतासारख्या विकसनशील देशातील प्रत्यक्ष यंत्रावर काम करणाऱ्यांची संख्या रोडावत असून स्वयंचलित व मानवसदृश रोबो बलुतेदार कष्टकऱ्यांची हकालपट्टी करत आहेत.

आताची जगण्याची पद्धत एक रॅट रेस झालेली आहे. साधे-सरळ आयुष्य जगण्यापेक्षा काही आभासी उद्दिष्टामागे, मौजमजेच्या भन्नाट कल्पनामागे, तथाकथित बुद्धीजीवी वर्ग धावत आहे. त्यातल्या त्यात सेवा क्षेत्र हे न संपणारे कुरण ठरत आहे. फक्त सेवाक्षेत्राचाच फुगा फुगला नसून प्रशासन, व्यवस्थापन, गुंतवणूक इत्यादी क्षेत्रातही ही साथ पसरत आहे. (कर, कायदा, इ.इ) सल्लागार, विश्लेशक, समन्वयक, विशेषज्ञ, (मानवी संसाधन, शिक्षण, हॉस्पिटल्स, टूर्स अँड ट्रॅव्हल्स) व्यवस्थापक, इत्यादी नवीन नवीन नावं रोजगारांना देत असंख्य प्रकारच्या पदांची जन्माला घातल्या जात आहेत. प्रत्येकाच्या मनात आपले कुणी तरी हिसकावून घेतील या भीतीमुळे सुरक्षा रक्षक,   मार्शल्स व सेक्युरिटी प्रोव्हायडर्स   असलेल्या सुरक्षा (सेक्युरिटी) क्षेत्राची भर पडली असून त्यातही लाखो रोजगार निर्माण होत आहेत. एवढेच नव्हे तर पाळलेल्या कुत्र्यांना आंघोळ घालणारे, हॉटेलमधील खाद्यान्न घरी पोचवणारे, गरबा वा फुगडी-झिम्मा शिकविणारे, डोहाळ जेवण, मुलांचे वाढदिवस, अशा समारंभांचे इव्हेंट्स मॅनेज करणारे इत्यादींची रोजगारात भर पडत आहे. त्यामुळे आपल्या प्रधान सेवकांनी चहा-भजी विकण्याला वा

भंगार गोळा करण्याला व्यावसायिक पातळीवर नेल्यास आश्चर्य वाटायचे कारण नाही. हे सर्व बघताना या रॅट रेसमध्ये काही तरी करून इतरांच्या खिशातील पैसे काढून स्वतः (व पुढल्या सात पिढ्या) ऐषारामी जीवन जगतील हे एकच लक्ष्य यांच्या समोर असावे अशी दाट शंका येते. यातूनच कदाचित बुलशिट् जॉब्सची साथ पसरली असावी.

हे सर्व प्रकार पाहत असताना एखादी अदृश्य शक्ती यामागे असेल की काय असे वाटू लागते. ही शक्ती एकामागून एक असे निरर्थक रोजगारांची निर्मिती करून आपल्याला जखडून ठेवत आहे की काय असा संशय बळावतो. यातच कुठले तरी रहस्य दडले असावे. कारण भांडवली अर्थव्यवस्था रोजगाराभिमुख कधीच नसते व त्यात असे काही अपेक्षित नसते. अस्तंगत साम्यवादी रशियामध्ये हे एक वेळ चालले असते. कारण सर्व हातांना काही ना काही तरी काम देऊन पोटापाण्यापुरते मोबदला देणे हे त्या व्यवस्थेचे उद्दिष्ट होते. म्हणूनच दुकानातील ब्रेड विकण्यासाठी तेथे तीन मजूर ठेवले जात होते म्हणे.

खरे पाहता अशा प्रकारच्या निरर्थक रोजगारात कुठेही बाजारीकरण वा स्पर्धा नाही. बाजारीकरणात आर्थिक नफा नसल्यास कुठलेही पान हलत नसते. त्यामुळे बाजारीकरणच अशा फालतू रोजगारावर अंकुश ठेऊ शकते. केवळ लाभ कमावण्यासाठी उभारलेला धंदा अतिरिक्त कामगारांना ठेऊन पगार देत पोसत नाही. तरीसुद्धा या शतकातील भांडवलीव्यवस्था बुलशिट जॉब्सची निर्मिती करतच आहे.

मोठमोठ्या कंपन्या/कार्पोरेट्स अनेक वेळा नोकऱ्यामध्ये कपात करतात. कनिष्ठ कामगारांना घरी बसवून ठेवतात. अनेक वेळा ज्यांच्या जिवावर कंपनी चालत असते तेच या नोकर कपातीचे बळी ठरतात. कंपन्या असे का करतात हे एक न सुटलेले कोडं असून याची बाहेरच्यांना अजिबात कल्पना येत नाही. गंमत म्हणजे या नोकरकपातीत कागदी घोडे नाचविणारे मात्र नेहमीच सुरक्षित

राहतात. एवढेच नव्हे तर त्यांच्यात भरही पडते. 50-60 तास काम करत असल्याचा दावे ते करत असतात. कीन्सच्या भविष्यवेधाप्रमाणे ते आठवड्यातील फक्त 15-20 तास काम करतात व इतर वेळ कुठल्यातरी शिबिराचे, कार्यशाळेचे व्यवस्थापन करण्यात किंवा तत्सम ठिकाणी हजेरी लावण्यात खर्ची होतो. नाही तर स्वतःची प्रतिमा उजळवणाऱ्या गोष्टीत वाया घालवला जातो.

**असे का घडत असावे?**

याची कारणं अर्थशास्त्रात शोधण्यापेक्षा नैतिकतेत व सत्ताकारणात शोधायला हवेत. सत्तेत असलेल्या वर्गाला स्वतंत्रपणे विचार करणारा बुद्धीजीवी वर्ग धोकादायक वाटतो. त्यामुळे या धोकादायक वर्गाला कुठे ना कुठे तरी गुंगवून ठेवल्यास त्यांची सत्ता अबाधित राहू शकते, असे सत्ताधाऱ्यांना वाटते. त्याचप्रमाणे बुद्धीजीवी वर्गाला आपण (देशासाठी) काही तरी करत आहोत याची खुमखुमी असते. परंतु त्यासाठी शेतकऱ्याप्रमाणे उन्हा-तान्हात, धोधो पावसात कष्ट करण्याची तयारी नसते. त्यामुळे मानसिक समाधानासाठी व सत्तेतल्यांचा रोश ओढवून न घेता बुद्धीजीवी वर्ग असल्या बुलशिट् जॉब्समध्ये स्वतःला गुंतवून ठेवतो. संगनमताने गले लठ्ठ पगार घेतो. व हा पैसा कुणाच्यातरी घामातून आपल्याकडे येत आहे व आपण स्वतःला फसवत आहोत याबद्दलची अपराधी भावना मनात न आणता आल् इज वेल् म्हणत आयुष्य जगतो. अशा प्रकारे या वर्गाची नैतिकता, कार्पोरेटचे धोरण व सत्तेत असलेल्यांची खेळी हे सर्व परस्परांना पूरक ठरतात. त्यामुळे भांडवलशाहीचा उंच मनोरा अजूनही टिकून आहे. त्यामुळे पिढ्यान पिढ्या सुतारकाम केलेल्यांना येथे मासे तळण्याचे काम करावे लागते. या उलट ज्यांना सुतार काम येत नाही व शिकून घेण्याची इच्छा नाही त्यांना फर्नीचर बनविण्याच्या कामाला जुंपलेले असते. त्यामुळे मासेही करपून जातात व

फर्नीचरही धड तयार होत नाही. तरीही  व्यवस्था तशीच टिकून असते. तळलेली मासे खाल्ले की नाही खाल्ले वा फर्निचर धड असले तरी वा नसले तरी कुणाला त्याचे देणे घेणे नाही.

कदाचित नरकसदृश स्थितीचा अनुभव आताचा हा समाज घेत असावा.

समाजाच्या अशा (दु)स्थितीबद्दल कुणी काही बोलू वा लिहू लागल्यास तथाकथित शहाणे तुम्हाला याच्यातले काय कळते? कुठला रोजगार योग्य व कुठला अयोग्य हे सांगणारे तुम्ही कोण? योग्य म्हणजे नेमके काय? तुम्ही इतरांच्या नैतिकतेत लुडबुड करू नका, आम्हाला  शहाणपणा शिकवू नका. समाजाला काय हवे वा काय नको हे सांगणारे तुम्ही कोण? इ.इ. प्रकारची शेरेबाजी करत नामोहरम करतील. खऱ्या समस्यावर पडदा टाकण्याचा प्रयत्न करतील. सामाजिक मूल्य यावर वादविवाद होत राहतील. मूळ समस्येला व उपस्थित केलेल्या प्रश्नांना बगल देण्याचे प्रयत्न होत राहतील. एक मात्र खरे की आताच्या परिस्थितीत श्रम प्रतिष्ठेची व्याख्या पुन्हा एकदा तपासावी लागेल.

खरोखरच श्रमप्रतिष्ठेतून देशाच्या संपत्तीत आम्ही भर घालत आहोत असे ज्यांना मनापासून वाटत असेल त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल संशय घेणे वा टीका-टिप्पणी करणे योग्य नसेलही. परंतु ज्यांना ते करत असलेल्या निरर्थक कामाबद्दल तिटकारा वाटतो त्यांचे काय? यातले काही ज्यांना शक्य आहे ते कंटाळवाण्या नोकरीचा राजिनामा देऊन आवडीच्या कामाचा शोध  घेत आपल्या जीवनाला अर्थ देण्याचा प्रयत्न करत असतीलही. कमी पगार घेत आपले छंद संभाळत आयुष्य काढत असतीलही. साहित्य, कला वा समाजकार्य करत कमी पैशात गुजराण करणाऱ्यांची उदाहरणं आपल्यासमोर आहेत. गरीबीचे चटके सहन न झाल्यामुळे पुन्हा एकदा न आवडणारी नोकरी

पकडलेल्यांची उदाहरणंसुद्धा आपल्या समोर आहेत. परंतु ते आपल्या आयुष्याच्या निरर्थकतेविषयी प्रांजळपणे कबूली देतात.

**मानवी समूह कुठे भरकटत आहे?**

अशा प्रकारच्या गोष्टीबद्दल विचार करताना हा मानवी समूह कुठे भरकटत आहे, हा प्रश्न विचारावासा वटतो. स्वतःच्या आवडीचे काम करून आयुष्य जगण्यापेक्षा बलाढ्य बहुराष्ट्रीय कार्पोरेटमध्ये गुलामी करणे कितपत योग्य असेल, हा प्रश्न उपस्थित करावासा वाटतो. गंमत म्हणजे रोजगारांच्या कार्पोरेटीकरणामुळे एक-दोन टक्के लोकांच्या हातात संपत्ती एकवटत असून आपण अजूनही बाजारीकरणाची गोडवे गात आहोत. प्रत्येक देशातील शासन व्यवस्था कार्पोरेट्ससमोर हतबल झालेली आहे, निष्क्रीय होत चालली आहे. कार्पोरेट्सची शरणागती पत्करलेले कुणीही आपण करत असलेली नोकरी निरर्थक होती/आहे असे कधीच कबूल करणार नाहीत. मोठमोठ्या पार्टीमध्ये कार्पोरेट्सचे सुटा-बुटातील गुलाम सुंदर मुखवटे चढवून आपापल्या कामाची तारीफ करत असतात. परंतु एक-दोन पेग पचवल्यानंतर हे मुखवटे गळून खरा चेहरा दिसू लागतो व सत्य काय आहे ते कळू लागते.

खरे पाहता हे एका प्रकारची मानसिक हिंसाच ठरू शकेल. श्रमप्रतिष्ठेचे गुणगान करणाऱ्यांना ते श्रमच निरर्थक वाटत असल्यास ते कुणाला फसवत आहेत? नरकाच्या उदाहरणामध्ये सांगितल्याप्रमाणे मासे तळण्यासारखी न आवडलेली वा न जमणारी कामं करणारे कालांतराने इतरांचा द्वेष करू लागतात किंवा स्वतःच नामशेष होण्याचा विचार करू लागतात. समाजोपयोगी व आवडीने काम करणारे काही जण तुटपुंज्या पैशावर जगतात व इतर त्यांच्या जिवावर मौजमजा करत असतात.

या प्रकारे अनावश्यक कामाच्या रगाड्यात स्वतःला जुंपवून घेण्यात काय धन्यता असते हेच कळत नाही. जर अशा प्रकारची बुलशिट् जॉब्स करणारे

जगातून नाहिसे झाल्यास काय होईल? शेतकरी, भाजिपाला विक्रेते, छोटे/मोठे दुकानदार, शिक्षक/शिक्षिका, नर्सेस/डॉक्टर्स, गोदी/माथाडी कामगार, ड्रायव्हर्स, मशीन ऑपरेटर्स, इ.इ. माणसं नष्ट झाल्यास जगाचे व्यवहार ठप्प होतील, याचा आपण अंदाज करू शकतो. शेती व्यवसाय, शिक्षण, सार्वजनिक वाहतूक व्यवस्था, आरोग्य व्यवस्था, संवाद यंत्रणा, यासारख्या जीवनावश्यक यंत्रणा कोसळल्यास मध्ययुगातील जीवनासारखे आपल्याला जगावे लागेल. कार्पोरेट्स वा कंपन्या मानवी सोई-सुविधांना पूरक उत्पादन करत असल्यास त्यांचे स्वागतच होईल. परंतु एखाद्या कंपनीतील काही अनावश्यक पदं रद्द केल्यास आभाळ कोसळून पडणार नाही. कंपनीतील अतिरिक्त मिडल् मॅनेजर्स, अर्थविषयक/गुंतवणुकीचे सल्लागार, वकीलांची फौज, लॉबिंग करणारे दलाल, हे घ्या, ते घ्या म्हणून फोनवरून त्रास देणारे टेलीमार्केर्स, इ.इ. नसल्यास जगाच्या दैनंदिन व्यवहारांना काही धक्का बसणार नाही. गंमत म्हणजे अशाच लोकांचे हे जग हे या भ्रमात आपण जगत आहोत.

कदाचित हाच भांडवलशाहीचा गाभा असावा. म्हणूनच भांडवलशाही भरभराटीला येत आहे. आताच्या कामाचे स्वरूप अर्थसत्ता एकवटण्यास पोषक ठरत आहे. विचार करू शकणाऱ्यांना फालतू कामात गुंतवून विचारशक्तीचे खच्चीकरण केले जात आहे. कारण माणसं विचार करू लागल्यास सत्तेला सुरुंग पडण्याची शक्यता जास्त. त्यामुळे कुठल्यातरी बुलशिट् जॉब्समध्ये त्यांना गुंतवून प्रचंड नफा कमवण्याचा उद्देश यात असावा.

शेतकऱ्यांचा मोर्चा शहरात आला की वा किंवा कामगारांनी बंद पुकारल्यास शहरातील मुद्रित व इलेक्ट्रॉनिक माध्यमं एकजुटीने शहराचे व्यवहार ठप्प झाले म्हणून आरडाओरडा करत मोर्चा/संपाच्या विरोधात मुद्रित माध्यमात रकानेच्या रकाने भरतात; टीव्हीवर तासन् तास रटाळ चर्चेचे गुऱ्हाळ

चालवत गरळ ओकतात. परंतु हेच शेतकरी शेतात काम करण्याचे सोडून दिल्यास काय स्थिती होईल याचा कधीतरी विचार केला जातो का? वाहतूक व्यवस्थेतील कामगार काम करण्यास नकार दिल्यास काय स्थिती होईल याची कल्पना करता येईल का? शिक्षकाने शिकवणे सोडून दिल्यास आपल्या पाल्यांचे काय होईल याचा विचार कधी केला आहे का? कार्पोरेट व्यवस्थेतील मिडल् मॅनेजर्स निर्मिती करत नाहीत, हे लक्षात आल्यास बुलशिट् जॉब्सची संख्या कमी होत जाईल असे वाटते. आपला रोजगार निर्मितीक्षम असावा व त्यात समाधान मिळणारा असावा. कागदी घोडे नाचवणारा वा सायबर कूली टाइप नसावा एवढीच माफक इच्छा. आताची रोजगार यंत्रणा सर्वांचेच हित जपणारी नाही एवढे समजले तरी यात सुधारणा होऊ शकेल अशी आशा धरता येईल. आपल्याला आवडो न आवडो, बऱ्या वाईट तंत्रज्ञानाची भर पडतच राहणार. कुठले तंत्रज्ञान स्वीकारावे व कुठल्या तंत्रज्ञानाला नकार द्यावा हे बाजार ठरवत असल्यामुळे आपल्याला फक्त आपल्यापुरतेच बघण्याची मुभा राहणार आहे. कृत्रिम बुद्धिमत्ता व यंत्रमानव इत्यादीशी संबंधित असणाऱ्या तंत्रज्ञानातील घोडदौडीचा अंदाज घेतल्यास पुढील काळात शेती, बांधकाम, मायनिंगसारख्या अतीश्रमाची कामे यंत्रमानवावर सोपवले जातील व कमीत कमी मानवी सहभाग यात असू शकेल.

**युटोपियन स्थिती?**

प्रगत तंत्रज्ञान मुबलक प्रमाणात मानवी हस्तक्षेपाविना आहारधान्य पिकवेल व जगातील प्रत्येक माणूस रोज पोटभरून जेवू शकेल. त्यामुळे कदाचित पर्ल बकच्या गॉड्स मेन या कादंबरीत वर्णन केल्याप्रमाणे ज्याप्रकारे हवा, पाण्यासाठी माणसांना कुठलेही कष्ट करावे लागणार नाही. आहार पदार्थासाठीसुद्धा पुढील काळात मानवी समाजाला श्रम करण्याची गरज भासणार नाही. 16व्या शतकातील थॉमस मूर याच्या युटोपिया कादंबरीत

अशाच एका आदर्श समाजाचे वर्णन असून त्यात समाजातील प्रत्येक माणसाला त्याच्या मूलभूत गरजा भागवण्यासाठी कुठल्याही प्रकारचे काम करून न घेता काही ठराविक रक्कम सरकार देत होते.

या सरकारकडे एवढा पैसा आला कुठून किंवा ते सरकार कुठली संसाधनं विकून पैसे उभी करत होती किंवा ही संसाधने कोण विकत घेत होते किंवा समाजाच्या या नंदनवनसदृश स्थितीसाठी इतर किती समाजांचे शोषण होत असेल हे प्रश्न बाजूला ठेवून विचार केल्यास अशा प्रकारच्या युटोपियन स्थितीबद्दल काही भविष्यवेत्ते विचार करत आहेत. त्यांच्या मते यापुढील बिजिनेस् मॉडेलमध्ये समाजाचे संतुलन संभाळण्यासांठी पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येकाला वैश्विक आधारमूल्याची (Universal Basic Income) सोय करावी लागेल. तंत्रज्ञानामुळे अटळ ठरलेल्या बेरोजगारीवरील उपाय म्हणून याचा स्वीकार करावा लागेल. वैश्विक आधारमूल्य दिल्यास स्वयंचलित (आटोमेशन) तंत्रज्ञानामुळे होणाऱ्या बेरोजगारीवर मात करता येईल. आताच कमी रोजंदारीवर काम करणाऱ्यापैकी 83 टक्के आटोमेशन तंत्रज्ञानामुळे बेकारी अनुभवत आहेत. कुशल कामे करणाऱ्यांच्यात 31 टक्के बेकार आहेत. त्यामुळे वैश्विक आधारमूल्याला पर्याय नाही, असे तज्ञांचे मत आहे. काहीही काम न करता बेकार भत्ता दिल्यासारखे  वैश्विक आधारमूल्य दिल्यामुळे अराजकता माजेल, लोक व्यसनावर पैसे उधळतील, इत्यादी आक्षेप घेतले जातील. परंतु तसे काही होणार नाही असा विश्वास तज्ञ व्यक्त करत आहेत. किमानपक्षी आताच्या दृश्यस्वरूपातील उपासमार व विषमता तरी काही प्रमाणात नष्ट होईल, असे त्याना वाटते.

अत्याधुनिक तंत्रज्ञानातसुद्धा कुशलतेला भरपूर वाव आहे. प्रभावी अल्गॉरिदम लिहिणे, विशिष्ट तंत्रज्ञानातील बारकावे समजून घेऊन त्यावर भाष्य करणे, प्रचंड स्वरूपात संग्रहित केलेल्या डेटाचे विश्लेषण करून योग्य निष्कर्ष काढून उत्पादकता वाढवणे इ.इ. खरोखरच समाधान देणारी कामं आहेत. कदाचित बुलशिट् जॉब्सचा

ज्यांना तिटकारा आला आहे त्यांनी आव्हान म्हणून स्वीकारून अशी कौशल्ययुक्त काम करत असल्यास बाजार व्यवस्थेतील समाजसुद्धा याचे स्वागत करेल.



# गणितीय बुद्धीमत्ता व चारित्र्य गुणांक (MICQ)

## गप्पा गणितज्ञाशी

### डॉ. भास्कर आचार्याबरोबरच्या गप्पा... गणिताच्या!

कदाचित उपशीर्षक वाचून आश्चर्य वाटले असेल. कोण हा डॉ. भास्कर आचार्य? त्याच्या गप्पातून काय मिळणार? याचा आपल्याशी काय संबंध? मुळात हा कुठल्या विद्यापीठाचा? स्टॅनफोर्ड, ऑक्सफर्ड, हार्वर्डचा की कुठल्यातरी गावठाणातला? त्याच्या नावावर किती पेटंट्स आहेत? खरोखरच तो स्कॉलर आहे का? गूगलवर – लिंकडेनवर त्याच्याबद्दल काय माहिती दिली आहे? ... असे अनेक प्रश्न आपल्याला सुचतील. जरा दमानं घ्या. सगळ सांगतो.

गणिताची थोडी फार माहित असलेल्यांना डॉ. भास्कर आचार्य या नावाशी साधर्म्य असलेले भास्कराचार्य काही नवीन नाहीत. बाराव्या शतकातील भारतीय गणितज्ञ. स्वत:च्या अविवाहीत मुलीचे मन रिझविण्यासाठी लीलावती या ग्रंथाचे ग्रंथकर्ते. गणितातील कूटप्रश्नाबद्दल लिहिणारे. हेच भास्कराचार्य आता डॉ. भास्कर आचार्य म्हणून वावरत आहेत.

हे कसे शक्य आहे? 21 व्या शतकात त्यांचे येथे काय काम?

काही वैद्यकीय चमत्कारामुळे 12 व्या शतकातील भास्कराचार्य पृथ्वीवरील मृत्युनंतर माणूससदृश वस्ती असलेल्या अंतराळातील गुरुग्रहाच्या टायटन या उपग्रहावर सदेह पोचले. (सदेह वैकुंठगमन आपल्याला नवीन नाही!) टायटनवर पोचल्यानंतर तेथेही त्यानी आपले चांगले बस्तान बसविले व काही चमत्कारिक आयुर्वेद औषधांच्या सेवनामुळे त्यांना चिरआरोग्य व अमरत्व प्राप्त झाले. पाला पाचोळा व जडीबुटीपासून बनविलेल्या काही टॉनिकच्या सेवनामुळे त्यांची बुद्धी तीक्ष्ण राहिली. गंमत म्हणजे टायटन

उपग्रहातील ‘माणसं’ पृथ्वीवासीयांच्या तुलनेने फारच बुद्धीमान होते. उदाहरणच द्यायचे असल्यास तेथील अती सामान्य ‘माणसा’चे बुद्ध्यांकसुद्धा 200 च्या पेक्षा जास्त आहे.

आपल्याला जसे परग्रहातील बुद्धीमान प्राण्याविषयी कुतूहल आहे तसेच तेथील माणसांनासुद्धा अंतराळातील इतर सजीवाबद्दल उत्सुकता होती. त्यांच्या प्रगत संस्कृतीने विज्ञान – तंत्रज्ञानातील अत्याधुनिक संशोधनातून पृथ्वीवर सजीवसृष्टी आहे हे केव्हाच ओळखले होते. पृथ्वीवर अनेक वेळा ते येऊनही गेले आहेत. एका विशिष्ट टेलिपोर्टेशन तंत्रामुळे हे त्यांना सहज शक्य झाले. टेलिपोर्टेशन तंत्रातील काही विशेष गुणधर्मामुळे पृथ्वीवर आल्यानंतर ते परग्रहातील रहिवाशी असावेत याचा किंचितही कुणालाही संशय न येण्याइतपत ते बेमालूमपणे आपल्यात मिसळून गेले व येथे असताना पृथ्वीवरील जीवनपद्धती त्यांनी आत्मसात केली. परंतु या पृथ्वीवर फार दिवस राहण्याचा त्यांना कंटाळा येत होता. परत आपल्या ग्रहावर पोचण्याची घाई करत होते. कारण त्यांच्या दृष्टीने पृथ्वीवरील माणसं अकलेने फार कमी होते. डॉ. भास्कर आचार्य मात्र याला अपवाद ठरले. काही कागदपत्रांची पूर्तता करून ते पृथ्वीवर प्राध्यापक म्हणून वावरत होते. त्यांचा पृथ्वीवरील वेळ मजेत जात होता. नवीन गोष्टी समजून घेण्यात त्यांना रुची होती. त्यामुळे ते विद्यापीठांच्या सेमिनार्समध्ये न चुकता हजर राहत होते.

अशाच एका गणित विषयाशी संबंधित परिषदेत त्यांची भेट झाली. परिचय वाढला. त्यांचा पूर्व इतिहास समजला. परिचयाचे मैत्रीत रूपांतर झाले. अनेक वेळा ते भेटतही गेले. गप्पा रंगू लागल्या. मनमोकळेपणाने ते बोलू लागले. माझ्यासारख्या निरुपद्रवी माणसापासून धोका नाही याची खात्री झाल्यानंतर ते आपणहून त्यांच्या जगाच्या गोष्टी सांगू लागले. आपल्या या जगाच्या गुणदोषावर बोट ठेऊ लागले. त्यांच्या टीकेत थोडासाही किल्मिष नव्हता हे

विशेष. त्या गप्पा कशा प्रकारच्या होत्या, त्यातील डॉक्टरांची मार्मिक टिप्पणी कशी होती याबद्दलची ही एक लेखमालिका आहे. कदाचित कंटाळवाणा वाटेल. परंतु एका एलियनच्या नजरेतून आपण काय आहोत हे समजून घेणे मनोरंजक ठरेल.

त्या दिवशीच्या गप्पांच्या ओघात डॉक्टरांना पृथ्वीवरील बुद्धीमत्ता मोजण्याची तऱ्हा पसंत नाही हे कळले. त्यांच्या मते बुद्ध्यांक हे बुद्धीमत्तेचे मापक होऊ शकत नाही. कारण त्यात व्यक्तीच्या चारित्र्याला, त्याच्या सचोटीला स्थान नाही. थोडेसे खोदून विचारल्यानंतर बुद्ध्यांकाऐवजी गणितीय बुद्धीमत्ता व चारित्र्य गुणांक (Mathematical Intelligence and Character Quotient – MICQ) हे प्रमाण मानले जावे अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली. मुळात त्यांच्या जगातील एकूण एक सर्व व्यवहार गणितीय (व सांख्यिकी) पद्धतीने चालतात व त्यांच्यात गणितनिष्ठा उपजत असते. डॉक्टरांच्या मते पृथ्वीवरील माणसांची विभागणी दोन प्रकारात होऊ शकते; एक ब्राइट (BRITE -Benevolent, Resourceful, Intelligent, Talented, Earthling) किंवा अन् ब्राइट (unBRITE). ब्राइट यांचा MICQ जास्त असतो व अन् ब्राइटचा फार कमी असतो. व या दोन्हीमधील मध्यरेषा म्हणून ज्यांचा MICQ, 50च्या जवळपास असेल त्यांच्याशी टायटनचे रहिवाशी संवाद साधू शकतील, असे त्यांना वाटत होते.

*परंतु अन् ब्राइट्सची संख्या कशी काय कमी करता येईल?*

यासाठी प्रथम गणितातील काही मूलभूत नियमांचे काटेकोरपणे पालन करावे लागेल. उदाहरणार्थ, कुठल्याही संख्येला शून्याने भागाकार करू नये, Infinity ही संख्या नाही हे लक्षात ठेवावे, तर्क व विचारांतीच कृती करावी, मेंदूला जड वाटत असेल तरच calculatorचा वापर करावा – ऊठसूट साधे, सुलभ आकडेमोडीसाठी नको, गणित सोडविताना इतर कुठल्याही गोष्टीपेक्षा

रीतीकडे जास्त लक्ष असू द्यावे, इंजिनीयरिंग व संख्याशास्त्रासाठी गणिताचा वापर करताना विशेष काळजी घ्यावी, इ.इ…. जर या गोष्टी लक्षात ठेऊन वागत असल्यास त्याचा MICQ 50च्या जवळपास आहे, असे म्हणावयास हरकत नसावी. त्याचबरोबर विनोदबुद्धी असणे अत्यंत गरजेचे आहे.

तुमच्या दृष्टीने MICQ नेमके किती असू शकते, याची काही उदाहरणं…? या विधानावरून MICQ काढता येईल.

MICQ

0 मानवी संवेदनांचा अभाव (अट्टल गुन्हेगार, मादक पदार्थांचे व्यसनी)

5 स्वार्थ प्रेरित वृत्ती (बेभानपणे वाहन चालविणारे,समाजविरोधी कृती करणारे)

10 टोकाचा हव्यास (सावकारी करणारे,घर सांभाळण्यासाठी शिकारी कुत्रे बाळगणारे)

15 दुराग्रह (विषमतेचे समर्थन करणारे,नालायक, असमर्थ)

20 सामान्यांना मूर्खात काढणे (कार्स, घर – जमीन यांच्याखरेदी – विक्रीचे दलाल, माध्यम/जाहिरात तज्ञ)

25 प्रेरणांचा अभाव (टीव्हीवरील जाहिरातदार,मुरलेले राजकारणी)

30 स्वत:च्या फायद्यासाठी विद्वत्तेचा वापर(राजकीय/सामाजिक नेते, तथाकथित शिक्षणतज्ञ)

35 सत्याचा अपार्थ करणे(फौजदारी वकील, भाषातज्ञ)

40 भव्य – दिव्य स्वप्न पाहणे (तथाकथित इंटेलेक्चुअल्स, संस्कृतीच्या नावे ऊरबडवून घेणारे, कला-संस्कृतीचे गंध नसणारे)

45 अमूर्त संकल्पना समजून घेण्याची कुवत नसणे (कामाच्या ठिकाणी पाट्या टाकणारे, इंजिनीयर्स, संख्यातज्ञ)

50 विनोदबुद्धी नसणे (सैन्याधिकारी, पोलीस अधिकारी,कर संकलन अधिकारी)

गणिताबद्दल अनादर दाखविणाऱ्यांच्या MICQ बद्दल अशा प्रकारे मांडणी करता येईल:

0 आयुष्यात गणिताला काही स्थान नाही व कुठलेही स्थान देता कामा नये

5 गणिताची रीत समजून न घेता व गणितीय नियम नवापरता एकमेकासारख्या दिसणाऱ्या संख्यांना रद्द करता येते.(64/16 = ~~6~~4/1~~6~~ =4)

10 गणिताचे नियम व सिद्धांत व्यक्ती स्वातंत्र्याला मारक ठरतात

15 आकार लहान असो वा मोठा, संख्या महत्वाची

20 गणितीय रीत व नियमामध्ये अग्रक्रमलावण्याची गरज नाही.

25 विचार व तर्क यांना उत्स्फूर्तता व मनमानी एके दिवशी मागे टाकतील.

30 एखादी गोष्ट अत्युत्तमपणे कार्य करत असलेतरी त्यात सुधारणा करण्यास वाव आहे

35 माणसापेक्षा यंत्र फारच चांगले

40 सामाजिक प्रगतीत गणिताचा नगण्य सहभाग आहे

45 गणिताची रीत वेळखाऊ व कष्टदायक असते

50 संख्यांचा अभ्यास म्हणजेच गणिताचा अभ्यास

*जर यातील 2 -3 गोष्टींचा उल्लंघन करत असल्यास MICQ त काय फरक पडू शकेल?*

कॉफीचा कप ढवळत “ज्या गोष्टीचा MICQ सर्वात कमी असेल तेवढेच त्याचे MICQ असेल.”

*गणितातील प्रगतीसाठी काय काय करता येणे शक्य आहे?*

सहावीपासूनच तर्कशुद्ध विचार करण्याचे धडे द्यायला हवेत. शिक्षण व्यवस्था विद्यार्थी केंद्रित हवी. सहावीचे विद्यार्थी आपले लक्ष्य असावेत. तर्कशुद्ध विचार व त्यावरून निर्णय हे नेहमीच भोवतीच्या परिस्थितीवर अवलंबून असतात. तर्कशुद्ध विचार हा गणिताचा पाया आहे व ते एकमेकात गुंतलेले आहेत.

*परंतु गणितज्ञही तर्कविहीन निर्णय घेतच असतात की?*

त्यांना अपवाद म्हणून वगळावे लागेल. टायटन ग्रहावरील माणसांच्यात गणितीय ज्ञान उपजतच असते. कदाचित आमच्या येथील जनसामान्यांचा MICQ, 50 पेक्षा जास्त असावा. व बहुतेक जण गणिताच्या नियमांचे पालन करतात.

*जर कुणाचा तरी MICQ, 50 पेक्षा कमी असल्यास.....*

थोडेसे मागे पुढे पाहत व हळू आवाजात " आमच्या येथे अशा लोकांसाठी दोन पर्याय आहेत; पहिल्यात एका ब्रेन वाशिंग मशीनमध्ये जाऊन मेंदूतील बिघडलेल्या पार्टसची दुरुस्ती करून घेऊन बाहेर येणे किंवा आमच्या ग्रहावरील तुरुंगात कायमचे राहणे. या तुरुंगातील कैद्यांना टीव्हीवर दिवसाचे 24 तास व आठवड्यातील साती दिवस पृथ्वीवर खेळलेल्या क्रिकेटचे मॅचेस दाखविले जातात. काही दिवसातच कैदी वैतागून, कंटाळून ब्रेन वाशिंग मशीनमध्ये जाण्याचा हट्ट धरतात.

*MICQ बद्दल बोलताना विनोद बुद्धी हवी असे तुम्ही म्हणालात. मुळात गणितात कुठेही विनोद नाही. ते एक कोरडे शास्त्र आहे. विनोदाची का गरज आहे?*

विनोदबुद्धी तुमचे जीवन उजळून टाकते. गणित विषय शिकविताना याचा वापर केल्यास अमूर्त गोष्टी चटकन लक्षात राहतील व विषय सोपा होईल.

तुमच्या ग्रहावरची माणसं हसू शकतात?

*आमच्यातही विनोदबुद्दी आहे. फक्त आमचे विनोद गणित व विज्ञान यांच्याशी संबंधित असल्यामुळे तुमच्या लोकांना त्या सपक वाटतील.*

एखादं उदाहरण....

*एक भौतशास्त्रज्ञ व गणितज्ञ कॉफी शॉपमध्ये कॉफी पीत बसले होते. तितक्यात कॉफी मशीनला आग लागली. धूर व ज्वाळा बाहेर येऊ लागल्या. भौतशास्त्रज्ञ उठला, कोपऱ्यातली रिकामी बादली उचलली, नळाखाली ठेऊन पाण्याने भरली, मशीन डिस्कनेक्ट करून बकेटमधील पाणी मशीनवर ओतून आग विझवली.*

*काही आठवड्यानंतर पुन्हा हे दोघे त्याच शॉपमध्ये बसले होते. पुन्हा मशीनला आग लागली. यावेळी गणितज्ञ उठला व रिकामी बकेट भौतशास्त्रज्ञाच्या हातात देत "मागील case वरून problem काय आहे व त्याचे उत्तर काय असेल याची मला पूर्ण कल्पना आहे. व त्यासाठी मी ही रीत सोपी करून देत आहे.... " भौतशास्त्रज्ञ कपाळावर हात मारून घेत नळापाशी गेला....*

*खरच. विनोदाची पातळी फारच उंचीची वाटते.*

मी पृथ्वीवरील अशाच प्रकारच्या विनोदांच्या चुटकुल्यांच्या शोधात आहे. याकामी तुम्ही मला मदत कराल का?

*हो. अवश्य. त्या मोबदल्यात मलाही काही हवं आहे.*

काय हवे?

*आमच्या पृथ्वीवरील विद्यार्थ्यांना शिकण्यासाठी काही कूटप्रश्न, कोडी द्यावीत.*

"Done. मला या गप्पा आवडल्या. पुन्हा भेटू". असे म्हणत ते बाहेर पडले.



# शिक्षणव्यवस्था

## गप्पा गणितज्ञाशी

**डॉ. भास्कर आचार्याबरोबरच्या गप्पा… गणिताच्या!**

डॉ. भास्कर आचार्य कॉफी शॉपच्या कोपऱ्यातील एका टेबलापाशी बसले होते. मला बघितल्यावर बसण्याचा इशारा करून माझ्याकडे त्यानी हळूच एक चिठ्ठी सरकवली.

*हे काय?*

तुमच्या विद्यार्थ्यांसाठी. तुमच्या विनोदी चुटकुल्यांच्या मोबदल्यात…..

मी चिठ्ठी वाचली. चिठ्ठीत दोन प्रश्न होते:

प्रश्न 1: एका पिशवीत 3 निळया रंगाच्या, 5 काळया रंगाच्या व 1 पांढऱ्या रंगाच्या अशा पायमोज्यांच्या जोड्या कोंबल्या आहेत. पिशवीच्या आत डोकावून न पाहता किमान किती पायमोज्या बाहेर काढल्यास एकाच रंगाची एक तरी जोडी मिळू शकेल?

प्रश्न 2 : अ, ब व क यांनी एका ओल्या पार्टीचा बेत आखला. प्रत्येकाने जमेल तेवढे बीअरच्या बाटल्या विकत आणायचे व बाटल्या फस्त झाल्यानंतर हिशोब करण्याचे ठरले. अ नी 5 बाटल्या व ब नी 3 बाटल्या आणल्या. परंतु क ला दुकानापाशी पोचण्यास उशीर झाल्यामुळे तो काहीही आणू शकला नाही. पार्टीची नशा ओसरल्यानंतर क कडून 240 रूपये वसूल करून अ व ब नी पैशाची वाटणी करून घेतली. बाटलीची किंमत समान असल्यास वाटणी कशाप्रकारे झाली असेल?

*एकदम सोपे गणित आहेत. विद्यार्थी सहज सोडवतील.*

तुमच्या येथील शिक्षण पद्धतीवर तुमचा भलताच विश्वास दिसतो.

*त्यात काय चुकीचे आहे?*

मला नाही वाटत की तुमच्या शिक्षण पद्धतीमुळे मुलं सज्ञानी होतील व तुमचा उद्देश सफल होईल.

*थोडेसे स्पष्ट कराल का?*

माझ्या प्रश्नाला थेट उत्तर न देता या विषयाशी संबंधित 5 सप्टेंबरच्या शिक्षक दिन या दिवशी रेकॉर्ड केलेल्या एका शिक्षकाची लाइव्ह मुलाखतच त्यानी लॅपटॉप उघडून दाखवायला सुरुवात केली.

तुम्हाला शिक्षक व्हावे असे का वाटले?

लहान वयातील मुलांना सज्ञानी बनवावे, त्यांच्यातील उत्सुकतेला उत्तेजन द्यावे, हे माझे बालपणापासूनचे स्वप्न होते. अगदी लहान वयापासूनच त्यांची बुद्धीमत्ता वाढवण्यासाठी, त्यांना चारित्र्यवान बनविण्यासाठी प्रयत्न करणे गरजेचे आहे. व त्यासाठी शिक्षकी पेशाला दुसरा पर्याय नाही.

या शिक्षकी व्यवसायात आपण समाधानी आहात का?

जितके व्हायला हवे होते तितके समाधान मिळाले नाही. आपली सार्वजनिक शिक्षण व्यवस्था – व्यवस्था की अव्यवस्था, काहीही म्हणा – रशियातील कम्युनिस्ट राजवटीसारखी आहे असे मला वाटते. नोकरशाहीचा विळखा. वरून येणाऱ्या आदेशांचे तंतोतंत पालन करण्याची सक्ती. त्यात काही बदल वा सुधारणा करण्यास वाव नाही. नाविन्यतेला वाव नाही. या वयातच गुणवत्ता, कार्यक्षमता, क्रियाशीलता इत्यादींचे महत्व पटवून दिल्यास उद्याचे नागरिक म्हणून ते देशाची धुरा संभाळू शकतील. परंतु येथेच भोंगळ व्यवस्था असल्यामुळे पालक व इतरांकडून आम्हा शिक्षकांना नको नको त्या गोष्टी ऐकून घ्यावे लागतात. एक पालक म्हणूनही मी समाधानी नाही. सार्वजनिक शिक्षण व्यवस्थेतून बाहेर पडत असलेली पिढी खाजगी व्यवस्थेतील पिढीपेक्षा फारच गुणवत्ताविहीन व निकृष्ट दर्जाची आहे. जॉब मार्केटमध्ये ती तग धरू शकणार नाही.

तरीसुद्धा शिक्षक कसे काय टिकून राहतात?

सकारात्मक दृष्टी असलेले अनुभवी शिक्षक वाईटातूनच काही तरी चांगले शोधण्याच्या प्रयत्नात असतात. व व्यवस्थेला शरण जात आपला कार्यभाग संभाळून घेतात. अनुभव नसलेले गटांगळ्या खात काही तंत्र वापरून (काही वेळा चमचेगिरी करून) अस्तित्व टिकवून ठेवतात.

नवीन शैक्षणिक धोरणाविषयीचे आपले मत…

नववीपर्यंत परीक्षा नको म्हणून विद्यार्थ्यांना पुढच्या वर्गात ढकलताना नववीच्या परीक्षेत नापासांची संख्या वाढणार हे लक्षात घेतले जात नाही. काही तरी उलट सुलट धोरणं परस्पर ठरवून तथाकथित शिक्षण तज्ञ निवृत्त होऊन स्वत:च्याच धोरणावर शेरेबाजी करत टीव्हीवर मुलाखत देतात. परंतु यांच्या या धरसोड वृत्तीमुळे, चुकीच्या धोरणामुळे व अर्धवट अंमलबजावणीमुळे पिढ्या बरबाद होत आहेत हेच कुणाच्याही लक्षात येत नाही.

तुम्ही शिक्षकीपेशा सोडण्याच्या विचारात आहात का?

अजून तरी नाही. परंतु कुठलेही उत्तेजन नसलेली, गुणवत्तेची कदर नसलेली ही किडलेली व्यवस्था कधीतरी मला पर्यायी विचार करण्यास भाग पाडणार हे मात्र नक्की. मीसुद्धा खाजगी शाळेत जायचा विचार करेन. कदाचित तेथील व्यवस्था एवढी वाईट नसेल.

वाईट शिक्षकांना नोकरीवरून कमी करणे शक्य आहे का?

‘वाईट’ची व्याख्या कसे करणार यावर ते सर्वस्वी अवलंबून आहे. विद्यार्थ्याला ‘शिक्षा’ देताना तो अपंग झाला वा काही तरी विपरीत घडल्यास त्या शिक्षकाला नोकरीवरून काढून टाकण्याची शिफारस करता येईल. काही काळ पूर्ण पगारावर त्याचे निलंबन होईल. विचारणा चवकशी, इत्यादी सोपस्कार पूर्ण होईपर्यंत बराच काळ निघून जाईल. त्यामुळे इतर शिक्षक यातून काही

‘धडा’ शिकून सुधारतील याची शाश्वती नाही. वाईट शिक्षक म्हणजे शिक्षकी पेशासाठी नालायक, शिकविण्याची क्षमता नसलेला वा विद्यार्थ्यांना परिक्षार्थी बनविणारा असे वाटत असल्यास त्याला कधीच नोकरीवरून काढले जाणार नाही.

शिक्षणव्यवस्थेत पैसा जास्त ओतल्यास सुधारणा होईल का?

हा एक चुकीचा समज आहे. शिक्षणातील भोंगळ कारभाराला, शिक्षकांचा अपुरा पगार वा वाईट शिक्षक जबाबदार नसून चुकीच्या गोष्टीवर भर देणाऱ्या व त्या हट्टापायी विद्यार्थ्यांचे नुकसान करणाऱ्या चांगले तज्ञच जबाबदार आहेत, हे माझे स्पष्ट मत आहे.

उदाहरणार्थ…..

शाळेत आलेला प्रत्येक विद्यार्थी डॉक्टर वा इंजिनीयर होत नसतो म्हणून विद्यार्थ्यांना किमान लिहिता वाचता आले तरी पुरेसे आहे या (कु)तर्कामुळे संपूर्ण व्यवस्था फक्त लिहिता वाचता येण्यासाठीच राबवली जात आहे. पाठ्यक्रमात, पाठ्यपुस्तकात किमान गोष्टीवरच भर दिला जात आहे. जास्तीत जास्त विषयावर कमीत कमी शिकविण्याकडे लक्ष केंद्रित केले जात आहे. त्यामुळे शेवटी शाळेतून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्याला काहीही ज्ञान नसते. शालेय शिक्षणानंतर प्रत्येकाला प्रमाणपत्र दिले पाहिजे या हट्टापाय़ी कुठल्याही परिस्थितीत विद्यार्थ्याला नापास करायचे नाही असा अर्थ घेतला जात आहे. चुकीचे उत्तर बरोबर कसे यासाठी कसरत करणाऱ्या परीक्षकांची संख्या वाढत आहे. त्यामुळे शिक्षणाचे सुमारीकरण होत आहे.

एवढे होऊनसुद्धा आपला देश वैज्ञानिक, तंत्रज्ञ, यांचा देश म्हणून डांगोरा का पिटला जातो?

त्यासाठी येथे 80: 20 चा नियम लागू होतो. कुठलिही संस्था (कसेबसे) चालण्यासाठी तेथील फक्त 10 -20 टक्के लोक जबाबदार असतात. इतर 80

टक्के लोक निकृष्ट दर्जाचे असले तरी काही बिघडत नाही. त्यामुळे उपजतच हुशार असलेले मोक्याच्या ठिकाणी असल्यास व्यवस्था चालू शकते. व्यवस्था अजूनही पूर्णपणे कोसळली नाही म्हणून हा देश महान म्हटला जात असावा. थोडेसे आत डोकावून पाहिल्यास वरच्या थराखाली सगळाच गाळ भरलेला दिसेल.

हे सर्व सुधारण्यासाठी काय करायला हवे?

शिक्षणाला भ्रष्ट राजकारण्यांपासून मुक्त करायला हवे. सब घोडे बारा टके ही मानसिकता जायला हवी. जे हुशार आहेत त्यांना उत्तेजन द्यायला हवे. ज्यांना जमत नाही त्यांना त्यांच्या योग्यतेचे शिक्षण मिळायला हवे. त्यांच्यासाठी काही पर्याय हवा. या देशाला वैज्ञानिक, डॉक्टर्स, तंत्रज्ञ, कलावंत यांच्या बरोबरच प्लंबर्स, टेलर्स, इलेक्ट्रिशियन्स, गवंडी, मेकॅनिक्स इत्यादींचीसुद्धा गरज आहे. त्यामुळे औद्योगिक प्रशिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्था मोठ्या प्रमाणात हव्यात. व त्यातून बाहेर पडणाऱ्यांना सन्मानाने वागवायला हवे. काहीच येत नाही म्हणून अशा धंद्यात पडणाऱ्याच्या संख्येत वाढ झाल्यामुळे निकृष्ट प्रतीचे काम होत आहे. मुळात खासगीकरणाचा ठेका बंद करून काही भरीव करण्यासाठी शासनाने पुढाकार घ्यायला हवे. तथाकथित शिक्षणतज्ज्ञांना बाहेर हाकलून द्यावे....

डॉक्टरांनी लॅपटॉप बंद केला.

*फारच कठिण उपाय...*

जाऊ द्या हो. यात काहीही बदल होणार नाही, हेही तितकेच खरे.

नवीन विनोदी चुटके?

...

1. एका नवीन सिद्धांताचा प्रस्ताव आहे.

प्रस्ताव: ज्याला कमीत कमी ज्ञान आहे त्याला जास्तीत जास्त पैसा मिळतो.

प्रूफ :

ज्ञान म्हणजे शक्ती (Knowledge is power; knowledge = power) व वेळ म्हणजे पैसा (Time is money; time = money)

सामान्यपणे वापरात असलेली ही गृहितकं आहेत.

भौतिकीतील नियमाप्रमाणे शक्ती = काम/ वेळ ( power = work/time)

ज्ञान = शक्ती= काम/ वेळ = काम/ पैसा

(knowledge = power = work/time = work/money)

पैसा = काम/ ज्ञान (money = work/Knowledge)

यावरून ज्याच्याकडे ज्ञान कमी त्याप्रमाणात त्याच्याकडे पैसा जास्त असे सिद्ध करता येते.

प्रत्यक्ष व्यवहारातसुद्धा मोठ्या पदावरील जागांची भरती कमी ज्ञान असलेल्यांच्याकडे का होत असते हे कळू शकेल.

2. 180पेक्षा जास्त बुद्ध्यांक असलेल्या एका विद्वानाचा पृथ्वीतलावर मृत्यु होतो. नेहमीप्रमाणे पाप – पुण्याचा हिशोब ठेवणाऱ्या चित्रगुप्तासमोर त्याच्या आत्म्याला उभे केले जाते.

“नवीन फर्मानाप्रमाणे आम्ही, तुझी हरकत नसल्यास, तुला तुझ्यापेक्षा कमी बुद्ध्यांक असलेल्या आत्म्याबरोबर काही दिवसासाठी ठेवणार आहोत. कारण आम्ही फक्त शहाण्यानाच वाव देतो असा वृथा आरोप आमच्यावर केला जात आहे.

यातील एकाचा बुद्ध्यांक 150 आहे.”

“बरे झाले. मी त्याच्याशी गणिताविषयी बोलू शकतो.”

“हा दुसरा. याचा IQ 100 आहे.”

“बरं. भौतशास्त्राची उजळणी होऊ शकेल.”

“हा तिसरा. याचा IQ फक्त 50 आहे.”
“ग्रेट. मला नेहमीच शिक्षणतज्ज्ञांशी गप्पा मारावेसे वाटत होते. ही तज्ञ मंडळी शिक्षणाची इतकी कशी काय वाट लावू शकतात, हे एक माझे न सुटलेले कोडे आहे.”
(माझ्या मते शिक्षणतज्ज्ञांचा IQ एवढा कमी नसावा. कारण ते भलतेच हुशार असून करून सवरून आपण त्यातले नाहीत म्हणून सटकून जाण्याचे, व शिक्षकांवर ढकलून देण्याचे कौशल्य त्यांच्याकडे आहे. व त्यासाठी 50 पेक्षा जास्त IQ असावा लागतो.)
डॉक्टर धन्यवाद देत व पुन्हा भेटू असे पुटपुटत चालू लागले.

**प्रश्न 1 चे उत्तर:**

एक जोडी पायमोजे म्हणजे किमान 2 पायमोजे तरी बाहेर काढावे लागतील. कॉलेजच्या क्लासपुढे हा प्रश्न ठेवल्यानंतर फारच कमी विद्यार्थी या प्रश्नाचे उत्तर देऊ शकले. काही जणांनी निळया रंगाच्या पायमोज्याच्या जोडीसाठी 11 वेळा, पांढऱ्यासाठी 10 वेळा व काळया रंगासाठी 9 वेळा पायमोजे बाहेर काढायला हवेत असे उत्तर दिले. काहींच्या मते हेच आकडे अनुक्रमे 20, 18 व 16 असे होते. एका दोघानी मात्र 4 पायमोजे काढल्यास एकाच रंगाची एक जोडी निघू शकेल असे बरोबर उत्तर दिले.
इतरांनी प्रश्न समजून न घेता उत्तर देण्याची घाई केली होती. प्रश्न विचारताना विशिष्ट रंगाचे सॉक्स हवेत असे कुठेही म्हटलेले नव्हते. त्यामुळे उत्तर द्यायच्या अगोदर प्रश्न नीटपणे समजून घेणे गरजेचे आहे.

**प्रश्न 2 चे उत्तर:**

अंकगणितीय पद्धती:
क ने 240 रुपये दिले याचा अर्थ एकूण 240 x 3 = 720 रुपये खर्च आला असेल. ही किंमत 8 बाटल्यांसाठी असल्यामुळे प्रत्येक बाटलीची किंमत

720/8= 90 रुपये असेल. त्यामुळे अ ला 90×5 – 240 = 450-240 = 210 रुपये व ब ला 90×3 – 240 = 270-240 = 30 रुपये
अशी वाटणी झाली असावी.

बीजगणितीय पद्धती:

X रुपये बाटलीची किंमत असून अ ला Y1रुपये व ब ला Y2 रुपये मिळाले असे गृहित धरता येईल. अ ने 5Xरुपये खर्च करून Y1 रुपये परत मिळविले व ब ने 3x रुपये खर्च करून Y2 रुपये परत मिळविले. यावरून समीकरणांची मांडणी अशी करता येईल

Y1+ Y2 = 240,

5X – Y1 = 3 X – Y2 = 240

या समीकरणावरून

5X – Y1 = 240

3 X – Y2 = 240

या दोन्हींची बेरीज

8X – (Y1 + Y2) = 240 +240 = 480 परंतु

(Y1 + Y2)= 240

त्यामुळे

8X – 240 = 480

8X = 720

X = 90, (बाटलीची किंमत)

Y1 = 210 (अ ची बाकी) व

Y2 = 30 (ब ची बाकी)

असे उत्तर असेल.



# गणिताविषयी अज्ञान

## डॉ. भास्कर आचार्यांबरोबरच्या गप्पा... गणिताच्या!

आयुकाच्या कँटीनमध्ये कॉफी पीत असताना डॉ भास्कर आचार्यांनी मला पाहिले. समोरच्या खुर्चीवर बसल्यानंतर माझ्या हातात त्यांनी एक चिठ्ठी सरकवली. नेहमीप्रमाणे त्यात दोन कूटप्रश्न होते.

प्रश्न 1:

500 किमी लांबीच्या रेल्वे मार्गावरील एका टोकाला एक इंजिन 'क्ष' आणि दुसऱ्या टोकाला अजून एक इंजिन 'य' उभे आहेत. क्ष इंजिन ताशी 150 किमी वेगाने व य इंजिन ताशी 100 किमी वेगाने धावू शकतात. क्ष इंजिनसमोर एक माशी बसलेली असून ती ताशी 200 किमी वेगाने उडू शकते. signal दिल्याक्षणी दोन्ही इंजिन्स समोरासमोर धावू लागतात व माशीसुद्धा सरळरेषेत य इंजिनच्या दिशेने उडू लागते. य इंजिनापर्यंत पोचल्यानंतर माशी पुन्हा क्ष इंजिनच्या दिशेने उडते. क्ष पर्यंत पोचल्यानंतर पुन्हा य इंजिनकडे.... शेवटी दोन्ही इंजिन्सची समोरासमोर टक्कर झाल्यावर माशी मरून पडते. मरण्यापूर्वी माशीने किती अंतर कापले असेल?

प्रश्न 2:

अदिती व अशोक आपल्या भावंडाबरोबर एकाच कुटुंबात राहतात. अशोकला जितके भाऊ आहेत तितक्याच बहिणी आहेत. आणि अदितीला बहिणींच्या दुप्पट भाऊ आहेत. त्या कुटुंबात एकंदर भाऊ व बहिणी किती आहेत?

*गंमतीशीर कोडी आहेत.* चिठ्ठी मी खिशात सरकवली.

डॉ. भास्कर आचार्य एक – दोन मिनिटं स्तब्ध बसून नंतर बोलू लागले. मला एक कळत नाही की तुम्हा लोकांना गणितातलं काही कळत नाही असे सांगण्यात अभिमान का वाटतो? आपल्या अज्ञानाचे एवढे उघड प्रदर्शन

कशासाठी? मला आकडेमोड जमत नाही, मला त्यातलं काही कळत नाही यात काही तरी जिंकल्यासारखे वक्तव्य असते. हे असे का?

*बहुतेक जण गणित विषयाला घाबरत असावेत. गणित मुळात अमूर्त असल्यामुळे त्यापासून दूर राहणे पसंत करत असावेत.*

कित्येक सुशिक्षितसुद्धा गणितांच्या प्राथमिक नियमाविषयी अनभिज्ञ असतात. खरे पाहता त्यांच्या कामात, रोजच्या व्यवहारात, भाषेच्या वापरात, सामान्यपणे विचार करण्यात गणिताला पर्याय नाही. परंतु त्यांचे वर्तन मात्र तर्काला धरून नसते. आता हेच पहा ना, 1999 च्या डिसेंबर 31 तारखेला जगभर उत्सव साजरा केला गेला. त्यादिवशी कुठला उत्सव होता?

*दुसऱ्या सहस्रकाचा शेवटचा दिवस म्हणून ...*

कसला हा मूर्खपणा. पहिल्या सहस्रकातील पहिला वर्ष इ.स. 1 ची सुरुवात 1 जानेवारी 1 रोजी झाली व त्या वर्षाचा अखेर 31 डिसेंबर रोजी. इ.स. 2, 1 जानेवारी 2 ते 31 डिसेंबर 2 पर्यंत. त्याचप्रमाणे 3,4,5.. याच हिशोबाने इ. स. 1999, 1 जानेवारी 1999 ते 31 डिसेंबर 1999 पर्यंत असणार. आणि 2000 साल 1 जानेवारी 2000 ते 31 डिसेंबर 2000 पर्यंत असणार. त्यामुळे दुसरा सहस्रक 31 डिसेंबर 2000 रोजी संपतो, 31 डिसेंबर 1999 रोजी नव्हे. परंतु इलेक्ट्रॉनिक माध्यमांनी धुमाकूळ घातला व लोकांनी चक्क त्याला साथ दिली. लोकांच्या कसे काय ही गोष्ट लक्षात आली नाही व तथाकथित तज्ज्ञ मूग गिळून गप्प का बसले? याच्या विरोधात आवाज का उठविला नाही?

*परंतु चूक उमगल्यानंतर आम्ही 2000 सालाचे स्वागत करत आहोत असे म्हणत होतोच की.*

परंतु हे सर्व उशीरा सुचलेले शहाणपण व लंगडे समर्थन. तीसुद्धा कुणीतरी चूक दाखवली म्हणून. अजून एक गंमत सांगतो. काही वेळा बोलण्याच्या भरात अमुक अमुक स्पर्धेसाठी मी माझे 110 टक्के योगदान देण्यास तयार

आहे असे छातीठोकपणे सांगताना मी ऐकलेले आहे. मला हे कळत नाही की आपल्या विश्वातील कुठलीही वस्तु वा तिचे अस्तित्व (entity) 100 टक्केच असते. हे वरचे 10 टक्के आले कुठून?

*ती एका प्रकारची बोलण्याची पद्धत आहे. त्यांना पूर्ण ताकतीनिशी प्रयत्न करणार आहे हे सांगायचे असते.*

तरीसुद्धा माझ्या मते 100 टक्क्यापेक्षा जास्त असे काही असू शकत नाही. जर तुम्ही त्याच प्रकारच्या गोष्टीशी तुलना करत असल्यास ती गोष्ट वेगळी. उदाहरणार्थ, मागच्या वर्षी पडलेल्या पावसाची या वर्षी पडलेल्या पावसाबरोबर तुलना करत असल्यास 110 टक्के वा 120 टक्के होऊ शकते. परंतु एक स्वतंत्र घटक म्हणून विधान करत असल्यास ती 100 टक्केपेक्षा जास्त असू शकत नाही. शिक्षक टक्केवारी शिकवत असताना या गोष्टी स्पष्ट का करत नाहीत? याच टक्केवारीच्या संबंधातील एका घटनेचा मी साक्षीदार होतो.

दिवाळीचा मोसम होता. एका दुकानात सेल होता. बाहेर लटकवलेल्या पाटीवर मोठ्या अक्षरात फॅक्टरीतर्फे 50 टक्के सूट आणि (फक्त) आजच्या दिवशी दिवाळी निमित्त आमच्या दुकानातर्फे आणखी 50 टक्के सूट. त्वरा करा. असे लिहिले होते. एक ग्राहक दुकानात शिरला व हजार रुपयाची एक वस्तू उचलून बाहेर जावू लागला. काउंटरवर त्याला अडविण्यात आले व 250 रु भरण्यास सांगितले. ग्राहक अवाक झाला. व चिडून मोठ-मोठ्याने भांडू लागला.

तुम्हीच बाहेरच्या पाटीवर येथील वस्तूवर फॅक्टरीतर्फे 50 टक्के व दुकानातर्फे 50 टक्के असे एकूण 100 टक्के सूट देणार आहात. त्यामुळे ही वस्तू आम्हाला फुकट मिळायला हवी. तुम्हाला एवढे साधे गणित येत नाही का?

काउंटरवरचा सेल्समन शांतपणे त्याला समजावून सांगू लागला.फॅक्टरी डिस्कौंट 50 टक्के म्हणजे या वस्तूची किंमत 500 रुपये आणि दुकानाचे 50 टक्के डिस्कौंट म्हणजे या वस्तूची आजची किंमत 250 रुपये. ग्राहक निमूटपणे 250 रुपये भरून निघून गेला.

*म्हणूनच आजकाल असले काहीही लिहिताना * अशी खूण करून जाहिरातीच्या खाली काही अटी लागू अशा डिस्क्लेमरचा उल्लेख करतात. त्यामुळे दुकानदार कोर्टाच्या भानगडीत अडकत नाहीत.*

जाऊ द्या हो. कुठे आहेत तुमचे विनोदी किस्से?

काही वैज्ञानिक, अभियंते व इतर काही तज्ञ एका ठिकाणी जमले होते. या तज्ञांना गणिताचे कितपत ज्ञान आहे याची चाचणी घेण्यासाठी त्यांना फक्त एकच प्रश्न विचारला गेला.

सर्व विषम संख्यांना अविभाज्य संख्या (prime numbers) असे म्हणता येईल का?

या तज्ञ मंडळीनी नोंदविलेल्या उत्तरात नक्कीच विविधता होती.

त्यातील काही मासलेवाईक नमूने –

**रसायन शास्त्रज्ञ** – अविभाज्य संख्या म्हणजे नेमके काय?

**भौतशास्त्रज्ञ** – 3 ही अविभाज्य संख्या, 5 ही अविभाज्य संख्या, 7 सुद्धा अविभाज्य संख्या, 9 सुद्धा.... नसेल परंतु प्रयोगातील चूक म्हणून त्याकडे दुर्लक्ष करता येईल. 11 ही अविभाज्य संख्या, 13 ही अविभाज्य संख्या..... यावरून सर्व विषम संख्या अविभाज्य असू शकतात.

**प्राध्यापक** – 3 प्राइम संख्या, 5 ही प्राइम संख्या, 7 सुद्धा प्राइम संख्या.... आता या नंतरच्या बाकीच्या गोष्टी विद्यार्थ्यांना होमवर्कसाठी देण्यात आलेले आहेत.

**राजकीय विश्लेषक** – काही विषम संख्या आहेत हे मला (आता) कळले.

परंतु ही विषमता समाजातून उखडून टाकली पाहिजे. व ज्या संख्या अविभाज्यतेकडे जात आहेत त्यांचा विकास झाला पाहिजे.

**अभियंता** – 3,5, 7.... हे सर्व अविभाज्य आहेत. त्याचप्रमाणे 11, 13, 15, 17, 19 .... अविभाज्य आहेत. त्यामुळे सर्व विषम संख्या अविभाज्यच असणार.

**संगणक तज्ञ** – 01 प्राइम, 10 प्राइम, 11 प्राइम, 101 प्राइम.....

**जीवशास्त्रज्ञ** – 1 अविभाज्य, 3 अविभाज्य, 5 अविभाज्य... ठीक आपण हे पेपर पब्लिश करून टाकू या.

**मायक्रोसॉफ्ट वैज्ञानिक** – 1 ही अविभाज्य संख्या, 3 हीसुद्धा अविभाज्य संख्या, 5, 7 बद्दल आपण पुढच्या रिलीजच्या वेळी अनौन्स करू या.

**संख्याशास्त्रज्ञ** – आपण काही random संख्या घेऊ या, 23, 31, 67.... यावरून सर्व विषम संख्या अविभाज्य आहेत असे म्हणता येईल.

**कायदातज्ञ** – 3 ही अविभाज्य संख्या, 5 ही अविभाज्य संख्या, 7 सुद्धा अविभाज्य संख्या.... या भक्कम पुराव्यावरून इतर विषम संख्या अविभाज्य आहेत असे म्हणता येईल.

**मानसतज्ञ** – 3 ही अविभाज्य संख्या, 5 ही अविभाज्य संख्या, 7 सुद्धा अविभाज्य संख्या, 9 सुद्धा.... आपण ही संख्या लक्षातच घ्यायचे नाही.....

**व्यवस्थापन तज्ञ** – 3 ही अविभाज्य संख्या, 5 ही अविभाज्य संख्या, 7 सुद्धा अविभाज्य संख्या, 9 सुद्धा.... आपण यासाठी MOU वर सही करावी का?

हे सर्व तथाकथित तज्ञ नेहमीच गणिताला शिव्या का देतात हे या सर्वेक्षणातून नक्कीच कळू शकेल.

मला धन्यवाद देत डॉक्टर निघून गेले.

**प्रश्न 1चे उत्तर** :

रेल्वेच्या रुळावर दोन इंजिन्स समोरासमोर कशा काय धावू शकतात, वा हा

अपघात टाळता आला नसता का किंवा त्या गरीब माशीचा जीव का घेता…. असल्या शंका-कुशंका बाजूला ठेऊन आपल्याला उत्तर शोधायचे आहे.

मुळात, अंतर = वेग x वेळ

माशीने कापलेले अंतर यासाठी माशीच्या उडण्याचा वेग (200 किमी/तास) व वेळ म्हणजे दोन्ही इंजिन्सची टक्कर होण्यासाठी लागलेला वेळ प्रथम शोधावे लागतील.

दोन्ही इंजिन्सचा सापेक्ष वेग 150+ 100 = 250 व अंतर = 500

यावरून अपघात होण्यासाठी लागलेला वेळ 500/250 = 2 तास एवढा असेल.

त्यामुळे माशी अपघातात मरण्यापूर्वी 200×2= 400 किमी अंतर धावली होती. (बीजगणितीय पद्धतीनेसुद्धा याचे उत्तर काढता येईल.)

**प्रश्न 2 चे उत्तर :**

त्या कुटुंबात क्ष भावंडे व य बहिणी आहेत असे गृहित धरल्यास

क्ष – 1 = य आणि

य – 1 = क्ष/ 2

अशी दोन समीकरणं मिळतील.

य = क्ष/ 2 + 1

∴ क्ष – 1 = य = क्ष/ 2 + 1

∴ क्ष – क्ष/ 2 = 2

∴ क्ष/ 2 = 2

∴ क्ष = 4 व य = 3

यावरून त्या कुटुंबात 4 भाऊ व 3 बहिणी आहेत.



# (फसव्या) जाहिरातीच्या जगात

**डॉ. भास्कर आचार्यांबरोबरच्या गप्पा… गणिताच्या!**

हॉटेल वैशालीच्या एका कोपऱ्यात डॉक्टर आचार्य कॉफी पीत बसले होते. मी त्यांच्यासमोर बसल्यानंतर हातातील चिठ्ठी माझ्या हातात दिली. नेहमीप्रमाणे त्यात 2 कूटप्रश्न होते.

**प्रश्न 1**

वडील व मुलाचे आताचे वय अनुक्रमे 43 व 16 आहे. यानंतर किती वर्षांनी वडिलाचे वय मुलाच्या वयापेक्षा दुप्पट होईल?

**प्रश्न 2**

बुद्धीबळाच्या एका मॅराथॉन स्पर्धेसाठी 14539 बुद्धीबळपटूंनी नाव नोंदविले. स्पर्धेच्या नियमानुसार बाद पद्धतीच्या या स्पर्धेत जो हरतो त्याला स्पर्धेतून वगळले जाणार होते. जर खेळ ड्रा झाल्यास नाणे उडवून छाप काट्याद्वारे विजेता ठरवला जाणार होता व त्याला पुढच्या फेरीत खेळण्याची संधी मिळणार होती. किती डावानंतर अंतिम विजेता कोण हे ठरविणे शक्य होईल?

मी चिठ्ठी खिशात ठेवल्यानंतर डॉक्टर विषयाचा प्रस्ताव मांडतात.

टीव्हीवर जाहिरातींचा एवढा भडिमार का असतो याची तुम्हाला काही कल्पना आहे का?

*प्रेक्षकांनी त्यांचा माल विकत घ्यावा म्हणून..*

टीव्हीच्याऐवजी इंटरनेटवर ते का जाहिरात करत नाहीत? कारण बहुतेक प्रगत देशात इंटरनेटचा वापर मोठ्या प्रमाणात होत आहे व त्याचा फायदा जाहिरातदार घेऊ शकतात.

*टीव्हीएवढा प्रभाव त्याचा नसावा.*

मला वाटतं, फक्त तेवढच कारण नसावं. लोकांना माहिती शोधण्याचा कंटाळा येत असावा. त्यांना सर्व काही आयतेच मिळाले पाहिजे. चमच्यानी

भरवायला हवे. टीव्हीचे जाहिरातदार याचाच फायदा घेत असावेत. यांच्या जाहिराती तद्दन भिकार, गुणवत्ता नसलेले, प्रेरणाशून्य असतात. ज्यांना थोडी तरी अक्कल आहे त्यांनी टीव्हीवर जाहिरात केलेल्या वस्तूंवर पूर्णपणे बहिष्कार टाकावा, या मताचा मी आहे.

*का म्हणून?*

माझ्या या विधानामागे तर्कशुद्ध विचार आहे. वाईट जाहिराती वाईट जाहिरातदार बनवितात. वाईट जाहिरातदारांना काम देणाऱ्या उत्पादकांना आपल्या वस्तूंची जाहिरात बघितल्यावर ते चांगले आहे का वाईट हेही त्यांना कळत नाही. त्यांच्यावर व त्यांच्या उत्पादनांवर विश्वास ठेवता येत नाही. त्यामुळे जाहिरातीच्या माध्यमातून ग्राहकाच्या माथी मारू पाहणाऱ्या मालांची खरेदी करू नये. त्यांचा माल नक्कीच निकृष्ट दर्जाचाच असणार, यात शंका नसावी. अशा जाहिरातदारांचा MICQ अगदीच कमी असणार हे मी या अगोदरच सांगितले आहे. याचा अर्थ असा नाही की चांगल्या जाहिरातींच्या उत्पादनांची खरेदी करावी.

*परंतु आज जाहिरातीवर राग येण्याचे कारण काय?*

टीव्हीवरील कॉमर्शियल ब्रेकच्या वेळी एक जाहिरात दाखवित होते. लॅपटॉपवर ते तुम्हीच बघा. म्हणजे मला का राग येतो याचे कारण समजेल.

एक गोड चेहऱ्याची आई आपल्या आजारी पडलेल्या मुलीला कुठले औषध द्यावे याची विचारपूस पांढरा ऍप्रॉन घातलेल्या ‘डॉक्टर’कडे करत होती. *या कंपनीची का त्या कंपनीची*. मुळात मुलगी आजारी वाटत नव्हती. आजारपणाचे ढोंग करणारी ही मुलगी चॉकलेट देणार म्हणून झोपवल्यासारखी वाटत होती. ही आई दोन कंपन्यांच्या गोळ्या डॉक्टरसमोर हातात धरून कुठल्या गोळ्या देऊ अशी विचारत होती.

*मग...*

मग काय? कुठलाही शहाणा माणूस डॉक्टरांना असले मूर्खपणाचे प्रश्न कधी विचारेल का?  डॉक्टर भास्कर आचार्य यांचा चेहरा लालबुंद झाला होता.

अजून एक उदाहरण देतो. अशाच एका औषध कंपनीची जाहिरात होती. काही वृद्ध पुरुष व स्त्रिया स्वत:च्या आजारपणाचे ‘अनुभवकथन’ करत होते. एक पडीक हीरो त्यांना खोदून खोदून प्रश्न विचारत होता. औषध किती गुणकारी आहे हेच ठसविण्याचा प्रयत्न तो करत होता. परंतु कार्यक्रमाच्या शेवटी हा हिरो औषधाच्या उपदुष्परिणामांची अक्षरश: यादी वाचून दाखवू लागला. मी तर अवाकच झालो. एवढे साइडइफेक्ट्स असतील तर हे औषध कुणी घेतील का? जाहिरातदाराच्या डोक्यात असले प्रश्न कसे काय शिरत नाहीत? असली औषधं बाजारात यायला नकोत. त्यावर बंदी घालायला हवी. *औषध घेतल्यानंतर एखाद्या रुग्णावर काही विपरीत परिणाम झाल्यास उत्पादकावर खटला भरला जाऊ नये म्हणून ही काळजी.*

फारच विचित्र. गंमत म्हणजे हा हिरो एवढ्यावरच थांबत नाही. पुढच्या वेळी तुम्ही तुमच्या डॉक्टरला भेटल्यास हे औषघ लिहून देण्याचा आग्रह धरा, असे ठणकावून सांगतो. डॉक्टर असे काही तरी सांगेल का? मी याचीसुद्धा चवकशी केली.

डॉ. आचार्य लॅपटॉप उघडून डॉक्टर व पेशंट यांच्यातील संवादाची चित्रफीत दाखवू लागले.

बाई: डॉक्टर हे औषध माझ्यासाठी चांगले आहे का?

डॉक्टर: (शांतपणे) तुम्ही किती वर्ष वैद्यकीय शिक्षण घेतले आहे?

बाई: (गोंधळून) काहीच नाही.

डॉक्टर: मी पाच वर्षे मेडिकलचा अभ्यास केला आहे. त्यानंतर 2 – 4 वर्ष हॉस्पिटलमध्ये काम केले आहे. व गेली 10 वर्षे मी येथे प्रॅक्टीस करत आहे. मी वैद्यकीय क्षेत्रात नवीन काही घडत असल्यास त्याकडे बारकाईने लक्ष ठेवतो.

माझे या विषयीचे ज्ञान अद्यावत आहे. त्यामुळे तुमच्या आरोग्यासाठी काय हवे काय नको हे मला कदाचित तुमच्यापेक्षा जास्त कळते. जर तुम्ही सुचविलेले औषध चांगले असते तर मी तुम्हाला सांगितले नसते का?

बाई: परंतु टीव्हीच्या जाहिरातीत.....

डॉक्टर: जर तुमचा उपचार जाहिरात करत असल्यास तुम्ही खुशाल त्या जाहिरातदाराकडे जा व तुमची प्रकृती दाखवा.

डॉ. आचार्य लॅपटॉप बंद करत आजकाल डॉक्टर्स इतके निष्ठुरपणे बोलत नाहीत हेही तितकेच खरे. कारण शेवटी त्यांना धंदा करायचा असतो. औषधी कंपन्या त्यांना चारत असतात. असे म्हणाले.

*अजून कुठल्या जाहिरातीमुळे हे तुमचे मत झाले आहे?*

काही जाहिराती उघड उघड फसवत असतात. जाहिरातीवरची किंमत एक असते व प्रत्यक्ष विकत घेतानाची किंमत भलतीच असते. असे का म्हणून विचारल्यानंतर काही थातुर मातुर कारण सांगून खिसा रिकामा करतात. इंटरनेट प्रोव्हैडर्स जाहिरात करताना 100 mbps – 200 mbps स्पीड्स असे काही तरी जाहिरात करत असतात. प्रत्यक्ष डाउनलोड – अपलोड करताना हे स्पीड्स 20 ते 200 kbps असतात. (व यासाठीसुद्धा भरमसाट दर ठेवलेले असतात.) अशी जाहिरात करणारे खरोखरच सचोटीने व्यवहार करत असल्यास सत्य परिस्थती सांगून ग्राहकांचा विश्वास संपादन करू शकतात. परंतु या सर्वाना दिशाभूल करण्याची सवय जडलेली आहे.

टूथब्रश, टूथपेस्ट, सॅनिटरी नॅपकिन्स, मोटर सायकली, बाथरूम – संडास स्वच्छ करण्यासाठी लागणारे लिक्विड्स, गोरेपणा, केस गळण्याचे थांबविणारे – केस भरगच्च वाढविणारे -केस चमकदार व मुलायम बनविणारे तेल-क्रीम्स, इत्यादींच्या उबग आणणाऱ्या जाहिराती बघत असताना तुम्हा लोकांना कंटाळा का येत नाही? राग का येत नाही? ज्या प्रकारे अशा मालांची जाहिरात

केली जाते त्यावरून तरी या मालांवर बहिष्कार टाकायला हवे. थंड पेय पिण्यासाठी 200 – 300 मीटरवरून उडी का म्हणून मारायला हवे? लोहचुंबकाची पट्टी वापरून मानदुखी कशी काय कमी होवू शकते? अशी हजारो उदाहरणं देता येतील.

डॉक्टर पुन्हा एकदा लॅपटॉप उघडून अजून एका मासलेवाइक जाहिरातीची चित्रफीत दाखवू लागले.

जाहिरात करणारी बाई: उघड्या पायानी चालत असल्यास काचेचे तुकडे वा काटे टोचल्यामुळे पाय दुखू लागतात…

ग्राहक महिला: हो खरच की….

जा.क.बा.:तुमच्या पायाला भेगा पडतात. रक्त येते. पू भरू लागते. डॉक्टरी उपचार करावे लागतात. हॉस्पिटलमध्ये अॅड्मिट व्हावे लागते. काही वेळा तुमचा पाय कापावा लागतो.

ग्रा.म. : आई ग ! खरं की काय ? मग काय करायला हवे?

जा.क.बा.: आमच्या कंपनीचे बूट वापरा. सुरक्षित व आरामाचे जीवन जगा….

ग्रा.म : धन्यवाद! मी आजच बूट आणते व झोपेच्या वेळीसुद्धा बूट घालूनच झोपते..

अशा प्रकारे ती महिला एखादा अद्भुत खजिना सापडल्यासारखे बुटाला कवटाळते.

याच प्रमाणे आयुर्वेद औषधांच्या प्रचाराचासुद्धा उबग येतो. अशा जाहिरातीवर बंदी का नाही?

*ते शक्य नाही. कारण टीव्ही चॅनेल्सचे अर्थकारण अशा जाहिरातीवर अवलंबून आहे.*

जाऊ द्या हो…. माझ्यासाठी काही किस्से आहेत का?

किस्सा 1
एका आर्मी युनिटच्या कमांडरच्या बायकोनी जीव विमा कंपनीची एजन्सी घेतली. कमांडरची बायको असल्यामुळे युनिटच्या प्रत्येक रिक्रूटकडे जाऊन *जीव विमा उतरवा... त्याचे अमुक अमुक फायदे* असे काही ती सांगणार नव्हती. त्यामुळे कमांडंटनी हे काम सुभेदार मेजरकडे सोपविले. त्यानी हाताखालील 4 -5 सुभेदारांना बोलवून कोटा पूर्ण करण्याची ऑर्डर दिली. जास्तीत जास्त शिपायांनी विमा उतरविला पाहिजे असे फर्मान सोडले. एका सुभेदाराचा अपवाद वगळता इतरांची क्षमता अत्यंत सुमार होती. मात्र एका सुभेदाराने भरपूर शिपायांकडून विमा उतरविण्यास भाग पाडले. कमांडंट आश्चर्यचकित होत याचे रहस्य काय म्हणून त्या सुभेदाराला विचारले. काही विशेष नाही सर, मी त्या शिपायांना तुम्ही युद्धात वीर मरण पावल्यास सरकार तुमच्या कुटुंबाला एक लाख रुपये देते. परंतु तुम्ही हा विमा उतरविल्यास व युद्धात मृत्यु आल्यास सरकारला अडीच लाख रुपये द्यावे लागणार. यातून सरकारचे भरपूर नुकसान होणार. त्यामुळे कदाचित अशा विमाधारकांना फ्रंटवर पाठविणार नाहीत असे सांगत होतो. त्यामुळे ते पटापट विम्याचा पहिला हप्ता देवू लागले.

"तर्कशुद्ध फसवणूक, छान..." डॉक्टर आचार्य.

किस्सा 2
टीव्हीवर एका मानसोपचार केंद्राची जाहिरात वरचेवर झळकत होती. विषयानुसार ज्ञानवर्धक गोळया! अमुक गोळी घेतल्यास अमुक विषयावरील एकूण एक ज्ञान मेंदूत जाऊन तुम्ही त्या विषयाच्या कुठल्याही प्रश्नाचे अचूक उत्तर देवू शकता. ....

एका कॉलेजच्या विद्यार्थ्याला अजून तीन विषयांचे पेपर्स द्यावयाचे होते. अभ्यास झाला नव्हता. ज्ञानवर्धक गोळयांची जाहिरात त्याला वरदान ठरली.

हा विद्यार्थी ताबडतोब जवळच्या मेडिकलच्या दुकानात गेला व अमुक अमुक कंपनीच्या गोळया आहेत का? याची विचारपूस केली.
“मला रसायनशास्त्राच्या गोळया हवेत.. ”
काउंटरवरच्या सेल्समनने कपाटातून लाल गोळया दाखवत या गोळया
“परीक्षेला जाण्यापूर्वी घेतल्यास तू सर्व प्रश्नांचे उत्तर लिहू शकशील. ”
विद्यार्थ्याला ते काही पटले नाही. गोळीची चाचणी घेण्यासाठी त्यानी ती पटकन तोंडात टाकली. काही क्षणातच त्याच्या डोक्यात अणुरचना, प्रक्रियांचे समीकरण, व्हॅलन्स, कोव्हॅलन्स, बाँड, विकीरण… अशा गोष्टी तरंगू लागल्या.
“अद्भुत परिणाम…” विद्यार्थी आनंदित होऊन
“तुमच्याकडे इतिहासाच्या गोळया आहेत का?”
सेल्समनने शांतपणे एक निळी गुळगुळीत गोळी त्याच्या हातावर ठेवली. ती गोळी तोंडात ठेवून चिघळत असतानाच इतिहासातील राजे – महाराजे, सनावळया, युद्धाचे प्रसंग, तहनामा, बखरी इत्यादीनी त्याचे डोळे गच्च भरले.
“उद्या माझा गणिताचा पेपर आहे. गणिताची गोळी आहे का?”
“मला खात्री नाही. परंतु थांब, मी शोधतो.”
कपाटाच्या कोपऱ्यातील एका बाटलीत काळसर अशी एकच गोळी शिल्लक होती. ही गोळी दिसायला विद्रूप, खडबडित असी काहीतरीच होती.
विद्यार्थ्याला ती काही आवडली नाही.
“शी, असली कसली ही घाण गोळी…”
“ठीक आहे. नको घेऊस. तुझ्यासारखे अनेक जण असेच म्हणत गोळी न घेता परत गेले आहेत. गणित हे नेहमीच पचनी पडण्यास कठिण असते.”

“अशा गोळ्यांचे पेटंट घ्यायला हवे. पुष्कळ पैसा कमवता येईल. पुन्हा भेटू” असे म्हणत डॉक्टर बाहेर पडले.

**प्रश्न 1 चे उत्तर:**

बीजगणितीय पद्धतीने याची मांडणी

43+क्ष = 2(16+क्ष) असे करता येईल.

समीकरण सोडविल्यास क्ष = 11 असे उत्तर येईल.

11 वर्षानंतर मुलाचे वय 27 व वडिलांचे वय 54 म्हणजे मुलाच्या वयापेक्षा दुप्पट होईल.

**प्रश्न 2 चे उत्तर:**

कदाचित विंबल्डनच्या टेनिस मॅचेसप्रमाणे जोड्यांचा हिशोब करत डोके खाजवत असाल. परंतु या स्पर्धेतील प्रत्येक डावात एक स्पर्धक बाद होणार व शेवटी एकही खेळ न हरता प्रत्येक डाव जिंकणारा विजेता ठरणार. त्यामुळे 14539 – 1 = 14538 डाव खेळल्या जातील.

अशा प्रकारे विचार करून उत्तर देण्यासाठीच्या पद्धतीला lateral thinking हे नाव आहे.



# वाहतुकीच्या नियमांची ऐशी तैशी

## डॉ. भास्कर आचार्यांबरोबरच्या गप्पा... गणिताच्या!

रूपालीच्या आतल्या कोपऱ्यात डॉ. भास्कर आचार्य कॉफी पीत बसले होते. मला पाहता क्षणीच बसण्याची खूण करत खिशातून चिठ्ठी काढून माझ्या हाती सरकवली. चिठ्ठीतील कूट प्रश्न अशा प्रकारे होते.

**प्रश्न 1**

घोड्यांच्या रेसमध्ये भरपूर कमाई केलेल्या एका श्रीमंताचा वृद्धाप्यकाळात मृत्यु होतो. मृत्युपश्चात त्याच्या इस्टेटीची, मालमत्तेची वाटणी त्याच्या तिन्ही मुलात मृत्युपत्रानुसार करण्याची जबाबदारी त्याच्या वकिलावर होती. सर्व काही बापाच्या इच्छेनुसार वाटणी झाली परंतु रेसच्या घोड्याच्या वाटणीच्या मुद्द्यावर गाडी अडून बसली. मृत्युपत्रात उल्लेख केल्याप्रमाणे एकूण घोड्यापैकी अर्धे घोडे पहिल्या मुलाला, एक तृतियांश घोडे मधल्या मुलाला व एक नवमांश घोडे धाकट्याला द्यावयाचे होते. परंतु मृत्युच्या वेळी त्यांच्याकडे फक्त 17 घोडे शिल्लक होते. काही घोड्यांची विक्री वा दान करून वाटणी न्यायसंमत ठरले नसते. खरे पाहता वकील भावाभावामध्ये भांडण लावून कमाई कशी करता येईल याचा विचार करत होता. परंतु मोठा भाऊ शेजारीच असलेल्या व रेसचे घोडे बाळगणाऱ्या वडिलाच्या मित्राला बोलावून या पेचप्रसंगातून मार्ग काढण्याची विनंती करतो. हा मित्र योग्य वाटणी करून तिढा सोडवतो. मित्राने हा तिढा कसा सोडवला असेल याची तुम्ही कल्पना करू शकाल का?

**प्रश्न 2**

एका राजकुमाराला शेजारच्या राज्यातील राजकुमारीशी लग्न करायचे होते. परंतु शेजारच्या राजाला हा राजकुमार स्वत:च्या मुलीशी लग्न करण्यास योग्य आहे की नाही याची परीक्षा घ्यायची होती. परीक्षेत उत्तीर्ण झाल्यास लग्न

लावून देण्यास त्याची हरकत नव्हती.
परीक्षेसाठी राजकुमार दरबारात हजर होतो. राजा त्याला तेथे एका बाजूला असलेल्या दोन बंद दरवाज्यांकडे बोट दाखवत यातील एक दरवाजा तुला वधस्तंभाकडे नेणारा व दुसरा तुला सुरक्षित ठिकाणी पोचविणारा आहे. या दरवाज्यांच्या पहाऱ्यासाठी रखवालदार आहेत. यापेकी एक रखवालदार नेहमी खोटे बोलणाऱ्या टोळीतला व दुसरा नेहमी खरे बोलणाऱ्या टोळीचा आहे. तुझे काम एवढेच की यातील एकाला असा प्रश्न विचारायचा की त्याच्या उत्तरातून तू सुरक्षितपणे बाहेर नेणाऱ्या दरवाज्यातून बाहेर पडू शकशील.
राजकुमाराने विचारलेला प्रश्न कोणता असेल?

खिशात चिठ्ठी ठेवत मी डॉक्टरांच्या बघत बसलो.

डॉक्टर क्षणभर गप्प बसून

तुमच्या येथील वाहतूक व्यवस्था इतकी गचाळ आहे की त्याची कल्पना करवत नाही. स्टीअरिंग व्हील हातात धरून बसलेला हा प्राणी नेहमीच युद्धाच्या आवेशात असतो की काय? समोर जे काही दिसेल त्याला धडक मारत पुढे पुढे जात असतो. रहदारीचे नियम पाळण्यासाठी नाहीतच हे त्याच्या मनात ठसविलेले असते अशी मला शंका आहे.

डॉक्टर आचार्य लॅपटॉप उघडतच रहदारींच्या नियमांची कशी पायमल्ली होत आहे याचे चित्रणच मला दाखवतात.

त्यानी दाखवलेला प्रसंग असा होता.
शहराच्या उपनगरातील एका अरुंद रस्त्यावर एक जण इंडिका / मारुती 800 टाइप असलेली कार मर्यादित वेगाने चालवत होता. रस्ता अरुंद व रस्त्याच्या दोन्ही बाजूला खणून ठेवलेले असल्यामुळे खड्ड्यात भरपूर चिखल व गढूळ पाणी. पाठीमागून एक स्पोर्ट्स युटिलिटी वेहिकल (SUV) जोराने भरधाव वेगाने आली. कदाचित या SUVच्या मालकाला पुढे जाण्याची घाई असावी.

रस्ता अरुंद असल्यामुळे ओव्हरटेक करून पुढे जाता येत नव्हते. हॉर्न वाजवतो. काही उपयोग नाही. पुढचा ड्रायव्हर शांतपणे जात असतो. गाडी रेस करतो. काही उपयोग नाही. पुढची गाडी अजूनही बैलगाडीच्याच वेगाने रस्त्याच्या मधोमध. एका विशिष्ट क्षणी SUVचा ड्रायव्हर डाव्या बाजूने ओव्हरटेक करून पुढे जातो. परंतु गाडी स्लिप होऊन खड्ड्यातील चिखलात घुसून रुतून बंद पडते. हा ड्रायव्हर हातवारे करत, ओरडत बाहेर काढण्याची विनंती करू लागतो. मात्र पुढचा ड्रायव्हर अगदी ढिम्म. कशी जिरली या तोऱ्यात हसत बाय बाय करत पुढे निघून जातो.

या प्रसंगातील प्रत्येकाच्या चेहऱ्यावरील बदलते भाव कॅमेऱ्यानी छानपैकी टिपलेले होते.

अजून एका प्रसंगात एक मस्तवाल तरुण सहा पदरी हायवेवर जास्तीत जास्त वेगाने गाडी चालवत असतो. पोलीसांची गाडी त्याचा पाठलाग करत एका वळणावर गाडी थांबविण्यास भाग पाडते. इन्स्पेक्टर त्याला काही प्रश्न विचारू लागतो.

इन्स्पेक्टर : एवढ्या वेगाने तू गाडी का चालवत होतास? ठिकठिकाणी लावलेल्या वेगमर्यादेच्या पाट्या तुला दिसल्या नाहीत का?

तरुण : मुळात गाडी चालवणे म्हणजे माझ्या जीवनशैलीची अभिव्यक्ती आहे. घटनेने मला स्वातंत्र्याचे हक्क दिले आहेत. त्यामुळे गाडीच्या वेगावर मर्यादा घालणे घटनाविरोधी कृती आहे. मी गाडी जोराने चालवणारच.

इ : लेन बदलताना, ओव्हरटेक करताना तू काही सिग्नल्स वा हाताने खुणा का करत नाहीस?

त : खुणा – बिणा, रहदारीचे नियम बायकांसाठी, म्हताऱ्यांसाठी असतात. माझ्यासाठी नाही.

इ: गाडी जोरात चालविल्यामुळे इतर घाबरतात. त्यांना ब्रेक लावावे लागते.

अपघात होतात. त्यांची तुला पर्वा नाही का?
त: ज्याना अशा प्रसंगातसुद्धा नीटपणे गाडी चालवता येत नसल्यास त्यानी घरी बसावे. या रस्त्यावर खरोखरच मर्दानी छाती असलेल्यानीच गाडी चालवावे.
इ: तुझ्या शेजारी तुझा मुलगा सीटबेल्ट न लावता बसलेला असल्यास याच वेगाने तू गाडी चालवशील का?
त :बिनदिक्कत! माझ्या मुलाला अगदी लहानपणापासूनच स्पर्धेत यशस्वी कसे व्हायचे, सक्षम कसे व्हायचे, शक्तीशाली कसे व्हायचे हेच मी शिकविणार आहे. इतरांची काळजी करत बसल्यास तू यशस्वी होणार नाही हेच मी त्याला शिकविणार आहे.
इ : ठीक…. पाच या संख्येला शून्य या संख्येने भागाकार केल्यास उत्तर काय येईल?
त : (एका क्षणाचाही विलंब न लावता ) शून्य.
इ : यावरून तुला अक्कल नाही हे कळते. तुझ्यासारखे हजारो रस्त्यावर गाड्या चालवतात म्हणून ही दुरवस्था!
असे म्हणत इन्स्पेक्टर तरुणाला ढकलत ढकलतच पोलीसाच्या गाडीत कोंबतो.

काही तरुण व तरुणीसुद्धा अशा प्रकारे वागतात हे मात्र खरे. याविषयी सरकारही हतबल आहे.

हीच आमची तरुण पिढी असल्यास या पृथ्वीवरील MICQ 40 – 50 पेक्षा कधीच जास्त होणार नाही. जाऊ दे…

तुम्ही माझ्यासाठी काही किस्से आणले आहेत का?

कॉफीचा शेवटचा घोट घेत घेत मी त्याना हा किस्सा सुनावला.

एक्सप्रेस हायवेवर नुकतेच ठिकठिकाणी स्पीडगन्स, सीसीटीव्ही कॅमेरे बसविले होते. त्यामुळे वेगमर्यादा ओलांडणाऱ्यावर दंड बसविणे शक्य झाले

होते. एका प्रसंगी वेगमर्यादा ओलांडल्याचे लक्षात आल्यावर ट्रॅफिक पोलीस पन्नाशीच्या वयातील स्मार्ट दिसणाऱ्या एका महिलेला गाडी बाजूला थांबविण्याची खूण करतो. बाई भलतीच सुसंस्कृत होती. हळू हळू गाडीची काच खाली सरकवत

"काय हवालदार, ओळखला नाहीत का? काही प्रॉब्लेम आहे का?"

"मॅडम, आपण 80 पेक्षा जास्त स्पीडने गाडी चालवत आहात. तुमचे ड्रायव्हिंग लायसेन्स बघू दे."

"माझ्याकडे ते नाही. मी तुम्हाला दाखवू शकत नाही. "

"का नाही?"

"दोन वर्षापूर्वी माझे लायसेन्स जप्त करण्यात आले. कारण मी दारूच्या नशेत गाडी चालवत.... "

"....तुमच्या गाडीची कागदपत्र दाखवा."

"सॉरी. ही गाडी माझी नाही. खरे म्हणजे या गाडीच्या ड्रायव्हरचा खून करून त्याचे तुकडे मी गाडीच्या डिकीत कोंबलेले आहेत. दाखवू का?"

पोलीस खरोखरच घाबरला. त्याची बोबडी वळली. बाईला गाडीतच बसण्याची खूण करत तो आपल्या वरिष्ठाला फोन लावला. त्याचे बारकाईने बाईकडे लक्ष होते. बाई शांतपणे च्युयिंगगम चघळत बसली होती.

15 -20 मिनिटात 5 -6 पोलीसांच्या ताफ्यासह त्याचा वरिष्ठ अधिकारी तेथे आला. पोलीसानी पुन्हा एकदा त्याला ब्रीफिंग केले. थोडेसे घाबरतच हा अधिकारी बाईच्या गाडीपाशी गेला.

" मॅडम, माझा सहकारी तुम्ही दारूच्या नशेत गाडी चालविल्यामुळे तुमचे ड्रायव्हिंग लायसेन्स जप्त करण्यात आले आहे.असे सांगतोय. खरे की खोटे?"

"खोटे. हे बघा माझे लायसेन्स." पर्समधील लायसेन्स काढून इन्स्पेक्टरच्या हातात देते. अधिकारी आश्चर्यचकित नजरेने लायसेन्स पुढे मागे पुढे करून

बघतो व लायसेन्स परत करून
“माझा हवालदार तुमच्या गाडीच्या डिकीत प्रेत आहे म्हणून सांगतोय…”
बाई डिकीची चावी त्याच्या हातात देत “तुम्हीच उघडून खात्री करून घ्या. ….”
उघडून पाहिल्यावर डिकी रिकामी असते.
“माझा तो सहकारी…. मला कळत नाही…….”
बाई मात्र शांतपणे, “इन्स्पेक्टर, तुमचा हवालदार चक्क खोट बोलतो. कारण मी त्याला लाच दिली नाही. आता तो मी वेगमर्यादा ओलांडली म्हणूनही सांगेल.”
इन्स्पेक्टर पूर्णपणे गोंधळलेला. तो हवालदारकडे जातो व बाई पुहा पूर्ण वेगाने गाडी चालवत अदृष्य होते.

“कधी तरी या बाईला पकडून मोठ्या प्रमाणात दंड ठोकायला हवे.” डाक्टरांचे स्वगत.

आणखी काही….

एक तरुण नवरा जोरजोराने किंचाळतच किचनमध्ये येऊन बायकोवर खेकसतो,
“हे काय? तुला काही समजत की नाही? दूध उकळतय! खाली सांडतय! जरा गॅस कमी कर बघू!
हे काय चाललय मला कळतच नाही! भांडं खाली घे… चिमट्यानी.. हात भाजेल… तुला कसं कळणार! कधी कळणार! ओ माय गॉड….. काही तरी कर…”
बायको त्याच्याकडे निरखून बघत “तुला झालयं तरी काय? असा का किंचाळतो? एवढा आरडा ओरडा कशासाठी? तुला काय वाटतं मला दूध तापविता येत नाही?”

“माय डीअर… तुला हे सर्व माहित आहे. कबूल. आवाज हळू हळू करत नवरा सांगू लागतो. मी जेव्हा तुला शेजारी बसवून गाडी चालवत असतो तेव्हा काय परिस्थिती असते याची एक झळक मी आता तुला दाखवत होतो. तुझा वैताग, तुझा आरडाओरडा… तुझ्या हजार सूचना. त्या वेळी माझे काय हाल होत असतात…..”

“छान किस्सा. आपल्या गप्पा छान रंगतात. भेटू पुन्हा कधी तरी…. “असे म्हणत डॉक्टर बाहेर पडले.

**प्रश्न 1 चे उत्तर:**

मृत्युपत्रात उल्लेख केलेल्या अपूर्णांकांची बेरीज पूर्णांकात दाखवल्यास अट पूर्ण होऊ शकेल. मृत्युपत्रा प्रमाणे

$1/2 + 1/3 + 1/9 = 17/18 < 1$

शेजारच्यानी स्वत:चा घोड्याला इतर घोड्यांच्या सोबत उभे करून 18 घोड्यांची वाटणी करतो. वाटणीप्रमाणे पहिल्या मुलाला 9 घोडे, मधल्याला 6 घोडे व धाकट्याला 2 घोडे वाटून शेजारचा मित्र बाकी राहिलेला आपला घोडा घेऊन निघून जातो.

(सगळी मुलं खुष होतात. शेजारी मदत केल्याबद्दल समाधानाने घरी जातो. परंतु वकील अस्वस्थ होतो. कारण भावंडामध्ये वाटणीवरून भांडण लावून पैसे कमविण्याची त्याची संधी हुकलेली असते !)

**प्रश्न 2 चे उत्तर:**

राजकुमारला कुठल्याही एका रखवालदाराला खालील प्रश्न विचारल्यास सुखरूपपणे बाहेर घेऊन जाणाऱ्या दरवाज्यातून जाणे शक्य होईल

*तू जर दुसऱ्या टोळीचा असता तर मला सहिसलामत बाहेर जाण्यासाठी कुठल्या दरवाजाने जायला सांगशील?*

जर रखवालदार खरे बोलणाऱ्या टोळीतला असल्यास खोटे बोलणारा रखवालदार वधस्तंभ असलेल्या दरवाज्यातून जाण्यास सांगितला असता याची त्याला खात्री होती. त्यामुळे राजकुमाराने त्यानी बोट दाखवलेल्या दरवाज्याऐवजी दुसऱ्या दरवाज्याने बाहेर जाईल.

जर रखवालदार खोटे बोलणाऱ्या टोळीतला असल्यास खरे बोलणारा रखवालदार सुरक्षितरित्या बाहेर जाणाऱ्या दरवाज्याकडे बोट दाखविला असता असे विचार करून येथेही खोटे सांगून राजकुमाराला वधस्तंभ असलेल्या दरवाज्याकडे बोट दाखवेल. राजकुमार मात्र त्यानी दाखविलेल्या दरवाज्यातून न जाता दुसऱ्या दरवाज्याने जाईल.

अशा प्रकारे रखवालदार कुठल्याही टोळीचा असला तरी राजकुमार रखवालदारानी दाखविलेल्या दरवाज्याऐवजी दुसऱ्या दरवाज्यातून बाहेर पडणे सुरक्षित ठरेल.

*(अशा प्रकारच्या या गप्पांना अंत नाही. परंतु डॉ. भास्कर आचार्य कित्येक दिवस दिसले नाहीत म्हणून या गप्पांना (तात्पुरती) विश्रांती. )*



# ॲस्टेरिक्स-ओबेलिक्स गोतावळ्याच्या अभूतपूर्व जगात

*The year is 50 B.C. Gaul is entirely occupied by the Romans. Well, not entirely... one small village of indomitable Gauls still holds out against the invaders. And life is not easy for the Roman legionaries who garrison the fortified camps of Totorum, Aquarium, Laudanum and Compendium...*

*ॲस्टेरिक्सच्या (बहुतेक) कॉमिक्सची सुरुवात*

1960-70च्या सुमारास आपल्या देशात तरी कॉमिक्स या चित्रकथा प्रकाराचं वेड लागलेलं नव्हतं. पण त्या काळी अमेरिकेत 'मॅड', 'आर्ची', 'बॅटमॅन' इत्यादी कॉमिक्स लहान वयोगटातील मुलं (आणि प्रौढ वाचकसुद्धा) अत्यंत आवडीने वाचत होते. त्यातही 'मॅड' हे कॉमिक्स लहान मुलांऐवजी प्रौढांच्यातच जास्त प्रमाणात वाचलं जात असावं. आपण मात्र आपला सोवळेपणा जपून ठेवणाऱ्या अनंत पै यांच्या 'अमर चित्र कथां'च्या कह्यात सापडलेलो होतो. अपवाद फक्त बिरबल वा तेनाली रामकृष्ण यांच्या कथांचा असावा. मुळात लहान मुलं वाचू शकतात, त्यांच्यासाठी पुस्तकांची सोय करणं ही पालकांची जबाबदारी असू शकते, हेच मध्यमवर्गीय पालक विसरून गेले होते. (आजसुद्धा परिस्थितीत फार बदल झालेला नाही!) मुळात पाल्यांसाठी नवी कोरी पाठ्यपुस्तकं विकत घेण्यास कुरकुर करणाऱ्या पालकांना मुलांना हसवणाऱ्या, रिझवणाऱ्या, कल्पनारम्य जगांत नेणाऱ्या कॉमिक्सची चैन परवडणारी नव्हती. तरीसुद्धा 'चाचा चौधरी', 'लोटपोट'सारखी कॉमिक्स पुढील काळात मोठमोठ्या शहरांत मिळायला लागली.

कॉमिक्सच्या जगाला कलाटणी देण्याचं काम ॲस्टेरिक्स कॉमिक्सने केलं असं म्हणायला भरपूर वाव आहे. ॲस्टेरिक्स कॉमिक्सचा जन्म 1960च्या सुमारास झाला. रने गोसिनी यांच्या डोक्यातील ही कल्पना होती. 1926मध्ये पॅरिसमध्ये जन्मलेल्या गोसिनीचं बालपण फ्रान्स व अर्जेंटिनात विभागलं होतं. चार वर्षांचा असताना त्याची ओळख पातोरुझु या कार्टून कॅरेक्टरची झाली. हे कॅरेक्टर अर्जेंटिनामधील त्या काळी सुपरहीरोच्या दर्जाचं होतं. त्यात फॅसिस्ट प्रवृत्तीची झाक असली, तरी ते प्रामाणिक व गरीबांना मदत करणारं असल्यामुळे त्याकाळच्या अर्जेंटिनातील वृत्तपत्रांत त्याला प्रसिद्धी मिळत गेली.

ॲस्टेरिक्सच्या पुस्तकांच्या प्रसिद्धीत रेडिओ लक्सेंबर्गच्या जाहिरातीचा नक्कीच वाटा असावा. 1961च्या सुमारास *ॲस्टेरिक्स दि गॉल* हे पुस्तक फ्रेंच भाषेत प्रकाशित झालं. पहिल्या वर्षी सहा हजार प्रतींची, तर पुढच्या वर्षी वीस हजार प्रतींची विक्री झाली. 1963मध्ये चाळीस हजार, 1964मध्ये दीड लाख, 1965मध्ये तीन लाख, 1966 मध्ये चार लाख, तर 1967मध्ये बारा लाख प्रतींची विक्री झाली.

पुढच्या 16 वर्षांत या जोडीने 26 पुस्तकं हातावेगळी केली. रने गोसिनी 1977मध्ये मरण पावला. त्यावेळी त्याच्या हातात *ॲस्टेरिक्स इन बेल्जियम* (Astérix chez les Belges) या पुस्तकाचं काम होतं. पुस्तक प्रकाशित होण्याआधी त्याचा मुत्यू झाला. गोसिनीच्या मृत्युने अख्खा फ्रान्स हादरला. जणू पॅरिसमधला आयफेल टॉवरच कोसळला, असं ॲस्टेरिक्सप्रेमींना वाटत होतं. ॲस्टेरिक्स हा फ्रेंच संस्कृतीचा अविभाज्य भाग होता. जादुई काढ्याचा घोट (magic potion) घेतल्यावर गॉलवासी त्यांना काही क्षणांपुरत्या मिळत असलेल्या अफाट शक्तीचा वापर करत रोमन सम्राट ज्यूलिअस सीझरचा धुव्वा उडवतात अशा साहसकथांच्या आहारी सगळा फ्रान्स गेला होता.

गोसिनीच्या मुत्युआधीच्या पुस्तकाला बेल्जियममधल्या तलवारबाजीची पार्श्वभूमी लाभली होती. त्याचबरोबर बेल्जियमची बिअर व बेल्जियममधले ब्रुसेल स्प्राउटसुद्धा! त्याला 'टिनटिन' मधल्या काही पात्रांची जोड होती. ॲस्टेरिक्सची कदाचित ही शेवटची घटिका असावी. कारण उदेर्झोचं चित्र अजून साकार व्हायचं होतं. त्याआधीच ॲस्टेरिक्सचा निर्माता जगाआड गेला होता. उदेर्झो पुस्तक पूर्ण करण्यासाठी राजी नव्हता. पण पुस्तकाचे प्रकाशक अशा भावनांची कदर करण्यास अजिबात तयार नव्हते. त्यांनी उदेर्झोला कोर्टात खेचलं. कराराप्रमाणे पुस्तक पूर्ण करण्याचा तगादा लावला. त्याच्यावर खटले भरले. उच्च न्यायालयापर्यंत प्रकरण गेलं. शेवटी उदेर्झो कोर्टबाजीत हरला. नंतरच्या काळात त्याने पुस्तक पूर्ण केलं आणि ते प्रकाशित झालं. त्याला प्रचंड प्रतिसाद मिळाला. गंमत म्हणजे पुढच्या 25 वर्षांत उदेर्झोनं मागे वळून न पाहता एकट्यानेच ॲस्टेरिक्स मालिकेत आणखी 8 पुस्तकांची भर घातली.  दर वेळी 'हे शेवटचंच पुस्तक' अस सांगत वाचकांना तो झुलवत होता. ॲस्टेरिक्सचं बाजारमूल्य तो जाणत होता. ॲस्टेरिक्सवर चित्रपट निघाले आणि त्यांनाही प्रेक्षकांनी गर्दी केली. 2011पर्यंत ॲस्टेरिक्सची धुरा त्याने सांभाळली. अगदी त्या क्षणापर्यंत उदेर्झो ॲस्टेरिक्सभक्तांची इच्छा पूर्ण करत होता. जाँ-यीव फेरी (कथा) व दिदिए कोन्राड (चित्र) आता ॲस्टेरिक्सचे व्यवहार सांभाळतात. या जोडीने ॲस्टेरिक्स मालिकेत आणखी चार पुस्तकांची भर घातली आहे. वयाच्या 93व्या वर्षी, 24 मार्च 2020 रोजी उदेर्झोचा हृदयविकारामुळे मृत्यू झाला. ॲस्टेरिक्सचे दोन्ही जन्मदाते काळाच्या पडद्याआड गेले.

1969च्या एका सर्वेक्षणानुसार फ्रान्समधल्या 70% लोकांनी ॲस्टेरिक्सचं किमान एक तरी पुस्तक वाचलं होतं. गोसिनीच्या मृत्युच्या वर्षी फ्रान्समधल्या ॲस्टेरिक्सच्या पुस्तक विक्रीचा खप साडेपाच कोटींच्या घरात पोचला होता.

2017 साली  जगभरात ॲस्टेरिक्स मालिकेतल्या पुस्तकविक्रीचा आकडा 37 कोटीपर्यंत गेला होता. 'टिनटिन' या त्याच्या बेल्जियन स्पर्धकापेक्षा हा आकडा कितीतरी मोठा होता. 1965मध्ये आकाशात झेप घेतलेल्या फ्रेंच आकाशयानाचं नाव *ॲस्टेरिक्स* होतं. नंतरच्या काळात हाच कित्ता गिरवत अमेरिकेने त्यांच्या आकाशयानांची नावे *चार्ली ब्राउन* आणि *स्नूपी* अशी ठेवली. या कार्टूनपात्रांची नावं अजरामर झाली. 60-70च्या काळातील जाहिरात होत असलेल्या कित्येक वस्तूंच्या नावांना ॲस्टेरिक्सची जोड असे. एकदा उदेर्झो प्रवास करत असताना तीन वेगवेगळ्या परस्परविरोधी वस्तूंच्या जाहिरातीत ॲस्टेरिक्स हे नाव बघून तो आश्चर्यचकित झाला. त्यानंतर यासंबंधात काही धोरणं आखून तो जाहिराती नियंत्रित करायला लागला.

फ्रेंच वाचकांच्या हाती पडलेले 1964 मधील ॲस्टेरिक्स दि ग्लेडिएटर  (Astérix Gladiateur) असो, वा *ॲस्टेरिक्स अँड क्लिओपात्रा* हा चित्रपट असो, किंवा *ॲस्टेरिक्स इन ब्रिटन* असो, फ्रेंच वाचकांनी कधीच नाकं मुरडली नाहीत. (या पुस्तकात सीझर 'गॉल आस्थानकवी' कॅकोफोनिक्सला पकडून नेतो व त्याला सोडविण्यासाठी ॲस्टेरिक्स स्वतः ग्लॅडिएटर होऊन मैदानात उतरतो. खरे पाहता कॅकोफोनिक्सच्या कविता वा त्याचे ‘किंचाळणे’ कुणालाही आवडत नाही. म्हणूनच प्रत्येक पुस्तकाच्या शेवटी हमखासपणे येत असलेल्या पार्टीच्या चित्रात कॅकोफोनिक्सच्या मुसक्या बांधून त्याला झाडावर टांगलेले बघावयास मिळते. परंतु शेवटी तो गॉलच होता व सीझरला नामोहरम करण्याची एकही संधी ॲस्टेरिक्स व ओबेलिक्स सोडत नाहीत.)

नाराज होण्याइतके उदेर्झोचे लेखन काही वाईट नव्हते. काही लेखनात समकालीन राजकीय व्यवस्थेवर त्यांनी केलेली टीका गुदगुल्या केल्यासारखी हसवते. काही पुस्तकांत राजकीय व्यवस्था व फॅशनचे फॅड यांचा पुरेपूर

समाचार घेतला आहे. *ॲस्टेरिक्स अँड दि ब्लॅक गोल्ड*मध्ये गॉलमंडळी जादुई काढ्याला लागणाऱ्या सामग्रीच्या शोधात चक्क मध्यपूर्वेत जातात. कारण त्याकाळी, म्हणजे 80-90च्या सुमारास इंधनसमस्या प्रसिद्धीच्या टोकावर होती व इंधन-तेलाचे राजकारण तेथे तापलेले होते. इंधन-तेलाच्या राजकारणामुळे प्रदूषणात कशी भर पडणार आहे यावर त्याने या पुस्तकात चांगल्या प्रकारे भाष्य केले आहे. एका प्रसंगात ॲस्टेरिक्सचे जहाज समुद्रधुनीतून येत असताना चक्क अंगावर तेल ओथंबलेले समुद्रपक्षी त्यांना दिसतात.

खरे पाहता मुळात या दोघांनाही कुठल्याच राजकीय व्यवस्थेवर मल्लीनाथी करायची नव्हती. ते केवळ हसविण्याचा धंदा चालवत होते. काही वेळा त्यांना या भांडणतंट्याच्या आणि साहसी प्रसंगांचासुद्धा कंटाळा येत असावा. म्हणूनच *ॲस्टेरिक्स अँड दि सन*मध्ये ॲस्टेरिक्स जेव्हा ओबेलिक्ससमोर आपली नाराजी व्यक्त करतो, तेव्हा ओबेलिक्स या साहसाचा शेवट निरभ्र आकाशाखाली रात्रीच्या वेळी जंगी पार्टीत होणार असून काळजी करण्याचे काही कारण नाही असे आश्वासन देतो.

काहींच्या मते ॲस्टेरिक्स व रोमन साम्राज्य यांच्यातील लढ्याची 'डेव्हिड आणि गोलिएथ' या बायबलकथेतील लढ्याशी तुलना होऊ शकते. डेव्हिड हा एकटा, खंगलेला, वंचित व दुबळा. याच्या विरोधातील गोलिएथ हा प्रचंड महाकाय व महापराक्रमी. तरीसुद्धा डेव्हिड स्वतःच्या बुद्धिकौशल्याने गोलिएथशी सामना करून त्याला हरवतो. किरकोळ प्रकृतीचा व हाताशी कुठलेही प्रबळ साधन नसलेला ॲस्टेरिक्स व त्याचा गोतावळा महाशक्तीशाली रोमन साम्राज्याशी लढून आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवण्याचा प्रयत्न करतात. गोसिनीच्या डोक्यात चिरडलेल्यांना सहानुभूती

दाखविणे वा पायदळी तुडविणाऱ्यांबद्दल सूडाची भावना असणे असे कुठलेही विचार नव्हते अशी कबुली त्यांनी एका मुलाखतीत दिली होती.

ॲस्टेरिक्सच्या साहसकथांची डेव्हिड-गोलिएथ कथेशी तुलना करणे अप्रस्तुत ठरेल. कारण ॲस्टेरिक्सच्या साहसकथेत शहाणपणा वा अफलातून सुचलेल्या युक्त्या-प्रयुक्त्यांचा लवलेशही नसतो. तिथे आहे ती फक्त जादुई काढ्याचा घोट प्यायल्यामुळे मिळणारी प्रचंड क्षणिक शक्ती. या शक्तीसमोर कुठलाही शत्रू टिकूच शकणार नाही. एका पाठोपाठ एक घडत असलेल्या साहसांत या शक्तीबरोबरच गॉलवासींच्या डोक्यातून निघणाऱ्या अजब कल्पना व त्यातून होणारे घोळ यांचा मोठा वाटा आहे. त्यातून तयार होणारे हे अफलातून मिश्रण कुठल्याही मख्ख माणसाला हसवू शकेल. एखादी गोष्ट सहज शक्य होईल असे वाटत असतानाच गॉल मंडळीनी घातलेल्या घोळांतून जो काही विनोद निर्माण होतो, व ते घोळ ज्या पद्धतीने निस्तरत त्यांचा अखेरीस विजय होतो, त्याला तोड नाही. कदाचित या गुणविशेषामुळेच ॲस्टेरिक्स प्रौढ वाचकांचा लाडका झाला असावा.  त्या काळच्या वाचकांच्या संगणकांसाठीचे पासवर्डसुद्धा ॲस्टेरिक्स, ओबेलिक्स इ. होते.

त्याचबरोबर फ्रेंच राजकारणाची व तथाकथित उच्च सांस्कृतिक मूल्यांची टर उडविणाऱ्या शब्दांच्या आतिषबाजीमुळेसुद्धा प्रौढ वाचकवर्ग आकर्षित झालेला असावा. *ओबेलिक्स अँड कंपनी* (Obélix et compagnie) या गोष्टीमध्ये रोमन साम्राज्याचा अर्थतज्ज्ञ हा फ्रान्सचे राष्ट्रपती ज्याक शिराक यांच्या आर्थिक धोरणांची सही सही नक्कल करून साम्राज्याची घडी विसकटतो.

फ्रेंच पाठ्यपुस्तकांतील इतिहासाचा आरंभच मुळी 'गॉलवासी आपले पूर्वज आहेत' ('Nos ancêtres les Gaulois') या वाक्याने होतो व सर्व मुलं अगदी लहानपणापासून हे वाक्य घोकतच मोठे होतात. या प्राचीन

इतिहासातील मध्यवर्ती विषयवस्तू असलेल्या गॉल जमातीच्या हिरोचे नाव वेरसॉन्जेटोरिक्स (Vercingetorix) होते. इ.स.पू 50च्या सुमारास त्यांनी काही युक्त्या-प्रयुक्त्या लढवून ज्यूलिअस सीझरच्या रोमन सैन्याला हरवल्याची आख्यायिका गेली 2000 वर्षे ऐकवली जात आहे. सीझरच्या इतिहासकारांच्या मते रोमनविरुद्धच्या युद्धात या गॉलिक हिरोचा पराभव होऊन तो सर्व शस्त्रे सीझरच्या चरणी अर्पण करून शरण आला. सीझरच्या विजयोल्लासात हा हिरो मारला गेला. डाव्या व उजव्या अशा दोन्ही विचारवंतांचा हा लाडका हिरो आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात जेव्हा जर्मनीने फ्रान्सवर आक्रमण करून देश बळकावला तेव्हा भूमीगत होऊन जर्मनीच्या विरोधात काम करणाऱ्यांना स्फूर्ती देण्याचे काम या वेरसॉन्जे-टोरिक्सच्या आख्यायिकेने केले. जरी वेरसॉन्जेटोरिक्सने सर्व शस्त्रास्त्रे अर्पण करून हार पत्करली, तरी त्याच्या महाशक्तीशाली विरोधकांशी लढा देण्याच्या धैर्याला फ्रेंच जनता दाद देत होती. या सर्व गोष्टींचा *ॲस्टेरिक्स दि गॉल्स* (Astérix le Gaulois)मध्ये गोसिनी व उदेर्झो या जोडगोळीने फार छानपणे उपयोग करून घेतला आहे. या साहसी कथेत जेव्हा ॲस्टेरिक्स सर्व शस्त्रे सीझरच्या पायावर ठेवतो, तेव्हा सीझर विजयोद्गार न उच्चारता "ओय्.." असे ओरडून बोटावर पडलेल्या शस्त्रांना दूर सारतो! कदाचित याच वेरसॉन्जेटो-रिक्सच्या नावातील शेवटची अक्षरेच ॲस्टेरिक्सच्या पुस्तकातील ॲस्टेरिक्स, ओबेलिक्स, गेटाफिक्स, व्हायटलस्टॅटिस्टिक्स, डॉग्मॅटिक्स इ. नावे या गोतावळ्याला ओळख देणारी आहेत.

ॲस्टेरिक्स व ओबेलिक्स (व काही वेळा पूर्ण गॉलचा गोतावळा!) यांच्या साहसीवृत्तीला फक्त गॉल प्रदेशातील लुटेशिया, कोर्सिका, रोमन साम्राज्य इत्यादींच्या सीमेचे बंधन नव्हते. बेल्जियम, स्पेन, ब्रिटन, जर्मनी या युरोपीय देशांबरोबर अमेरिका, मध्यपूर्वेतील देश व भारत इत्यादी ठिकाणीसुद्धा त्यांचा

मुक्त संचार होता. ॲस्टेरिक्सच्या लेखकद्वयांनी त्यांना वैज्ञानिक कादंबरी-तल्याप्रमाणे अवकाशयात्रासुद्धा करून आणले आहे.

ॲस्टेरिक्सची पुस्तकं जगभरातील 111 लिखित व बोलीभाषेत अनुवादित झाली असून अजूनही त्यांना उत्तम प्रतिसाद मिळत आहे. फ्रेंच भाषेबरोबर एस्टोनियन, इंग्रजी, झेक, डच, जर्मन, गॅलिसिएन, डेनिश, आइसलँडिक, नॉर्वेजियन, स्विडिश, फिनिश, स्पॅनिश, कातलान, बास्क, पोर्तुगीज, इटॅलियन, ग्रीक, हंगेरियन, पोलिश, रुमेनियन, टर्किश, स्लोव्हन, वेल्श, लॅटिन इत्यादी भाषांतही स्थानिक संदर्भ देत अनुवाद करण्यात आले आहेत. ॲस्टेरिक्स मालिकेतील काही निवडक पुस्तकांचे अनुवाद एस्परांतो, आयरिश, इंडोनेशियन, फारसी, मॅन्डरिन, कोरियन, जपानी, बांग्ला, हिंदी, अरबी, हिब्रू, सिंहली, व्हिएतनामी भाषांतही उपलब्ध आहेत.

ॲस्टेरिक्सचे आशय व स्वरूप पूर्णपणे फ्रेंच असूनसुद्धा जगभरातल्या बहुतेक देशांनी त्याचे इतके स्वागत का केले असावे हा प्रश्न विचारावासा वाटतो. कदाचित याचे श्रेय इंग्रजी भाषेचा जगभरात असलेला प्रभाव व मुख्यत्वे फ्रेंचमधून इंग्रजीत अनुवाद करणारे यांना द्यावे लागेल. इंग्रजीत भावानुवाद करणारे ॲन्थिआ बेल व डेरेक हॉकरिज यांनी अप्रतिमरित्या ॲस्टेरिक्सला जगभर पोचविले आहे. त्यांनी कधीच शब्दशः भाषांतर केले नाही. फ्रेंच विनोद, फ्रेंचमधील शाब्दिक कसरती यांना इंग्रजीचा पेहराव चढविल्यामुळे इंग्रजीतील वाचक ॲस्टेरिक्स वाचत असताना आपण अनुवाद वाचत आहोत हे पूर्णपणे विसरून जातात. अशाच प्रकारचा अनुभव रशियातील अभिजात साहित्याचे इंग्रजी अनुवाद वाचताना येत असतो. गंमत म्हणजे या अनुवादकांनी मूळ नावातसुद्धा सुधारणा करून वाचकांची मनं जिंकली आहेत. काव्य व स्वरांचा गंध नसलेल्या या गॉल खेड्यातील एकमेव गायक/कवी मूळ फ्रेंचमध्ये अश्युरॉन्सटूरिक्स (Assurancetourix) या नावाने

वावरतो. परंतु त्याचे इंग्रजीतील नामकरण कॅकोफोनिक्स (कॅकोफोनी म्हणजे कर्कश, कर्णकटू) करण्यात आले. जादुई काढा तयार करणारा फ्रेंचमधील पानोरोमिक्स इंग्रजीत गेटाफिक्स ('गेट-अ-फिक्स' (उपाय करणारा) = गेटाफिक्स) या नावाने ओळखला जातो. ओबेलिक्सच्या सावलीसारखा फिरणारा त्याचा कुत्रा मूळ फ्रेंचमध्ये इदेफिक्स (इदे (आयडिआ) + फिक्स ) म्हणून वावरतो. मात्र इंग्रजीत तो डॉग्मॅटिक्स (डोग्मा आणि डॉग ह्यांचा श्लेष) होऊन वाचकांचे मनं रिझवतो. फ्रेंच व इंग्रजांचे हाडवैर असल्यामुळे इंग्रजांची खिल्ली उडविण्याचा एकही प्रसंग फ्रेंच सोडत नाहीत. तरीसुद्धा इंग्रजीतील अनुवादात या वैरत्वाचा मागमूस कुठेही सापडत नाही. उलट शब्दांची कोलांटी उडी मारून वाचकांना हसविण्यात हे दोन्ही भावानुवादक यशस्वी झाले आहेत. काही खास फ्रेंचविशिष्ट शब्दांना व त्या शब्दाबरोबर येणाऱ्या लांबलचक वाक्यांना या अनुवादकांनी पूर्णपणे फाटा देत पुस्तकांच्या वाचनीयतेत उलट भर घातली आहे. बहुतेक अनुवादक आपापल्या भाषांतील खुबींचा व त्या त्या काळातील महत्वाच्या घटनांचा, व्यक्तींचा योग्य वापर करून विनोदनिर्मितीत यशस्वी झाले आहेत. उदा. ब्रिटनमधील साहसकथेत व्हॅल्यूॲडेडटॅक्स, सिलेक्टिव्ह-एंप्लॉयमेंटॅक्स वा डबलेक्ससारखे शब्दप्रयोग वापरून 90च्या काळातील काही प्रसंगांवर बोचरी टीका केली आहे. रोमन सैनिकांच्या हातात चक्क 'हे रोमन्स क्रेझी आहेत' हे सुचविणारे SPQR (Sono pazzi questi romani)चे कापडी फलक सुद्धा दिले आहेत. *ॲस्टेरिक्स अँड दि मॅजिक कार्पेट* या ॲस्टेरिक्सच्या भारतातील साहसयात्रेत त्यांची भेट हत्तींना प्रशिक्षण देणाऱ्यांशी होते. सापाची शिडी करून वर उंचावर चढणारा गारुडी त्यांना भेटतो. एवढेच नव्हे, तर आकाशात उडणाऱ्या जादूई सतरंजीवर बसून प्रवास करून येतात. या देशातील प्रत्येक जण गंगेत आंघोळ करतो व प्रत्येकाच्या डोक्यावर पगडी असते असे त्यांना वाटते.

मुळात ॲस्टेरिक्सच्या कथानकाला एक जागतिक आकर्षण आहे. त्यातही युरोपमधील देशांमध्ये तसूभर जास्त असेल. कारण या संपूर्ण युरोपभरातील राष्ट्रे एकेकाळी रोमन साम्राज्याच्या अधिपत्याखाली होती. सत्तेत असलेल्यांना विरोध हा नेहमीच सामान्यांच्या जिव्हाळ्याचा विषय असतो. त्यामुळे सत्तेच्या विरोधात लढणारे बंडखोर हिरो ठरतात. फ्रेंच वाचकांना वेरसॉन्जेटोरिक्स, ब्रिटिश वाचकांना रोमन साम्राज्याच्या विरोधात बंड करणारी Boudicca राणी  वा वेल्श बंडखोर Caratacus, जर्मन वाचकांना हेर्मन हे ॲस्टेरिक्समध्ये दिसत असावेत. इटलीतल्या वाचकांतील मूळ विनोदबुद्धी रोमन साम्राज्यावरील टीका-टिप्पणींना हसून दाद देते. यातील नर्मविनोद कुणाच्याही जिव्हारी लागत नाहीत, हे विशेष.

कदाचित अपवाद म्हणून अमेरिकी वाचकांकडे बघता येईल. ॲस्टेरिक्सला अमेरिकेत म्हणावा तितका प्रतिसाद कधीच मिळाला नाही. अमेरिकी वाचकांना आकर्षित करण्यासाठी लेखक गॉलवासींना अमेरिकेतही घेऊन गेले, तरी फार फायदा झाला नाही. हॉलिवूड चित्रपट व डिज्नीवर पोसलेल्या अमेरिकी बाल वा प्रौढ वाचकांनी ॲस्टेरिक्सला जवळ केले नाही. त्यांच्या मते ॲस्टेरिक्स हा फारच साधा, सरळ व कुठल्याही तंत्रज्ञानांचा आधार न घेणारा हिरो आहे. त्यामुळे बॅटमॅन, स्पायडरमॅन, सुपरमॅनची सर त्याला नाही. त्याचबरोबर रोमन साम्राज्यवादाचे काही अंश अमेरिकी आधुनिक संस्कृतीतही सापडत असल्यामुळे ॲस्टेरिक्सचा स्वीकार करणे त्यांना जड जात असेल.

मुळात ॲस्टेरिक्सचा गोतावळा पूर्णपणे युरोपीय आहे. रोमन साम्राज्याचा वारसा युरोपीय राष्ट्रांत वेगवेगळ्या स्तरावर असूनसुद्धा त्या सर्वांचा इतिहास व मिथकं यांच्याकडे पाहण्याचा दृष्टीकोन मात्र सारखाच आहे. त्यामुळे अट्लांटिकच्या पलीकडल्या अमेरिकेला तो आकर्षित करू शकला नाही.

काही तज्ज्ञांच्या मते ॲस्टेरिक्सच्या पुस्तकांनी नव्या पिढीला रोमन साम्राज्याविषयी पुनर्विचार करण्यास प्रेरणा दिली. रोमन इतिहासाला उतरती कळा लागलेली होती. परंतु या पुस्तकांनी रोमन इतिहास पुनर्जीवित केला. पुरातत्त्वशास्त्रज्ञांनी या रोमनविषयक औत्सुक्याच्या संधीचा फायदा घेत प्राचीन वस्तुसंग्रहालयांची पुनर्रचना केली. *'ॲस्टेरिक्स ॲट ब्रिटिश म्यूजियम'* अशी जाहिरात करून शालेय विद्यार्थ्यांचे व इतर प्रेक्षकांचे लक्ष वेधले. संग्रहालयात रोमन इतिहासाला जिवंत करणारी विशेष दालनं उघडण्यात आली. रोमन साम्राज्यवाद म्हणजे मूळ निवासी असलेली लहानमोठी राज्ये वा परगणे जिंकून त्यांचे रोमनीकरण करणे वा त्यांच्या विरोधक बंडखोरांना संपवून टाकणे. रोमनीकरण म्हणजे लॅटिन भाषेचा वापर, अंगावर रोमनसारखे टोगांचे परिधान व सामूहिक स्नानगृहांची निर्मिती. ॲस्टेरिक्सच्या खेड्याजवळील अनेक खेड्यातील जमातींचे रोमनीकरण झाले होते. त्यांच्या बायका-मुलं रोमनांचे अनुकरण करण्यात धन्यता मानत होते. ॲस्टेरिक्स रहात असलेले खेडे मात्र रोमन साम्राज्याला विरोध करत स्वतंत्र राहू इच्छित होते. त्याचाच राग रोमन साम्राटाला होता. म्हणून तो रथ, घोडे इत्यादी लवाजम्यासकट रोमन सैनिकांची तुकडी पाठवून गॉलवासींच्या या खेड्याला संपवण्यामागे लागला होता. याचे सुंदर चित्रण *ॲस्टेरिक्स ॲंड दि बिग फाइट*मध्ये (Le Combat des chefs ) केले आहे.

ॲस्टेरिक्सच्या पुस्तकात उभे केलेले रोमन साम्राज्याचे प्रारूप तितकेसे खरे नाही. मुळात रोमन साम्राज्यात इतर राज्यांवर अंकुश ठेवू शकणाऱ्या लढवय्यांची संख्या नगण्य होती. त्या काळी एकसंध अशी रोमन संस्कृती असे काही नव्हते. रोमच्या अभिजनांना संपत्ती व शांत जीवन हवे होते. त्यासाठी मूळ निवासींनी वेळेवर कर भरावा, त्यांनी बंड पुकारू नये व शक्य होईल तितकी रोमन अभिजनांच्या कपड्यांची, वास्तूप्रकारांची, राहणीमानाची,

मनोरंजनातील प्रकारांची नक्कल करावी एवढीच त्यांची अपेक्षा होती. त्यांना आयुष्य सरळ रेषेत, कुठल्याही अडीअडचणींशिवाय जगावेसे वाटत होते. परंतु ॲस्टेरिक्स कॉमिक्सनी पूर्णपणे वेगळेच चित्र उभे केले व रोमन इतिहासाला एक सुंदर कलाटणी दिली.

चित्रपटसृष्टीतील जाड्या-रड्या जोडीने चित्रपट रसिकांवर एके काळी जादू केली. त्याचप्रमाणे पुस्तकाच्या जगात ॲस्टेरिक्स - ओबेलिक्स या जोडीनेसुद्धा एक काळ गाजविला. एकदोन पिढ्यांना मिश्किलपणे हसवले.  वाचकांचे आयुष्य सार्थकी लावल्याबद्दल जगभरातील वाचक गोसिनी व उदेर्झोचे कायम ऋणी राहतील.



# कौन बनेगा करोडपती

जगजित हा एक 20-22 वर्षाचा तरूण. त्याला अगदी बालपणापासून गाण्याची आवड. त्याचा आवाजही बऱ्यापैकी होता. त्यातही गजल प्रकार त्याचा अत्यंत आवडीचा. मोठमोठ्या गजल गायकांचे गजल तो हुबेहूब गायचा. मित्र तर त्याला जगजितसिंग म्हणूनच हाक मारायचे.  शाळा-कॉलेजच्या वा घरगुती कार्यक्रमात त्याची हजेरी असायची. घरातले, इतर नातेवाईक, शेजारी-पाजारी, मित्र-मैत्रिणी त्याच्या गाण्याचे कौतुक करायचे. टीव्हीवरील कार्यक्रमात एक-दोनदा तो भागही घेतला होता. आई-वडीलसुद्धा त्याच्या गाण्याला उत्तेजन द्यायचे. शाळा-कॉलेज संपल्यानंतर त्याला आपणही मोठा गायक होण्याची स्वप्नं पडू लागली. चित्रपट संगीतकारांकडे कुणाच्या तरी ओळखी-पाळखीने तो दोन-चार चकराही मारून आला. खोट्या आश्वासनाव्यतिरिक्त पदरी काही पडले नाही. कुठेही डाळ शिजत नव्हती. शेवटी (वैतागून) स्वतःचीच स्टेज शो करणारी कंपनी का काढू नये हा विचार त्याच्या मनात येऊ लागला. जर भिकार, भकास आवाज असलेले म्युजिक शो करून खोऱ्याने पैसे कमावतात तर आपण का या धंद्यात पडू नये असे त्याला वाटू लागले. आपल्या कलागुणांना वाव मिळावा, चार पैसे कमवावे, इतर सहकलाकारांनाही संधी द्यावी असले विचार त्याच्या डोक्यात शिरू लागले. जेथे जेथे त्याचे (मराठी) गजल सर्व ऐकत आहेत, त्याच्या शोला गर्दी जमते, अशी स्वप्न तो पाहू लागला.

त्याची ही स्वप्नं प्रत्यक्षात उतरतील का?

माझ्या मते त्याचे हे स्वप्न खरे होण्याची शक्यता 10 टक्कयापेक्षा कमी असेल. हाही एक अपयशी कलाकार म्हणून काळाच्या पडद्याआड जाईल. त्याच्यासारखी अशी स्वप्नं पाहिलेले हजारो गायक, वादक, लेखक, कवी, फोटोग्राफर, नाटककार,पडद्याआड गेले आहेत, याचीही त्यानी दखल

घेतल्यास तो अशी स्वप्नं उराशी बाळगलाच नसता. सगळया प्रसिद्धी माध्यमांना यशस्वी लोकांचीच गोष्ट सांगाविशी वाटते. गरीबीत वाढलेला कसा श्रीमंत झाला, उद्योगपती झाला,  या गोष्टी वाचण्यात लोकांचा रस असतो. मागणी तसा पुरवठा या तत्वाप्रमाणे वार्ताहर/लेखक अशा गोष्टीलाच जास्त फुलवून सांगत असतात. अनेक वेळा काही गोष्टी लपवून यशाची एकच बाजू आपल्यासमोर मांडत असतात. आपल्याला मात्र ते सगळे खरेच आहे असे वाटू लागते.  अपयशी कलाकारांच्या कर्तृत्वांची दर्दभरी कहाणी सांगण्यात कुठल्याही वार्ताहराला वा लेखकाला इंटरेस्ट नाही. काही वेळा अपवादात्मक-रित्या एके काळी गाजलेल्या कलाकारांच्या दुर्दैवी अंताच्या बद्दल कुठल्या तरी नियतकालिकेतील रकाने भरलेले सापडतीलही. परंतु अगदीच अपवाद म्हणून.

कौन बनेगा करोडपती ही टीव्ही मालिका सोफ्यावर बसून बघत असताना अमिताभ बच्चन विचारत असलेल्या सर्व प्रश्नांची अचूक उत्तरं (कुठेही फोन न करता वा कुठल्याही व्यक्तीची मदत न घेता!) आपल्याला माहित आहेत असेच वाटत असते. त्यामुळे  करोडपती होणे इतके कठिण नाही अशी एक (गैर) समजूत आपण मनात बाळगून  असतो. परंतु हॉटसीटवर बसलेला(ली) दुसरीच व्यक्ती  मोठीची  मोठी रक्कम घेऊन जाते, तेव्हा टाळया वाजवण्याव्यिरिक्त आपण काहीही करू शकत नाही. अशा प्रकारच्या तद्दन सुमार कार्यक्रमात भाग घेण्यासाठीसुद्धा अनेक डावपेच खेळावे लागतात हे आपण विसरतो. त्यामुळे जगजितच्या स्वप्नातली कंपनी प्रत्यक्षात उतरण्यासाठी नुसतेच फक्त गाता येते हे पुरेसे नाही. स्पर्धेत उतरून पैसे कमवण्यासाठी आणखी काही गोष्टी लागतात व त्या गोष्टी आपल्याकडे नाहीत याचे भान ठेवणे गरजेचे आहे. त्यामुळे सेल्फ-हेल्पची पुस्तकं वाचून अजूनपर्यंत कुणीही श्रीमंत झालेला नाही हेही लक्षात ठेवावे लागते.

खरे पाहताही तरुणांच्या अस्तित्वाच्या प्रश्नांशी  स्वप्नं निगडित आहेत. सकारात्मक विचार करावा, संधीच्या शोधात असावे, संधी एकदाच येते, आलेली संधी सोडू नये हे वाचण्यापुरते ठीक आहे. प्रत्यक्ष व्यवहारात हे काही जमण्यासारखे नाही हे लक्षात येते. आपल्याच मित्रापैकी एखादा (अती) उत्साहाने स्टार्ट अप् कंपनी काढतो. आपल्यालाही त्यात भागीदारी वा हिस्सा देण्याचे आश्वासन देतो. आपणही हुरळून जातो. परंतु तो प्रस्ताव पुढे सरकतच नाही. 3-4 वर्षे झाल्यानंतर ती कंपनी गुंडाळल्याची बातमी कळते. बर झालं आपण सुटलो असे सुस्कारा सोडतो. याचा अर्थ सगळीकडे सगळयांच्या बाबतीत असे घडते असेही नाही. एका यशस्वी कंपनीच्या मागे शंभर अयशस्वी कंपन्या आहेत हेही लक्षात ठेवणे गरजेचे आहे. परंतु ज्या पद्धतीने उत्तुंग शिखरे गाठल्यांची चित्रं रंगवली जातात, ते मात्र खरे नसते. कुणीतरी आपल्याला अमुक अमुक समभाग घ्या, अमुक अमुक म्युच्यअल फंडमध्ये पैसे गुंतवा, 2-3 वर्षात 15-20 टक्के परतावा मिळेल असे छातीठोकपणे सांगणाऱ्यांचे एका कानाने ऐकावे व दुसऱ्या कानाने सोडून द्यावे. अशा प्रकारे सांगणाऱ्यांचे व त्याबद्दल रकानेच्या रकाने लिहिणाऱ्यांचे कधीच बळी पडू नये.  अमुक अमुक अवधीत तुमचे पैसे दुप्पट करून देतो अशा जाहिरातीला बळी पडून पैसे गुंतवल्यावर पैसेही गुल् व कंपनीही गुल्.

या अविचारी व तर्कशून्य (दुष्ट)चक्रातून बाहेर पडून आपले अस्तित्व टिकवण्यासाठी नेमके काय करावे हा प्रश्न नक्कीच जगजित विचारेल. यासाठी सर्वात पहिल्यांदा आपल्याला यशाची व्याख्या बदलावी लागेल. पैसा, प्रसिद्धी, सत्ता वा चंगळवादी जीवनशैली म्हणजेच यश हे डोक्यातून काढावे लागेल. आयुष्यात सगळे काही पटकन हवे, आजच, आताच हा हट्टाग्रह सोडण्याची तयारी हवी. आपल्या कर्तृत्व शक्तीवर आपला विश्वास असावा. कुणीतरी सांगितले म्हणून मी केले असे कधीच होऊ देता कामा नये. आपण

करत असलेल्या प्रत्येक गोष्टीला आपणच जबाबदार आहोत हे मनात पक्के असावे. सर्वात महत्वाचे म्हणजे बौद्धिक व/वा शारीरिक कष्ट घेतल्याशिवाय प्रामाणिकपणे जगता येत नाही हे लक्षात ठेवावे. जगात काहीही फुकट मिळत नाही. ते जरी आता फुकट वाटत असले तरी त्याची पुरेपूर किंमत कधीतरी वसूल केली जाते.

प्रत्येकाचे एक विशिष्ट  व्यक्तिमत्व असते. काही बलस्थाने असतात. काही मर्यादा असतात. आणि या गोष्टी थोड्याशा थंड डोक्याने विचार केल्यास प्रत्येकाला हे कळू शकतात. त्यासाठी अती खर्चिक सल्लागाराकडे जायची गरज नाही. आपण आपल्या अस्तित्वाचा प्रश्न सोडवू शकतो. आपण आपल्या पायावर उभे राहू शकतो. आपण कुणाच्या मिंद्यात नाही हेसुद्धा आपल्याला भरपूर समाधान देऊ शकते. जरा सबूरीने विचारपूर्वक कृती केल्यास  काही मर्यादेपर्यंत तुमची स्वप्नं पुरे होतात. फक्त यशाबरोबर अपयशाकडे बघण्याचा दृष्टिकोन बाळगणे  गरजेचे आहे. ते वेदनादायक असले तरी त्याला पर्याय नाही.



# पुस्तकवेड्यांची अजब दुनिया!

पुस्तक हाच विषय केंद्रस्थानी ठेऊन लिहिलेली पुस्तकं इंग्रजी साहित्यविश्वात मोठ्या प्रमाणात आढळतात. तसे पाहिल्यास मराठी साहित्यात अशी पुस्तकं फारच कमी प्रमाणात असावेत. मराठी साहित्यिकांना हा विषय कदाचित गौण वाटत असावा. परंतु पुस्तकसंस्कृती रुजवण्यात अशा प्रकारच्या पुस्तकांचा वाटा फार मोठा आहे.

मुद्रणाचा शोध सहाशे वर्षांपूर्वी झाला तेव्हापासूनच पुस्तकासंबंधी मोठ्या प्रमाणात विचार व कृती केले जात असावेत. वाचकांच्या हातात पुस्तक देत असताना तो एक अमूल्य ठेवा म्हणून ठेवला जात असावा. पुस्तक केवळ निर्जीव वस्तू नव्हे तर त्यामागे दडलेले विचार व लेखनाचे उद्दिष्ट यांनाही जास्त महत्त्व आहे, याची दर्दी वाचकांना नक्कीच जाण  असावी.  तर अशाच प्रकारचा ग्रंथ ठेवा नितीन रिंढे यांनी ‘लीळा पुस्तकांच्या’ या ग्रंथरूपात वाचकापर्यंत पोचवला आहे

लेखकांनी आपल्या प्रस्तावनारूपी विषयांतर या प्रकरणात मराठी पुस्तकसंस्कृतीबद्दल काही प्रश्न उपस्थित केले आहेत. महाराष्ट्रीयांच्या असलेल्या व/वा नसलेल्या पुस्तकसंस्कृतीचा लेखाजोखा मांडत असताना पुस्तकाविषयीची पुस्तकं हे दालन मराठीत फार समृद्ध नाही अशी खंत ते व्यक्त करतात. मुळात पुस्तकसंस्कृती आकाराला येण्यासाठी पुस्तकप्रेमी (bibliophile) व पुस्तकवेडे (bibliomaniac)   अशा दोन्ही प्रकारचे लोक मोठ्या संख्येने असावे लागतात. पुस्तकप्रेमी/ग्रंथप्रेमी कुणाला म्हणावे व पुस्तकवेडे कुणाला म्हणावे याचे काही निकष ठरवता येतील. काही पुस्तकसंग्राहकांना एका विशिष्ट विषयाला/ लेखकाला/ प्रकाशकाला अनुसरून व त्यांना उपयुक्त अशा पुस्तकांचे वाचन व संग्रह करण्यावर भर असतो अशा व्यक्तींना  आपण पुस्तकप्रेमी असे ढोबळपणे म्हणू शकतो. परंतु

पुस्तकवेडे ही कॅटेगरी मात्र फार वेगळी आहे. त्यांना पुस्तकातील आशय व त्यातील विचार यांच्यापेक्षा इतर बाह्य गोष्टीवरच लक्ष जास्त असते. पुस्तकांचा जुनाटपणा, पुस्तकांची पहिली आवृत्ती, लेखकाने सही केलेली पुस्तकं, लेखक/अभ्यासक यांनी पानाच्या मार्जिनमध्ये केलेल्या नोंदी व टीका-टिप्पणी, इत्यादींच्यावर त्यांच्या पुस्तकसंग्रहाचा रोख असतो. यासाठी ते जिवाचे रान करतात; वणवण फिरतात; रद्दी उपसून काढतात व आपले ईप्सित पूर्ण करून घेतात.

आजसुद्धा आपल्या महाराष्ट्रात अशा पुस्तकप्रेमी/पुस्तकवेड्याची कमतरता नाही. उदाहरणार्थ, आपल्या बेळगावचे शंकरराव चाफाडकर, बदलापूरचे श्याम जोशी, मुंबईचे सतीश काळसेकर, सांगलीचे डॉ. तारा भवाळकर इ.इ. नावं पुस्तकदर्दींच्या  यादीत अग्रक्रमाने कोरले जातील. तरीसुद्धा पाश्चात्य देशातील पुस्तकवेड्यांच्या तुलनेत ही संख्या अगदीच तुरळक असणार. कदाचित डॉ बाबासाहेब आंबेडकर व महात्मा फुले यांच्या कालखंडापूर्वी बहुजनांसाठी ज्ञानाचे दरवाजे बंद होते व त्यामुळे पुस्तकप्रेमी व पुस्तकवेड्यांची संख्याही कमी असावी. वाचक वर्गात सर्व जाती स्तरांचा समावेश होण्याची प्रक्रिया अद्यापही पूर्ण झालेली नाही असे लेखकांचे मत आहे

लेखकाला अत्यंत आवडलेल्या वॉल्टर बेंजामिन या जगावेगळ्या संग्राहकाविषयी लिहिताना कुठल्याही संग्राहकात बेशिस्तपणा व विक्षिप्तपणा असल्याशिवाय तो पट्टीचा संग्राहक होऊ शकत नाही, असे उल्लेख करतात. वॉल्टर बेंजामिन (1892-1942) हा एक जर्मन लेखक. ‘सिलेक्टेड रायटिंग्ज’ (पाच खंड), पत्रव्यवहाराचे खंड, ‘आर्केड प्रोजेक्ट’ व आयुष्यभर जमवलेल्या वैशिष्ट्यपूर्ण संग्रहांचा वेध घेणारा ‘अर्काइव्हज’ अशा ग्रंथसंपदांचा हा लेखक. हा रूढार्थाने अकॅडमिक स्कॉलर नव्हता. भाषिक विश्लेषण करणारा असला

तरी तो भाषावैज्ञानिक नव्हता. धर्मशास्त्रात रस होता तरी तो धर्मशास्त्रज्ञही नव्हता. विसाव्या शतकात पूर्ण आयुष्य घालवत असला तरी एकोणिसाव्या शतकाने त्याला जंग जंग पछाडले होते. जुन्या वस्तू, जुनी पुस्तकं यांच्या वेडापायी तो मरेपर्यंत एकोणिसाव्या शतकातील युरोपियनाप्रमाणे तो जगत होता, वागत होता. एका प्रकारच्या विषण्णतेची गडद छाया त्याच्या आयुष्यात पसरलेली होती. त्यातच त्याचा दुर्दैवी अंत झाला.

वयाच्या पंधराव्या वर्षापासून पुस्तकाने पछाडलेल्या स्टुअर्ट केली यानी 'द बुक ऑफ लॉस्ट बुक्स'मध्ये प्राचीन काळापासून आतापर्यंत नाहिशा झालेल्या पुस्तकांचे वर्णन केले आहे. कागदावर उमटलेली अक्षर/शब्द (व विचार) कधीना कधीतरी पुसून जाणार याचे प्रत्यंतर स्टुअर्ट केलीला आले. कारण लिहिण्यासाठी वापरला जाणारा कागदच मुळात नाशवंत आहे. तो सहज फाडता येतो. वेगाने तो जळतो. उंदीर, वाळवी यांचं ते खाद्य आहे. एवढेच नव्हे तर कागदाच्या व त्यावरील शाईच्या अंतर्गत घडणाऱ्या रासायनिक प्रक्रियेमुळे तो काळाठिक्कर/पिवळाधम्मक पडून अक्षरं पुसली जातात. जीर्ण होऊन त्याचे तुकडे तुकडे होऊ शकतात. त्यामुळे पुस्तकांना काहीतरी निमित्त घडून नष्ट होण्याचा धाक असू शकतो. गंमत म्हणजे स्टुअर्ट केलीच्या मते पुस्तकं नाहिशा होण्याचा एक सर्रास आढळणारा प्रकार म्हणजे तो जाणीवपूर्वक नष्ट करणे. स्वतःला मान्य नसणाऱ्या विचारसरणीची पुस्तकं जाळून टाकण्याची परंपरा अलेक्झांड्रियाच्या लायब्ररीतील पुस्तके जाळून खाक करण्यापासून हिट्लरच्या काळात सार्वजनिकरित्या पुस्तकांची होळी करेपर्यंत अनेक वेळा अनेक ठिकाणी टिकून आहे. स्टुअर्ट केलीने ग्रीक काळापासून एकोणिसाव्या शतकापर्यंत नष्ट झालेल्या पुस्तकांचा मागोवा घेतला व 'द बुक ऑफ लॉस्ट बुक्स' हे छानसे पुस्तक लिहिले.

पुस्तकाचा इतिहास हासुद्धा एखाद्या पुस्तकाचा विषय असू शकतो, याबद्दल लिहिताना याविषयीचे अनेक पुस्तकांचे उल्लेख नीतीन रिंढे करतात. मार्गारेट विल्स या लेखिकेचे 'रीडिंग मॅटर्स', अँड्र्यू पेटिग्री यांचं 'दि बुक इन द रिनेसान्स', अ का प्रिओळकर यांचे 'द प्रिंटिंग प्रेस इन इंडिया', नॅशनल बुक ट्रस्ट तर्फे प्रसिद्ध झालेले 'हिस्टरी ऑफ प्रिंटिंग अंड पब्लिशिंग इन इंडिया', शरद गोगटे यांचे 'मराठी ग्रंथ प्रकाशनाची दोनशे वर्षे', अभिजित गुप्ता संपादित 'प्रिंट एरिया', 'मुव्हेबल टाईप' इत्यादी पुस्तकांचा उल्लेख ते करतात.

पण 'कॅसानोव्हा वाज अ बुकलवूहर अँड अदर नेकेड ट्रुथ्स अँड प्रव्होकेटिव्ह क्युरिअसिटीज अबाउट द रायटिंग, सेलिंग अँड रीडिंग ऑफ बुक्स' असं लांबलचक शीर्षक असलेल्या जॉन मॅक्सवेल हॅमिल्टन याच्या पुस्तकाबद्दल मात्र ते भरभरून लिहितात. हॅमिल्टन हा पत्रकार असल्यामुळे गेली दोन-तीनशे वर्षातली मिळालेली भरगच्च माहिती पुस्तकभर विखुरलेली आहे व हॅमिल्टनने ती मनोरंजकपणे सादर केली आहे. पुस्तकाच्या शीर्षकातच मिस्कीलपणा उठून दिसतो, हे मान्य करायला हवे. खरे पाहता कॅसानोव्हाची बाईलवेडा, रंगेल, छंदीफंदी अशी प्रतिमा असल्यामुळे त्याचा पुस्तकाशी काय संबंध हा प्रश्न वाचकांच्या मनात उमटणे साहजिकच आहे. परंतु हॅमिल्टन या लेखकाच्या मते मात्र कॅसानोव्हा एक हाडाचा पुस्तकवेडा होता. त्याने इतर अनेक उद्योग केले असले तरी त्याला लेखक म्हणून घ्यायला आवडायचे. त्यासाठी त्यांनी अनेक अभिजात पुस्तकांचे भाषांतर केले. आपले लेख छापून आणण्यासाठी दोन मासिकं चालवली. इतिहास, तत्त्वज्ञान अशा गंभीर विषयावर लेखन केले. कविता रचल्या. नाटकं लिहिली. नास्तिक मताचा समर्थन केलं. नंतरच्या काळात लैंगिक आशय असलेली कविता वाचून दाखवल्याचा आरोप त्याच्यावर ठेवण्यात आला. पुस्तकांमुळे त्याला तुरुंगवास भोगावा लागला. तसाच तो पुस्तकामुळे तुरुंगातून निसटूही शकला.

पाश्चात्य  साहित्यविश्वात अल्बर्टो मँग्वेल यांचा समीक्षक, कादंबरीकार आणि अनुवादक म्हणून दबदबा आहे. पण अलीकडच्या काळात पुस्तकाविषयीच्या पुस्तकांचे लेखक म्हणून त्याची एक नवी ओळख तयार झाली आहे.  'लायब्ररी ॲट नाईट' या ग्रंथालयकेंद्रित पुस्तकात ग्रंथालयाचा इतिहास गुंफला आहे. त्याच्या मते ग्रंथालयातील पुस्तकं रात्रीच्या वेळी एकमेकांशी संवाद साधतात म्हणून तो शक्यतो दिवसा पुस्तकं वाचतो. ग्रंथालयाच्या जन्माची कथा उलगडताना त्याचं नातं अलेक्झांड्रिया ग्रंथालयाशी तो   जोडतो. ग्रंथालयाची स्वतःची एक आयडेंटिटी असून आजच्या आत्मकेंद्री, असहिष्णू व विषारी समाजकारणावर ग्रंथालयातून प्रसवणारी बहुसांस्कृतिकता रामबाण उपाय ठरेल, असे त्याला वाटते. पुरेशी जागा नाही या सबबीखाली जेव्हा ग्रंथालय आपले संग्रह निकालात काढतात तेव्हा ती राष्ट्रीय संपत्तीची हानी असते, याचे अनेक दाखले मँग्वेलनी 'लायब्ररी ॲट नाईट'मध्ये दिलेली आहेत.

लेखक रिंढे यानी वर्णन केलेल्या झोरान झिवकोविच या सर्बियन लेखकाच्या 'द लायब्ररी' या कथासंग्रहातल्या कथेमधील जग पुस्तकांनीच व्यापलेले  आहे. एका कथेत पुस्तकांनी घराचा पूर्ण ताबा घेतल्यामुळे मालकाला घराबाहेर काढलेल्या भयस्वप्नाचे वर्णन आहे. अजून एका कथेत नायक मृत्यूनंतर नरकात जातो. परंतु त्याला उकळत्या तेलाच्या कढईत किंवा आगीत होरपळण्याच्या शिक्षा देण्याऐवजी ग्रंथालयात अनंत काळपर्यंत वाचत बसण्याची शिक्षा दिली जाते. नरकातील कारकुनाच्या नोंदीप्रमाणे हा माणूस जिवंतपणे फक्त दोन पुस्तकांना हात लावलेला असतो; त्यापैकी एका पुस्तकाची चार पाने व दुसऱ्या पुस्तकातील एक परिच्छेद एवढेच वाचन केल्यामुळे त्याला ही जबरदस्त शिक्षा  सुनावली जाते.

पुस्तकांच्या जगातील अनभिषिक्त सम्राटाचा दर्जा वाचकांचा असतो.

लेखकसुद्धा त्यांच्यासमोर गौण ठरतो. वाचक नावाची एक नवीन प्रजातीच मुद्रण व्यवसायानंतर जन्माला आली असे म्हणावयास हरकत नाही. एकेकाळची श्रोत्यांची जागा वाचकांनी घेतली. अशाच वाचकांच्याभोवती इतालो केल्विनोचा 'इफ ऑन अ विंटर्स नाइट अ ट्राव्हलर' व मार्सेल बुनोबुचे 'डम्प धिस बुक व्हाइल स्टिल यू कॅन' या कादंबऱ्या लिहिल्या आहेत. याचेच वर्णन लेखकानी एका प्रकरणात केले आहे. रिंढे यांच्या मते पुस्तकाशी असणार वाचकांच नातं जेवंढ आनंददायक असतं तेवढच यातनादायकही असतं. पण हे अशा आनंददायक - यातनादायक नातं कादंबरीत उलगडत जातं तेव्हा आपल्यासारखे वाचक नक्कीच सुखावतात.

पुस्तक आणि माणूस यांच्यातील नातेसंबंध हे युरोपियन संस्कृतीतील विविध पैलूतील  महत्त्वाचा पैलू असे म्हणता येईल. या नात्याचे  अनेक छटा कादंबरीत व्यक्त होत असतात. मिग्वेल डी सेर्व्हांटिस  याचे 'डॉन किहोते' या साहसवेड्याची कादंबरी असो,  की पास्कल मेसिअर याचे 'नाईट ट्रेन टु लिस्बन' असो किंवा कार्लोस  झाफोनचा 'द शॅडो ऑफ द विंड' असो त्यांच्या आशयातील वैचित्र्यामुळे वाचक खिळून जातो. 'द शॅडो ऑफ द विंड'मध्ये पुस्तकाच्या कबरस्तानाची कल्पना लढवली आहे. जी पुस्तकं वाचली जात नाहीत अशा विस्मृतीत जमा झालेल्या पुस्तकांना या कबरस्तानात आश्रय मिळतो. या कादंबरीतील नायक  एकदा फक्त शीर्षक वाचून पुस्तक विकत घेतो व रात्रभरच्या प्रवासात व्यक्तीशोधाबद्दलचे हे पुस्तक वाचून संपवतो. पुस्तकात केवळ व्यक्तीचा शोध नसून पोर्तुगालमधील सालाझार राजवटीची जुलुमशाही आणि व्यक्तींची नैतिकता म्हणजे काय या प्रश्नाचा शोध घेतलेले असते. खरे पाहता शोध घेणं हा मुळातच लोकप्रिय रहस्यकथांचा आकृतीबंध. परंतु या कादंबरीत हा शोध वेगळया पातळीवर होतो.

आपल्याला कादंबरीचा विषय कसा सुचला, आपण कादंबरी का लिहिली या विषयावरील लेखन उम्बर्टो इकोसारख्या लेखकांनी केले आहे. त्याचे याविषयीचे ‘कन्फेशनस ऑफ अ यंग नॉव्हेलिस्ट’ हे पुस्तक गाजले त्याचेच अजून एक ‘सिक्स वॉक्स इन द फिक्शनल वुड’ हे पुस्तकसुद्धा याच विषयाशी संबंधित आहे. मारियो वऱ्हास योसा  या लॅटिन अमेरिकन लेखकाचे ‘राईटर्स रिअलिटी’  आणि टर्की लेखक ओरहान पामुक यांचे ‘द नाइव्ह अँड द सेंटीमेन्टल नॉव्हेलिस्ट’ ही पुस्तकंसुद्धा कादंबरीकाराच्या लेखन प्रक्रियेवर झोत टाकतात. उम्बर्टो इको  यांनी संगणक व माध्यमक्रांती यामुळे मानवी जीवनात गेल्या अर्धशतकात जे मोठे परिवर्तन घडून आले त्या विषयी भरपूर लेखन केले आहे गंमत म्हणजे वयाच्या सत्तावन्नाव्या वर्षी पहिली कादंबरी लिहिलेला हा ‘यंग’ कादंबरीकार गोष्टीरूपातच समीक्षा, सदरलेखन, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र इत्यादीवर लिहितो. आपला पीएच डीचा प्रबंधदेखील एखाद्या गुप्तहेर कथेसारखे लिहिल्यामुळे परीक्षकांची नाराजी त्याला पत्करावी लागली. अकादमिक वर्तुळातील विद्वान समीक्षक अशा प्रकारच्या गोष्टीवेल्हाळांना तुच्छ लेखतात. परंतु वाचक मात्र खूश असतात.

झपाटलेपणा हासुद्धा पुस्तकवेडासाठी पुरेसे कारण ठरेल. झपाटलेपणाचा असा कोणताच फॉर्मुला नसतो. कोणत्या क्षणी, कशामुळे, कोणामुळे माणसं झपाटले जातील, हे सांगता येत नाही. परंतु झपाटून जाणं हे आयुष्यभर पुरू शकतं. अशाच एका झपाटलेल्या अत्तरविक्याची गोष्ट एका पुस्तकाचा विषय आहे. झॅग ग्युरिन ह्याला मार्सेल प्रूस्त या फ्रेंच कादंबरीकाराने झपाटले होते  या कादंबरीकाराच्या प्रेमात पडल्यानंतर ग्युरिनने प्रूस्तच्या मिळतील त्या प्रकाशित/अप्रकाशित पुस्तकं, त्यानी हाताळलेल्या वस्तू, त्याच्यावरील नाटकं/चित्रपट इत्यादींची पुनर्मांडणी करत प्रूस्तला अजरामर करण्याचा वसा

तो पत्करतो. लोरेन्झा फोशिनी या संशोधिकेने लिहिलेल्या ‘प्रूस्तस् ओव्हरकोट’ या पुस्तकामुळे झॅग ग्युरिनची कथा जगाला कळाली.

आर्तुरो पेरेझ – रिवेर्ते हा स्पॅनिश रहस्यकथा लेखक. त्यानी लिहिलेले ‘द्युमाज क्लब’ हे पुस्तक सर्वसाधारण वाचकांसाठी एक रहस्यकथा असू शकेल. पण एखाद्या पुस्तकवेड्या वाचकाला हे पुस्तक आणखी वेड लावेल. जुन्या दुर्मिळ पुस्तकांच्या हस्तलिखितांचा ठावठिकाणा शोधणं, हस्तलिखितांच्या वा पुस्तकांच्या प्रती खऱ्या आहेत की बनावट हे शोधणं या भोवती हे पुस्तक विणलेले आहे. दुर्मिळ पुस्तकांचे मूल्य कशावरून ठरते, त्यांची खरेदी-विक्री कशी होते, इत्यादीविषयीची चर्चा या कादंबरीत जागोजागी आहे. नकली प्रती तयार करणारे लोक, त्यासाठी कागद-शाई जुनी दिसावी यासाठी वापरलेल्या करामती, वेगवेगळया कालखंडातील छपाई व पुस्तक बांधणीच्या तंत्रांचा बारकाईने केलेला अभ्यास, त्या त्या काळच्या अक्षरांच्या टाइपमध्ये होत गेलेले बदल इत्यादीबद्दल वाचताना वाचक थक्क होतो.

‘अॅट होम विथ बुक्सः हाऊ बुकलव्हर्स लिव्ह अँड केअर फॉर देअर लायब्ररीज’ या कॉफी टेबल टाइपचे हे पुस्तक इस्टेले इलियास, कॅरोलिन सीबॉम आणि क्रिस्तोफर सिमॉन सेइक्स या तिघानी मिळून लिहिले आहे. पुस्तकाच्या शीर्षकातच एक प्रकारचा निवांतपणा आहे, विनाव्यत्यय जवळीक, एकांत आहे, पुस्तकप्रेमाची ऊब आहे. ऐसपैस मोठ्या आकाराच्या या पुस्तकात पानोपानी विखुरलेल्या छायाचित्रांमधून पुस्तकाने भरभरून वाहणारी जिने, भिंती, टेबल, कपाट, खुर्च्या, खिडक्यांची कठडे यांना बघताना वाचक वेडा होतो. मजकुरात जितकं बोलतं त्याहून कितीतरी पटींनी छायाचित्रातून पुस्तकीवेडेपणाचे दर्शन हे पुस्तक घडवतं. छायाचित्रांमध्ये पुस्तकात बुडालेले पुस्तकवेडे, लेखक. वाचक आपल्याला दिसतात. त्यांच्या

चेहऱ्यावरील पुस्तकाबद्दलचा जिव्हाळा उठून दिसतो.

खरे पाहता पुस्तक वेड्यांच्याबद्दलच्या पुस्तकात बुकशेल्फ वरचा लेख काहीसा असंबद्ध वाटेल.  बहुतेक पुस्तकवेड्यांचे पैसे पुस्तक खरेदीतच खर्च होत असल्याने पुस्तकासाठी कपाट बनवून घेण्यात टाळाटाळ करण्यकडे त्यांचा कल असतो. पुस्तकं कमी असतात तेव्हा घरात त्या कुठेही पसरलेले असतात. पुस्तक कुठेही तुम्ही ठेवलात तरी बिचारे अंग चोरून घेऊन बसतात; उभी राहतात; आडवे पडतात. परंतु जेव्हा पुस्तकांची संख्या वाढत जाते तेव्हा मात्र बुकशेल्फची आठवण येते. बुकशेल्फचे विविध आकार, त्याची रचना संग्राहकाच्या/ग्रंथालयाच्या कुवतीप्रमाणे बदलत जातात. या बुकशेल्फचा अतिशय रोचक इतिहास हेन्री पेट्रोस्की याच्या 'द बुक ऑन बुकशेल्फ' (बुकशेल्फवर ठेवलेले पुस्तक या अर्थाने नव्हे!) या पुस्तकात वाचावयास मिळते.

आपण वाचत असलेल्या/वाचून संपवलेल्या पुस्तकांतलं  आपल्या किती व काय काय लक्षात राहते असे एखाद्या पुस्तकप्रेमीला विचारल्यास ती व्यक्ती अडखळते. कारण वाचलेल्या पुस्तकांची संख्या प्रचंड असल्यामुळे सर्वकाही लक्षात ठेवणे अशक्य होते. परंतु यावर उपाय म्हणून अनेक पुस्तकप्रेमी पुस्तक वाचत असतानाच मार्जिनमध्ये नोंदी ठेवतात, पेन/पेन्सिलीने खुणा करतात, काही वाक्य/शब्द अधोरेखित करतात. वैयक्तिक पुस्तकातील समासातील या विद्रुपीकरणाला (मार्जिनालियाला) सर्व गुन्हे माफ! 'परफ्युम' या जगप्रसिद्ध फ्रेंच कादंबरीचा लेखक पॅट्रिक झस्किंड याने या समासातील नोंदीचा मागोवा घेत 'थ्री स्टोरीज अँड अ रिफ्लेक्शन' हे पुस्तक लिहिले आहे. वाचनसंस्कृतीविषयीच्या संशोधनात मार्जिनालिया हा एक महत्त्वाचा अभ्यासविषय बनला आहे. एच जे जॅक्सन या संपादक-विदुषीने लिहिलेलं

‘मार्जिनालियाः रीडर्स रायटिंग इन बुक्स’ या पुस्तकाचा नीतीन रिंढे आवर्जून उल्लेख करतात.

पुस्तकाचे विक्रीयोग्य दर्शनीय  भाग म्हणजे त्याचे मुखपृष्ठ. परंतु बहुतांश वाचक  मुखपृष्ठावर न रेंगाळता लगेच पान उलटून मजकूर वाचू लागतात. मुखपृष्ठ कितीही कलात्मकतेने सजविले असले तरी वाचक, समीक्षक, पुस्तकाचे मूल्यमापन करणारे, इत्यादी घटकांकडून कायमच दुर्लक्षित केलेली ही बाब असते.  पुस्तकाच्या अशा अतीपरिचित परंतु पूर्ण दुर्लक्षिलेल्या मुखपृष्ठांचा इतिहास ॲलन पॉवर्स या लेखकाने ‘फ्रंट कव्हर’ या पुस्तकात दिला आहे.

वाचनाविषयी उदासीन असलेल्या या समाजात पुस्तकं जमविणारे आणि ते वाचणारे साहजिकच अल्पसंख्य आहेत. परंतु पुस्तकप्रेमी व पुस्तकवेडे आपण जमवलेली सर्वच्या सर्व पुस्तकं वाचतीलच  याचा  नेम नाही.  पुस्तक दिसले की अधाश्यासारखे विकत घेतील व सवड मिळेल तेव्हा केव्हातरी वाचून काढतील.  आपण पुस्तक वाचले नाही याची खंत मात्र त्यांना अस्वस्थ करते. वाचनाविषयी अपराधगंड दूर करणारे ‘हाऊ टू टॉक अबाऊट अ बुक यू हॅवन्ट रेड’ हे पुस्तक असून त्याचा लेखक आहे पियरे बायर्ड. पुस्तकप्रेमींच्या न वाचण्यामागचा तत्त्वज्ञान सांगणारे हे पुस्तक आहे.

नितीन रिंढे यांनी या पुस्तकातील एका प्रकरणात हिंदू या दैनिकात सदर लिहिणाऱ्या प्रदीप सेबॅस्टीअन  या भारतीय लेखकांच्या ‘ग्रोनिंग शेल्फ’ या पुस्तकाबद्दल लिहिले आहे.  पुस्तके गोळा करणे, त्याची मांडणी, पुस्तकांचे मुखपृष्ठ. त्याची बांधणी, पहिल्या आवृत्तीचा संग्रह करणारे नादिष्ट, पुस्तकाविषयी पुस्तक लिहिणारे लेखक, पुस्तकांचे इतिहासकार,  जगातील काही मोठी व उत्तम पुस्तकांची दुकाने, पुस्तकाविषयीचे चित्रपट,

पुस्तकाविषयीच्या कादंबऱ्या, पुस्तकाविषयीचे वेबसाईट, ई-बुक रीडर अशा विविध विषयावरील मुक्तचिंतन या पुस्तकात आहे.

माणूस  पुस्तक का वाचतो या प्रश्नाचे उत्तर जॉन कॅरे ('द अनएक्स्पेक्टेड् प्रोफेसरः ॲन ऑक्सफर्ड लाईफ इन बुक्स' या पुस्तकाचे लेखक) यानी मार्मिकपणे दिलेले आहे. विचार करण्याचे, अनुभव घेण्याचे अनेक मार्ग वाचन खुले करते;  वाचन चिकित्सेला बळ देते; तुमच्या धारणा, विचार यांच्यातील एकांगी ठामपणा डळमळीत करते; साध्या गोष्टींमधल्या असामान्यत्वाचे भान देते; वाचन तुम्हाला दुसऱ्याच्या मनात प्रवेश मिळवून देतो आणि त्या दुसऱ्यांना ती तुमच्या व्यक्तिमत्त्वाचा हिस्सा बनवते; वाचन म्हणजे तुम्हाला पडलेल्या तुमच्या अस्तित्वाच्या विचारशक्तीच्या त्रासापासून मुक्त होणारी गोष्ट.

लेखकाने इतर काही प्रकरणात एका नामांकित विद्यापीठातील प्राध्यापक दुर्मिळ पुस्तकांचा विक्रेता कसा बनला याबद्दल,  पुस्तकचोराच्या मागोवा घेतलेल्या गुप्तहेराबद्दलच्या पुस्तकाबद्दल, शब्दकोश तयार करणाऱ्या सॅम्युएल जॉन्सन या आद्य शब्दकोशकाराबद्दल, क्रूरकर्मी अडॉल्फ हिट्लरच्या पुस्तकसंग्रहाबद्दल, व पुस्तकांच्या पॅशनविषयी  लेख लिहिलेले असून हे लेखसुद्धा तितकेच वाचनीय आहेत.

पुस्तकासंबंधी विचार करत असताना पुस्तकं मानवी जीवनातून नाहिश्या झाल्यास काय होईल ही भीती कायमची असते. उम्बर्टो इकोच्या मते अशी भीती बाळगण्याचे कारण नाही. कारण जोपर्यंत भाषा जिवंत राहते तोपर्यंत पुस्तकाला, मग ते मुद्रित स्वरूपात असो की डिजिटल स्वरूपात असो की क्वांटम/नॅनो स्वरूपात असो, मरण नाही.  जग कितीही बदलले तरी पुस्तकं कुठल्या ना कुठल्या स्वरूपात टिकून राहणारच. चाकाचा शोध प्राचीन काळी झाला म्हणून तो काही त्याज्य झाला नाही. वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या कामासाठी वेगवेगळ्या स्वरूपात चाक वापरत असले तरी 'चाक' ही संकल्पना कायम राहिली. तसाच प्रकार पुस्तकांच्या बाबतीतही आहे, असे उम्बर्टो इकोला वाटते.

लेखकानी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे पुस्तकवेड्यांच्या पुस्तकसंग्रहाबद्दलचा अत्युत्साह बघता पुस्तकाचे स्वरूप बदलेल,  कागदावर छापलेली पुस्तकं जाऊन त्याजागी ई-पुस्तकं येतील, पण त्यातही 'वाचन करणे' ही गोष्ट कायम राहील. जोवर माणसाला नवनव्या गोष्टी जाणून घेण्याची, अनुभवण्याची तहान आहे तोवर पुस्तकांना (व पुस्तकवेड्यांनासुद्धा!) मरण नाही.

**लीळा पुस्तकांच्या**
*नीतीन रिंढे*
लोकवाङमय गृह प्रकाशन
पाः189, किः 250 रु



# समाज माध्यम आणि खिन्नमनस्कता

जात-पंथ-धर्म, रूढी-परंपरा, वेद-उपनिषद, आयुर्वेद – होमिओपथी, थोरा-मोठ्यांचा इतिहास, संस्कृती, देशप्रेम-देशभक्ती, प्रादेशिक-भाषिक अस्मिता, पक्ष-पक्षनेतृत्व, इत्यादीसारख्या कुठल्याही (अती) संवेदनशील विषयाबद्दल थोडीशी जरी टीका केली तरी डोके फोडून घेण्याची तयारी हवी. कारण तुमचे कुठले तरी शब्द वा वाक्य कुणाच्या भावना कसे दुखवतील याचा नेम नाही. काही प्रमाणात समाज माध्यमसुद्धा याच पंक्तीत जाऊन बसत आहे की काय असे वाटत आहे. *वाट्सअॅप, फेसबुक, इन्स्टाग्रॅम वा ट्वीटरसारख्या समाज माध्यमातून मत प्रदर्शित करण्यात काही चूक नाही; आलेले मेसेजेस न वाचता वेळ न दवडता ताबडतोब लाइक शिक्का मारणे वा फॉर्वर्ड करणे हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे; वेळी-अवेळी, रात्री-अपरात्री, घरात नाष्टा-जेवण (वा नैसर्गिक विधी) करत असताना, सार्वजनिक समारंभ – कार्यक्रमाच्या वेळी वा कामाच्या ठिकाणी महत्वाच्या मीटिंगमध्ये असताना, (हॉस्पिटल-स्मशानाच्या ठिकाणीसुद्धा!) मोबाइलवरील मेसेजेस वाचण्यात (व ताबडतोब प्रतिसाद देण्यात) काही गैर नाही;* अशा प्रकारच्या ' टेकन फॉर ग्रँटेड' मानसिकतेमुळे कुणालाही काहीही वाटेनासे झाले असून यात काहीतरी चुकत आहे याची पुसटशी शंकासुद्धा कुणाला शिवत नाही. उठल्या-बसल्या, दिवस-रात्र त्या निळया प्रकाशात आपले डोके खुपसून बसलेले असताना या नील किरणांचे आपल्या डोळयावर काही दुष्परिणाम होऊ शकेल याचे भानही नसल्यामुळे हा अव्यापारेषु-व्यापार अव्याहतपणे चालू आहे. नीटपणे स्वतःचे नाकही पुसता न येणाऱ्या 2-3 वर्षाच्या अजाण मुला-मुलींपासून धूसर दृष्टी असलेल्या म्हाताऱ्या-कोताऱ्यापर्यंतच्या सर्वांना आवडणाऱ्या या स्मार्टफोनच्या वापराविषयी एक अवाक्षरही उच्चारले तरीही तडीपार होण्याची तयारी हवी. समूह माध्यमाचे हत्यार हाती असल्यामुळे बदनामीकारक मजकूर लिहून

विरोधकांचा मानसिक छळ करणे हा तर या समाज माध्यमाच्या वापरकर्त्यांचा हातचा मळ झाला आहे.

समाज माध्यमं व खिन्नमनस्कता यांचा एकमेकाशी काही संबंध आहे का हा प्रश्न नेहमीच विचारला जात आहे. काही मानसतज्ञांच्या मते समाज माध्यमाच्या अतीव वापरामुळे खिन्नमनस्कता (depression) या मानसिक रोगाचे आपण शिकार होऊ शकतो. परंतु अशा प्रकारे घाईने कुठलेही निष्कर्ष न काढता नेमके कुठे चुकत असावे याचा शोध घेणे शहाणपणाचे ठरेल.

खरे पाहता ही समस्या वाटते तितके सोपी नसून फार गुंतागुंतीची आहे. करोडपती अमिताभ बच्चन स्टाइलने ‘होय’ किंवा ‘नाही’ असे एका दमात उत्तर देणे शक्य नाही. वाट्सअॅपवरील कोरोना महामारीच्या संदर्भातील मजकूर स्क्रोल करत असताना मन विषण्ण होऊन जाते. प्रसंगाचे गांभीर्य न ओळखता केलेली मल्लीनाथी वाचताना मेसेज पाठविणाऱ्यांची कीव कराविशी वाटते. अनेक वेळा मित्रांचा हेवा वाटू लागतो. आपण इतके तडफडत आहोत; ते मात्र किती कूल आहेत हा विचार शिवून जातो. समाज माध्यमावर झळकणारे चित्र-विचित्र फोटो व/वा व्हीडीओ बघत असताना आपण कुठल्या जगात वावरत आहोत असे वाटू लागते. समाज माध्यमावरील अफव्यामुळे व या अफव्यावर नको तितका विश्वास ठेवल्यामुळे आर्थिक व जीवित हानी होत असलेले पाहून मन विषण्ण होते.

परंतु त्याच वेळी एखाद्या लहान बाळाचे स्मित हास्याचा फोटो वा त्याच्या खोडकरपणाचा व्हीडीओ बघत असताना मनातला शीण भुर्रकन उडून जातो. कुत्र्या-मांजरांचा खेळ, जंगलातील क्रूर प्राण्यांची अस्तित्वासाठीचा झगडा, दूरच्या कुठल्या तरी देशातील पर्यटन ठिकाणांचे धबधबे, सूर्योदय-सूर्यास्तासारखे दृश्य स्क्रीनवर पाहतांना मन हरवून जाते. आवडलेले जुने चित्रपट, कार्टून्स पहात असताना आपण पुन्हा भूतकाळात शिरतो. फक्त या

एकमेव कारणासाठी तरी समाज माध्यमाची ही सुविधा हवीहवीशी वाटू लागते. समाज माध्यमातून आलेल्या हास्यमय प्रसंगाच्या फोटो/व्हीडीओंना आपण मनस्वी दाद देतो; हसतो; शेर करू लागतो. त्यामुळे समाज माध्यम तितके वाईट नाही, असे वाटू लागते.

समाजमाध्यमाविषयी अनेक प्रकारचे उलट-सुलट मतप्रवाह व्यक्त होत आहेत. ट्रोलिंग, सायबर बुलिंग, स्क्रीनची व्यसनाधीनता इ.इ.मुळे समाज माध्यमाबद्दल टोकाची विखारी मतं व्यक्त केले जात आहेत. अत्याधुनिक फोटोशॉपिंग व फिल्टरिंग तंत्रामुळे समाज माध्यमावरील माहितीची सत्यासत्यतेची शहानिशा  करणे जमेनासे झाले आहे. शिवाय समाज माध्यमांचा पुरेपूर वापर करणाऱ्यांच्या  मनावर होणारे, त्यांच्या कामावर होणारे परिणाम इत्यादी गोष्टीसुद्धा ऐरणीवर आहेत.

अलीकडेच JAMA या वैद्यकीय विषयक अमेरिकन  नियतकालिकात Association of Screen Time and Depression in Adolescence या शीर्षकाचा एक लेख प्रसिद्ध झालेला आहे. नुसते शीर्षक वाचूनच तरुणं - तरुणींमधील स्क्रीन ॲडिक्शनच्या वाढत्या सवयीविषयी समाजाची काळजी करणाऱ्या अनेकांना समाज माध्यमाचा धक्का बसत आहे. अनेकांच्या  मनात स्क्रीनसाठी वेळ खर्ची घालणे धोकादायक असे वाटू लागले आहे. परंतु समाज माध्यम व विषण्णता यांच्यात खरोखरच काही संबंध आहे का या विषयी अभ्यास करताना संशोधकांनी काही सावधानतेचे इशारेही दिले आहेत.

मादक द्रव्य व मादक पदार्थांचे सेवन करणाऱ्या  सुमारे 3800 पौगंडावस्थेतल्यांचा अभ्यास करत असताना त्यांच्या स्क्रीन ॲडिक्शन-विषयीसुद्धा अभ्यास केला गेला. हा अभ्यास सुमारे चार वर्षे चालला होता. अभ्यासकांच्या मते या वयातील तरुण-तरुणींच्यात खिन्नमनस्कतेचे प्रमाण वाढण्यात स्क्रीन ॲडिक्शनचाही वाटा आहे. एक समूह म्हणून केलेले संशोधन

व व्यक्ती म्हणून केलेले संशोधन या दोन्ही बाबतीतही हेच निष्कर्ष निघत असल्यामुळे हा चिंतेचा विषय होत आहे, असे लेखात नमूद केले आहे.

या निष्कर्षाप्रत  येण्यास घाई तर होत नाही ना? समाज माध्यम वाईटच आहे असे म्हणत या विषयीची चर्चा थांबविण्यापूर्वी संशोधकानी स्क्रीन ॲडिक्शन व खिन्नमनस्कता यांच्यातील संबंधाविषयी  नमूद केलेल्या सावधानतेच्या इशाऱ्यांकडेही लक्ष वेधणे तितकेच गरजेचे आहे म्हणून हा लेखनप्रपंच.

JAMAच्या लेखात पौगंडावस्थेतील मुला-मुलींच्यातील समाज माध्यमाच्या वापरामुळे खिन्नमनस्कतेच्या निर्देशांकात वाढ होत असून स्क्रीन समोरील वेळेत एक तास जरी वाढ केल्यास हा निर्देशांक 0.64 ने वाढत आहे, असे नमूद केले आहे. मुळात मानसतज्ञांच्या मते वेगवेगळया निकषानुसार खिन्नमनस्कता   0 ते 28 या निर्देशांकानुसार ठरविले जाते. गंमत म्हणजे या वयोगटातील मुलींच्या खिन्नमनस्कतेच्या 2.79 निर्देशांक पोचण्यासाठी मुलींना दर दिवशी 4-5 तास स्क्रीनसमोर बसावे लागेल. त्या तुलनेने  ही वाढ नगण्यच म्हणावे लागेल.  समाज माध्यमांच्या वापरामुळे हा वयोगट पूर्णपणे वाया जात आहे असे समजण्यात हशील नाही.

समाजमाध्यमात फक्त  वाट्सॲप, फेसबुक, इन्स्टाग्राम वा ट्वीटर एवढेच प्रकार नसून टिक् टॉक्  लिंकडेन, स्नॅपचॅट, यूट्यूब, क्वोरा, रेड्डिट् पिंटरेस्ट, फ्लिपबोर्ड असे अनेक प्रकार आहेत व यातील प्रत्येक प्रकाराला प्राथमिकता दर्शविणारे अनुयायी वेगवेगळया गटात विभागलेले असतात. एवढे वेगवेगळे प्रकार असले तरी समाज माध्यमामुळे मानसिक संतुलन बिघडते व ही एक समस्या आहे याबद्दल मात्र सर्वांचे एकमत असते.

समाज माध्यमाच्या वापराच्या समस्येचा अल्कोहॉलच्या समस्येशी करता येईल असे जाणकारांना वाटत आहे. सीमित प्रमाणात अल्कोहॉल घेत

असल्यास ती समस्या होत नाही; फक्त त्याचे अती सेवन केल्यास ती समस्या होऊ शकते. हाच निकष समाज माध्यमाच्या वापरालाही लावता येईल. दारू पिणे हे कुठले तरी (काल्पनिक) दुःख विसरण्यासाठी सातत्याने होत असल्यास त्याचे ॲडिक्शनमध्ये रूपांतर झल्यास ते एक मानसिक रोगाचे लक्षण ठरू शकेल. त्याच प्रमाणे फेसबुक, ट्वीटरसारख्या समाज माध्यमांचा वापरसुद्धा काही विसरण्यासाठी होत असल्यास वा समोरच्या प्रश्नांचा विसर पडावा म्हणून सतत स्क्रीनसमोर बसण्याचा पर्याय निवडत असल्यास ती एक मानसिक समस्या ठरू शकेल. परंतु समाज माध्यमांचा विवेकशील वापरामुळे आपले जीवन अधिक फुलवण्यासाठी होत असल्यास त्याचे स्वागतच करायला हवे.

पौगंडावस्थेतल्यांच्यातील खिन्नमनस्कतेला समाज माध्यमच पूर्णपणे कारण आहे असे निर्विवादपणे JAMAच्या लेखात वा इतर ठिकाणी सिद्ध झालेले नाही. कदाचित या दोन्ही गोष्टी एकत्र आल्यामुळे त्यांच्यात परस्पर संबंध आसावा अशी अटकळ बांधली जात असावी. समाज माध्यमाच्या (अतीव) वापरामुळे खिन्नमनस्कतेत वाढ होत आहे हे मान्य केले तरी खिन्नमनस्कतेला तेच एकमेव कारण आहे असे म्हणता येणार नाही.

याच लेखातील उदाहरण घेतल्यास पौगंडावस्थेतील खिन्नमनस्थितीतील रुग्णांचे बालपण तितके सुखाचे गेले नसेल व त्यामुळे ते स्क्रीन ॲडिक्शनचे बळी ठरलेले असावेत. काही कारणामुळे ही मुलं बालपणी बळजबरी, हिंसा, अत्याचारसारख्या प्रसंगांना सामोरे गेलेले असल्यामुळे मोठेपणी ते अशा प्रकारच्या समाज माध्यमातून हरवलेले सुख शोधत असावेत. मानसतज्ञांच्या मते प्रौढ व्यक्तीतील खिन्नमनस्कतेचे एक कारण त्यांच्या बालपणातील कटु अनुभवात शोधता येते. खिन्नमनस्कतेची अनेक कारण असू शकतात व त्यावर मोठ्या प्रमाणात संशोधन चालू आहे.

यावरून समाज माध्यम तितकेसे वाईट नाही असे आपल्याला वाटत असल्यास आपण योग्य दिशेने विचार करत आहात असे म्हणता येईल. 2018 सालच्या एका अभ्यासानुसार 21व्या शतकातील समाजसुद्धा  बहिष्कृत करत असलेल्या समलिंगी व तृतीयपंथी (LGBTQ) व्यक्तींना समाज माध्यमाचा फार मोठा आधार वाटत आहे. समाज माध्यमावरील त्यांच्याबद्दल घृणा व्यक्त करणारी जहरी टीका, टिंगल,  टवाळी, कुटाळक्यांच्या बरोबरच त्यांच्या विषयी सहानुभूतीचे पोस्टसुद्धा त्यात असल्यामुळे त्यांचे  जीवन सह्य होत आहे. समूह माध्यमातून त्यांना एकमेकाशी संवाद साधणे शक्य होत आहे. कदाचित या समाज माध्यमामुळेच अशा व्यक्ती संघटित होऊ शकले व अशा व्यक्तींबद्दलची विषम वर्तणूक गुन्हा समजला जावे यासाठी कायदा करून घेणे शक्य झाले आहे.

तरीसुद्धा समाज माध्यमाचा वापर करणाऱ्यांना खालील धोक्याच्या इशाऱ्यांबद्दल जास्त जागरूक असणे गरजेचे आहेः

- समाज माध्यमाच्या वापरामुळे रोजच्या व्यवहारातील परस्पर संबंध बिघडणे,
- वास्तव जगातील सुखद प्रसंगांचे आनंद अनुभवताना  समाज माध्यमावरील तुमच्या प्रोफाइलला धक्का पोचण्याच्या भीतीमुळे त्रस्त होणे,
- समाज माध्यमाचा वापर कमी करण्यास अशक्यप्राय आहे असे वाटणे.

मुळात कुठल्याही गोष्टीचा अतिरेक झाल्यास पश्चात्तापाची पाळी नक्कीच येत असते. त्यामुळे समाज माध्यमाच्या अती वापराबरोबरच वरील पैकी एखादा जरी धोक्याचा इशारा तुम्हास लागू होत असल्यास समाज माध्यमापासून व/वा स्क्रीनपासून काही काळ दूर राहून कुणाशी तरी प्रत्यक्ष

संवाद साधणे किंवा कुणाच्या तरी हास्य विनोदात सहभागी होणे हाच (एकमेव) उपाय तुम्हाला समाज माध्यमाच्या  धोकादायक वावरापासून वाचवू शकेल.



# सत्तातुराणाम् न भयं न लज्जा..

काही वर्षापूर्वी रॉबर्ट ग्रीन या अमेरिकेतील ‘एस्क्वॉयर’ नियतकालिकाच्या संपादकाने लिहिलेले व (भरपूर मार्केटिंगचे तंत्र वापरून) गाजविलेले ‘48 लॉज ऑफ पॉवर’ हे पुस्तक म्हणजे 15व्या शतकातील निकोले मायकेव्हेलीचीच सुधारित आवृत्ती म्हटले तरी वावगे ठरणार नाही. ‘दि प्रिन्स’ या मायकेव्हेलीच्या गाजलेल्या पुस्तकात सत्ता कशी काबीज करावी, सत्ता कशी टिकवावी व विरोधकांच्यावर मात कसे करावे याबद्दलचे काही उपयुक्त सल्ला-वजा-डोज दिले होते. मुळात त्या काळच्या सरंजामशाहीत राजे-राजवाडे, त्यांचे वारसदार यांना मायकेव्हेलीचे हे पुस्तक म्हणजे जणू काही बायबलच होते. सत्तेच्या खुर्चीवर बसल्यानंतर सत्तेचा दीर्घकाळ उपयोग करून घेण्यासाठी व इतर सामान्यांच्या परिश्रमावर स्वतःचे शान-शौकीन चंगळवादी जीवन जगण्यासाठी दिलेला तो मंत्र होता. व पुढील दोन-तीनशे वर्षे या पुस्तकाची ‘राज’प्रियता तसूभरही कमी झाली नव्हती.

परंतु लोकशाहीचे वारे वाहू लागले. सर्व राजे/राजकुमार सत्ता काबीज करण्यासाठी वेगळी वाट चोखाळू लागले. या सर्वांना लोकशाहीचा भलताच उमाळा आला होता. त्यामुळे मतदारांना आकृष्ट करण्यासाठी ‘मनी’ व ‘मसल्’ पॉवरचाच आधार घेत त्या त्या देशातील महत्वाच्या व मोक्याच्या पदावर विराजमान होऊन आपण काय काय करू शकतो याची चुणुक ते दाखवू लागले. राजा म्हणजे खुद्द परमेश्वरच वा परमेश्वराचा अंशच हे डोक्यात भिनवून घेतलेली भोळी-भाबडी प्रजा अजूनही, 21व्या शतकातसुद्धा, कुर्नीसात करत असल्याची उदाहरणं आपल्या देशातील राजस्थान, मध्य प्रदेशसारख्या राज्यात सापडतील. इंग्लंडमधील राजघराणे व त्या घराण्यावर प्रेम करणारे अजूनही शिल्लक आहेत हे आपल्या बुद्धीच्या दिवाळखोरीचे जिवंत उदाहरणं आहेत. आपला लोकशाहीचा प्रवास सरंजामशाही,

घराणेशाही यातून सरकत सरकत पुढे नेत नेत येथपर्यंत पोचली आहे. व ही लोकशाही नेहमीच सत्तेच्या खुर्चीभोवती पिंगा घालत असते, हे एक उघड गुपित आहे. इतरावर वर्चस्व गाजविण्यासाठी, इतरांच्या कमकुवतीचा फायदा घेण्यासाठी अधिकारपदाला पर्याय नाही, हाच मंत्र अशा प्रकारच्या व्यवस्थापनशास्त्रात शिकविले जात असावे.

सत्तेची गुर्मी एकदा अंगात चढली की त्यातून बाहेर पडणे फारच अवघड ठरू शकते. म्हणूनच अगदी सामान्यातल्या सामान्यालासुद्धा सत्तेचा, एक तुकडा का होईना, हवा असतो.  सत्तेपुढे शहाणपण चालत नसल्यामुळे शहाणी सुरती माणसं सत्तेपासून चार हात दूर राहण्यास प्रयत्न करतात. परंतु ज्यांना सत्ता हवी असते व दीर्घकाळ निरंकुशपणे भोगावेसे वाटते त्यानी ‘48 लॉज ऑफ पॉवर’ वाचायले हवे. कारण या पुस्तकात सत्तेसाठी आपल्यात कुठले गुण अंगी बाळगावे, अधिकारप्राती व अधिकार टिकविण्यासाठी कुठल्या रणनीतीचा अवलंब करावा, आपले हितसंबंध कसे जपावेत, सत्तेच्या खेळातील फासे कसे उलटवावेत इत्यादींचा एक रेडीमेड आराखडाच दिला आहे.

पुस्तकाच्या प्रस्तावनेतच लेखक उघडपणे हे पुस्तक फसवेगिरीमार्फत कार्यसिद्धी करण्याच्या विषयातील प्रत्यक्ष मार्गदर्शक असे हँडबुक आहे. ... यातील सूत्रे प्रत्यक्ष वापरात आणल्यास आधुनिक जगामध्ये तुम्ही भरभराटी करू शकाल, आतून मात्र तुम्ही लबाडीने पुरते कह्यात ठेवणारे कावेबाज असलात तरी शिष्टसंमत चांगुलपणाचा आदर्श नमूना म्हणून वरकरणी तुमची छाप पडेल. या हँडबुकच्या मदतीने जोमाने प्रगती करणे तसेच उच्चपद गाठणे तुम्हाला शक्य होईल. असे म्हटलेले असल्यामुळे तुमच्या आधिकार लालसेच्या आड येणाऱ्यांच्या पाठीतून सुरा खुपसायचा तर हातावर मलमलीचा हातमोजा आणि चेहऱ्यावर अगदी गोड-प्रेमळ  हसू आणायचा

यावर येथे भर दिला जात आहे. आयन रँड या लेखिकेने ज्या प्रकारे Greed is Good चे समर्थन करून तिचाच एक पंथ निर्माण केल्यासारखे रॉबर्ट ग्रीनच्या या पुस्तकामुळे हा लेखकही अमेरिकेतील कल्ट फिगर झाला आहे. अमेरिकेतील तुरुंगातील कैद्यांच्या लायब्ररीत या पुस्तकाला प्रचंड मागणी असते.

'48 लॉज ऑफ पॉवर' या पुस्तकातील सत्तेच्या शिडीची एकेक पायरी चढत वरपर्यंत पोचण्यासाठी आपल्या अंगात कुठले कुठले गुण हवेत, कुठले कुठले डावपेच आखले पाहिजेत व त्यांची अंमलबजावणी कसे करता येईल याचा एक सुसज्जित योजनाच आपल्यासमोर ठेवत आहे. खरे पाहता सेल्फ-हेल्पची ढिगाने पुस्तकं असताना या पुस्तकाचे वैशिष्ट्य काय हा प्रश्नही विचारला जाऊ शकतो. कारण शंभर दिवसात कोट्याधीश कसे व्हावे, यशस्वी होण्याचे मंत्र  अशा प्रकारचे शीर्षक असलेली पुस्तकं  वाचून अमुक अमुक श्रीमंत झाला आहे असे ऐकीवात नसताना व खुद्द लेखकच प्रकाशकाकडे मानधनासाठी खेपा घालत असताना या पुस्तकाचा लेखक, रॉबर्ट ग्रीन सत्तेच्या शिखरावर का चढला नाही असे वाटणे साहजिकच आहे.

हे 48 जीवनसूत्रं तरी कोणते हे समजून घेतल्यास  सत्ता हाशील करण्याचा मार्ग सुकर होईल असे लेखकाला विश्वास वाटतो. त्याच्या मते सत्ता हाशील करण्यासाठी

1. तुमच्या वरिष्ठापेक्षा जास्त चमकू नका.
2. मित्रावर जास्त विसंबू नका. शत्रूंचा वापर करायला शिका.
3. तुमचे प्रयोजन झाकून ठेवा.
4. नेहमी आवश्यकतेपेक्षा कमी बोला.
5. कीर्तीवरच सर्व काही अवलंबून आहे. प्राणपणाने त्याची जपणूक करा.

6. कुठलीही किंमत मोजून लक्ष वेधून घ्या.
7. इतराकडून कामे करवून घ्या. त्याचे श्रेय मात्र तुमच्या खात्यात जमा होऊ दे.
8. गरज पडल्यास आमिश दाखवा. इतरानाच तुमच्याकडे येऊ द्या.
9. विवाद्य बडबडीपेक्षा कृतीने जिंका.
10. साथीच्या रोग्यासारख्या असणाऱ्या दुःखी व दुर्दैवी यांचा सहवास टाळा.
11. लोक तुमच्यावर अवलंबून असू देत.
12. निवडकपणे प्रामाणिकता व औदार्य यांचा वापर करा. तुमच्या सावजाला निःशस्त्र करा.
13. तुम्हाला मदत करण्यात इतरांचे फायदे काय आहेत यावर भर द्या. लोकांच्या दया व औदार्याला आवाहन करू नका.
14. मित्रासारखे रहा. हेरासारखे पाळत ठेवा.
15. शत्रूचा संपूर्ण बिमोड करा.
16. आदर आणि सन्मान वाढविण्यासाठी अनुपस्थितीचा (उशीरा येण्याचा) वापर करा.
17. इतरांना अंधारात ठेवा.अकल्पनीय खेळीची हवा वाढीस लावा.
18. स्वतःच्या बचावासाठी किल्ले बांधू नका. एकांत धोकादायक ठरतो.
19. कोणाबरोबर वाटाघाटी करताय ते जाणून घ्या. चुकीच्या माणसाला दुखवू नका.
20. कोणालाही वचन देवू नका
21. दुधखुळे वागून दुधखुळ्यांना आकर्षित करा. तेच तुमच्यापेक्षा जास्त हुशार आहेत, हे ठसवा.

22. शरणागतीची युक्ती वापरा. दैन्याचे बलामध्ये परिवर्तन करा.
23. तुमच्या शक्तीवर चित्त एकाग्र करा.
24. खुशामतीचे तंत्र वापरा.
25. स्वतःत बदल घडवून आणा.
26. तुमचे हात निष्कलंक असू द्यात.
27. विश्वास ठेवण्याच्या लोकांच्या गरजेचा फायदा घ्या. व्यक्तिपूजक अनुयायांचा पंथ निर्माण करा.
28. कृतीच्या रिंगणात बेधडक उतरा.
29. अंतिम परिणतीच्या क्षणापर्यंत नियोजन करा.
30. तुमचे संपादित सामर्थ्य हे विनासायास आहे, असे वाटू द्या.
31. पर्यायावर तुमचे नियंत्रण राहू द्या. तुमच्या कामाचे पत्ते इतरांनी पिसू द्या.
32. लोकांच्या स्वप्नांचा व्यापार करा.
33. प्रत्येकाचा कमकुवतपणा शोधून काढा.
34. पेहेराव व थाटमाट राजेशाही ठेवा.इतरांनी तुम्हाला ‘राजा’ गणण्यासाठी राजासारखे वागा
35. वेळ साधण्यात नैपुण्य मिळवा.
36. तुम्ही प्राप्त करू शकत नाही त्या गोष्टींची तुच्छता बाळगा. दुर्लक्ष हीच शत्रूवर मात करण्याची उत्कृष्ट रीत आहे.
37. नजरेला कैद करणारा भव्य देखावा निर्माण करा.
38. रुचेल तसा विचार करा; पण आचरण मात्र इतरांसारखेच असू दे.
39. मासे पकडण्यासाठी पाणी ढवळून काढा.
40. मोफतच्या जेवणाचा तिरस्कार करा.
41. महान व्यक्तीची भूमिका गिरविणे टाळा.

42. मेंढ्या विखुरण्यासाठी मेंढपाळाला दणका हाणा.
43. इतरांच्या हृदयाचा ठाव घ्या. त्यांच्या मनावर प्रभुत्व मिळवा.
44. प्रतिबिंब-प्रभावाचा परिणाम साधा. शत्रूला क्रोधाविष्ट करून त्याला निःशस्त्र करा.
45. बदलाच्या आवश्यकतेचा उपदेश करा. पण एकाएकी खूप सुधारणा करू नका.
46. कधीही अतिप्रवीण व पारंगत दिसू नका.
47. हेतूच्या नक्की केलेल्या निशाणापलीकडे जाऊ नका. विजयाच्या क्षणी कुठे थांबायचे ते शिका.
48. निराकारत्वाचा बहाणा करा.

('सत्ता' पुस्तकाचे अनुवादिका अनघा दिघे यांच्या सौजन्याने)

या पुस्तकातील एकेक सूत्राबद्दल वाचत गेल्यास यात काय चूक आहे, असेच वाटण्याची शक्यता आहे. परंतु थोडेसे विचार केल्यास पुस्तकातील या सूत्रांचे समर्थन करत असताना आपल्याला माहित असलेले सत्य, प्रामाणिकपणा, औदार्य, अनुकंपा, सहानुभूती, पारदर्शिकत्व, मैत्रीचे पावित्र्य, मानवीयता, चांगल्या गोष्टींचे अनुकरण, साधेपणा, साधन शुचिता, इत्यादी प्रकारच्या जीवन मूल्यांना पायदळी तुडवूनच अधिकार गाजविता येते हाच संदेश दिला जात आहे. परस्पर सहकार, समाजाशी बांधिलकी, त्याग, कारुण्य, यांचा या लेखकाच्या व्यवस्थापनशास्त्रात स्थान नाही.

बसु चटर्जी यांच्या 'छोटी सी बात' या गाजलेल्या चित्रपटात अशोक कुमार यानी अमोल पालेकरला विद्या सिन्हाला वश करण्यासाठी अशाच प्रकारचे व्यवस्थापनाचे धडे दिलेले आपल्यापैकी काहींना आठवत असेल. ज्या आक्रमक रीतीने अमोल पालेकर त्यांची तंतोतंत अंमल बजावणी करतो, त्याला तोड नाही. व या शास्त्रापुढे टिकू न शकल्यामुळे असरानी नामोहरम

होतो. खरे पाहता अमोल पालेकर व असरानी या दोघांच्यात ही स्पर्धा असते. फेअर प्ले असल्यास कदाचित विद्या सिन्हा असरानीशीच लग्न केले असते. परंतु अशोक कुमारच्या मतलबी सल्ल्यामुळे अमोल पालेकर असराणीवर मात करून विद्या सिन्हाला पटकावतो. साध्या भोळया अमोल पालेकरला स्ट्रीट स्मार्ट बनविण्यात अशोक कुमारच्या धड्यांचा फारमोठा वाटा आहे, यात शंकाच नसावी. अशाच प्रकारचे थीम असलेले कित्येक चित्रपट व सिरियल्स पडद्यावर नक्कीच पहायला मिळतील. व यात काही तरी चुकत आहे याची पुसटशी शंकासुद्धा मनाला शिवत नाही. राजकारण्यांची सत्तालालसासुद्धा कमी जास्त प्रमाणात याच सूत्रांचाच अवलंब करत असेल. कुठलाही विधी निषेध न बाळगता अत्युच्च शिखरावर ते कदाचित शिखरापर्यंत पोचतही असतील.

कदाचित व्यवस्थापन संस्कृती वाढविण्यासाठी अशाच प्रकारचे धडे घेऊन व्यवस्थापनाच्या शिक्षण संस्थेतून बाहेर पडलेले देशाची धुरा संभाळत असावेत. त्यांना स्वतःच्या स्वार्थाव्यतिरिक्त दुसरे काही दिसत नसल्यामुळे येनकेन प्रकारे ते वरपर्यंत पोचत असावेत. म्हणूनच ‘सत्तातुराणाम् न भयम् न लज्जाम्….’ असे म्हणावेसे वाटते.



# 42’ ची अशीही गोष्ट

‘42’ ची अशीही गोष्ट हे शीर्षक वाचल्यानंतर अनेकांच्या मनात वेगवेगळ्या प्रतिक्रिया उमटतील, याची पूर्ण कल्पना आहे. काहींना 1942च्या स्वातंत्र्य लढ्याची आठवण येईल; काहींना दुसऱ्या महायुद्धाच्या काळातील 1942 साली घडलेल्या घटना आठवू लागतील; काहींना ‘समर ऑफ फॉर्टी टू’ या इंग्रजी चित्रपटाची आठवण येईल; काहींना ‘नायंटीन फॉर्टी टू लव्ह स्टोरी’ या हिंदी चित्रपटाची आठवण ताजी करेल; तर काहींना हॅरिसन फोर्डच्या बेसबॉलवरील ‘42’ या चित्रपटाची आठवण येईल. परंतु ही गोष्ट आहे 42 या संख्येबद्दलची व या संख्येच्या करामतीची.

गणिताचे छंद जोपासणाऱ्यांना काही संख्या नेहमीच बुचकळ्यात टाकतात. त्यापैकी 42 हीसुद्धा अशीच एक चमत्कारिक संख्या आहे. गोष्टीसाठी हीच संख्या का निवडली या प्रश्नाला उत्तर नसले तरी 42 बद्दलच्या गणितीय दृष्टिकोनाबरोबर त्याच्याशी जोडलेल्या इतर गोष्टीही तितक्याच मनोरंजक आहेत याबद्दल दुमत नसावे.

गूगलच्या सर्च इंजिनवर 42 ही संख्या टाइप केल्यास त्यासंबंधी 100 कोटीहून अधिक नोंदी सापडतील. विकिपिडियाची पानं उलगडल्यास 42 या संख्येबद्दल मोठ्या प्रमाणात माहिती त्यात असेल. गणित, विज्ञान, तंत्रज्ञान, खगोलशास्त्र, धर्म इत्यादींच्या बरोबरच ‘अलाइस इन वंडरलँड’चे लेखक, लुइस कॅरोलच्या पुस्तकात, डोग्लास ॲडम्सच्या ‘हिचहायकर्स टु द गॅलक्सी’ या वैज्ञानिक कादंबरीत 42 या संख्येचा कशा खुबीने वापर करून घेतला आहे याचे उल्लेख सापडतील. त्याचप्रमाणे संगीत, आर्थिक व्यवहार, टीव्ही मालिका, चित्रपट, व्हिडिओ गेम्स, क्रीडा प्रकार, वास्तुशास्त्र, कार्टून पुस्तकं इत्यादींच्यात 42 या संख्येचा वापर कशा प्रकारे करण्यात आला आहे, याची मनोरंजनात्मक माहिती वाचावयास मिळेल.

डोग्लास अॅडम्सच्या ‘हिचहायकर्स टु द गॅलक्सी’ या पाच पुस्तकांच्या मालिकेतील पाचव्या पुस्तकाच्या शेवटी-शेवटी डीप थॉट या सुपरसंगणकाला ‘जगातील अत्यंत महत्वाच्या प्रश्नाचे उत्तर काय असेल?’ असे विचारल्यावर संगणकाच्या स्क्रीनवर फक्त 42 ही संख्या झळकते. या उत्तरामुळे कादंबरीतीलं पात्रेच नव्हे तर वाचकही नक्कीच बुचकळ्यात पडले असावेत. 42चे हे गौडबंगाल आहे तरी काय याबद्दलची उत्सुकता नक्कीच शिगेला पोचली असेल.

खरे पाहता वाचक नेहमीच कुठल्याही गोष्टीमागील, घटनेमागील रहस्य जाणून घेण्यात व/वा गूढ उकलण्यात सदैव उत्सुक असतो. म्हणूनच मुद्रणाच्या शोधापासूनच्या काळापासून आतापर्यंत रहस्यकथांना (व रहस्यकथा-लेखकांना) भरपूर मागणी आहे. इतर कुठल्याही साहित्यप्रकारापेक्षा गूढकथा-हेरकथा कादंबरीचे दालन अत्यंत समृद्ध आहे. त्यातही टीव्ही व चित्रपटामुळे गूढकथा-पत्तेदारी कादंबऱ्या लाखोनी, नव्हे करोडोनी, खपत असावेत. या स्मार्ट फोनच्या बहुविध करमणुकीच्या काळातसुद्धा गूढतेची जादू किंचितशीसुद्धा कमी झालेली नाही.

त्यामुळेच डीप थॉट या (काल्पनिक) महासंगणकाकडून मिळालेल्या जगातील अत्यंत महत्वाच्या प्रश्नाचे उत्तर 42 ही संख्या नक्कीच कुणालाही धक्कादायक ठरू शकेल. डीप थॉटला हे उत्तर शोधण्यासाठी 75 लाख वर्ष लागली म्हणे. त्या कादंबरीतील इतर कॅरेक्टर्सना हे उत्तर नक्कीच पटलेले नसावे. कारण या उत्तरातून काही बोध होत नसावे. मुळात या प्रश्नातच काहीतरी गोलमाल आहे असे डीप थॉटला वाटत असावे. संगणकाला हा प्रश्न गार्बल्ड वा चुकीचा वाटत असावा. कदाचित 42 या उत्तराला शोभेल अशा प्रश्नाची पुनर्मांडणी करण्यास  या संगणकाला अजून एका नव्या संगणकाची रचना करावी लागेल व त्यासाठी भरपूर वेळ खर्ची घालावे लागतील. कदाचित

हे नवे संगणक दुसरे-तिसरे काही नसून पृथ्वी हेच एक संगणक असू शकेल. यानंतर नेमके काय होते हे समजून घेण्यासाठी डोग्लास ॲडम्सची पुस्तकं मुळापासून वाचायला हवीत.

डोग्लास ॲडम्सची ही पुस्तकं वाचून प्रेरित झालेले अनेक उत्साही छंदोपासक 42 या संख्याभोवतीचे गूढ उकलणे हा छंद जोपासून आहेत. हा छंद जोपासणाऱ्यांची संख्याही झपाट्याने वाढत आहे. मुळात या छंदाची सुरुवात  गप्पा-टप्पाच्या ओघात, हास्यचुटकीवरून वा एखाद्या तिरकस विधानावरून झाली असावी. उदाहरणार्थ, प्रश्नाची पुनर्मांडणी करत ‘सगळ्याच गोष्टींचे उत्तर काय?’ असे गूगलवर (इंग्रजीत) टंकित केल्यावर बहुतेक वेळा 42 असेच उत्तर आले असावे. फ्रेच-जर्मन-स्पॅनिश अशा इतर युरोपियन भाषेतून विचारल्यावरसुद्धा गूगलवर हेच उत्तर आल्यामुळे आश्चर्यचकित झालेल्यांची संख्या कमी नसावी. तसेच गूगलच नव्हे तर क्वाँट, उल्फ्रॅम अल्फा वा चॅटबॉटसारख्या सर्च इंजिनवर प्रश्न विचारल्यावरही हेच उत्तर आल्यामुळे प्रश्न विचारणारे अचंबित झाले असतील. (कदाचित भारतीय भाषेपर्यंत हे लोण अजूनही पोचले नसेल.)

या 42च्या छंदाची सुरुवात 2013मध्ये फ्रान्स येथील एका खाजगी प्रशिक्षण केंद्रातून झाली. त्याचे नाव ‘फॉर्टीटू नेटवर्क’ असे ठेवण्यात आले. ॲडम्सच्या पुस्तकवाचकांनीच (किंवा ‘42’ चित्रपट पाहून आलेल्यापैकी कुणीतरी) हे नाव ठेवले असावे. आज या नेटवर्कचे जगभर सुमारे 15 तरी प्रमुख केद्र असावेत.

42 या संख्येभावती अनेक आख्यायिका व काही मजेशीर गोष्टी वाचावयास मिळतील. उदाहरणार्थ,

- हिंदू धर्मशास्त्रात 18 पुराणे, 14 मुख्य उपनिषद, 4 वेद व 6 दर्शने, असे (18+14+4+6=42) 42 गोष्टींचा उल्लेख आहे.

- इजिप्तच्या पुराणकथेत 42चा उल्लेख करताना मृत आत्म्याला 42 न्यायाधीशासमोर उभे केले जाते व ही आत्मे 42 प्रकारच्या पापातील एकाही पापाचे धनी नाहीत याची खात्री करून घेतल्यानंतरच त्यांना स्वर्गात प्रवेश मिळतो.
- 42 ही संख्या स्पायडरमॅन: इन्टू द स्पायडर-व्हर्स *या* साहसीकथांच्या चित्रपटात अनेक वेळा  वापरल्यामुळे या संख्येला अमाप प्रसिद्धी मिळत आहे.
- 1966मध्ये पॉल कूपर या गणितज्ञाने पृथ्वीच्या एकमेकाच्या विरुद्ध टोकाला असलेल्या दोन ठिकाणी  (उदाः उत्तर धृव ते दक्षिण धृव) कमीत कमी वेळात (व कमीत कमी प्रवास खर्चात) पोचण्यासाठी एक नामी कल्पना मांडली.  त्याच्या मते पृथ्वीच्या एका टोकाला ट्यूब रेल्वे जाण्याइतपत एका ठिकाणाहून विरुद्ध दिशेला असलेल्या ठिकाणापर्यंत आरपार बोगदा खोदल्यास गुरुत्वाकर्षण शक्तीनेच विरुद्ध ठिकाणी कमीत कमी वेळात पोचता येते व त्यासाठी फक्त 42 मिनिटं लागतात. (त्या ट्यूब ट्रेनचे नाव ग्रॅव्हिटी ट्रेन असेल.) यात कुठल्याही प्रकारचे घर्षण असणार नाही असे गृहित धरले आहे. हीच कल्पना लुइस कॅरोल यांनी 1893मध्ये त्याच्या सिल्व्ही अँड ब्रुनो कन्क्ल्युडेड या पुस्तकात मांडली होती. (खरे पाहता या प्रवासाला 42 ऐवजी फक्त 38 मिनिटं लागतात, असे तज्ञांचे म्हणणे आहे. )
- मॅरार्थॉन या क्रीडा प्रकारातील पळण्यासाठीचे अंतर 42.195 किमी आहे. या अंतराच्या निश्चितीमागे एक दंतकथा आहे. इ.स.पू.  490 साली पर्शिया बरोबरच्या मॅरार्थॉन युद्धात विजय संपादन केल्यानंतर ती बातमी सांगण्यासाठी फिलिडिपाइड्स हा रोमन सैनिक  युद्धठिकाणाहून

अथेन्सपर्यंत पळत गेलेले अंतर सुमारे 42 किमी होते म्हणे. (त्या काळी किलोमीटर्स ही संकल्पना माहित नसली तरी त्यावेळच्या अंतर मोजण्याच्या मोजमापावरून नेमके 42 किमी हे अंतर येणे हा निव्वळ योगायोग नसावा)

- प्राचीन तिबेटवर राज्य केलेल्या लामांची संख्या 42 आहे.  इ.स.पू. 127च्या सुमारास न्यात्सी त्सेम्पो हा पहिला राजा; तर शेवटच्या राजाचे नाव लॅंगडर्मा असे होते. त्याचा  राज्यकाल इ.स. 836 ते 842. (येथेही 42 संख्या!)
- मुद्रणयंत्राचा शोधक गुटेनबर्ग यानी मुद्रित केलेले पहिले पुस्तक बायबल होते. त्यातील प्रत्येक रकान्यात 42 वाक्ये होती. म्हणूनच त्याच्या बायबलला ‘फॉर्टीटू लाइन बायबल’ असे म्हटले जात होते.
- न्यूयॉर्क शहरातील 42nd Street प्रसिद्ध रस्ता आहे. याच मार्गावर क्रायस्लर बिल्डिंग, ग्रॅंड सेंट्रल टर्मिनल, न्यूयॉर्क लायब्ररी, टाइम्स स्क्वेरसारखी ठिकाणं आहेत. या स्ट्रीटच्या पूर्वेला संयुक्त राष्ट्र संघाची इमारत आहे.
- मायक्रोसॉफ्टच्या धोरणाप्रमाणे विंडोज डोमेनसाठीचे पासवर्ड्स 42 दिवसानंतर निरुपयोगी ठरतात.
- चायनिज भाषेतील yes साठीचा शब्दोच्चार  42च्या जवळपासचा आहे. त्यामुळे तरुण चायनीज एसएमएस पाठवताना 42चा मुबलक प्रमाणात वापर करतात.
- ‘टॉवर 42’ ही लंडन शहरातील बहुमजली गगनचुंबी इमारत आहे. त्याचे पूर्वीचे नाव नॅटवेस्ट टॉवर असे होते.

- द्यूत वा सोंगट्याच्या खेळातील 2 फासेवरील खुणांची बेरीज ((1+2+3+4+5+6)x2) = 42 असते.
- खेळातील पत्त्यांच्या एका डेकमध्ये 42 ‘डोळे’ आहेत; दोन्ही डोळे असलेले (बदाम, इस्पिक व किलवर) तीन राजे, एकच डोळा असलेला (चौकटचा) राजा, (दोन्ही डोळे असलेल्या) चारी राण्या, दोन्ही डोळे असलेले (चौकट व किलवर) दोन गुलाम, व एकच डोळा असलेले (बदाम व इस्पिक) दोन गुलाम असे ((3x2+1+4x2+2x2+2x1) = (6+1+8+4+2) = 21) 21 एका बाजूला व अजून 21 दुसऱ्या बाजूला असे एकूण 42 डोळे.
- क्रिकेट या मैदानी खेळाचे नियम बनविणाऱ्या एमसीसी या लंडनमधील क्रिकेट क्लबने खेळासाठी 42 नियमांची यादी केली आहे. त्यातील 42वा नियम fair व unfair खेळासंबंधी आहे.
- लुई कॅरालच्या ‘अलाइस इन वंडरलँड’च्या गोष्टीतील एका मैलापेक्षा जास्त उंची असलेल्यानी दरबारातून निघून जावे हे विधान 42व्या नियमानुसार आहे, असा उल्लेख पुस्तकात आहे.
- लुई कॅरालच्या ‘दि हंटिंग ऑफ दि स्नार्क’ या कवितेतील बेकर या विसराळूच्या पेट्यांची संख्या 42 आहे.
- लुई कॅरालच्या ‘अलाइस इन वंडरलँड’च्या प्रथम आवृत्तीच्या मूळ पुस्तकात 42 चित्रं होती. (हिचहायकर्स गाइड टु गॅलक्सी’चे लेखक, डोग्लास अॅडम्सला ‘20व्या शतकाचा लुई कॅराल’ असे ऑब्जर्व्हर या पत्रिकेने सन्मानित केले आहे.)

- ‘हिचहायकर्स गाइड टु गॅलक्सी’ या पुस्तकाच्या रेडियोवरील वाचनाचा 42व्या जयंतीच्या निमित्ताने फार मोठा समारंभ साजरा करण्यात आला. गंमत म्हणजे अशा प्रकारे 42वी जयंती समारंभ इतर कुठल्याही गोष्टी वा घटनेबाबत साजरा केल्याचे ऐकीवात नाही.
- डोग्लास अॅडम्सच्या पुस्तकात उल्लेख असलेल्या 42 या संख्येच्या मागे लेखकाचे वैशिष्ट्यपूर्ण अशी एखादी गोष्ट असावी असे वाटण्याचा संभव आहे. परंतु त्यांच्या बरोबरच्या ऑनलाइन चर्चेत त्यांना हा प्रश्न विचारल्यानंतर अगदी थोडक्यात त्यानी दिलेले उत्तर असे होतेः हा एक जोक होता. मला एक साधी, सरळ, सोपी व लहान अशी संख्या हवी होती. त्यावेळी सुचलेली ही संख्या आहे. त्यात 2 आधारांकाची (बेसची) बायनरी वा 10 बेस असलेली दशमान पद्धतीतील वा  13 आधारांक (बेस) असलेल्या पद्धतीतील  संख्या असे काहीही नाही. तिबेटच्या राजांची संख्या याला काही अर्थ नाही. मी डेस्कसमोर बसलो. खिडकीतून बाहेर बघत होतो. व 42 ही संख्या सुचली व मी टाइप करत गेलो. एवढाच त्यामागील इतिहास. बस्स...
- दशमान पद्धतीत 10 ही जशी आधारांक (बेस) असते, तसे बायनरीत 2 ही बेस असते. या बायनरी पद्धतीत 42 ही संख्या 101010 असे लिहिले जाते. बायनरीमध्ये लक्षात ठेवायला सोपी असलेल्या 42चे छंद असलेल्यांनी 10 ऑक्टोबर 2010 रोजी जंगी पार्टीचे आयोजन केले. अॅडम्सने उल्लेख केलेल्या 13 बेस असलेली संख्या अप्रत्यक्षपणे 42चे प्रतिनिधित्व करते. यासाठी 6 गुणिले 9चे उत्तर काय हा प्रश्न विचारावा लागेल. प्रश्न गोंधळून टाकणारा असला तरी 6 x 9 = 54 हे उत्तर 13 बेस

असलेल्या पद्धतीत लिहिल्यास ते 42 (4x13)+2 = 54) म्हणून लिहावे लागेल.

गणितज्ञांच्या 42बद्दलच्या अशा काही उदाहरणाहून प्रेरित होऊन संगणक तज्ञसुद्धा आपणही मागे नाही हे सिद्ध करण्यासाठी प्रयत्न करत आहेत. त्यामुळे गणितविश्वात 42 या संख्येला एक वेगळे वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे. तरीसुद्धा गणिताच्या दृष्टिकोनातून या संख्येकडे बघितल्यास अजूनही अनेक गंमतीशीर गोष्टी कळू लागतील.

- 2 या संख्येच्या पहिले तीन विषम घातांक असलेल्या संख्यांची बेरीज 42 आहे. 21 + 23 + 25 = 42
- फक्त 4 ही संख्या काही वेळा वापरून 42 अशा प्रकारे लिहिता येईलः
  ((4+4)/0.4444)+4! =8/(4/9)+(4x3x2x1)

=(8x9/4)+24=18+24=42

- 42 ही संख्या 6 या संख्येचा पहिल्या 2 घातांकाच्या बेरजेतूनही मिळते. 61 + 62 = 42
- 42 या संख्येला Harhad (वा Niven) संख्या म्हणून ओळखले जाते. कारण या संख्येला त्याच्या अंकाच्या बेरजेने भागाकार केल्यास पूर्णांक मिळतो. (42 /(4+2)) =42/6=7
- 42 ही संख्या कॅटलान संख्या म्हणून ओळखली जाते. अपरिमेय संख्यापेक्षा या संख्या दुर्मिळ आहेत. सुरुवातीच्या 100 कोटी संख्येतील काही कॅटलान संख्याः 1, 1, 2, 5, 14, 42, 132, 429, 1430, 4862, 16796, 58786, 208012, 742900, 2674440, 9694845, 35357670, 129644790, 477638700, 1767263190,

6564120420, 24466267020, 91482563640,

343059613650, 1289904147324, 4861946401452, ...

युजिन चार्ल्स कॅटलान (1814–1894) या फ्रेंच-बेल्जियन गणितज्ञाने $c(n)$ ही संख्या कंसाच्या जोड्यासारखे $n$ *प्रकारे लिहिता येते, यावरून* एका सूत्राचा शोध *केला. कंस हे नेहमीच जोड्यानेच येतात. जितके कंस उघडल्या जातात तेवढ्याच बंद कराव्या लागतात. उदाहरणार्थ,* $c(3) = 5$ प्रकारे लिहिता येऊ शकतेः

**( ( ( ) ) ); ( ) ( ) ( ); ( ( ) ) ( ); ( ( ) ( ) ); ( ) ( ( ) )**

या श्रेणीतील (sequence) $n$th पद शोधण्यासाठी $c(n) = (2n)! / (n!(n + 1)!)$ या सूत्राचा वापर केला जातो.

- convex बहुभुजाकृतीच्या (ज्या बहुभुजाकृतीच्या आतील कोन 180 अंशापेक्षा कमी अंशाचा असू शकतो त्या आकृतीच्या) शिरोबिंदूना सरळरेषेंनी जोडून किती त्रिकोनांची रचना करता येते याचा शोध घेत असताना कॅटलान संख्यांचे वैशिष्ट्य लिओनार्ड ऑयलर या स्विस गणितज्ञाच्या लक्षात आले.



- 42 ही संख्या प्रॅक्टिकल संख्या म्हणूनही ओळखली जाते. या प्रॅक्टिकल संख्यांचे वैशिष्ट्य म्हणजे या  संख्यांच्या विभाजकांच्या उपसंचाची बेरीज प्रॅक्टिकल संख्या वा तिच्यापेक्षा कमी असलेल्या सर्व संख्या एवढी असते. उदाः 18 या संख्येचे विभाजक 1, 2, 3, 6, 9 असून 18 पेक्षा कमी असलेल्या 1 ते 18 पर्यतचे सर्व आकडे या विभाजकांच्या बेरजेतून दाखवता येतील. उदाः  1, 2, 3, 4 (1+3), 5 (2+3), 6 (1+2+3), 7 (1+6), 8 (2+6), 9, 10 (1+9),  11 (2+9), 12 (3+9), 14 (2+3+9) , 15 (6+9), 16 (1+6+9), 17 (2+6+9) 42 ही एक प्रॅक्टिकल संख्या असून 42च्यापेक्षा कमी असलेल्या सर्व संख्या त्याच्या (1, 2, 3, 6, 7, 14, 21 42) विभाजकांची बेरीज करून लिहिता येऊ शकते. या संख्यांच्या श्रेणीतील सुरुवातीच्या काही संख्या असे आहेतः 1,2,4,6,8,12.16,16,20,24,28,30,32,36,40,42,48, 54,56,60,64,66,72, …. इ.इ...

  भारतीय गणितज्ञ श्रीनीवासन यांनी 1948मध्ये सर्व प्रॅक्टिकल संख्यांचे 1 व 2 यांचा अपवाद वगळता 4 वा 6 वा हे दोन्ही संख्या विभाजक असतात, असा शोध लावला.

- 42 या संख्येचे अरिथमॅटिक (arithmetic) संख्या म्हणूनही ओळख आहे. ज्या संख्याचे विभाजकांची सरासरी पूर्णांक असल्यास ती संख्या अरिथमॅटिक संख्या म्हणून ओळखली जाते. उदाः 20 या संख्येचे 1, 2, 5, 10  व 20 विभाजक आहेत. या विभाजकांची सरासरी ((1+2+4+5+10+20)/6=42/6=7) पूर्णांक असल्यामुळे 20 हे अरिथमॅटिक संख्या आहे. 42चे 1, 2, 3, 6, 7, 14, 21, 42 विभाजक

असून त्याची सरासरी (1+2+3+6+7+14+21+42 =96/8=12) पूर्णांक असल्यामुळे 42 अरिथमॅटिक संख्या आहे.

काही सुरुवातीच्या अरिथमॅटिक संख्याः 1, 3, 5, 6, 7, 11, 13,14,15,17, 19, 20, 21, 22, 23, 27, 29, 30, 31, 33, 35, 37, 38, 39, 41, 42, 43, 44, 45, 46, 47, 49, 51, 53, 54… इ.इ

- 42 या संख्येची ओळख admirable संख्या म्हणूनही आहे. admirable संख्येची व्याख्या अशी केली जातेः n ही admirable संख्या व त्याचे d1, d2, d3…dn विभाजक असल्यास एका विभाजकाची वजाबाकी इतर विभाजकाच्या बेरजेतून n संख्या येत असल्यास त्या संख्येला admirable संख्या असे म्हणता येईल.

  उदाः 12 चे विभाजक 1 , 2 , 3 , 4, 6 आहेत व या विभाजकांची मांडणी अशी करता येईलः 12 = 1 + 2 + 3 - 4 + 6;. त्याचप्रमाणे 42 चे विभाजक 1, 2, 3, 6, 7, 14, 21 आहेत व या विभाजकांची मांडणी अशी करता येईलः 42= 1+2+3-6+7+14+21

  काही सुरुवातीच्या admirable संख्याः 12, 20, 24, 30, 40, 42, 54, 56, 66, … इ.इ

- धातूच्या एखाद्या पातळ पत्र्यावर 3x3 रकान्यात संख्या लिहून त्यात मंतरलेली शक्ती आहे असे एके काळी भासविले जात होते, गंमत म्हणजे ह्या संख्याची आडवी, उभी व तिरकी बेरीज केली तरी तीच संख्या येते. 42 ही संख्यासुद्धा अशीच एक मंतरलेली मॅजिक कॉन्स्टंट आहे व 3x3च्या रकान्यातून याची अशा प्रकारे मांडणी करता येतेः

| | | |
|---|---|---|
| 17 | 10 | 15 |
| 12 | 14 | 16 |
| 13 | 18 | 11 |

हे सर्व गंमतीशीर असले तरी 42 ही संख्या सैद्धांतिक गणितीय अभ्यासकांच्या दृष्टीने फार महत्वाचे नाही असेच वाटत असावे. इतर कुठल्याही संख्येप्रमाणे 42सुद्धा एका आकड्यांची करामत असेल असेही वाटले असेल.

काही संगणकतज्ञांना व गणितज्ञांना मात्र 42बद्दल जबरदस्त आकर्षण वाटत असावे. कारण अलीकडेच 3 घातांक असलेल्या 3 संख्यांची बेरीज करताना अचानकपणे 42 ही संख्या सापडली. व या अभ्यासकांना 100च्या आतील संख्यामध्ये 42 ही संख्या जास्त ‘त्रासदायक’ आहे असे वाटू लागले.

3 घातांक असलेल्या n = a3 + b3 + c3 या सूत्रात n पूर्णांक असून या n साठी a, b, c या संख्या कोणत्या असतील हा अभ्यासकांच्या समोरचा प्रश्न होता. घातांक 3 असलेले 3 संख्यांच्या गटामध्ये एखादी संख्या ऋण संख्या असू शकेल. 2 घातांक असलेल्या संख्यांच्या बेरजेच्या संख्यांपेक्षा 3 घातांक असलेल्या संख्यांची बेरीज असलेल्या संख्या जास्त प्रमाणात असतील. तुलनेने 2 घातांक असलेल्या 2 संख्यांच्या बेरजेत भरपूर मर्यादा आहेत.

2007 साली 156 या संख्येसाठी

156 = 26,577,110,807,5693 + (−18,161,093,358,005)3 + (−23,381,515,025,762)3

या संख्यांचा शोध लागला. यावरून अशा संख्या शोधणे अत्यत जिकिरीचे वाटत आहे.

उदाः *n* = 1 साठी 13 + 13 + (–1)3 = 1 असे लिहिता येईल.

किंवा 93 + (–6)3 + (–8)3 = 729 + (–216) + (–512) = 1 असेही लिहिता येईल.

याचाच अर्थ एखाद्या *n*_साठी अनेक प्रकारच्या तीन संख्या असलेले गट शोधता येतील._

1936 साली कुर्ट माल्हेर या जर्मनीच्या गणितज्ञांने कुठल्याही *p या संख्येतून 1 साठी या सूत्राचा शोध लावलाः* (9*p*4)3 + (3*p* – 9*p*4)3 + (1 – 9*p*3)3 = 1

त्याचप्रमाणे 2 साठी 1908मध्ये ए एस वेरेब्रुसोव्ह यानी या सूत्राचा वापर केलाः

(6*p*3 + 1)3 + (1 – 6*p*3)3 + (–6*p*2)3 = 2

यावरून 2च्या कुठल्याही 2 व 3 घातांक असलेल्या संख्येचा शोध घेऊ शकतो. उदाः 16 या 2च्या 3 घातांकाच्या दुप्पट असलेली संख्या p = 1च्या सूत्रावरून 143 + (–10)3 + (–12)3 = 16 मांडता येईल**.**

2019मध्ये **3** या संख्येची मांडणी 13 + 13 + 13 = 3;     43 + 43 + (–5)3 = 3  अशा प्रकारे करण्यात आली.

या प्रकारच्या संख्यांच्या शोधासाठी गणितज्ञ संगणकांची मदत घेऊ लागले. 1,  2, 3, 6, 7, 8, 9, 10, 11, 12, 15, 16 ... या संख्येसाठी 3 घातांक असलेले गट शोधू लागले. 2000 साली हार्वर्ड विद्यापीठाचे  नोम एल्कीस यानी यासंबंधी एक पद्धत शोधली होती. त्याचाच वापर करून जर्मनीचे Andreas-Stephan Elsenhans व Jörg Jahnel  गणितज्ञ 1 ते 1000 यामधील संख्यांसाठी **3** घातांक असलेल्या (परंतु 1014 पेक्षा कमी असलेले) 3 संख्यांचा गट शोधू लागले. त्यांच्या मते  33, 42, 74, 114, 165, 390, 579, 627, 633, 732, 795, 906, 921, 975 या संख्याच फक्त

या सूत्रात बसतात. 100 पेक्षा कमी असलेल्यात फक्त 33, 42, 74 या तीन संख्या आहेत.

2016मध्ये सँडर ह्युइसमन या नेदरलँड्सच्या गणितज्ञांने 74 साठी खालील प्रकारे मांडणी केलीः

(–284,650,292,555,885)3 + (66,229,832,190,556)3 + (283,450,105,697,727)3

2019मध्ये ब्रिस्टॉल विद्यापीठाचे अँड्र्यू बुकर यानी 33 साठी 8,866,128,975,287,528)3 + (–8,778,405,442,862,239)3 + (–2,736,111,468,807,040)3 या संख्या शोधल्या.

2020मध्ये बुकर व एम आय टीचे  अँड्र्यू सुदरलँड यांनी मिळून 42ची मांडणी

42 = (–80,538,738,812,075,974)3 + 80,435,758,145,817,5153 + 12,602,123,297,335,6313 अशा प्रकारे केली.

165, 795 व 906 साठी अलिकडेच **3** घातांक असलेल्या संख्यांचे गट शोधण्यात  गणितज्ञ यशस्वी झाले आहेत. व 1000 खालील 114, 390, 579, 627, 633, 732, 921 व 975 या संख्यांसाठी शोधकार्य चालू आहे.

डोग्लास अॅडम्सची 42 ही संख्या खरोखरच एकमेवाद्वितिय असल्यास अशा प्रकारे मांडणी करता आली नसती. तरीसुद्धा या संख्येभोवती अजूनही रहस्य वलय आहे असे म्हणण्यास भरपूर वाव आहे.



# नैतिकतेसाठी परमेश्वर हवा(च) का? – एक सर्वेक्षण

माणूस हा एक विचित्र प्राणी आहे. या प्राण्याला नाविन्याची फार हौस आहे. त्याच्यात सर्जनशीलतेची क्षमता आहे. गुंतागुंतीच्या समस्यांना योग्य उत्तरं शोधण्याची हतोटी आहे. त्यानी केलेल्या तंत्रज्ञानातील अफाट प्रगतीमुळे मानवी जीवन सुसह्य होत चालले आहे. स्वत:च्या आरोग्य स्थितीवर संशोधन करत तो आता जास्तीत जास्त वर्षे जगण्याचा प्रयत्न करत आहे. दुर्धर समजलेल्या रोगांवर औषधोपचार शोधल्यामुळे निरोगी आयुष्य जगणे त्याला आता शक्य होत आहे. परंतु एवढे करूनसुद्धा अजूनही तो अविचारांना, चुकीच्या विचारांना बळी पडतोच आहे. याचा एक अत्युत्तम पुरावा म्हणून अजूनही जनसामान्यांच्या मनात असलेली परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल असलेली श्रद्धा याचा उल्लेख करता येईल. एकदा आपण परमेश्वराच्या अस्तित्वाला मान्यता दिल्यास त्या अनुषंगाने येणारे धर्म, धार्मिक व्यवहार, कर्मकांड, पूजा-प्रार्थना, सण-उत्सव, जन्मापासून मृत्युपर्यंतचे विविध प्रकारच्या विधी, गंडे, दोरे, तावीज, पाप-पुण्य, पवित्र-अपवित्र या संकल्पना, भव्य-दिव्य पूजास्थानांची उभारणी, धर्मस्थळांची सहल, दैव-नशीब, इत्यादी आपसुकच येणार याची खात्री असावी. या गोष्टी-कमी अधिक प्रमाणात जगभर सापडतील. परंतु त्यांचे समूळ उच्चाटन झाले नाही. तंत्रज्ञानाची घोडदौडही त्यांना रोखू शकली नाही.

परमेश्वर ही संकल्पना अजूनही टिकून आहे यामागे कदाचित परमेश्वरप्रणीत धर्मामुळे नैतिक मूल्ये रुजविले जातील ही मानसिकता अजूनही मूळ धरून आहे. आधुनिक काळात सत्ता व धर्म यांची फारकत केल्यास कल्याणकारी राज्यव्यवस्था चालविणे शक्य होईल असे वाटल्यामुळे जगभरातील अनेक

लोकशाही राष्ट्रांनी धर्मनिरपेक्षतेला अग्रक्रम दिल्याने चांगले परिणामही दिसू लागले. पुरोगामी विचारवंतानी तार्किकरित्या धार्मिक मूल्ये व नैतिक मूल्ये यांचा अर्थाअर्थी एकमेकाशी काही संबंध नाही असे सिद्ध केले. तरीही धार्मिक मात्र अजूनही आपला हेकेखोरपणा सोडण्यास तयार नाहीत. काही वेळा जनसामान्य परमेश्वर-धर्म इत्यादींचा कास सोडून स्वतंत्रपणे जगत आहेत असेही वाटत असते. याचा पडताळा घेण्यासाठी देव धर्माविषयी सर्वेक्षण घेतले जाते. त्यातून नेमकी काय स्थिती आहे ते कळू शकते. अशाच प्रकारच्या एक व्यापक सर्वेक्षणातील अहवालातील निष्कर्ष वाचकांसमोर ठेवण्याचा हा एक अल्पसा प्रयत्न.

प्यू रिसर्च सेंटर या जागतिक स्तरावर काम करणाऱ्या संशोधक संस्थेने धर्म, परमेश्वर व नैतिकता, आणि धर्माचरणात पूजा – प्रार्थना इत्यादींचे महत्व याबद्दलची मतं जाणून घेण्यासाठी सर्वेक्षण केले असून त्यांनी एक अहवाल प्रसिद्ध केला आहे. या सर्वेक्षणात युरोप व पूर्वीच्या सोव्हिएत युनियनच्या देशात परमेश्वराला महत्व देण्याची ही संकल्पना कशी उत्क्रांत होत गेली याचे विश्लेषण करण्याचाही प्रयत्न करण्यात आला आहे.

या अहवालासाठी 13 मे ते 2 ऑक्टोबर 2019च्या दरम्यान 34 देशातील 38426 प्रतिसादकांची प्रतिक्रिया नोंदविली. आफ्रिका-लॅटिन अमेरिका-मध्यपूर्व एशिया येथील राष्ट्रात प्रत्यक्ष भेटीतून तर अमेरिका व कॅनडा येथे फोनवरून माहिती मिळवली. तसेच भारत, इंडोनेशिया, फिलिपाइन्समध्येसुद्धा प्रत्यक्ष भेटीवर भर दिला. परंतु फ्रान्स, जर्मनी, दि नेदरलँड्स, स्पेन, स्विडन, येथून फोनवरून सर्वेक्षण करण्यात आले. मात्र बल्गेरिया, झेक रिपब्लिक, ग्रीस, हंगेरी, इटली, लुथेनिया, पोलंड, रशिया, स्लोव्हाकिया, युक्रेन येथे प्रत्यक्ष संदर्शनातून माहिती मिळविली.

**सर्वेक्षणाची पद्धत**

या केंद्राने भारतातील सर्वेक्षणासाठी 276 प्राथमिक चाचणी नमून्यांच्या गटामार्फत (Primary sampling units) कोलकत्ता, व मुंबई या मेट्रो शहराबरोबर अहमदाबाद व काही इतर शहरं आणि अनेक छोटे मोठे खेड्यात प्रत्यक्ष घरोघरी जाऊन यादृच्छिक पद्धतीने प्रतिसादकांची निवड केली. परमेश्वर, धर्म व नैतिकता या संबंधी एक प्रश्नावली तयार केली व या प्रश्नांच्या उत्तरांच्या स्वरूपात प्रतिसादकांकडून माहिती मिळविली. प्रतिसादकांची निवड करताना प्रतिसादक त्या त्या देशातील भाषिक, भौगोलिक, सास्कृतिक, धार्मिक, सामजिक, आर्थिक, राजकीय इत्यादी सर्व स्तरांतील समुदायांचे प्रतिनिधित्व ते करतील याची काळजी घेतली होती. या उपक्रमासाठी संगणकांची मदत घेतली गेली. 18 वर्षाच्या वरील हे प्रतिसादक वेगवेगळया उत्पन्न समूहातील, वेगवेगळया वयोगटातील व उच्च-निम्न जाती व उत्पन्न गटातील स्त्री-पुरुष होते. जास्तीत जास्त तीनदा भेटी देऊन अपेक्षित असलेली प्रश्नावली भरून घेतली होती. हीच पद्धत इतर देशातील प्रतिसादकांकडून प्रत्यक्ष भेटीतून व/वा फोनवरून माहिती मिळवून अहवाल तयार केला आहे.

**देशा-देशातील टक्केवारी**

नीती व चांगली मूल्ये टिकविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे म्हणणाऱ्यांची सर्वेक्षण केलेल्या देशातील टक्केवारी खालील प्रमाणे आहेः

**Majorities in emerging economies connect belief in God and morality**

*% who say it is necessary to believe in God in order to be moral and have good values*




Source: Spring 2019 Global Attitudes Survey. Q30.
PEW RESEARCH CENTER

नीती व चांगली मूल्ये टिकविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे ठामपणे म्हणणाऱ्या सहा खंडात पसरलेल्या 34 देशांतील प्रतिसादकांची सरासरी टक्केवारी 45 आहे. परंतु या प्रश्नांचे असे ठामपणे उत्तर देणाऱ्यांच्यात देशागणिक वेगवेगळ्या प्रमाणात टक्केवारी आहे, हे वरील चित्रातून स्पष्ट होईल.

आर्थिकरित्या विकासाच्या मार्गावर असलेल्या देशातील नागरिक पूर्ण विकसित झालेल्या देशातील नागरिकांपेक्षा तुलनेने जास्त धार्मिक आहेत, असे या सर्वेक्षणात आढळले आहे. आर्थिकरित्या मागासलेल्या या देशातील लोकांमध्ये आपल्या आयुष्यात धर्माला महत्व देणाऱ्यांची संख्या मोठी असून ही संख्या आर्थिकरित्या पूर्ण विकसित झालेल्या देशांपेक्षा जास्त आहे. नैतिकतेसाठी परमेश्वर हवाच यावर श्रद्धा असणारे या देशात बहुसंख्य आहेत.

त्याचप्रमाणे या देशात यामताच्या विरोधात विचार मांडणारेसुद्धा आहेत. नैतिक असण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे त्यांना वाटत नाही.

**परमेश्वर, प्रार्थना, धर्म**

काही प्रमाणात व्यत्यास असला तरी सर्वेक्षणात जगभरातील देशात सरासरी 62 टक्के प्रतिसादकांनी आयुष्यात परमेश्वराचे स्थान अत्यंत महत्वाचे स्थान आहे असे आढळते. 53 टक्के प्रतिसादकांना प्रार्थनेची गरज भासते. 1991नंतर रशिया व युक्रेनमध्ये ही संख्या वाढलेली आहे. तुलनेने पश्चिमेतील युरोपियन देशात ही संख्या कमी होत आहे.

सर्वेक्षण केलेल्या पश्चिमेतील आठ युरोपियन राष्ट्रामध्ये नैतिकतेसाठी परमेश्वराची गरज आहे असे म्हणणाऱ्यांची सरासरी 22 टक्के आहे. व पूर्वेतील सहा युरोपियन राष्ट्रांत ही संख्या 33 टक्के आहे. युरोप खंडातील राष्ट्रे जास्त प्रमाणात धर्म निरपेक्ष (secular) आहेत. परंतु या राष्ट्रामध्ये अल्पसंख्याकांकडे व त्यांच्या धर्माकडे बघण्याच्या दृष्टिकोनात फार मोठा फरक जाणवतो, हेही या सर्वेक्षणातून लक्षात येते.

**परमेश्वर व नैतिकता**

चागली मूल्ये रुजविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे म्हणणाऱ्यांची मते देशा-देशागणिक बदलत आहेत.

परमेश्वर व नैतिकता यांच्यात घनिष्ठ नाते आहे यावर विश्वास ठेवणारे युरोपियन युनियनमधील 13 देशापैकी ग्रीकमध्ये 53%, बल्गेरियामध्ये 50 % व स्लोव्हाकियामध्ये 45 % आहेत. मात्र याच युरोपियन युनियनमधील स्विडनमध्ये फक्त 9%, झेक रिपब्लिकमध्ये 14% व फ्रान्समध्ये 15% प्रतिसादकांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात एकमेकाशी काही संबंध आहे असे वाटते. अमेरिका व कॅनडा येथे अनुक्रमे 26% व 44% ही टक्केवारी आहे.

कदाचित या देशातील राजकीय ध्रुवीकरणामुळे या आकडेवारीवर परिणाम झाला असावा.

मध्यपूर्वेतील व आफ्रिकेतील देशामध्ये दहापेकी सात जणांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात घनिष्ठ नाते आहे असे वाटते. लेबनानमध्ये 72%, टर्कीत 75% व ट्युनिशियामध्ये 84% लोकांना चांगल्या मूल्यांसाठी परमेश्वराची गरज आहे असे वाटते. इस्रायलमध्ये मात्र याविषयी लोकं अर्ध्यावर (48%) विभागले गेले आहेत.

**Importance of God has declined in many European nations since 1991, but has increased in former Soviet Union**

*% who say God plays an important role in their life*

| | 1991 | 2019 | Change |
|---|---|---|---|
| | % | % | |
| Spain | 71 | 45 | **-26** |
| Italy | 81 | 60 | **-21** |
| Poland | 83 | 69 | **-14** |
| France | 43 | 31 | **-12** |
| Lithuania | 56 | 44 | **-12** |
| UK | 48 | 40 | **-8** |
| Czech Rep. | 30 | 24 | **-6** |
| Slovakia | 60 | 55 | -5 |
| Hungary | 45 | 44 | -1 |
| Germany | 48 | 51 | +3 |
| Ukraine | 50 | 62 | **+12** |
| Bulgaria | 41 | 55 | **+14** |
| Russia | 40 | 56 | **+16** |

Note: Statistically significant differences shown in **bold**.
Source: Spring 2019 Global Attitudes Survey. Q66b.

PEW RESEARCH CENTER

इंडोनेशिया व फिलिपाइन्स मध्ये ही संख्या प्रत्येकी 96% आहे. भारतात 79% आहे. परंतु पूर्व एशियातील दक्षिण कोरियामध्ये 53% गरज आहे व

46% गरज नाही असे कौल देतात. जपानमध्ये 39% व ऑस्ट्रेलियामध्ये 19% लोकांना परमेश्वर व नैतिकता यात संबंध आहे असे वाटते.

आफ्रिकेतील केनिया व नायजेरिया या देशात ही टक्केवारी अनुक्रमे 95% व 93% आहे. दक्षिण आफ्रिकेतही परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे म्हणणाऱ्यांची संख्या 84% आहे. लॅटिन अमेरिकन देशातील ब्राझिलमध्ये 84% प्रतिसादकांचा नैतिकतेसाठी परमेश्वर हवा यावर भर आहे. परंतु मेक्सिको व अर्जेंटिनामध्ये हे प्रमाण 44% आहे. बायबल या धर्मग्रंथावर विश्वास ठेवणाऱ्या बहुसंख्य रोमन कॅथोलिक्सच्या या तिन्ही देशात माणूस नैतिक असण्यासाठी परमेश्वरी कृपा हवी याबद्दल त्यांच्या मनात संशय नाही.

**2002 व 2019 च्या सर्वेक्षणांची तुलना**

याच संस्थेने 2002 साली अशाच प्रकारचे एक सर्वेक्षण केले होते. 2019च्या सर्वेक्षणातील आकडेवारींशी यापूर्वीच्या आकडेवारीशी तुलना केल्यास काही देशामध्ये परमेश्वरावरील श्रद्धेबद्दलच्या मतात फरक झालेला जाणवतो. रशियामध्ये 11 टक्के वाढ झाली असून युक्रेनमध्ये 11 टक्के कमी झाली आहे. त्याचप्रमाणे बल्गेरिया व जपान या दोन्ही देशात वाढ झालेली असून उलट अमेरिकेत 14 टक्के कमी झाली आहे. त्याचप्रमाणे मेक्सिको, टर्की, दक्षिण कोरियातही नैतिकतेसाठी परमेश्वराची गरज आहे असे म्हणणाऱ्यांची आकडेवारी कमी झाली आहे.

**सकल राष्ट्रीय उत्पन्न (GDP)**

सामान्यपणे सकल राष्ट्रीय उत्पन्न (GDP) किती आहे यावरून देशाची आर्थिक स्थिती मोजली जाते. आपल्या देशाची 2018 साली GDP 2.72 लाख कोटी डॉलर्स (USD) होती. (अमेरिका - 20.54 लाख कोटी डॉलर्स केनिया - 8,790.83 लाख कोटी डॉलर्स, स्विडन - 55,608.6 लाख कोटी डॉलर्स) परंतु केवळ GDP देशाची खरी आर्थिक स्थिती दाखवू शकत नाही.

त्याच्याबरोहर त्या देशाची लोकसंख्या किती आहे हेही महत्वाचे असते. प्रती माणशी किती GDP आहे यावरून खरी आर्थिक स्थिती कळू शकेल. भारताची प्रती माणशी GDP 2010 डॉलर्स एवढी आहे. हे निर्देशांक त्या देशातील लोकांच्या क्रयशक्तीवर (Purchasing Power Parity – PPP) अवलंबून असते. प्यू रिसर्च सेंटरच्या सर्वेक्षणात परमेश्वरावरील श्रद्धा व नैतिकता यांचा प्रती माणशी GDPवर अवलंबून आहे, असे आढळले. स्थूल मानाने प्रती माणशी GDP व परमेश्वरावरील श्रद्धा व नैतिकता याबद्दलची टक्केवारी हे एकमेकाशी व्यस्त प्रमाणात आहेत असे म्हणता येईल.




उदाहरणार्थ केनिया येथील प्रति माणशी GDP सर्वेक्षण केलेल्या 34 देशात सर्वात कमी प्रती माणशी GDP आहे व 95 टक्के प्रतिसादकांचा परमेश्वरावरील श्रद्धामुळे नैतिकता टिकून राहते यावर विश्वास आहे. तद्विरुद्ध स्विडनची प्रती माणशी GDP सर्वात जास्त ($55,815) असून परमेश्वर व

नैतिकता यांच्यातील संबंधाविषयी फक्त 9 टक्के प्रतिसादक विश्वास ठेवतात. सामान्यपणे युरोपियन राष्ट्रे कमी प्रमाणात धार्मिक आहेत.

**वयोमान**

परमेश्वराची पाठराखण करणाऱ्यांचे सर्वेक्षण करत असताना वयोमानाप्रमाणेसुद्धा श्रद्धेत फरक पडतो हे लक्षात येते. पिढ्या-पिढ्यामधील अंतरसुद्धा परमेश्वर व नैतिकता यांच्या संबंधातील मतामध्ये फरक जाणवतो. 18 ते 29 या वयोगटातील प्रतिसादक 50च्या पुढच्या वयातील प्रतिसादकांपेक्षा कमी प्रमाणात परमेश्वरावरील श्रद्धेमुळे नैतिकता येते यावर विश्वास ठेवणारे आहेत. या पूर्वीच्या सर्वेक्षणातसुद्धा ही गोष्ट प्रकर्षाने जाणवली होती.

**Those with higher incomes less likely to see belief in God as necessary**

*% who say it is necessary to believe in God in order to be moral and have good values*

| | Lower income % | Higher income % | Diff |
|---|---|---|---|
| U.S. | 56 | 32 | -24 |
| Israel | 64 | 42 | -22 |
| Argentina | 68 | 48 | -20 |
| Bulgaria | 58 | 39 | -19 |
| Hungary | 37 | 18 | -19 |
| Lebanon | 79 | 65 | -14 |
| Poland | 43 | 29 | -14 |
| Canada | 33 | 20 | -13 |
| Slovakia | 56 | 44 | -12 |
| Germany | 43 | 31 | -12 |
| Spain | 28 | 16 | -12 |
| Australia | 25 | 13 | -12 |
| Mexico | 60 | 48 | -12 |
| Tunisia | 91 | 80 | -11 |
| Russia | 43 | 32 | -11 |
| Italy | 35 | 24 | -11 |
| Netherlands | 27 | 16 | -11 |
| UK | 25 | 14 | -11 |
| Greece | 59 | 49 | -10 |
| Ukraine | 57 | 47 | -10 |
| Sweden | 14 | 4 | -10 |
| Turkey | 80 | 71 | -9 |
| South Korea | 49 | 40 | -9 |
| Lithuania | 34 | 25 | -9 |
| Czech Rep. | 22 | 13 | -9 |
| France | 19 | 10 | -9 |

Note: Only statistically significant differences shown. Respondents with a household income below the approximate country median are considered lower income. Those with an income at or above the approximate country median are considered higher income.
Source: Spring 2019 Global Attitudes Survey. Q30.

PEW RESEARCH CENTER

दक्षिण कोरियातील 64 टक्के जेष्ठ नागरिकांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे असे वाटते. परंतु 18-29 वयोगटातील केवळ 20 टक्के प्रौढांना परमेश्वर व नैतिकता यांच्याशी संबंध जोडता येईल असे वाटते. हाच प्रकार ग्रीस, अर्जेंटिना, अमेरिका, मेक्सिको, जपान, पोलंड, हंगेरी या देशातही आढळते. परंतु ब्राझिल, नायजेरिया व भारत या देशात तरुण व वृद्ध पिढीत फार फरक जाणवत नाही.

**व्यक्तिगत पातळीवरील उत्पन्न**

व्यक्तिगत पातळीवरील उत्पन्नाच्या प्रमाणातसुद्धा हाच प्रकार दिसून येईल. ज्यांचे उत्पन्न जास्त आहे, त्यांचे परमेश्वरावरील श्रद्धा कमी आहे, हे काही देशातील सर्वेक्षणाच्या आकडेवारीवरून कळून येईल.

**शिक्षण**

प्रतिसादकांची शैक्षणिक पातळीसुद्धा परमेश्वरावरील श्रद्धेबद्दलचा एक निकष होऊ शकतो. अमेरिका व युरोपमधील सर्वेक्षणात जास्त शिक्षण घेतलेल्यांच्यामध्ये नैतिकतेसाठी परमेश्वर हवा याबद्दलचा विश्वास कमी आहे, हे लक्षात येते. शिक्षण व उत्पन्न यातही परस्पर संबंध असून शिक्षणानुसार हा विश्वास कमी जास्त होतो, हे सर्वेक्षणात स्पष्ट होत आहे.

34 पैकी 24 देशातील उच्च शिक्षित प्रतिसादक परमेश्वराचा नैतिकतेशी संबंध आहे यावद्दल कमी विश्वास ठेवत होते. परंतु इतर 10 देशात मात्र शिक्षणामुळे त्यांच्या विश्वासात काही फरक आढळला नाही. 15 देशातील प्रतिसादकांचे या बद्दलचे मत त्यांच्या राजकीय विचारांशी निगडित होते. जरी उजवी व डावी विचारपद्धती देशानुसार बदलत असली तरी सामान्यपणे उजव्या विचारगटातील प्रतिसादकांना नैतिकता व चांगुलपणासाठी परमेश्वरावरील श्रद्धा आवश्यक आहे अस वाटते. अमेरिका, ग्रीस, इस्रायल

मधील उजव्यागटांबरोबर डाव्यागटांतील अर्ध्यापेक्षा जास्त प्रतिसादकांना परमेश्वरावरील श्रद्धेमुळे माणूस नीतीवान होतो यावर विश्वास आहे. अमेरिका, पोलंड व ग्रीसमध्ये ही दरी 30 टक्केपेक्षा जास्त आहे. स्वीडनमध्ये उजव्या गटातील 10 टक्के प्रतिसादकसुद्धा नैतिकतेसाठी परमेश्वरावरील श्रद्धेची पाठराखण करत आहेत. 2 टक्के डाव्यांनासुद्धा असेच वाटत आहे. हंगेरी, स्पेन, कॅनडा, जर्मनी, इस्रायल, ब्राझिल, ऑस्ट्रेलिया, दक्षिण कोरिया, ब्रिटन, दि नेदरलँड्स, व स्वीडनमधील बहुतेक उजव्या गटांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे याबद्दल अजिबात संशय नाही.

**धर्माचे महत्व**

या सर्वेक्षणात (संघटित) धर्माविषयी प्रश्न विचारण्यात आले होते. तुमच्या आयुष्यात धर्माला आपण किती महत्व देता याविषयी अती महत्वाचे, कमी महत्वाचे, थोडे-फार महत्वाचे वा बिन महत्वाचे अशी वर्गवारी करणारा प्रश्न विचारला होता. इतर राष्ट्रांच्या तुलनेत युरोपियन राष्ट्रांनी धर्माला महत्व नाही असे उत्तर दिले. 34 पैकी 23 राष्ट्रांना धर्म ही बाब अत्यंत महत्वाची वाटते. इंडोनेशिया, नायजेरिया, ट्युनिशिया, दि फिलिपाइन्स, केनिया, भारत, दक्षिण आफ्रिका, ब्राझिल व लेबनान या राष्ट्रातील 90 टक्के प्रतिसादकांना धर्म अत्यत महत्वाचे वाटते.

यातील अनेक राष्ट्रांमधील जनतेंची त्यांच्या आयुष्यात धर्माविषयीची बांधिलकी जास्त प्रमाणात आहे. आकडेवारीप्रमाणे इंडोनेशिया (98%), नायजेरिया (93%), दि फिलिपाइन्स (92%), केनिया (92%), ट्युनिशिया(91%), दक्षिण आफ्रिका (86%), ब्राझिल (84%), भारत (77%) व लेबनान (70%) यांचा धर्माविषयीच्या बांधिलकीबद्दल क्रमांक लावता येईल.

युरोपमधील राष्ट्रं मात्र धर्माला जास्त महत्व देत नाहीत. धर्माला महत्व देण्याचे प्रमाण स्वीडनमध्ये 22%, झेक रिपब्लिकमध्ये 23%, फ्रान्समध्ये 33% व दि नेदरलँड्स व हंगेरीमध्ये 39% आहे.

बहुसांस्कृतिक युरोपमध्ये आयुष्यात पूर्णपणे धर्माला नाकारणाऱ्यांची संख्या लक्षणीय प्रमाणात आहे. झेक रिपब्लिक, फ्रान्स, दि नेदरलँड्स, स्वीडन, ब्रिटन या देशातील तरुण वर्ग इतर कुठल्याही ऑप्शनपेक्षा धर्म नको असेच म्हणत आहे.

त्याच वेळी ग्रीस, पोलंड, इटली येथील दहापैकी सहा प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवा असे वाटत हे. ग्रीसमधील 80% प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवासा वाटतो. जर्मनी, स्लोव्हाकिया, लिथुआनिया या युरोपियन देशांतील 55% प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवासा वाटतो. बल्गेरियात ही संख्या 59% आहे.

**प्रार्थना**

सर्वेक्षणातील एक प्रश्न प्रार्थनेविषयी होता. परमेश्वर जास्त महत्वाचा की त्याची प्रार्थना? या प्रश्नाला अर्ध्यापेक्षा जास्त देशांनी दोन्ही तितकेच महत्वाचे आहेत असे मत नोंदविले. 34 देशात 61% प्रतिसादकांना परमेश्वर महत्वाचा वाटतो व 53% प्रतिसादकांना प्रार्थना महत्वाचे वाटते.

आर्थिकरित्या विकसित असलेल्या देशातील प्रतिसादक परमेश्वराला नाकारल्याप्रमाणे प्रार्थनेलाही ते त्यांच्या आयुष्यात महत्व देत नाहीत. मात्र विकसनशील देश पूर्ण विकसित देशापेक्षा दुपटीने प्रार्थनेच्या उपयुक्ततेवर भर देत आहेत. दहापेकी नऊ विकसनशील देश परमेश्वराला त्यांच्या आयुष्यात महत्वाचा स्थान आहे यावर श्रद्धा ठेऊन आहेत. (अपवाद फक्त युक्रेनचा). त्या तुलनेने 11 विकसित देशात अर्ध्यापेक्षा कमी प्रतिसादक परमेश्वराला महत्व देत

आहेत. विकसित देशातील सरासरी 41% जणांना प्रार्थनेची उपयुक्तता आहे असे वाटते. परंतु हीच टक्केवारी विकसनशील देशात 96% आहे.

काही देशातील प्रतिसादकांना आयुष्यात प्रार्थनेपेक्षा परमेश्वरच जास्त महत्वाचा आहे, असे वाटते. इस्रायलमधील 71% प्रतिसादकांना प्रार्थनेपेक्षा परमेश्वर महत्वाचा वाटतो, तर 54% प्रतिसादकांना प्रार्थना महत्वाचा वाटतो. इस्रायलमधील मुस्लिम समुदायातील 96% जणांना व तेथील ज्यू समुदायातील 66% जणांना परमेश्वर महत्वाचा वाटतो, परंतु 81% मुस्लिम व 50% ज्यू प्रार्थनेली महत्व देत आहेत.

आयुष्यात परमेश्वराला महत्वाचे स्थान आहे याबद्दलचे मत हे प्रतिसादक कुठल्या धर्माचे आहेत यावर अवलंबून आहे, असे म्हणता येईल. आश्चर्याची गोष्ट म्हणजे बहुतेक देशातील धर्म न मानणाऱ्यामध्ये परमेश्वराला मानणारेसुद्धा आहेत. अमेरिका व अर्जेंटिनामध्ये सुमारे 30% निधर्मिकांचा परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास आहे. मेक्सिकोधील धर्मावर विश्वास न ठेवणारे बहुसंख्य जण त्यांच्या आयुष्यात परमेश्वराला महत्व देत आहेत.

ब्राझिल, केनिया व दि फिलिपैआइन्स मधील बहुतेक धार्मिक त्यांच्या आयुष्यात परमेश्वराला जास्त महत्व देत आहेत. त्याचप्रमाणे नायजेरियतीव मुस्लिम व क्रिश्चियन धार्मिकसुद्धा परमेश्वराला महत्वाचे स्थान देत आहेत.

**सोव्हिएत युनियनच्या अस्तानंतर**

१९९१नंतरच्या पश्चिम युरोपमधील देशात क्रिश्चियन धर्माला उतरती कळा लागल्याचे स्पष्ट संकेत अनेक अहवालामध्ये नमूद केलेले आहे. धर्माकडे बघण्याच्या दृष्टिकोनात स्पेन, इटली व पोलंड या कट्टर समजल्या जाणाऱ्या देशात २०१९च्या सर्वेक्षणात अनुक्रमे २६,२१ व १४ टक्के बदल झाला आहे. लुथियानियासकट बहुतेक युरोपियन राष्ट्रांमध्ये हाच ट्रेड अधोरेखित होत

आहे. पूर्वीच्या सोविएट संघातील या राष्ट्रात चक्क १२ टक्के फरक झालेला जाणवतो.

सोविएट संघराज्यात धर्मावर बंदी होती. परंतु सोविएटच्या अस्तानंतर रशिया व युक्रेनमधील धार्मिकांची संख्या वाढत आहे. बल्गेरियामध्ये १९९१साली धार्मिकांची संख्या 41% होती. ती २०१९मध्ये 55% झाली.

हाच ट्रेंड प्रार्थनेच्या बाबतीतसुद्धा दिसून येत आहे.

धर्म, परमेश्वर, प्रार्थना इत्यादीच्या बाबतीतील हे सर्वेक्षण जगभरातील जनसमुदायांच्या वैचारिक क्षमतेवर प्रकाश टाकत आहे. यावरून पुरोगामी, नास्तिक व अंधश्रद्धा निर्मूलन करणारे कार्यकर्ते इत्यादींचे कार्य किती कठिण आहे याची नक्कीच कल्पना येईल. वैचारिक क्षमतेवर पसरलेली श्रद्धेची गडद छाया लवकर काढता येणार नाही हे मात्र निश्चित.



# सायकलींचे आगळे वेगळे ‘विश्व’

आपल्यातील बहुतेकांना सायकल चालवायला शिकताना दोन चाकीच्या या वाहनावर पेड्लिंग करत करत कसे बसायचे, बसून बॅलन्स कसे साधायचे, कुणीही मागून न ढकलता पेड्लिंग करत हवेत तरंगल्यासारखे कसे जायचे, मित्र-मैत्रीणी-भाऊ-बहिणींना डबल सीट घेऊन या रोमांचकारी अनुभवात कसे सामील करून घ्यायचे, न धडपडता कसे उतरायचे इ.इ गोष्टींची नक्कीच मजा आली असेल. हा रोमांचकारी अनुभव फक्त तुम्हालाच नव्हे तर जगभरातील बहुतेकांना गेली शंभरेक वर्षे तरी आला असेल. मुलांच्यापेक्षा मुलींचा अनुभव नक्कीच वेगळा असेल. *घरात हे करू नको, ते करू नको, मान वर करून बोलू नको, सातच्या आत घरात,* अशा चित्र-विचित्र अटी-नियमांच्या जोखडातून मुक्त होत *आपण सायकल चालवू शकतो, सायकलीवर बसून मुक्त स्वातंत्र्य भोगू शकतो*; हा अंगावर काटे आणणारा अनुभव घेतलेल्या मुलींना सायकल ही एक त्यांच्यासाठी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठीचे फक्त एक साधन न राहता वेगळेच काही तरी आहे याची जाणीव झाली असेल.

गरीबातील गरीब देशापासून अती श्रीमंत देशापर्यंत सायकली वापरल्या जातात. बहुतेक शहरात व निमशहरात सायकल विक्रीची दुकानं असायची. गल्ली-बोळात सायकलींची दुरुस्ती करणारे सायकलचे ‘दवाखाने’ असायचे. त्यासमोर सायकल आडवे टाकून पंक्चर काढण्याचे दृश्य शहरातील मुलं-मुलींच्या कुतूहलाचा व टाइमपासचा विषय होता. स्वतःची सायकल नसणाऱ्यांना दर ताशी/दिवशी नाममात्र भाड्याने सायकली घेण्याची सोय असायची. कदाचित बहुतेक जणांनी भाड्याच्या सायकली घेऊनच सायकल चालविणे शिकले असेल. पोहणे व सायकल चालविणे या गोष्टी शिकल्याच पाहिजेत असा दंडक असल्यासारखे बालपणी या गोष्टी शिकविल्या जात

होत्या.  सगळयांच्या आवडत्या या वाहनाला कधीच ओहोटी लागणार नाही असेच त्याकाळी वाटत होते.

**सायकलचा शोध**

आता आपण वापरत असलेल्या सायकलीचा इतिहाससुद्धा मजेशीर आहे. हाडं खिळखिळे करणारे बोनशेकर्स (boneshakers) व एक लहान व दुसरे मोठे चाक असलेले पेनी-फार्दिंग सायकली एके काळी प्रसिद्धीच्या शिखरावर होत्या. सायकलींना केव्हाही आडवे पाडून हाडं खिळखिळे करणारे वाहन (बोनशेकर्स) असे म्हटले तरी त्याकाळीसुद्धा सायकली भविष्यासाठीचे  वाहन म्हणून मिरवत होत्या.

1810च्या सुमारास इंडोनेशियातील माउंट तंबोरा येथील ज्वालामुखी गंधकाची धूर ओकत होती. कदाचित त्याचाच परिणाम म्हणून की काय, युरोप खंडातील पिकं जळून खाक झाले. दुष्काळी परिस्थितीत अन्न-पाणीविना घोडे मरू लागल्या. सर्व जनजीवन ठप्प झाले. कारण त्या काळी घोडेच वाहतुकीचे प्रमुख साधन होत्या.  जर्मनी येथील कार्ल फॉन ड्राइसला घोड्याऐवजी दुसरे कुठले तरी घास-पाणी यांची अपेक्षा न करणाऱ्या साधनाचे स्वप्न दिसू लागले. त्याच्याच या कल्पनाविलासातून सायकलचा जन्म झाला. 1817च्या सुमारास कार्ल फॉन ड्राइसने तयार केलेला  घोड्याच्या आकारात असलेला हा ओबड-धोबड स्वरूपातील सायकलीच्या (“dandy horse”) प्रारूपात  आताच्या सायकलीत असल्याप्रमाणे पेडल्स, चेन-स्प्रॉकेट, ब्रेक यासारख्या गोष्टी नव्हत्या. या दोन-चाकी डँडी हॉर्सच्या  सांगाड्याला पायाने सरकवत सरकवत पुढे नेले जात होते. जरी हे अल्पजीवी ठरले तरी त्या काळच्या युरोपमधील संशोधक-उद्योजकांना मोठ्या प्रमाणात त्यातून प्रेरणा मिळाली. अनेक नवे उद्योजक त्या डँडी हॉर्समध्येच सुधारणा करत त्याला आधुनिकतेचे साज चढवू लागले. 1860च्या सुमारास या डँडी हॉर्सला बॉलबेरिंग्स, स्पोक्स असलेली

रिम व रिमभोवती पोकळ नसलेले भरीव रबराचे चाक, तरफाचा वापर करुन गीअर बदलण्याची यंत्रणा अशा अनेक सुधारणा करण्यात आल्या. एशिया व आफ्रिका खंडातील देशांच्या सायकलींना मागच्या बाजूला सामान ठेवण्यासाठी कॅरियरची सुविधा देण्यात आली. भारतीय महिलांच्यासाठी खास 'लेडीज' सायकली बनविण्यात आल्या.  काही काळानंतर खेळाडूंसाठी स्पोर्टस् सायकलींची भर पडली.

21व्या शतकाच्या अत्यंत आधुनिक तंत्रज्ञानयुगातसुद्धा संगणक व कार्सच्यापेक्षा जास्त पटीने सायकलींचे उत्पादन होत आहे. प्रदूषणाची होत असलेली वाढ व आकाशाला भिडत असलेल्या इंधनाच्या किंमतीमुळे सायकल हे यानंतरच्या जगाचे वाहतुकीचे एकमेव पर्यायी साधन ठरले जाणार आहे. त्याची लवचिकता हेच त्याचे गुणविशेष ठरत आहे.

**सायकलचे डिझाइन**

मुळात सायकलचे डिझाइन फारच सोपे व सुटसुटीत आहे व त्याची जोडणीसुद्धा तितकीशी किचकट नाही. सायकलीत काही मोजकेच सुटे भाग असल्यामुळे त्याची जोडणी एखादा अर्धप्रशिक्षित कामगारही सहजपणे करू शकतो.  सर्व सुटे भाग एकाच शेडमध्ये बनवून जोडणी करण्याचे कारण नाही. त्यामुळे सायकलीचे महत्वाचे सुटे भागच मोठ-मोठ्या काऱखान्यात तयार केले जातात व जोडणी नंतर केली जाते. कमीत कमी मजूरीवर काम करणारे कामगार ज्या देशात मिळतात तेथेच 80-90 टक्के सुटे भाग तयार होतात.

सायकलीचे पार्टस् बनविण्यासाठी स्टील, अल्युमिनम व अलीकडे कार्बन फायबर अशा गोष्टी वापरून भरपूर दणकट, वजनात कमी व भरपूर दिवस टिकणाऱ्या सायकलींचे उत्पादन करण्याकडे कल वाढू लागला. स्टील, अल्युमिनम वा कार्बन फायबरपासून  स्पेर पार्ट बनविणे युरोप-अमेरिकासारख्या श्रीमंत राष्ट्रांना अती खर्चिक (वा तंत्रज्ञानाच्या खालच्या

पायरीवरचे) वाटत असल्यामुळे सायकलीच्या सुट्या भागांचे उत्पादन करणारे तेथील कारखाने केव्हाच बंद पडले आहेत. आता सायकलींचे बहुतेक पार्ट तैवान, चीन, भारत या देशात तयार होतात, व हे सुटे भाग युरोप, दक्षिण आफ्रिका, ब्राझिल व अमेरिकासारख्या  श्रीमंत  देशांना पाठवून त्या त्या देशात जोडणी करून विकले जातात. खऱ्या अर्थाने जागतिकीकरणाचे प्रारूप सायकलीत मिळू शकते. रिम तैवान/भारतातून, स्टील अलॉय/अल्युमिनम/कार्बन फायबर चीन-जपानमधून, हबगीअर अमेरिकेतून, ट्यूब-टायर आणखी एखाद्या देशातून असे करत करत सायकलीचे विक्री व्यवस्थापन होत आहे. अशा प्रकारे उत्पादनाच्या व्यवस्थापनामुळे कळत न कळत  सायकलींच्या पार्टचे प्रमाणीकरण  होत असून ग्राहकाला याचा फार मोठा फायदा होत आहे. मोठ-मोठ्या कार्पोरेट्सची मक्तेदारी मोडून स्थानिक उत्पादकांचा सहभाग वाढविणे यातून शक्य होत आहे.

**आधुनिक सायकली**

परंतु अलीकडील काही वर्षात सायकलींचा वापर पूर्वीसारखे न राहता श्रीमंतांच्या व्यायामाचे व/वा छंदपूर्तीचे साधन म्हणून होत आहे. त्याचप्रमाणे सायकलीच्या वेगावर जास्त लक्ष दिले जात आहे. कमी वजन हे महत्वाचे घटक असून सायकलीच्या वायुगतिकीला जास्त महत्व प्राप्त होत आहे. जागतिक स्तरावर सायकलींचे मानक ठरविणाऱ्या संस्थेने सायकलीचे वजन 6.8  किलो असे ठरविल्यामुळे बहुतेक उत्पादक हे उद्दिष्ट गाठण्याच्या प्रयत्नात आहेत. या कमी वजनामुळे जास्तीत जास्त वेग मिळू शकेल याची खात्री वाटू लागली आहे. त्याचबरोबर खडकाळ व कच्च्या रस्त्यावरून वेगाने धावू शकणाऱ्या ट्यूब-टायरसाठीसुद्धा शोध चालू आहे. नवीन प्रकारच्या आताच्या या दणकट सायकली जगभरातील कुठल्याही प्रदेशात हजारो किलोमीटर्सचे

अंतर एकही पार्ट न बदलता सहजपणे पार करू शकतील असे उत्पादकांचा दावा आहे.

**सायक्लिंगची आवड**

पर्यावरण रक्षण व आधुनिक समाजाच्या गरजा यात मोठी दरी आहे. या गरजा प्रत्यक्ष/ अप्रत्यक्षरित्या प्रदूषणात भर घालत आहेत. त्यामुळे पर्यावरण संतुलन बिघडत आहे व त्यातून होत असलेले हवामान बदल मानवी जनजीवनावर मोठ्या प्रमाणात परिणाम करत आहे. ही दरी मिटविण्याचा एक मार्ग सायकलींच्या पुनरुज्जीवनात आहे. समाजात सायक्लिंगची आवड निर्माण झाल्यास काही प्रमाणात  प्रदूषण कमी करण्यास शक्य होईल असे तज्ञांना वाटत आहे.  प्रत्येक लहान-सहान गोष्टीसाठी 5-10 अश्वशक्तीच्या गाड्या वापरून वायू व ध्वनी प्रदूषणात भर घालण्यापेक्षा सायकलींचा वापर करणे इष्ट ठरेल. सायकलींच्या वापरासाठी पेट्रोल-डिझेलसारख्या इंधनाची गरज नाही. त्यामुळे प्रदूषण शून्य, परंतु जनसामान्यात पर्यावरण रक्षणाची मानसिकता विकसित न झाल्यामुळे गेल्या 30-40 वर्षापासून सायकली हद्दपार होत आहेत. एके काळचा घर-घरातील हा सोबती आता सायक्लिंगचे छंद जपणारा म्हणून वा वजन कमी-जास्त करण्याचे व्यायामाचे साधन एवढ्यापुरतेच राहिला आहे.

सायकलींचे उत्पादन वा त्याची उपलब्धता या गोष्टी फार महत्वाच्या नसून जनसामान्यात पुन्हा एकदा सायकलींची आवड निर्माण करण्याची गरज आहे. सायकल संस्कृती रुजविण्याची गरज आहे. शहरवस्तीतील जनसामान्यांच्यामध्ये पर्यावरण रक्षणासाठी सायक्लिंगबद्दल जागृती निर्माण करण्याची गरज आहे व त्यासाठी अनुकूलता उपलब्ध करून द्यावी लागणार आहे. व हे काम फक्त जागृत नागरिकच करू शकतील.

काही तज्ञांच्या मते आताच्या सायकलीच्या डिझाइनमध्ये बदल केल्यास शहरातल्या शहरात सायकलींचा वापर वाढविणे शक्य होईल. सायकलीचे डिझाइन शंभर वर्षापूर्वीचे असून काही क्षुल्लक अपवाद वगळता त्यात फार मोठा बदल झालेला नाही. तरुणाईला आकर्षित करण्यासाठी लुकमध्ये फार वेगळे दिसत असले तरी मूळ ढाचा तसाच आहे. काही सायकलींची सीट जास्त उंचावलेली असेल, काहीतील हब-गीअर उच्च प्रतीचे असू शकेल, काहींच्यात ट्यूबलेस् टायर्स असतील. परंतु डिझाइनमध्ये फार बदल नाहीत.

**लोकप्रतिनिधीकडून उत्तेजन**

जगभरातील काही शहरात यासंबंधीचे वेगवेगळे प्रयोग केले जात आहेत. यात त्या त्या शहरातील लोक प्रतिनिधींचा वाटा जास्त आहे. सायक्लिंगची आवड असणारे लोकप्रतिनिधी जिवाचे रान करून सायकल संस्कृतीला जिवंत ठेवण्याचे प्रयत्नही करत आहेत. जगभरातील सायकलींचे छंदिष्ट यासाठी पुढाकार घेत आहेत. काही नगरपालिका सायकलीसाठी स्वतंत्र ट्रॅकची सोय करत आहेत. काही शहरात नगरपालिका नागरिकांना सायकल वापरण्यास उत्तेजन देण्यासाठी एखाद्या कंत्राटदाराला नेमून शहरभर सायकलींची सेवा देत आहेत. सायक्लिंगची आवड निर्माण करण्यासाठी सायकल विकत घेणे, पार्किंगसाठी जागा शोधणे, त्याची देखभाल करणे वा चोरीस जाऊ नये यासाठी उपाय शोधणे या गोष्टींना फाटा देत  मोबाइलवर पैसे भरून व क्यूआर कोडच्या सहायाने लॉक-अनलॉकची सुविधा व कुठेही सायकली सोडून आपापल्या कामासाठी जाण्यास योग्य अशी यंत्रणा काही नगरपालिका राबवित आहेत.

लोकांचा सायकलीचा  वापर शासनांच्या ध्येय-धोरणावर पूर्णपणे अवलंबून आहे असे म्हणता येईल. सायकलींचा वापर सार्वजनिक रस्ते व इतर भागात होत असल्यामुळे लोकप्रतिनिधींच्या सकारात्मक निर्णयावर विसंबून

रहावे लागते. लोकांच्या दबावाविना सायकलींचा रस्त्यावरील वावरावर मर्यादा येऊ शकतात.  सायकली चालविण्यासाठी सुरक्षित रस्ते हवेत. जेथे कार्स/बसेससारखी वेगवान वाहने धावत असतात, त्या रस्त्यांच्या कडेकडेनीसुद्धा सायकली चालविणे असुरक्षित ठरते. कुठल्याही क्षणी अपघात होऊन सायकलस्वार मरण्याची शक्यता असते. खड्डे, खाच खळगे असलेल्या वा  निसरड्या रस्यावर  सायकल चालविणे कसरतीच्या खेळासारखे वाटेल व छोट्यातला छोटा अपघातसुद्धा सायकलीच्या वापराला परावृत्त करू शकेल. कार्स व मोटाराइज्ड बाइकच्या गर्दीत सायकल चालविणे जिवावर बेतू शकेल. 21व्या शतकातील रस्ते व रस्त्यांची देखभाल सायकल-फ्रेंड्ली नाहीत असे म्हणावेसे वाटते. त्यामुळे सायकलींना उत्तेजन देण्यासाठी नगरपालिका व नगरपरिषदांचे सकारात्मक दृष्टिकोनच हवे. लोकप्रतिनिधींनी पुढाकार घेतल्यास  स्थानिक प्रशासन सायकली वापरण्यास अनुकूल नीती-नियम करू शकेल. खरे पाहता सार्वजनिक वाहन व्यवस्थेच्या ठिकाणापासून घरापर्यंत सायकली वापरण्यास अनुकूल वातावरण निर्माण करणे सहज शक्य आहे. तसे केल्यास जनसामान्यसुद्धा काही प्रमाणात सायकली वापरतील.

**बायसिकल मेयर**

नेदरलँड्स येथील बीवायसीएस ( BYCS )  ही स्वयंसेवी संस्था निरनिराळ्या शहरातील सायक्लिंगचा छंद असलेल्या  गटांशी  संपर्क साधून सायकलींचा प्रचार व प्रसार करण्याचा विडा उचलत आहे. त्याचाच एक भाग म्हणून प्रत्येक शहरातील या सायक्लिस्ट्सच्या म्होरक्यांना बायसिकल मेयर म्हणून निवडले जात आहे. त्यांचा उद्देश '50/30'. म्हणजे 2030 पर्यंत त्या त्या शहरातील लोकांनी किमान 50 टक्के तरी त्यांच्या मोटराईजड वाहनांचा वापर कमी करणे. मुंबईकरांसाठी फिरोजा सुरेश यांची पहिले बायसिकल मेयर म्हणून निवड झाली आहे. तिला सायक्लिंगचे अक्षरशः वेड आहे. लहानपणापासून

तिने हा छंद जोपासला आहे. कॉलेजमध्ये शिकताना कॉलेजच्या आवारात सायकलीचे स्टँड नसल्यामुळे संघर्ष करून स्टँडची सुविधा उपलब्ध करून घेतली. 50 टक्के मुंबईकर कामासाठी सायकलीवरून जावे हा तिचा आग्रह आहे. तिला तर मुंबई सायकलींची राजधानी व्हावे असे वाटते. अशाच प्रकारचे अनेक गट पुणे, बेंगळूरू, हैदराबाद, दिल्ली येथेही कार्यरत आहेत.

**फोल्डेबल सायकल**

तरुणाईत सायक्लिंगचा आवड निर्माण करण्यासाठी अनेक प्रकारच्या कल्पना लढविल्या जात आहेत. 15-20 किलोमीटर्सची सायकल सहल, शहरातील रस्त्यावरील स्वयंचलित वाहनांची गर्दी कमी असलेल्या वेळी सायकलींच्या मॅराथॉन/ट्रायथ्लॉन अशा प्रकारच्या कार्यक्रमांचे आयोजन केले जात आहे.  शहराबाहेरच्या महामार्गावर सायकल शर्यतींचे आयोजन केले जात आहे. तरीसुद्धा हे सर्व प्रयत्न अपुरे पडत आहेत. त्यामुळे सायक्लिंगला आपल्या जीवनशैलीचा महत्वाचा भाग बनविण्यासाठी काय करता येईल याचा विचार होणे गरजेचे आहे.

एके काळी शहरामध्ये सायकल पार्किंगसाठी भरपूर जागा होती. परंतु गेल्या 50-60 वर्षात जमीनीच्या किंमतीत भरमसाठ वाढ झाल्यामुळे गोर-गरीबांच्या या वाहनाच्या पार्किंगसाठी जागा उपलब्ध नाही. काही उद्योजकानी त्यासाठी फोल्डेबल सायकलीचे उत्पादन करून पार्किंगचा प्रश्न मिटविण्याचा प्रयत्न करत आहेत. युरोपमधील ब्रॉम्पटन ही कंपनी स्विस नाइफप्रमाणे फोल्डेबल सायकलींचे मोठ्या प्रमाणात उत्पादन करत आहे. 20-25 सेकंदात घडी उघडून सायकल वापरता येते. अर्ध्या मिनिटात पार्किंग स्पॉटमध्ये सायकल लावता येते. कारमध्ये, घराच्या कोपऱ्यात वा ऑफिसच्या टेबलाखाली ठेवता येण्याजोग्य या पोर्टेबल सायकली असून त्यांची विक्री मोठ्या प्रमाणात होत आहे.

**इ-बाइक**

आधुनिक समाजाला वेगाचे अक्षरशः वेड लागलेले आहे व त्याला फार महत्वही दिले जात आहे. पूर्वीची संथगती बिनकामाची ठरत आहे. वाहतुकीच्या साधनात जास्तीत जास्त वेग असणे व या वेगाला साजेशे बुलेट ट्रेन्स, एक्सप्रेस हायवे, 6-8 पदरी रस्ते, शहरांतर्गत एकेरी मार्ग, फ्लायओव्हर्स, भुयारी मार्ग तयार करणे व त्यांची देखभाल करणे एवढेच काम जगभरातील कल्याणकारी राज्यसंस्था करत आहेत. व यासाठी पैसे मोजण्याला समाजाची पूर्ण तयारी असते. त्यामुळे या रॅट-रेसमध्ये सायकलीचे उत्पादकही उडी न घेतल्यास नवल वाटेल. त्यासाठी इ-बाइकची संकल्पना राबविली जात आहे.

इ-बाइक इंधनावरून चालणाऱ्या व किक् स्टार्ट वा स्टार्टिंगसाठी बटन दाबल्यावर गती घेणाऱ्या स्कूटर-मोटरसायकल्ससारख्या दुचाकीपेक्षा वेगळी असून सायक्लिंगच्या आनंदाबरोबरच काही प्रमाणात मानवी श्रमाची बचत करत वेगाची भूक पण मिटवणारी आहे, असा दावा उत्पादकांकडून केला जात आहे. जर्मनीत याचे यशस्वी प्रयोग झाले असून हे इ-बाइक लोकप्रिय होत आहेत. सायकलीला बॅटरीच्या ऊर्जेवर चालणारी मोटर व दीर्घकाळ ऊर्जा पुरविणारी बॅटरी यांची योग्य प्रकारे सांगड घालून इ-सायकल तयार केली जाते.

इ-बाइकची संकल्पना तशी फार जुनी आहे. 1895साली याचे पेटंट घेण्यात आले होते. त्यासुमारास काही उद्योजकांनी सायकलीच्या मागच्या चाकाजवळ डीसी मोटर जोडली व त्यासाठी 100 अँपीयर – 10 व्होल्ट बॅटरीची सोय केली. परंतु बोजड मोटर व त्यासाठीची बॅटरी यांचे वजन, त्याची देखभाल, वारंवार करावी लागणारी दुरुस्ती इत्यादीमुळे अशा प्रकारच्या सायकलींची विक्री अपेक्षेप्रमाणे होऊ शकली नाही. नंतरच्या काळात मोटर्स व बॅटरीत फार मोठ्या प्रमाणात सुधारणा झाल्या. मोटर्सचे गात्र आकुंचित झाले. बॅटरींचे

आयुष्य वाठले. देखभालीचा खर्च कमी झाला. याच गोष्टींचा वापर नंतरच्या काळात करून इ-बाइकचे पुनरुज्जीवन होत गेले. 1990मध्ये टॉर्क सेन्सार्स व पॉवर कंट्रोल वापरून इ-बाइकला आधुनिक स्वरूप दिले. निकेल-कॅड्मियमची बॅटरी वापरल्यामुळे सायकलीचे वजन कमी करणे शक्य झाले. जपानची यामाहा ही कंपनी 1995 ते 2004 पर्यंत अशा प्रकारच्या इ-बाइक – त्याला झाइक असेही म्हटले जाते – उत्पादन करून विक्री करू लागली. तरी या प्रकारच्या सायकलींना म्हणावा तितका प्रतिसाद मिळाला नाही. 2007नंतर मात्र चीन येथील प्रमुख शहरांच्या रस्त्यावर या प्रकारच्या इ-बाइक दिसू लागल्या. याची बॅटरी चार्ज करण्यासाठी 8 तास लागत होते. एकदा चार्ज केल्यानंतर सुमारे ताशी 20 किमी वेगाने 40-50 किलोमीटर्स अंतर पार करू शकते. पेडलिंग करून सायकलीला एकदा वेग दिल्यानंतर विनाश्रम ती सायकल चालते. नंतरच्या हायब्रिड इ-बाइक मध्ये मानवी ऊर्जेची विद्युत ऊर्जेत बदल करून व जास्त ऊर्जा बॅटरीद्वारे घेण्याची सोय केली गेली. अशा प्रकारे स्नायु ऊर्जा व बॅटरीच्या ऊर्जा यांचे संगनमत करून सायकली विकसित करण्यात येत आहेत.

यामुळे आता जगभरात खालील प्रकारच्या सायकली रस्त्यावर आहेतः

- केवळ स्नायु ऊर्जेवर चालणाऱ्या सायकली
- केवळ विद्युत ऊर्जेवर चालणाऱ्या सायकली
- स्नायु ऊर्जा व विद्युत ऊर्जा या दोन्हींचा वापर करून चालणाऱ्या हायब्रिड सायकली

इंधनावर चालणाऱ्या 50-80 सीसी मोपेड्समध्येसुद्धा पेडलिंग वापरत असले तरी त्या प्रदूषणमुक्त नाहीत. हायब्रिड इ-बाइकमध्ये गरजेनुसार विद्युत ऊर्जा वापरली जाते. व या प्रकारच्या बाइकमध्ये वेग हा गौण समजला जातो.

पारंपरिक सायकली व हायब्रिड इ-बाइकची तुलना  साधे मोबाइल व स्मार्ट फोनशी करता येईल. कदाचित अशा प्रकारचे इ-बाइकच पुढील काळातील शहरांतर्गत वाहन ठरण्याची शक्यता आहे. हे इ-बाइक ताशी 45 किमी धावण्याची शक्यता असल्यामुळे इंधनांचा वापर करून धावणाऱ्या दुचाकी-चारचाकी गाड्यांचा वापर कमी कमी होत जाणार आहे. तरुणाई अशा गाड्या वापरण्यास उत्सुक आहे. जर्मनी व नेदरलॅंड्समध्ये हे बाइक चांगलेच बस्तान मांडत आहेत.

**सायक्लिंगचा धोका**

आजच्या प्रदूषणदूषित जगात मानवी स्नायु बलावर धावणाऱ्या सायकलींसारखा दुसरा योग्य  पर्याय सापडणार नाही. तरीसुद्धा पर्यावरण स्नेही असलेल्या या वाहनाचा वापर फार कमी देशात होत आहे. अती असुरक्षित व धोकादायक वाहन म्हणून सायकलीवर न पुसणारा  शिक्का बसलेला आहे. थंडी-ऊन-पावसाच्या काळात त्याला घरात ठेऊन दुसरा पर्याय शोधावा लागतो. ब्रिटन, अमेरिका व आस्ट्रेलिया या देशात फक्त 1 टक्के लोकच याचा नियमितपणे वापर करतात. यालाही अपवाद आहेतच. नेदरलँड्स येथे 27 टक्के वापर होतो. कोपनहेगन या डेन्मार्कच्या राजधानीच्या शहरात 50 टक्के लोक नियमितपणे सायकलींचा वापर करतात. सायकलींचा वापर कमी होतो म्हणून मृत्यूदर काही कमी होत नाही.  अमेरिकेत दर 100 मिलियन किलोमीटर सायक्लिंगमागे 5.8 मृत्यु दर आहे. ब्रिटनमध्ये 3.6 परंतु सायकलीचा छंद जोपासणाऱ्या जर्मनीत हाच मृत्युदर फक्त 1.7 आहे व डेन्मार्कमध्ये 1.5 आहे. या आकडेवारीवरून जास्त प्रमाणात सायकलींचा वापर होत असल्यास मृत्युदर कमी होऊ शकतो व सायक्लिंग जास्त सुरक्षित असू शकते असा निष्कर्ष काढता येईल.

**वेगमर्यादा**

मुळात वेगाच्या बाबतीत सायक्लिंग मोटरिंगशी स्पर्धा करू शकत नाही, हे लक्षात ठेवावे लागेल. शिवाय  गेल्या शंभर वर्षात शहर नियोजन व/वा शहर सुधारणा मोटराइज्ड वाहनांना डोळ्यापुढे  ठेऊन केली आहे. शहरातील रस्ते, पार्किंग व्यवस्था, गल्ली-बोळातील घरापर्यंत जाणारे रस्ते, पदपथ, चौकांची रचना इत्यादीत कार्सच्या अनुकूलतेकडे लक्ष दिले आहे. त्यामुळे पायी चालणाऱ्यांनासुद्धा घाबरत, अडखळत चालावे लागते, रस्ते क्रॉस करावे लागते. कित्येक शहरात सायकलींसाठी स्वतंत्र रस्ते नाहीत, जेथे आहेत येथे बिनधास्तपणे दुचाकी पार्किंगसाठी वापरले जात आहेत. पदपथावर चालायचे असल्यास झाडं, विद्युत वितरण यंत्रणा (व पथारीवाले) हे अडथळे पार करत जावे लागते.

सायक्लिंग करत असताना वेगाने जाणाऱ्या कार्स/मोबाइककडे संपूर्ण लक्ष ठेऊनच पुढे जावे लागते. चुकून जरी थोडेसे दुर्लक्ष झाल्यास अपघाताला निमंत्रणच. कार्सचे तंत्रज्ञान कितीही प्रगत असली तरी कार चालविणारी माणसच असल्यामुळे थोडीशी चूक झाली तरी जीवावर बेतू शकते. बाइकस्वारं तर कुठल्या तरी युद्धाला तातडीने पोचावे यासाठी वाटेतील सर्व अडथळयांच्यावर हल्ला चढवत, वाकडे-तिकडे मिळेल त्या जागेत बाइक घुसवत जात असतात. त्यामुळे सायकलस्वारांना यांच्यापासून चार हात दूर असावे असे वाटत असेल. कार्समधील व्यक्ती मोबाइलवर किंवा कारमधील इतर प्रवाश्याशी बोलत असल्यास शेजारून धावत असलेल्या सायकलीला धक्का लागण्याची शक्यता जास्त.  लंडनसारख्या शहराप्रमाणे सायकलीसाठीचे स्वतंत्र रस्ते अरुंद असल्यामुळे अपघात होण्याचा संभव जास्त.

या सर्व अपघाती अवस्थेतून जात असलेल्या सायकलींना पुनरुज्जीवित करणे अत्यंत गरजेचे आहे. प्रदूषणातील वाढ व हवामान बदल यांच्यात

अन्योन्य संबंध आहे, हे कुणीही नाकारू शकत नाही. शहरांतर्गत प्रदूषण पातळी सर्व दैनंदिन जनजीवनावर विपरीत परिणाम करत आहे. हे स्रर्व टाळण्यासाठी सायकलींचा वाहन म्हणून उपयोगात आणल्याशिवाय गत्यंतर नाही. हे एकदा लक्षात घेतल्यास तातडीचे काही उपाय नक्कीच सुचतील. उदाहरणार्थ शहर वस्तीतील कुठल्याही खासगी वाहनाची वेगमर्यादा कमाल ताशी 25-30 किमी इतके नियंत्रित केल्यास प्रदूषण कमी होईल, वाहतुकीची कोंडी टाळता येईल व सायक्लिंग सुरक्षित होईल. एकदा हे वास्तव समजून घेतल्यास काही अपवाद वगळता सायकलीचे फायदे लोकांच्या अंगवळणी पडतील व पुन्हा एकदा सायकलींना चांगले दिवस येतील.

**सायकलीसाठी प्रगत तंत्रज्ञान**

डच वा डेनिश नागरिकांच्या मनातील कल्पनाविश्वाचे प्रारूप सगळीकडे राबविणे शक्य आहे का? प्रदूषणास कारणीभूत ठरणाऱ्या, घातक धूर ओकणाऱ्या चार चाकी वाहनाऐवजी सर्व देशात सायकली वापरल्या जातील का? विशेषकरून पावसाळ्यातील निसरड्या रस्त्यावरून सायकल प्रवास सुरक्षित राहील का?

**प्रगत तंत्रज्ञान सायक्लिंगला स्मार्ट करू शकेल का?**

तीन-चार-पाच रस्ते मिळत असलेल्या चौकातून सायकलीवरून जाताना सायकलस्वारांची भरपूर तारांबळ उडते. हे चौकच सायक्लिंगला सर्वात मोठे अडथळे ठरतात. कार्सचालकांना चौक ओलांडण्याची घाई. मोबाइकस्वारांना आपल्या बाइकच्या इंजिनाच्या प्रचंड क्षमतेचे/त्यांच्या ड्रायव्हिंग कौशल्याचे प्रदर्शन करण्याची घाई. त्यामुळे सायकलस्वार मेटाकुटीला येतो. व भांबावलेल्या अवस्थेत सायकल चालविण्याचा प्रयत्न करतो. यातून मार्ग काढण्याचे ठरविल्यास चौकातील सिग्नल यंत्रणेत सुधारणा करावी लागेल. पादचारी व सायकलींना चौक ओलांडताना गाड्यांचा अडथळा येऊ नये

यासाठी हिरव्या दिव्यातील काही वेळ फक्त यांच्यासाठी ठेवणे वा सायकलींच्यासाठी राखीव ठेवलेल्या  रस्त्यावर वेगळे हिरवे सिग्नल ठेवणे गरजेचे आहे. त्याचप्रमाणे लाल सिग्नलच्या वेळी सायकलस्वारांना पाय टेकण्यासाठी व्यवस्था करावी लागेल. त्यामुळे हिरवा सिग्नल लागल्यानंतर तत्परतेने ते पुढे जाऊ शकतील. जास्त चढ असलेल्या रस्त्यावरून जाताना सायकलस्वारांसाठी मदत करणारी Trampe bicycle lift सारखी यंत्रणा असल्यास सायकलस्वाराचे श्रम वाचतील. ही यंत्रणा असल्यास सायकलस्वार संतुलन संभाळत एकच पेडल वापरत पुढे पुढे जाऊ शकतो.

सर्वात महत्वाचे म्हणजे सायकलस्वारांना कारचालकांनी प्रयत्नपूर्वकपणे अवकाश देण्याची आवश्यकता आहे. पार्किंगस्पेस वा रस्त्यावर सायकलींना योग्य प्रमाणात स्पेस दिल्यास सायक्लिंग करण्यास उत्तेजन मिळेल. ‘सायकल प्रथम’ हे धोरण राबविल्यास सायकल चालविण्यात  आत्मविश्वास वाढेल. पालकांना सायकलीवरून जाणाऱ्या आपली मुलं-मुलीं धडधाकट परत येतील, याची खात्री वाटेल. पार्किंग स्पेसमध्ये ‘सायकल प्रथम’ हे धोरण राबविताना कार पार्किंगसाठी कारचालकांना नक्कीच भुर्दंड बसेल. त्यापायी तरी कार्सच्या बेधुंद वापरण्याला आळा बसू शकेल.

आधुनिक तंत्रज्ञानाचे फायदे सायक्लिंगला पोचविणे सहज शक्य आहे. मोबाइल ॲप्सद्वारे सायक्लिंगच्या वेळी एकमेकाच्या संपर्कात राहून सायक्लिंग करता येईल. जवळचा रस्ता शोधण्यास मदत होईल. गर्दीचे रस्ते टाळता येईल. अडचणीच्या प्रसंगी एकमेकांना मदत करता येईल. सायकलची चोरी होऊ नये यासाठी पूर्व सूचना देता येईल. रस्त्यावरील खड्ड्याबद्दलच्या माहितीचे देवाण घेवाण होईल.

सायक्लिंगसाठी आधुनिक तंत्रज्ञानाचा फायदा केवळ मोबाइलपुरते सीमित न ठेवता इतर ठिकाणीसुद्धा पोचवता येणे शक्य आहे. कार्समधील एअरबॅगचे

तंत्रज्ञान वापरून सायकलस्वारांच्या हेल्मेटची रचना करणे शक्य आहे. कार्समध्ये कार्सच्या अगदी जवळून जाणाऱ्या सायकलींचा वेध घेणारे सेन्सार्स कारमध्ये बसविल्यास संभाव्य अपघात टाळता येईल.

चीन येथील एका विश्वविद्यालयाने कारमधील डॅशबोर्डसारखी सायकलीसाठीच्या डॅशबोर्डबद्दल संशोधन करत आहे. सायकलीवर विविध प्रकारचे सेन्सार्स बसवून, पेडल्सचा वेग, त्याची वारंवारता, सायकलस्वाराच्या हृदयाचे ठोके इत्यादीबद्दलची माहिती प्रदर्शित करण्याची सुविधा हँडलच्या जवळपास बसविलेल्या डॅशबोर्डवर असेल. GPS जोडलेले असल्यामुळे कार्समधील डॅशबोर्डप्रमाणे सायकलीच्या मार्गक्रमणाची माहिती त्यात असेल. स्मार्टफोनशी जोडल्यास आणखी अनेक प्रकारची माहिती त्यात प्रदर्शित करता येईल. अल्ट्रासॉनिक सेन्सार्स बसविलेले असल्यामुळे वाटेवरील खड्यांची माहिती मिळेल व त्याप्रमाणे सायकलीची गती व दिशा बदलता येतील. अशा प्रकारच्या स्मार्ट सायकली एके दिवशी जवळपासच्या कार्स/मोबाइकशी परस्पर संवाद साधून अपघाताचे प्रमाण शून्यावर आणू शकतील. ही स्मार्ट सायकल अत्यंत सुरक्षित व सायक्लिंगचे आनंद देणारी असेल.

पुढील काळात अशा प्रकारे सर्व सोईनीयुक्त स्मार्ट इ-बाइक रस्त्यावर आणणे सहज शक्य आहे.  हे सर्व करूनसुद्धा कार्स/मोबाइकवाहक सायकलीवर स्वार करण्यास तयार होतील का हा प्रश्न अनुत्तरितच राहील. काही तज्ञांच्या मते सुरक्षिततेची हमी असल्यास 10-60वयोगटातील शहरवासीय शहरांतर्गत 10-15 किमीच्या प्रवासासाठी नक्कीच सायकली वापरतील, मात्र यासाठी त्यांच्या  सायकलविषयीच्या व पर्यावरण रक्षणाविषयीच्या मानसिकतेत फार मोठा  बदल झाल्यास हे शक्य होईल.

सायकल मेयर, फिरोजा सुरेशच्या स्वप्नातील  मुंबई सायकलींची राजधानीऐवजी इ-बाइकची राजधानी होण्याचे शक्यता जास्त असून ते दिवस फार दूर नाहीत.



# कोविड 19 की कोविड 21?

ज्याप्रकारे कोरोनाचे विषाणू भारतात आता हाहाकार माजवित आहेत त्यावरून गेले वर्षभर साथ पसरू नये यासाठी मास्क घालणे, शारीरिक अंतर ठेवणे व गर्दी न करणे इत्यादी नियमांचे (अर्धवटपणे का असेना!) पालन करणे हे सर्व करूनसुद्धा दुसऱ्या लाटेतील जीवित हानी आपण थांबवू शकलो नाही व यानंतर काही दिवसानी तिसऱ्या लाटेचाही सामना करावा लागतो की काय असे वाटण्याची दाट शक्यता निर्माण आहे. गेल्या 2-3 महिन्याच्या कोविड रुग्णांची वाढत्या संख्येकडे पाहिल्यावर कोरोनाचे उत्परिवर्तन होत असलेले कोविड 19 विषाणू नसून सर्वस्वी वेगळ्या प्रकारचे - कोविड 21 - विषाणू असावेत की काय असे वाटत आहे. त्यामुळे या अलीकडील रुग्णांसाठी अत्यंत वेगळी उपचार पद्धती शोधून काढावी लागेल की काय हा विचार डोकावत आहे. फेब्रुवारी-मार्च 21 मधील आकडे सौम्य वाटावेत इतके एप्रिलमधील रुग्णांच्या आकड्यात वाढ झाली आहे. 24 एप्रिल या एकाच दिवसाची भारतातील रुग्णसंख्या 346786 होती. जगाच्या रुग्णसंख्येच्या 20 टक्के भारतातील रुग्णसंख्या आहे.

दिल्ली व चेन्नईसारख्या मेट्रो शहरातील 3-4 महिन्यापूर्वीची रुग्णसंख्या (व मृतांची संख्या) तपासल्यास आपल्याला यानंतर या विषाणूंना घाबरण्याचे कारण नाही असेच संशोधकांसकट इतरांनासुद्धा वाटले असावे. आता मात्र या क्षेत्रातील सर्व संशोधक, अभ्यासक व उपचारतज्ञ या भूतो न भविष्यती अशा दुसऱ्या लाटेच्या तीव्रतेची आपापल्या परीने कारणं शोधत आहेत. विषाणूचे 2-3 वेळा झालेले उत्परिवर्तन की बेजबाबदार सामाजिक वर्तन की लशीकरणातून वाढलेल्या अपेक्षेतून निर्माण झालेली बेफिकिरी इत्यादी घटकांची सरमिसळ झाल्यामुळे हा भयानक प्रसंग आपल्यावर ओढवला आहे की काय याची चाचपणी घेतली जात आहे. फ्रान्स व जर्मनीतसुद्धा

लोकसंख्येच्या तुलनेने रुग्णसंख्या नक्कीच जास्त आहे. कोविड -19 ने बाधित झालेल्यांची उच्चांक गाठलेल्या  अमेरिका व ब्राझिल मधील रुग्णसंख्या आता 70 हजार असून भारताने मात्र तीन लाख ही संख्या केव्हाच ओलांडली आहे. हा 3 लाखांचा उच्चांक तर अमेरिकेत 2 जानेवारी रोजी नोंदला गेला होता. सप्टेंबर महिन्यात एक लाखाच्या आसपास असलेली रुग्णसंख्या झपाट्याने कमी होत गेली. परंतु हाच आकडा मार्चमध्ये वाढू लागला व सर्वांचे धाबे दणाणले. आताचा हा उच्चांक यापूर्वीच्या उच्चांकापेक्षा दुप्पट आहे.

मुंबईतीतल हिंदुजा हॉस्पिटलचे झरीर उडवाडिया या डॉक्टराने नेचर या साप्ताहिकाला दिलेल्या मुलाखतीत आताच्या दुसऱ्या लाटेची तीव्रतेची पहिल्या लाटेशी तुलना केल्यास पहिली लाट ही बाथटबमधील लाटेसारखी वाटेल असे म्हटलेले आहे. आरोग्य व्यवस्था संपूर्णपणे कोलमडली असून खाटांची अपुरी संख्या, प्राणवायुच्या सिलिंडर्सची कमतरता, व रुग्णाचे प्राण वाचविणारी म्हणून मागणी होत असलेली रेमडेसिविरसारख्या औषधांची उणीव इत्यादीमुळे रुग्ण मरणोन्मुखी ढकलले जात आहेत. या गोष्टी आपण कुठल्या गंभीर परिस्थितीतून जात आहोत याची झलक दाखवत आहे. अशोका विद्यापीठातील शहीद जमील या विषाणुतज्ञालासुद्धा दुसऱ्या लाटेची प्रतिक्षा होती. परंतु ती इतकी भयानक असू शकेल याची कल्पना नव्हती.

कुठल्याही विषाणूपासून पसरणाऱ्या साथीची तीव्रता त्या विषाणूंना काबूत ठेवणाऱ्या शरीरातील प्रतीपिंडांच्या प्रमाणावरून मोजली जाते. SARS-CoV-2 या विषाणूसंसर्गाच्या संबंधातील अभ्यासात डिसेंबर-जानेवारीपर्यंत आपल्या देशातील अर्धे-अधिक लोकसंख्येत या विषाणूची लागण झाली होती. तरीसुद्धा रोगप्रतिकारक शक्ती चांगल्या प्रकारे काम करत आहेत, असे चेन्नईतील विषाणूतज्ञांचा अंदाज होता. त्या सुमारास 27 कोटी भारतीयांना या

विषाणूची लागण झाली होती. ही संख्या संपूर्ण लोकसंख्येच्या 20 टक्के होती. त्यामुळे यानंतरच्या साथीची तीव्रता तेवढी असणार नाही असेच वाटत होते. परंतु ज्या प्रकारे विषाणू या महिन्यात धुमाकूळ घालत आहे त्यावरून सर्व अभ्यासकांना अंतर्मुख होऊन पुनर्विचार करण्याची पाळी आली आहे.

दोन आठवड्याच्या टाळेबंदीतून आपण कोविड विषाणूना पळवून लावू असे वाटत होते. कोविड 19ची रोग लक्षणं पंधरा दिवस नव्हे तर महिनोन महिने राहू शकतात याची कल्पना कुणालाच नव्हती. रोगाणू हा प्रकार कधीच स्थिर नसतो. पॅथोजिन्स बदलतात, शरीर बदलत जातो व वातावरण बदलते. कोविडच्या बाबतीत तर या तिन्ही गोष्टी 2020मध्ये बदलले होते. सुरुवातीच्या 10 कोटी कोविडग्रस्तामधून ही साथ नवे नवे रूप घेत वेगवेगळया प्रकारे त्याचा संसर्ग होत गेला. आपली रोग प्रतिकारक शक्ती बदलली, आपली जीवनपद्धती बदलली व सामाजिक-राजकीय परिमाण बदलत गेले. त्याच अनुषंगाने सार्वजनिक आरोग्यातील सोई-सुविधा व वैद्यकीय उपचारही बदलत गेले.

काही तज्ञं शहरातील गरीब वर्गच पहिल्या लाटेचे शिकार होतील, असे मत व्यक्त करत होते. परंतु त्या काळी प्रतिपिंडांचा अभ्यास नीट न केल्यामुळे काही गटामधील तीव्रता वाढली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. प्रतिपिंडांच्या मर्यादित विदावरून विषाणूंच्या असमतोल प्रसाराचा अंदाज आला नसेल. गंगादीप कांग या वेल्लोरच्या क्रिश्चियन मेडिकल कॉलेजच्या विषाणूतज्ञाच्या मते यापूर्वीचा सुरक्षित समजलेल्यांच्यात कदाचित हा विषाणू आता घुसला असेल. त्यामुळे शहरी श्रीमंत वर्ग दुसऱ्या लाटेत मोठ्या प्रमाणात बळी जात आहे. परंतु काही संशोधकांच्या मते ज्या प्रकारे व ज्या वेगाने हा विषाणू पसरत आहे त्यावरून या विषाणूत वेगळेच घटक असावेत. डॉ. उडवाडियांच्या नीरिक्षणानुसार या पूर्वीचे विषाणू कुटुंबातील एकेकट्यावर

हल्ला चढवत होते; आता मात्र कुटुंबच्या कुटुंबच या (नव्या) विषाणूचे बळी ठरत आहेत. कुटुंबातील एखादा जरी पॉजिटिव्ह असला तरी काही दिवसातच पूर्ण कुटुंब पॉजिटिव्ह आहेत हे कळल्यावर आश्चर्य वाटायला नको.

रुग्णांच्या जनुकीय विदांचे विश्लेषण केल्यानंतर पंजाबमध्ये ब्रिटनमध्ये सर्वप्रथम आढळलेला B.1.1.7 हा विषाणूचा प्रकार आढळला. महाराष्ट्रात B.1.617 हा प्रकार आढळला आहे. हा प्रकार दोन  वेळा उत्परिवर्तन झालेला विषाणू असून त्याच्यात प्रसार होण्याची क्षमता जास्त आहे व शरीरातील प्रतिकारशक्तीला न जुमानता तो प्रवेश करू शकतो. या प्रकारचा विषाणू आतापर्यंत वीस  देशात आढळला आहे. भारतातील प्रयोगशाळेत  अशा प्रकारच्या विषाणूंचे कल्चर करून लशीकरण झालेल्या व्यक्तीत यांची लागण थांबविण्याची क्षमता आहे की नाही यबद्दलचे प्रयोग केले जात आहेत.

भारतातील आताची स्थिती मागच्या वर्षीच्या ब्राझिलच्या स्थितीशी मिळतीजुळती आहे. विषाणूचा P.1 हा प्रकार रोगप्रतिकारशक्तीला टाळून पसरत आहे. डेव्हिड रॉबर्ट्सन या ग्लास्गो विद्यापीठातील विषाणुतज्ज्ञांच्या मते आता उपलब्ध असलेल्या महितीतून कुठलेही निष्कर्ष काढणे दुरापास्त ठरणार आहे. रुग्णांच्या संख्येच्या तुलनेत जनुकीय क्रमनिर्धारणाची (सीक्वेन्सिंग) संख्या अतिशय कमी आहे. त्यामुळे कुठलेही निष्कर्ष काढण्यापूर्वी जास्तीत जास्त काळजी घेणे गरजेचे ठरत आहे. काही तज्ज्ञांच्या मते हा नवीन विषाणू प्रकार देशातील अगदी कमी भागात पसरलेला आहे. बहुतांश भागातील जनुकीय क्रमनिर्धारणाशी त्या जुळत नाहीत, असे मत भारतीय वैज्ञानिक व औद्योगिक संशोधन संस्थेचे (सीएसआयआरचे) अनुराग अग्रवाल यांनी व्यक्त केले आहे.

दिल्लीस्थित विषाणूतज्ज्ञ, श्रीनाथ रेड्डी यांनी आताच्या भयानक परिस्थितीस  सर्व नियमांची पायमल्ली केल्यामुळे उद्भवली आहे, असे स्पष्ट

मत नोंदवली आहे. आपले शारीरिक अंतर न पाळणे, झुंडीने प्रवास करणे, मास्क न घालता गर्दी करणे, रॅली, क्रिकेटच्या स्पर्धा वा धार्मिक उत्सव इत्यादीमुळे होणाऱ्या गर्दीचा अंदाज न येणे, हे अनुचित वर्तन कुठल्याही साथीला आमंत्रण देणारी ठरू शकते, याचे भानच आपण ठेवले नाही. सप्टेंबरपासून रुग्णसंख्या झपाट्याने कमी होत गेल्यामुळे आपण कोविड 19वर मात केली म्हणून आत्मसंतुष्ट राहिलो व आपण कोविड 19 ला जिंकलो ही भाषा वापरू लागलो. व हीच बेफिकिरी आपल्याला आता भोवत आहे. या बेफिकिरीमुळे इमारतींच्या  आत व बाहेर गर्दी उसळू लागली व धार्मिक सण-उत्सवांना उधाण आले, मोठमोठे (विवाह) कार्यालयं तुडुंब भरल्या. व साथ आटोक्याबाहेर गेल्यामुळे रुग्णांची व मृतांची संख्या वाढू लागली.

जानेवारीपासून लशीकरण देण्यात येईल हे जाहीर विधानसुद्धा जनतेच्या बेफिकिरवृत्तीला खतपाणी घालत  प्रादुर्भाव वाढण्यास मदत केली असेल. त्यातही जनता दुसऱ्या लाटेचा इशारा गंभीरपणे घेतली नाही. ही वृत्तीच या महासाथीच्या गंभीर परिस्थितीस कारणीभूत ठरत आहे. आतापर्यंत 15 कोटी जणांनी ही लस टोचून घेतली आहे. ही केवळ पूर्ण लोकसंख्येच्या केवळ 10 टक्के असून आपल्याला अजून फार मोठा पल्ला गाठायचा आहे. लस टोचून घेण्यासाठी दवाखान्यात जमलेल्या गर्दीमुळेसुद्धा रुग्णसंख्या वाढण्याचा धोका आपण पत्करत आहोत.

हे सर्व कधी संपणार याची निश्चिती नाही. कोरोनाचा उसळणारा  रौद्रालेख कधी सपाट होणार हे सांगता येत नाही. त्यामुळे वैयक्तिक अनुभवावर वा ऐकीव, अवैज्ञानिक व कॉमन सेन्सला न पटणारे उपाय टाळून वैद्यकीयरित्या जे प्राथमिक उपाय सुचविले जात आहेत त्यांचे तंतोतंत पालन करणे हे आपल्या हातात आहे  व तेवढे करत राहणे सोपेही आहे.



# विषयानुसार अनुक्रमणिका

## आरोग्य



## गणित



## चिकित्सा

## पुस्तक परिचय

## विज्ञान/तंत्रज्ञान



## विवेकवाद